विश्व - वार्ता

# बाल्टिक राज्यांना पुनः स्वातंत्र्य

संयुक्त राष्ट्रसंघाने आपल्या ४६ व्या अधिवेशनात गेल्या १७ सप्टेंबर रोजी सात नव्या देशांना संघाचे सदस्य म्हणून मान्यता दिली. या देशात सोविएट संघातून फुटून स्वतंत्र झालेले खास तीन देश आहेत एस्टोनिया, लाटेविया आणि लियोनिया. संयुक्त राष्ट्रसंघाचे सदस्य बनलेले अन्य चार देश आहेत–उत्तर कोरिया, दक्षिण कोरिया, पॅसिफिक बेटांचे देश माइक्रोनेशिया आणि मार्शल द्वीप.




सोविएट संघापासून अलग झाल्यावर काही दिवसातच या तीन बाल्टिक राज्यांना संयुक्त राष्ट्रसंघाचे सदस्य बनविण्यात आले. रशियन साम्राज्यात समाविष्ट असलेल्या बाल्टिक देशांना सन १९१७ मधील रशियन राज्य-क्रान्तिनंतर झारच्या अधिकारशाही-तून मुक्ति मिळाली नि ते स्वतंत्र झाले. पण दुसऱ्या विश्व-युद्धानंतर सप्टेंबर १९३९ मध्ये सोविएट नेता जोसेफ स्टालिन आणि जर्मनीचा हुकुमशहा अडाल्फ हिटलर यांच्यातील तहानुसार सन १९४० मध्ये या देशांना सोविएट संघात विलीन होणे भाग पडले. पन्नास वर्षे सोविएट नियंत्रणा-खाली राहिलेल्या बाल्टिक राज्यांना आता पुनः स्वातंत्र्य लाभले. सर्वप्रथम लियोनियाने मार्च १९९० मध्ये आपल्या स्वातंत्र्याची घोषणा केली. ऑगस्ट महिन्यात रशियात झालेल्या विद्रोहामुळे अध्यक्ष गोर्बाचेव्ह जवळ जवळ ७० तास अधिकारावर नव्हते. या संधीचा फायदा घेऊन दुसरे देश एस्टोनिया व लाटेविया या राज्यांनी ही आपले स्वातंत्र्य जाहिर केले. जेव्हा गोर्बाचेव्ह परत आले आणि त्यांनी कारभाराची सूत्रे आपल्या हाती घेतली, तेव्हा बाल्टिक देशांच्या स्वातंत्र्याला त्यांनी अधिकृत संमति दिली. सोविएट संसदेने ६ सप्टेंबर



रोजी बाल्टिक देशांच्या स्वातंत्र्याला मान्यता दिली. अशा रीतीने ५० वर्षांच्या पूर्वीच्या इतिहासाची या देशांबाबत पुनरावृत्ति झाली.

हे सर्व झाल्यावर बाल्टिक देशांनी संयुक्त राष्ट्रसंघात सामिल होण्यासाठी आपली प्रार्थन-पत्रे पाठविली. या देशांची सदस्यता प्रथम सुरक्षा परिषदेने आणि नंतर विधान परिषदेने मान्य केली. या देशांना १९१७ ते १९४० पर्यंत तत्कालीन राष्ट्रसंघाचे (लीग ऑफ नेशन्स) सदस्यत्व मिळालेले होते. संयुक्त राष्ट्रसंघाची मान्यता मिळाल्यावर लाटेवियाचे अध्यक्ष अंटोली गार्बानोव्स आपला आनंद प्रकट करीत म्हणाले–"दुसऱ्या विश्वयुद्धानंतर संयुक्त राष्ट्र-संघाने आपले जे मित्र गमावले, ते त्यांना आज पुन्हा मिळाले आहेत!" संयुक्त राष्ट्रसंघाचे अध्यक्ष पेरेज डी कुलर यांनी ध्वजारोहणाच्या उत्सवात भाषण देताना सांगितले की राष्ट्र-संघाने सदस्यतेच्या स्वीकृति बरोबर एक आणखी खास निर्णय घेतलेला आहे.

संयुक्त राष्ट्रसंघात सामिल झालेल्या तिन्ही बाल्टिक देशांच्या अध्यक्षांनी तावड-तोब मागणी केली कि त्यांच्या राज्यांतील रशियन सेना काढून घेतली जावी. या सर्व अध्यक्षांनी सोवियत संघा बरोबर आपले राजकीय संबंध चालू रहावेत हे मात्र मान्य केले. या तिन्ही देशांच्या अध्यक्षांची अशी इच्छा आहे की सोविएट संघाचे उत्तम मित्र बनून त्यांनी प्रगति करावी.



# पित्याची इच्छा

सीतापूर गावात रामावतार नावाचा एक व्यापारी रहात असे. त्याचे एक वाणसामानाचे दुकान होते. दुकानच्या प्राप्तीतून घरखर्च बाहेर पडे, पण इतर व्यापाऱ्यांप्रमाणे 'चांगली कमाई करून धनवान बनायचे काही त्याला जमले नाही.

रामावतारच्या मुलाचे नाव होते मैथिली-शरण. तो आपल्या पित्याच्याच दुकानात बसून कामधंद्यात मदत करी. आपला मुलगा एक कुशल व्यापारी बनावा, त्याने तरी चांगला पैसा मिळवावा असे रामा-वतारचे स्वप्न होते.

एकदा शेजारगावचा त्याचा मेहुणा मोहनदास रामावतारकडे आला होता. बोलता बोलता रामावतारच्या मनातली गोष्ट त्याच्या लक्षात आली. तो म्हणाला–"तुम्ही माझं म्हणणं जरा नीट ऐकून घ्या दाजी. मला असं वाटतं की, तुम्हाला व्या-पारातली काही रहस्यं माहीत नाहीत. आमच्या गावात भगवानदास नावाचा एक कुशल व्यापारी आहे. मी शब्द टाकला तर तो आपल्या मैथिलीला आपल्याकडे नोकरीला ठेवेल. तिथे राहून तो व्यापाराचे बारकावे आणि काही ठोकताळे शिकून घेऊन आपली प्रगति करू शकेल. कशी काय वाटते कल्पना माझी?"

रामावतारने या प्रस्तावाला मान्यता दिली आणि दुसऱ्याच दिवशी मैथिलीशरण मोहनदासबरोबर रवाना झाला. गावी पोचल्यावर भगवानदासकडे त्याला घेऊन जाऊन मोहनदास म्हणाला–"शेठजी, हा माझा भाचा मैथिलीशरण! तुम्ही याला आपल्याजवळ ठेवून घेऊन व्यापारातले बारकावे शिकवून द्या. इथून पुढे याची जबाबदारी मी तुमच्यावरच सोपवत आहे."

तारा देशपांडे



एके दिवशी भूषण नावाचा एक ग्राहक भगवानदासच्या दुकानी आला अन् त्याने उत्तम प्रकारच्या उडदाच्या डाळीची मागणी केली. मैथिलीशरणने त्याला चांगली भारी प्रकारची डाळ दाखवली.

पण जरा इकडेतिकडे आणखी पहात भूषण त्याला म्हणाला–"छे! मला याहून चांगली डाळ हवी."

"हीच तर सर्वात उत्तम डाळ आहे. याहून आणखी चांगली डाळ नाही आमच्याकडे!" मैथिलीशरण उत्तरला.

ते ऐकून भूषण तेथून निघून जाणार, इतक्यात त्याला थांबवून भगवानदास मैथिलीला म्हणाला–"अरे, रात्री तो नवा माल नाही का आला आपल्याकडे? जा आतल्या खोलीत त्या डाव्या कोपऱ्यातल्या पोत्यातली डाळ काढून आण."

आता मैथिलीशरण जी डाळ घेऊन आला ती पाहून समाधानाने मान डोलवत भूषण म्हणाला–"हां, ही छान आहे डाळ!" आणि ती खरीदून तो निघून गेला.

भूषण गेल्यावर मैथिली म्हणाला–"शेठजी, ही दोन्ही उडदाची डाळ एकाच प्रकारची आहे ना? मग हे काय?"

भगवानदास हसून उत्तरला–"अरे, आपल्याकडे येणाऱ्या सगळ्याच गिऱ्हाइकांना काही बरंवाईट समजण्याची बुद्धी नसते. पण त्यांना वाटत मात्र असतं की आपण त्यांना फसवतो. मग ते आपल्याला मोठी अक्कल असल्याचा आव आणतात. अशा लोकांना आपल्या जवळचा एकच माल निरनिराळा दाखवला की ते खूष होतात. कळलं?"

आणखी एकदा असाच गिरिधर नावाचा एक माणूस दुकानात आला. दुकानात अगोदरच गर्दी होती. सर्वच नोकर आपापल्या कामात व्यस्त होते. पण गिरिधर आपल्या हातातली यादी मैथिलीशरणला देत म्हणाला–"अरे, मला फार महत्वाचं काम आहे. मला या वस्तु लवकर बांधून दे." आणि तो घाई करू लागला.



पण मैथिलीशरण नम्रपणे त्याला म्हणाला–"तुमच्या अगोदर आलेली गिऱ्हाइकंही बरीच आहेत. तुम्हाला जरा थांबावं लागेल."

गिरीधरला एकदम राग आला अन् तो तेथून जाऊ लागला. पण भगवानदास हसऱ्या तोंडाने त्याला थांबवत म्हणाला–"तुम्ही जरा एक मिनिट थांबा. तुम्हालाच अगोदर माल मिळेल." नंतर जरा बाजूला पाहून तो म्हणाला–"अरे कोण रे तो? अगोदर यांचं सामान बांध पाहू. अन् थांब जरा, यांना आतून गार पाणी आणून दे प्यायला. उन्हातनं आलेले दिसतायत हे साहेब."

हे ऐकून गिरिधर खूष होऊन तिथेच एका स्टुलावर बसला. त्याच्या अगोदर आलेल्या गिऱ्हाइकांना त्यांचा माल दिला गेल्यानंतरच गिरिधरचे जिन्नस बांधले गेले. पण तोवर तो शान्त बसून होता. नंतर आपला माल घेऊन तो काहीही तक्रार न करता निघून गेला.

मैथिलीशरण आता विचारू लागला–"शेठजी, या गिऱ्हाइकाचं वागणं मला चमत्कारिकच वाटलं. माझ्या बोलण्यावर रागावून तो निघून चालला होता. पण तुम्ही सामान उशीरानेच बांधवून दिलंत तरी त्याने काही तक्रार केली नाही. याचं काय बरं कारण असावं?"



"मैथिली बेटा, अरे काही गिऱ्हाइकांना असं वाटत असतं की आपल्याला जरा स्पेशल वागणूक मिळावी, आपल्याकडेच दुकानदाराने अगोदर पहावे. अशा ग्राहकांना इतर सर्वांसमोर खास वागणूक मिळाली, आपण त्यांना मान दिला, की ते खूष होतात." भगवानदासने मैथिलीशरणची शंका दूर केली. एकदा चित्तरंजन नावाचा माणूस दुकानात आला. सामान ताब्यात घेतल्यावर तो म्हणाला कि "पैसे एका आठवड्यानंतर पाठवून देईन." मैथिली लगेच त्याचे नाव खाते-वहीत लिहू लागला.

पण भगवानदास त्याला एकदम म्हणाला–"अरे, या चित्तरंजनजींसारख्या



बड्या माणसांची उधारी वहीत लिहायची काही गरज नाही. ते आपण होऊन येऊन पैसे देऊन जातील बघ."

चित्तरंजन आनंदाने निघून गेला. त्याबरोबर शेठजी मैथिलीला म्हणाले–"हं, आता चित्तरंजनजींची उधारी लिहून टाक आपल्या वहीत."

आश्चर्याने मैथिलीशरण म्हणाला–"असं का म्हणता शेठजी? आत्ताच तर म्हणालात ना, कि नाव लिहायची काही जरुरी नाही? मग त्याच्यासमोर असं बोलून आता मला लिहायला का सांगता?"

यावर हसत शेठजी म्हणाले–"व्यापारात कुणावर एका मर्यादेबाहेर विश्वास ठेवू नये. पण देखावा मात्र करावा लागतो. चित्तरंजनसारख्या माणसाच्या प्रामाणिकपणावर आपण विश्वास दाखवला की तोही प्रमाणिकपणाला बांधला जातो. पण त्याची जर अशी समजूत झाली की आपण विसरून जाऊ, तर अशा वेळी खाते-वहीचा उपयोग होतो."

एक वर्ष निघून गेले. भगवानदास मैथिलीशरणला म्हणाला–"तुला मी व्यापारातले बरेच बारकावे शिकवून दिले आतापर्यंत. आता फक्त एकच शिकवायचं राहिलंय. ते म्हणजे उधारीची वसुली. ते ही शिकलास म्हणजे झालं. श्रियालकडून आपले शंभर रुपये येणं आहेत. जाऊन ते वसूल करून आण बरं."

नंतर मैथिलीने दोन-तीनदा जाऊन श्रियालकडे पैशांची मागणी केली. पण तो दाद देईना. पैसे मिळतील याचा भरोसा वाटेनासा झाला. तरीही एकदा तो आणखी काही माल घ्यायला दुकानवर आलाच. तेव्हां रागाने मैथिली त्याला म्हणाला–"मागची वसुली होईपर्यंत आता तुम्हाला काही उधारी मिळणार नाही."

पण इतक्यात भगवानदास मधेच म्हणाला–"श्रियाल, तुला हवा तो माल आत्ता घेऊन जा, अन् एकदा सर्व उधारी चुकती करून टाक. तुझे पैसे जाताहेत कुठं? हं, तुझ्या मुलीचं लग्न ठरल्याचं ऐकलंय! ही उधारी परत केलीस तर लग्नाच्या वेळी हवा तेवढा माल उधार घेऊन जा बरं का!"

भगवानदासच्या आश्वासनामुळे चारच दिवसात येऊन श्रियालने उधारीची सारी रक्कम जमा करून टाकली. नंतर एक आठवड्याने मुलीच्या लग्नासाठी सामान घ्यायला तो जेव्हां दुकानात आला तेव्हां भगवानदास त्याला म्हणाला–"हल्ली व्यापार काही पूर्वीसारखा बरा चालत नाही माझा. त्यामुळे यावेळी मी तुला काही उधारीने माल देऊ शकणार नाही; गैरसमज नको करून घेऊस. तू आणखी एकाद्याकडे प्रयत्न करून पहा."

यावेळी खूपसे सामान घेण्याचा श्रियालचा विचार होता. पण भगवानदासचे बोलणे ऐकून त्याचा चेहरा पडला. आपल्या मनातलं काळंबेरं भगवानदासने ओळखल्याचे त्याला कळून चुकले, अन् तो मुकाट्याने तेथून निघून गेला.

आश्चर्याने आपणाकडे पहात असलेल्या मैथिलीला शेठजी म्हणाले–"खरं पहाता श्रियालकडे पैसा कमी नाहीय. पण उधार नेऊन सामान हडप करायची वाईट खोड आहे त्याला. अशा माणसांना संधी साधून असाच धडा शिकवायला हवा."

अशा प्रकारे आणखी काही दिवस गेल्यावर मैथिलीशरणला आपल्याजवळ बसवून घेऊन भगवानदास मोठ्या प्रेमाने त्याला म्हणाला–"आता तू व्यापारांतल्या सगळ्या खुब्या, सर्व रहस्यं शिकला आहेस. आता आपल्या घरी जाऊन वडिलांचा धन्दा तू स्वतःच्या हाती घे."

कृतज्ञतेने भगवानदासच्या पाया पडून मैथिलीशरणने त्याचा आशिर्वाद घेतला आणि आपल्या गावी जाऊन पित्याचा व्यवसाय त्याने आपल्या हाती घेतला. आता त्याच्या हातून व्यापाराची चांगली भरभराट झाली. अशा प्रकारे मैथिलीने आपल्या पित्याची इच्छा पूर्ण केली.



# धोक्याची आगाऊ सूचना

सुदीप त्या ऑफिसमध्ये नव्यानेच नोकरीला आला होता. नोकरीच्या पहिल्याच दिवशी, तेथे आधीपासून काम करणारा सुरेश त्याला एकान्तात म्हणाला–"हे बघ सुदीप, ही जागा तुला नवखी आहे. इथल्या लोकांशी जरा संभाळूनच वाग. जरा कुणाजवळ पैसे दिसले की बास, लगेच उधार मागायला लागतात! एकदा का पैसे दिले, की संपलंच! ते वसूल करायला फार त्रास होतो! माझं हे बोलणं नीट लक्षात ठेव हं!"

इथपासूनच सुदीप आणि सुरेश यांच्यातली मैत्री वाढू लागली. पहिली तारीख आली अन् सुदीपने सुरेशची सूचना लक्षात ठेवून निश्चय करून टाकला, कि कोणी उधार पैसे मागितले तर मुळीच द्यायचे नाहीत. पण बरेच दिवस गेले, तरी त्याच्याकडे कोणीच उसने पैसे वगैरे मागितले नाहीत.

एक दिवस सुदीप अन् सुरेश काही खरेदीसाठी बरोबरच बाजारात गेले. सुरेशने काही सामान घेतले. पण बिल देताना त्याला पन्नास रुपये कमी पडू लागले.

सुरेश सुदीपला म्हणाला–"आता मला यातलं काही सामान कमी करावं लागेल. तू जरा मला पन्नास रुपये दे न. उद्या सकाळी ऑफिसात आल्याबरोबर तुझे पैसे देऊन टाकीन मी."

सुदीपने चटकन आपल्या खिशातून पन्नासची नोट काढून आपल्या प्रिय मित्राला दिली. पण नंतर बरेच दिवस सुरेशने त्याचे पैसे परत दिलेच नाहीत. शेवटी एक दिवस सुदीपने त्याला पैशांबद्दल विचारले.

यावर सुरेश म्हणाला–"मी तर तुला अगोदरच सुचवलं नव्हतं का, कि कुणाला उसने पैसे दिलेस तर लवकर वसूल होणार नाहीत? आता काही दिवस वाट पहा; माझ्याकडे तुला देण्यासारखे पैसे जमले, की परत करीन मी तुझे पन्नास रुपये!"

–प्रकाश परांजपे






[ ९ ]

[पूर्वकथा: अपूर्व हा यंत्राच्या मार्फत निर्माण झालेला एक विचित्रसा मानव. त्याने समीरच्या मदतीने समुद्री चाच्यांच्या तावडीत सापडलेल्या पाच मुलांना वाचवले. चाच्यांची आणखी एक टोळी लपवलेला खजिना पळवून नेण्यासाठी शिलाद्वीपावर पोचली. तेथे पोचल्यावर ते चोर दारूच्या नशेत बेहोश पडलेले असताना अपूर्व, समीर व त्या पाच मुलांनी मिळून खजिना नावेत घातला व ते परत फिरले. —पुढे वाचा।

नावेत बसून मुलं किनाऱ्याकडे निघाली.

दुष्ट समुद्री चाच्यांना पकडून देऊन राजाकडून शाबासकी मिळवलेला समीर अन् त्याचे मित्र पुन्हा कसल्याशा कामगिरीवर समुद्रात गेले असल्याची खबर ऐकून आसपासच्या गावचे कैक लोक सागरकिनाऱ्यावर जमून त्यांच्या परतण्याची वाटच पहात होते.

दुरून नाव येताना पाहून त्यांच्या उत्साहाला भरतं आलं. ते सर्व आरडा-ओरडा करू लागले–"अरे, पहा, तो पहा समीर, ती पहा इतर सारी मुलं!" नंतर त्यातली काही उत्साही माणसं ही खबर पोचवण्यासाठी गावाकडे धावली.

सागर किनारी थोड्या अंतरावर एक सुंदरसा बगीचा आणि त्याच्या मधोमध



एक इमारत होती. बाग फुलझाडं नि फळांचे वृक्ष यांनी भरून गेला होता. बागेत एक कारंजं थुई-थुई उडत राही. बागेची निगा राखणारा माळी आणि रखवालदार या झाडांवर पुत्रवत् प्रेम करीत. कोणाला झाडांला हात लावू देत नसत. फुलं झाडावरच सुकून जात नि फळं म्हणजे आसपासच्या पक्षांना मेजवानी! विश्रान्ती-साठी राजा कधीकधी तिथे येऊन रहात असे. आताही राजा नेमका तेथे आलेला होता. राजालाही ठाऊक झालं की ती साहसी मुलं पुन्हा समुद्रावर गेली होती, अन् आता ती परत येत आहेत. त्या मुलांबद्दल, विशेषत: समीरबद्दल राजाला विशेष प्रेम वाटे. त्यामुळे त्यालाही मुलांना भेटायची इच्छा होती. तो ताबडतोब घोड्यावर स्वार होऊन समुद्रकिनारी पोचला. त्याच्या-मागोमाग त्याचे सुरक्षा-सैनिकही होतेच. त्याच गर्दीत सर्व मुलांचे आईबाप अन् अन्य बंधूतही होते. राजाला पाहून नमस्कार करत सर्वांनी त्याला वाट करून दिली. समुद्र-किनाऱ्यावर राजासाठी छोटा शामियाना उभारला गेला. आसपासचे लोक शिस्तीने वागू लागले. पाळीपाळीने येऊ लोक राजाचे दर्शन घेऊन जाऊ लागले. किनाऱ्यावर पाहण्यासारखे सुंदर दृश्य दिसू लागले.

"मुलं आत्ता कोणत्या कामगिरीवर गेली होती, याबद्दल तुम्हाला काही माहिती आहे?" राजाने जनतेला उद्देशून विचारले.

"नाही महाराज!" लोकांच्यात उभ्या असलेल्या गाव-प्रमुखाने उत्तर दिले.

नावेच्या कडेवर बसलेल्या अपूर्वने किनाऱ्यावरच्या राजा आणि इतरेजनांना ओळखले. तो समीरला म्हणाला—"आता मी चलतो. पुढील काम तू व्यवस्थितपणे करशील याची मला खात्री आहे. खजिन्याची काळजी घ्यायला राजा समर्थ आहे. आपली काळजी दूर झाली. तू राजाला सांग, की या खजिन्याचा उपयोग गरीब प्रजेचे हाल कमी करण्यासाठी केला जावा."



समीरने भक्तिपूर्वक अपूर्वला नमस्कार केला. पण आपल्यापासून दूर होताना त्याला दु:ख होत आहे, हे जाणून अपूर्व त्याला म्हणाला—"मित्रा, धैर्य सोडू नकोस. सर्व काही चांगलंच होईल. खजिना हाती आल्याच्या आनन्दात त्या शिलाद्वीपावर बेशुद्ध असलेल्या डाकूंना विसरू नकोस. त्यांना तसंच सोडलं तर तहानभुकेनं मरून जातील बिचारे! ते डाकू असले तरी माणसच आहेत. सुसंस्कारांच्या अभावी बिचाऱ्यांनी डाकुगिरीचा व्यवसाय पत्करला. ते सन्मार्गी लागतील असा प्रयत्न व्हायला हवा. त्यांना तहान-भुकेनं मरू देणं केव्हा ही योग्य नाही. त्यांना वाचवण्याबद्दल राजाला विनन्ती कर."

इतके बोलून त्या माशांपैकी एका डॉल्फिनवर अपूर्वने उडी मारली अन् तो मासा अपूर्वच्या मनातला विचार ओळखून नावेपासून दूर होऊन किनाऱ्याकडे झेपावू लागला.

नदीचे पाणी जेथ सागराला मिळत होते, तेथे नाव पोचली. तिथे लाटा कमी असल्यामुळे पाणी शान्त होते. तिथे नाव सुरक्षितपणे किनाऱ्याला लावणे सहज शक्य होते. काही सशक्त लोक पाण्यात उतरून नाव किनाऱ्याकडे आणू लागले.

राजाला नमस्कार करून, आपण खजिना मिळवल्याची हकिकत समीरने निवेदन केली. राजाने स्वत: नावेजवळ जाऊन पाहिले. मोठमोठ्या पेटाऱ्यातले





ते सोन्याचे दागिने आणि चान्दीची नाणी वगैरे पाहून त्याच्या आश्चर्याला पारावार राहिला नाही. समीरने सुचवल्यावरून राजाने कबूल केले की या धनाचा उपयोग गरीबांसाठीच केला जाईल. प्रत्यक्ष त्याचा उपयोग कसा केला जावा याबद्दलही समीरनेच सूचना द्याव्या असेही राजाने त्याला सांगितले. गरीबांसाठी खजिन्याचा उपयोग कसा करावा याबाबत समीरच्या डोक्यात अनेक कल्पना येऊन गेल्या. पण त्यांबाबत आता राजाशी बोलण्याची ही वेळ नव्हती.

"महाराज, तूर्त हे धन आपल्या विश्रामगृहातच सुरक्षित ठेवावे. या धनाच्या सदुपयोगाच्या बाबतीत आपण नंतर विचार करू." समीरने सुचवले.

"ठीक आहे, तसेच करू." राजा म्हणाला.

"आणखी एक खास विनन्ती आहे महाराज." समीर नम्रतेने बोलला.

"हां बोल!" राजाने आश्चर्याने विचारले.

"शिलाद्वीपवर अडकलेल्या त्या डाकूंना इकडे किनाऱ्यावर आणायला हवं प्रभु!" समीरने सुचवले.

"कां? तिथेच राहू देत की त्यांना! आपोआप त्यांना चांगली शिक्षा होईल!" राजा म्हणाला.

"मरून जातील ते तिथे महाराज. डाकू झाले म्हणून काय झालं? शेवटी माणसंच आहेत ना ती!" समीर कळवळला.

"पण तिथून आणलं तरी इथे त्यांना मृत्युदंड द्यावा लागणार नं? कित्येक बिचाऱ्या निर्दोष लोकांना छळून त्यांचा खून करणाऱ्या त्या राक्षसांना यापेक्षा आणखी उत्तम शिक्षा दुसरी ती काय असणार?......पण ठीक आहे. तुझ्या इच्छेनुसार प्रथम त्यांना इथे आणू अन् मग व्यवस्थित न्यायनिवाडा करून त्यांना उचित शिक्षा देऊ." असे म्हणून राजाने आपल्या अंगरक्षकांपैकी एकाला लगेच राजधानीकडे पिटाळले.

यानंतर राजाज्ञेने सारा खजिना विश्रामगृहात पोचता झाला.

दुपारपर्यंत पन्नास शिपाई आणि दोन मोठमोठ्या नावा निघायला तयार झाल्या. वाट दाखवण्यासाठी समीर आणि त्याचे पाच मित्रही निघाले. मुलं आणि सेनापती त्या डाकूंच्याच नावेत बसले. ही नाव पुढे आणि मागोमाग शिपायांच्या दोन नावा कामगिरीवर निघाल्या. सर्वजण पहाटेच्या सुमारात शिला-द्वीपावर पोचले. नावा कुठे बांधायच्या हे समीरने दाखवले. तेथून अगदी थोड्याच अंतरावर मोठमोठे खडक होते.

अचानक एक मोठा पत्थर उडून सेनापतीजवळ येऊन पडला. पटकन उडी मारून बाजूला होत सेनापती म्हणाला—"ते मूर्ख आपल्यावर हल्ला करू पहात आहेत." अन् खडकांच्या दिशेला तोंड करून तो ओरडला—"तुम्ही कितीही झगडलात तरी आमच्या हातून वाचू शकणार नाहीत! तुम्ही फक्त पाच आहात आणि आम्ही आहोत पन्नास! माझं ऐका, आत्मसमर्पण करा म्हणजे तुम्हांला शिक्षाही काही कमी मिळेल. पण आम्हाला विरोध करू पहाल तर





मृत्युदण्डच तुमच्या नशिबी येईल." गंभीर आवाजातलं सेनापतीचं हे आव्हान ऐकूनही एका मागोमाग एक दगड हवेतून सरसर येतच राहिले. "हं, आता फेका दगड कसे फेकता ते!" असे म्हणून सेनापतीने शिपायांना आज्ञा दिली आणि त्यांनी ताबडतोब त्या दिशेने बाणांचा वर्षाव केला. बस, पत्थरफेक ताबडतोब थांबली.

सेनापती समीरला म्हणाला–"तू आणि तुझे दोस्त या नावेतच लपून रहा. त्या डाकूंच्या नजरेला मुळीच पडू नका. आम्ही त्यांना पकडून आणतो. आणि तो स्वत: नावेतून उतरला.

सेनापतीने पुन्हा एकदा आत्मसमर्पण करण्याबद्दल ओरडून आव्हान दिले पण चोरांकडून काहीच उत्तर आले नाही. शिपायांनी उंच उंच खडकांवर चढून पाहिले, पण त्या पाच डाकूंचा कुठेच पत्ता नव्हता!

"कुठल्यातरी गुहेत लपले असतील ते." असे म्हणून आणखी दहा शिपायांना तेथेच प्रवेशाशी पहाऱ्याला ठेवून सेनापतीने बाकी चाळीस शिपायांचे पाच-पाचांचे गट बनवले. नंतर सेनापतीने त्यांना गटागटाने सर्व गुहा तपासून पहायला सांगितले.

समीर व त्याचे मित्र उत्सुकतेने हे सर्व पहात होते.

"समीर!" एक मृदु आवाज ऐकून समीर एकदम आश्चर्याने तिकडे पाहू लागला.

एका शिळेवर हसत उभा असलेला अपूर्व त्याला दिसला.

"अरे, ते डाकू पूर्वेकडच्या बाजूच्या गुहेत. सेनापतीला ताबडतोब तिकडे जायला सांग समीर. उशीर नको उगीच." अपूर्वने त्याला सांगितले.

मोठ्या उत्साहाने समीरने नावेवरून खाली उडी मारली आणि तो सेनापतीकडे पळत सुटला.



"अरे, मी तुला नावेतच बसून राह्यला सांगितलं होतं नं? इकडे येणं धोक्याचं आहे बेटा!" सेनापतीने त्याला दटावले.

"तुमचं म्हणणं अगदी बरोबरच आहे. पण तुम्हाला एक खास गोष्ट सांगायसाठीच यावं लागलं मला. ते पाचही डाकू पूर्वेकडील गुहेत लपलेले आहेत. शिपायांना तिकडे शोधायला सांगा ना!" समीर म्हणाला.

"पण तुला कसं कळलं हे?" सेनापतीने आश्चर्याने विचारले.

"आम्ही प्रथम डाकूंच्या तावडीतून कसे वाचलो? खजिन्याचा पत्ता आम्ही कसा लावला? तशीच ही बात-मीही मला कळली ते सगळं मी तुम्हाला नंतर सांगेन." समीर हसत म्हणाला.

समीर खरेच बोलत आहे, हे सेनापतीने जाणले आणि त्याने दहा शिपाई तिकडल्या गुहेकडे पाठवले. तिथे स्वतः पोचून सेनापति आव्हान देत म्हणाला—"आता तरी निदान आत्मसमर्पण कराल काय? का मरायचीच इच्छा आहे तुमची?"

"मरायचं? कोणी मरायचं हे काळच सांगेल आता. गुहेत कोणी पाय तरी ठेवून बघा! यमसदनालाच जाल नं!" डाकूंचा सरदार उत्तरला.

इतक्यात गुहेत एक भयानक आवाज उमटला. "ही गुहा विषारी नागांनी भरलेली आहे. एक मिनिटही इथे थांबाल तर स्वतःच जाल यमसदनाला!"

सापांपेक्षाही त्या भुताटकीसारख्या आवाजाचीच चोरांना भीती वाटली. थरथर कापतच ते गुहेबाहेर पडू लागले.

"आम्ही आत्मसमर्पण करीत आहोत." सरदार म्हणाला. दोन्ही हात वर उचलून एक-एक डाकू बाहेर पडला आणि शिपायांनी त्या प्रत्येकाचे हात मागे पकडून बांधून टाकले. (क्रमशः)





# राजलक्षण

दृढनिश्चयी विक्रम त्या झाडाकडे गेला, फान्दीवरून प्रेत उतरवून त्याने ते आपल्या खान्द्यावर टाकले आणि नेहमी-प्रमाणे मौन धारण करून तो स्मशानाची वाट चालू लागला. तेव्हां त्या प्रेतात रहाणारा वेताळ म्हणाला—"राजा, अशा अवेळी; या भयानक स्मशानात तू प्राण-पणाने जी मेहनत करत आहेस ती खरोखरच प्रशंसनीय आहे. चांगलं-वाईट, उचित-अनुचित ओळखण्याची पात्रता नसणारी माणसं नेहमीच अगदी विनासा-यास हाती आलेली संधी गमावून बसतात. तुझा हेतु सफल होण्याच्या ऐन वेळी तुझ्या हातून अशी चूक घडू नये, म्हणून तुला सावध करण्यासाठी एका लाकुडतोड्याची मुलगी उषा हिची गोष्ट सांगतो. नीट लक्ष देऊन ऐक ती. तुझे हे कष्ट विसरायलाही मदत होईल त्यामुळे!" आणि वेताळ गोष्ट सांगू लागला—

वेताळाच्या गोष्टी



"पहाडगंज गावाच्या आसपास पसरलेल्या जंगलात एक लाकुडतोड्या आपल्या झोपडीत रहात असे. त्याच्या मुलीचं नाव होतं उषा. बिचारीची आई तिच्या लहानपणीच देवाघरी गेली होती. त्यामुळे घरातलं कामकाज पाहून ती आपल्या बापाचीही काळजी घेई. तिची आजी तिथल्याच आणखी एका निराळ्या जंगलात रहात असे. आजोबा वारल्यानंतरही आजी आपल्या मुलाकडे न जाता आपल्या झोपडीत एकटीच रहात असे.

एकदा आपली मैना, सुदारपक्षी नि बया यांना घेऊन उषा आजीला भेटायला आली. आजीने विचारले–"फार दिवसांनी आठवण झाली तुला आजीची?"

"काय करू ग आजी! मी नसले तर बाबांसाठी स्वयंपाक कोण करणार? त्यांनाही त्रास होतो की नाही? माझा आपला जीव दोन्हीकडे अडकतो बघ!" उषा उत्तरली.

"तुझं म्हणणं बरोबर आहे उषा! बरं, तुझे बाबा कसे आहेत? तुझ्या लग्नाचं काही बघताहेत, की तेही माझ्यावरच सोडलंय त्यांनी?" आजीने हसत विचारले.

"हो तर! तुझ्यावर सोपवलं असतं, तर जंगलातल्या एकाद्या अस्वलाबरोबर, किंवा माकडाबरोबर केव्हांच लग्न लावून टाकलं असतंस की माझं!" उषानेही हसतच आजीची टिंगल केली.

घरातल्या पहिल्याच खोलीतल्या तीन जुन्या खाटा पाहून उषाने आश्चर्याने आजीला विचारले–'काय ग आजी, आजोबांच्या या खाटा माळ्यावरून खाली कशाला काढल्या?"

"ती एक गोष्टच आहे लांबशी. तू अगोदर अंग धुवून घे, गरम गरम भाकरी खा, अन् मग सांगीन ती गोष्ट मी तुला." म्हातारी म्हणाली.

स्नान उरकून आजीजवळच बैठक मारून उषा भाकरी खाऊ लागली, तेव्हां आजीने आपली गोष्ट सुरू केली.

आपल्या देशाच्या राणीच्या पोटी एकाच वेळी तिळं जन्मलं, अन् राणी मात्र मरून



गेली. राजाने त्या तीन मुलांची जय, अजय आणि विजय अशी नावं ठेवली. या तीन्ही मुलांनी सर्व तऱ्हेच्या विद्या प्राप्त केल्या अन् आता त्यांचं सिंहासनावर बसायचं वय झालंय. राजाही अलिकडे आजारी असतो, त्याला आता वाटतंय की राज्यकारभाराची जबाबदारी तिघांपैकी कोणीतरी स्वतःवर घ्यावी. पण राजकुमारांपैकी कोणीच त्यात फारसं लक्ष घालायला तयार नाही. आत्ताच सिंहासनावर बसायची कोणाचीच इच्छा नाहीय. त्यामुळे राजा मात्र फार निराश झालाय.

राजाने त्यांना सांगितलंय की, तिघांपैकी पहिल्याने जो लग्न करील, त्याला राज्य मिळेल. विवाहाच्या इच्छेनं का होईना, पण एक तरी मुलगा राज्यकारभार हाती घेईल, अशी राजाची अपेक्षा. पण त्याचाही उपयोग झाला नाही. 'आपल्याला अजून कोणतीच मुलगी पसन्त पडली नाही' असं सांगून ते लग्नाचं टाळत राहिले आहेत. जवळजवळ सर्वच राज्यांच्या राजकन्यांना त्यांनी नकारघंटा वाजवलीय.

राजाने आता आणखी एक उपाय योजला अन् तो म्हणाला–"तुम्हीच आपल्या पसन्तीची मुलगी शोधा. लक्षात ठेवा, जो अगोदर लग्न करील तोच या देशाचा राजा बनेल."



राजकुमार हल्ली रोज मुलगी पहायच्या मिषाने बाहेर पडतात अन् दुपारपर्यंत या जंगलात पोचतात. संध्याकाळपर्यंत ते इथे आपल्या घरात बुद्धिबळ खेळतात, नंतर चांगली झोप काढतात, रात्र झाली की पुन्हा राजधानीला जातात.

राजपुत्रांची ही गोष्ट ऐकून उषा आजीला म्हणाली–"हे बरंय! म्हणजे रोज त्या तिघांना अन्न शिजवून घालता–घालताच तू अशी वाळून वाळून बारीक झालीयस ना?"

"छे! तसं नाही ग! जेवण ते बरोबर बांधून आणतात. त्यामुळे उलट मला स्वतःसाठीही काही शिजवायची जरूर पडत नाही बघ." म्हातारीने नातीला सांगितले.



"बरं ठीक आहे. त्यांच्याबद्दल आणखी काही सांगणार असशील, तर ते उद्या सांग. मला आता झोप आलीय. बरीच रात्र झाली." उषा म्हणाली.

नंतर उषा एका खाटेवर झोपली. पण तिला तिथे जराही झोप येईना. त्या जुन्या खाटेत खूपसे ढेकूण होते. रात्रभर बिचारी या कुशीवरून त्या कुशीवर वळत राहिली, पण झोप मात्र मुळीच आली नाही तिला!

दुसऱ्या दिवशी पहाटेच उठून उषाने आजीला विचारले—"आजी, अग ते खरो-खरीचे राजपुत्रच आहेत, का दगडाची माणसं आहेत? ढेकूण भरलेल्या या लाकडी फळ्यांच्या खाटांवर त्यांना झोप लागते तरी कशी?"

"राज्याच्या जबाबदारीपेक्षा त्यांना हे ढेकणांचं चावणं जास्त सुसह्य वाटत असेल!" तोंडाचं बोळकं पसरत म्हातारी बोलली.

मैनेने जेव्हां ऐकलं की उषाला रात्री झोप आली नाही, तेव्हां खाटेतले ढेकूण वेचून काढायचे काम तिने सुतारपक्षावर सोपवलं आणि नंतर मऊ गवताची गादी त्यावर पसरायचे काम तिने बयाला सांगितले.

तीन-चार तासातच सुतार अन् बयाने आपापली कामं मोठ्या उत्साहाने पार पाडली. या अवधीत उषाने घराची साफसफाई केली, कोळीष्टकं अन् बुरशी वगैरे काढून टाकून घराचे छतही तिने चकचकीत करून टाकले. नंतर बागेतून फुले आणून सगळ्या खोल्या सजवल्या आणि खिडक्यांना पडदे लावून टाकले. दुपारी तीनही राजपुत्र घोड्यांवर स्वार होऊन आले.

त्यांना पाहताच मैना म्हणाली—"चल, चल. आतल्या खोलीत पळ. पुरुषमाणसं आलियत." आणि तिने उषाला आत पाठवून दिले.

घरात शिरल्याबरोबर सर्व फरक राज-पुत्रांना जाणवला आणि आश्चर्याने त्यांनी विचारले—"अरे, या जुन्या घराचा हा कायापालट कुणी केला आजीबाई?"

"माझी नात उषा आलीय न इथे, तिचंच काम आहे हे सारं!" म्हातारी अभिमानाने उत्तरली.

"घर इतकं छान सजवणारी तुझी ही नात पाहिलीच पाहिजे." जय म्हणाला. व्यवस्थितपणे सजवलेली घरं माला फार आवडतात.

"इतकी घाई नको युवराज, आमच्या उषाला पहायला माणसानं भाग्यवान असावं लागतं." खिडकीत बसलेली मैना पटकन बोलली.

मैनेचे हे बोलणे ऐकून तीन्ही राजकुमार हसू लागले. त्यांना ते बोलणं फार आवडलं. राजपुत्रांनी खाण्याचे जे पदार्थ आणले होते, ते आजीने उषाच्या हाती दिले. उषाने ते पदार्थ चाखून पाहिले आणि तिने राज-पुत्रांसाठी सातूचे एक पक्वान्न बनवून पाठवून दिले. राजपुत्रांनी सातू कधी पाहिलाही नव्हता. त्यांना गरीबांचा तो पदार्थ फारच आवडला. ते म्हणाले—"वा! काय रुचकर आहे हा पदार्थ! आमच्या शाही रसोई-खान्यातही कधी असलं पक्वान्न बनवलं जात नाही!"

मैना पुन्हा मधेच म्हणाली—"हुं, आमची उषाताई तर असली कित्तीतरी स्वादिष्ट पक्वान्नं बनवू शकते राजपुत्रांनो!"

"असं? मग तर आम्हाला स्वतःच तिचं अभिनन्दन करायला हवं!" राज-





कुमार विजय बोलला. तो पक्का भोजनभाऊ होता.

"आमच्या उषाला पहायला तशी वेळ यावी लागते महाराज!" मैना गंभीरपणे म्हणाली.

आता पुन्हाही राजकुमारांना मैनेच्या बोलण्याचे हसू आले. नंतर ते तिघेही आपल्या राजवाड्याकडे परत गेले. दुसऱ्या दिवशी पुन्हा जेव्हां ते म्हातारीच्या घराकडे आले. तेव्हां उषा काही गाणे गुणगुणत बागेत फुले तोडत होती.

तिचं अलौकिक सौन्दर्य पाहून राजपुत्र चकित झाले. अन् गाण्याने तर मन्त्रमुग्ध झाले–"वा! काय मधुर आवाज!" तिघांच्याही तोंडून एकच उद्गार बाहेर पडला. तिघांनीही एकदमच टाळ्या पिटल्या.

त्यांना पाहून उषा घरात निघून गेली. तीन्ही राजकुमार एकमेकांना चुकवून एकेकटे म्हातारीला भेटले अन् प्रत्येकाने तिच्याजवळ उषाशी विवाह करायची आपली इच्छा व्यक्त केली.

तेव्हां आजी राजकुमारांना म्हणाली– "ठीक आहे, मी उषाला तिची काय इच्छा आहे, हे विचारून सांगेन."

राजकुमार निघून गेल्यावर म्हातारीने उषाला सर्व हकिकत सांगितली.

ते ऐकून प्रथम तर उषाला आश्चर्याचा धक्काच बसला. रात्रभर तिने खूप विचार करून एक निर्णय घेतला. अन् दुसऱ्या दिवशी सकाळी म्हातारीला म्हणाली– "आजी, मी तिन्ही राजपुत्रांना एक प्रश्न विचारणार आहे. मला अपेक्षित असलेलं उत्तर जो राजकुमार देईल, त्याच्याशीच मी लग्न करीन.

पुढच्या दिवशी राजकुमार पुन्हा आले तेव्हां आजीने उषाचे म्हणणे त्यांच्या कानावर घातले.

"आपल्या पिताजींनी या लग्नाला संमति दिली नाही, तर आपण काय कराल?" उषाने जयला विचारले.



"असल्या शंका मनात आणूच नकोस उषा! माझ्या म्हणण्यावर विश्वास ठेव. त्यांनी आपल्या लग्नाला संमति दिली नाही, तरी माझी खात्री आहे, कि कसंही करून मी त्यांची अनुमति मिळवीनच." जय आत्मविश्वास दाखवत म्हणाला.

नंतर समोर आलेल्या विजयलाही उषाने तोच प्रश्न विचारला.

"माझ्या पिताजींची इच्छा नसेल, तर मला वाटतं, की हा विवाह नाहीच होणार." राजपुत्र विजय बेफिकिरीने उद्गारला.

तो निघून गेल्यावर अजय उषाच्या खोलीत गेला. उषाने त्याच्यापुढेही तोच सवाल टाकला.

"पिताजींनी नाही परवानगी दिली, म्हणून काय झालं? आपलं लग्न थांबू नाही शकणार, ते होणारच! तुझ्यासाठी सारं राज्य, धन-दौलत, घर-दार सारं काही सोडून देऊन येईन. माझ्यावर विश्वास ठेव. मला फक्त तुझ्या होकाराचीच अपेक्षा आहे." अजय उत्तेजित होऊन उत्तरला.

उषा खोलीतून बाहेर आली, आणि तिने जयच्या गळ्यात वरमाला घातली.

इतकी गोष्ट सांगून झाल्यावर वेताळ म्हणाला–"हे राजा, उषाने ज्या तऱ्हेने



पतीची निवड केली, ती विचित्रच नव्हे का? तीन्ही राजपुत्रांनी जी उत्तरं दिली, ती पाहिली तर असं दिसून येतं की विजय हा आज्ञाधारक पुत्र आहे. पित्याचं म्हणणं तो कधीही टाळणार नाही. वडील माणसांबद्दल त्याच्या मनात असीम आदर आहे. राजपरिवारात असा गुण विरळाच! पण उषाने त्याला नाकारलं. अजयच्या बाबतीत पाहिलं तर तो उषासाठी अगदी असंभव असाही त्याग करायला तयार असल्याचं आढळतं. राजपाट, धनदौलत, घरदार सर्व काही सोडून तो उषाशी विवाह करायला तयार होता. इतकं करणाऱ्या युवकाला कोणतीही तरुणी नाकारणार नाही. पण

उषाने त्याला नाकारलं अन् जयच्या गळ्यात वरमाला घातली. ही गोष्ट अदूर-दर्शित्व आणि अनुचितता यांचीच निदर्शक नव्हे काय? या प्रश्नाचं उत्तर माहीत असूनही दिलं नाहीस तर, हे राजा तुझ्या मस्तकाचे शतशः तुकडे होतील."

यावर राजा विक्रम उत्तरला–" उषा ही एका अगदी सामान्यशा लाकुडतोड्याची मुलगी आहे. तिला राजघराण्याचा एकादा सेवक जरी पति म्हणून मिळाला तरी योग्यच म्हणायला हवं. पण हिचं भाग्य की तीन तीन राजकुमार एकाच वेळी तिच्याशी विवाह करायला उत्सुक आहेत, चढाओढ करत आहेत आपसात! अशा स्थितीत कोणतीही बुद्धिमान मुलगी, जो राजकुमार राज्यकारभार नीटपणे करू शकेल आणि जो विवेकी असेल अशाचीच निवड करील नं? भावनेच्या भरात वाहून जाणारा राजपुत्र काय कामाचा? उषानेही हाच विचार केला. विजय म्हणाला होता की वडिलांचं म्हणणं तो टाळू शकणार नाही. याचाच अर्थ असा की त्याला स्वतःचं असं व्यक्तित्व नाहीच. अजयचा विचार केला तर असं दिसं की, तो भावनेच्या भरात इतका वाहून केला की तो सर्वस्व सोडायला तयार झाला! यावरून लक्षात येतं की, तो केवळ बेजबाबदार आणि उच्छृंखल आहे! पण जय हा एकटाच राजकुमार असा आहे की त्याला आत्मविश्वास आहे. राजाचं मन वळवू शकू अशी त्याला खात्री आहे. दुसऱ्यांचं मन न दुखावता, आपलं काम साधून घेण्याची कला ही राजाच्या दृष्टीने फार आवश्यक गोष्ट आहे. म्हणूनच उषाने त्याचीच निवड केली."

विक्रम राजाने उत्तर बरोबर दिले, हे खरे. पण आता त्याचा मौनभंग झाल्यामुळे वेताळ प्रेतासह अदृश्य होऊन पुन्हा त्याच झाडाच्या फान्दीला लटकू लागला.

(कल्पित)



## चांदोबा पुरवणी–३७



भारतांची दैवते :

# महावीर

आपल्या देशात प्राचीन काळापासून जैन धर्माचे अनुयायी रहात आलेले आहेत. जैन धर्माच्या सिद्धान्तांचा अधिक प्रचार वर्धमान महावीर यांनी केला.

इसवी सनापूर्वी सहाव्या शतकात वैशालीच्या एका राजपरिवारात वर्धमान यांचा जन्म झाला. वयाच्या तिसाव्या वर्षी त्यांनी इह लोकीच्या सर्व सुखांचा त्याग केला आणि तेवीस तीर्थंकरांनी उपदेश दिलेल्या आध्यात्मिक मार्गाचे अनुसरण केले. जैन धर्माचा अधिक जोरदार प्रचार करून त्याचे सिद्धान्त लोकांना समजाऊन सांगून वर्धमान महावीर चोविसावे तीर्थंकर झाले.

मानवी जीवनाचा अंतिम उद्देश असतो निर्वाण. स्वतःवर नियंत्रण ठेवून संपूर्ण अहिंसा व्रताचे पालन केल्यास जन्ममृत्यूच्या बंधनातून मानवाला मुक्ति मिळू शकते व निर्वाण-प्राप्ति होते असा त्यांनी उपदेश केला.

जैन मंदिरात वर्धमान महावीराची पूजा केली जाते. ध्यान-मग्न मुद्रेत असलेल्या महावीरांचे चित्रण सोनेरी रंगात केलेले असते. या मंदिरात अन्य तीर्थंकरांना ही देव मानून त्यांची पूजा केली जाते. आपल्या देशात ठिक-ठिकाणी जुनी व नवी जैन मंदिरे आहेत.

# चांदोबाच्या बातम्या

## अति विशाल परिवार



तुम्ही कल्पना करू शकता की एकाद्या कुटुंबात सातशे सदस्य आहेत नि सर्व जण जिवंत आहेत? पण खरोखरीच असा एक परिवार आहे. केरळात कालिकत जवळ कुट्टिचिरा गावी एक मुसलमान कुटुंब आहे 'कोसानिवीडु.' या कुटुंबाने एक रेकॉर्ड प्रस्थापित करून गिनीज बुक ऑफ रेकॉर्डस् मध्ये स्थान मिळविले आहे. या परिवारातील सर्वात वृद्ध महिला आहे—चेरिया आईशाजी. ती ९० वर्षांची आहे. तिचे मुलगे, मुली, नातवंडं, पतवंडं सर्व मिळून ६८० सदस्य आहेत. गेली काही वर्षे दर १५ ऑगस्टला सर्व एकत्र जमून आनंदोत्सव साजरा करतात. फोटो काढतात. गणतंत्राच्या चालीवर ते आपल्या प्रमुखाची निवड करतात. ७५ वर्षांचा अहमद कोया गेली ३३ वर्षे या कुटुंबाचा प्रमुख म्हणून निवडून येत आहे.

## दहावा ग्रह

तीन महिन्यांपूर्वी ब्रिटिश शास्त्रज्ञांनी सौर-मंडलातील नऊ ग्रहांशिवाय आणखी एका ग्रहाचा शोध लावला. शास्त्रज्ञ म्हणतात की हा दहावा ग्रह आपल्या पृथ्वीच्या दहा पट मोठा आहे आणि एका मातृ-नक्षत्राचा भोवती फिरत आहे. आपली पृथ्वी सूर्याभोवती जेवढ्या क्षेत्रात फिरते, त्याच्या दोन-तृतीयांश क्षेत्रात हा ग्रह मातृ-नक्षत्राच्या भोवती फिरतो. शास्त्रज्ञ असे ही म्हणतात की या मातृ-नक्षत्रापासून दर तिसऱ्या सेकन्दाला लागोपाठ १४०० मेगॅ हर्ट्झ फ्रीक्वेन्सी वर रेडिओ लहरी फेंकल्या जातात नि त्या शक्तिमान रेडिओ टेलिस्कोपच्या साह्याने ऐकता येतात. धनुराशि नक्षत्र मंडळाच्या जवळ दिसणाऱ्या या ग्रहाचे नाव पी एस् आर् १८२९-१० ठेवण्यात आले आहे. या ग्रहावर जीवन असेल की नाही याबाबत शंकाच आहे.






# ठकास महाठक

रामापुर गावात शिवराज व शान्ता नावाचे जोडपे रहात असे. त्यांची एक पक्के घर आणि दहा एकर जमीन इतकी इस्टेट होती. त्यांच्या एकुलत्या एक मुलाचे नाव होते शंकर. पण हा शंकर अगदी नावाप्रमाणेच भोळा सांब होता. मुलगा होता चांगला, पण त्याच्या भोळेपणामुळे आईबापांना नेहमीच काळजी वाटे की पुढे हा आपला उदरनिर्वाह तरी कसा करील?

खूप विचार करून एके दिवशी दोघांनी ठरवले की शंकरचा विवाह एकादी चांगली बुद्धिमान मुलगी पाहून करून द्यावा म्हणजे त्याच्या भोळेपणाचा फायदा इतर कोणी घेऊ शकणार नाही. शंकर पुरेसा मोठा झाल्यावर पूर्वी ठरवल्याप्रमाणे शिवराज-शान्ता यांनी त्याचा विवाह ललिता नावाच्या एका गरीब घरच्या, परन्तु चांगल्या बुद्धिमान मुलीशी करून दिला.

ललिता केवळ बुद्धिमानच नव्हे, तर चांगली चलाखही होती. आपणाकडून काय अपेक्षा ठेवून सासू-सासऱ्यांनी आपल्याला या घरात आणलंय हे ओळखून ती आपल्या बुद्धीच्या जोरावर संसार असा करू लागली की नवऱ्याच्या भोळेपणाची आच घराला लागू नये. हे पाहून सासू-सासरे खूपच खूष झाले आणि सुनेच्या अपरोक्ष सर्वांजवळ तिची खूप स्तुति करू लागले.

असेच काही दिवस निघून गेले. आता ललितेची बुद्धि फिरली. म्हाताऱ्या सासू-सासऱ्यांची सेवा करणे अन् त्यांचा अधून-मधून मिळणारा सल्ला, सूचना यांना ती कंटाळून गेली. 'नवऱ्याच्या मागे लागून आपलं निराळंच बिऱ्हाड थाटलं तर या सगळ्यातून सुटका होईल, आपणच दोघं राहिलो की एकूण कामही कमी पडेल

सचिन आंबेकर



आणि जरा जास्त चैनीत रहाता येईल.' असा विचार करून आपल्या हेतूच्या सिद्धीसाठी ती योजना आखू लागली.

आपल्या अंगठ्यावर नख उगवल्याचे नाटक करून तिने एक पट्टी बांधली आणि म्हणू लागली—"हा मोठा भयंकर रोग आहे. हा बरा होण्यासाठी निराळे बिऱ्हाड करणे हा एकच उपाय आहे. एकत्र कुटुंबात राहून हा रोग बरा होणे केवळ अशक्य!"

सासू-सासरे दोघांनीही ठरवले की ललितेला चांगला धडा शिकवायला हवा! शांता मुलाला म्हणाली—"खरंच बेटा, अंगठ्यावर नख येणं हा मोठा भयंकर रोग आहे!"

ललिता आतून या गोष्टी ऐकतच होती. तिला कळून चुकले, की आपला फक्त पतीच नव्हे, तर सासू-सासरेही भोळसट आहेत! आता मात्र तिच्या आनन्दाला पारावार राहिला नाही.

इकडे शिवराजला हळूच काहीसे सांगून शान्ताने बाहेर पाठवून दिले. नन्तर ती स्वतः सुनेजवळ जाऊन बसून तिला झालेला रोग किती भयानक आहे, याबद्दलच्या गोष्टी बोलू लागली. तिने सुनेला सांगून टाकले की—"आता चोवीस तासांच्या आतच तुझं निराळं बिऱ्हाड मांडून देते बाई मी!" ललिताला आता आणखीच आनन्द झाला.

इतक्यात गावातला गावठी वैद्य बीरू याला बरोबर घेऊन शिवराज घरी आला. बीरूच्या हातात एक धारदार सुरी होती. शान्ता खोलीतून बाहेर आली आणि तिने मुलाला काही सांगितले. भोळा शंकर मान हलवून खोलीत शिरला आणि त्याने आपल्या बायकोला खाटेवर उठवून बसवले. त्याने लगेच तिला असे घट्ट पकडून ठेवले की तिला स्वतःला काही हालचाल करणेही अशक्य व्हावे. ती नवऱ्याला काही बोलणार, इतक्यात सासूही खोलीत घुसली आणि तिने ललितेचे दोन्ही हात घट्ट पकडून धरले.

तावडतोब बीरू त्या खोलीत आला आणि दगडावर सुरीला आणखी धार



करता करता तो बोलू लागला—"राणी बेटी, चटकन आपला हात पुढे कर बरं. तुझा अंगठा कापून टाकून मला लवकर पुढे जायचं आहे. गावात हाच रोग आणखीही चार लोकांना झाला आहे. सर्वांचेच अंगठे कापून काढावे लागतील नं?"

आता मात्र ललितेला भीतीने घाम फुटला. तिच्या तोंडून शब्दच फुटेना! ही गोष्ट आपल्या ध्यानातच न आल्यासारखे करीत शांता वैद्याला म्हणू लागली—"बीरूभाऊ, जरा काळजीपूर्वक बोट काप हं! फक्त तो नख उगवून आलेला अंगठाच तेवढा काप, नाहीतर भलतंच बोट ठेवशील कापून वेंधळेपणानं!"

यावर बीरू मोठ्याने हसत म्हणाला—"अरे, तुम्ही तरी काय बोलताय शान्ताबाई! मी काय इतका बेअक्कल आहे, कि एका बोटाऐवजी सगळा हातच कापून टाकीन? हां, एकदा मात्र असं झालं होतं खरं, की एकाच्या ऐवजी मी दोन बोटं कापली होती चुकून! पण अशी चूक फक्त एकदाच झाली हं! लोक मात्र उगीचच माझ्याबद्दल शंका घेतात. अच्छा......राणी बेटी, कर हात पुढे." असे म्हणून तो ललिताचा हात पकडू लागला.

पण इतक्यात ललिता एकदम भानावर आली. तिला वाटले, की हा मूर्ख, गावठी



वैद्य आपला अंगठा खरोखरीच सुरीने कापून टाकील. म्हणून सासूला नमस्कार करत कापऱ्या आवाजात ती म्हणाली—सासूबाई, मला या बीरूपासून वाचवा हो! माझ्या अंगठ्याला काहीही झालेलं नाहीय! निराळं बिऱ्हाड करायच्या आशेनंच मी हे सगळं नाटक रचलं! माझी चूक उमगली मला, मला क्षमा करा सासूबाई! या बीरूला घालवून द्या इथून तावडतोब!" हे सारं बोलताना तिच्या डोळ्यात अश्रू भरून आले होते.

आता शान्ताच्या चेहऱ्यावर हसू उमटले आणि तिने सुनेचे हात सोडून दिले. बीरूनेही आपली सुरी कमरेला खोचली.

शंकर मात्र भोळेपणाने विचारू लागला–
"पण आता अंगठ्यावर उगवलेल्या नखाचं काय? काहीत समजत नाहीय."

यावर जोराने हसत बीरू म्हणाला–
"नख! अरे जन्मल्यापासूनच आपल्या बोटांदर नखं असतातच ना शंकर?"

ललितेची मान लाजेने खाली गेली. पण शांताने मात्र तिचे सान्त्वन करत म्हटले–
"मुली, अग तुला खरोखरच निराळं बिऱ्हाड करायचं असेल ना, तर आम्ही दोघंही कधीच आड येणार नाही. अन् त्यासाठी तुम्हा दोघांना अन्यत्र कुठंही जायला नको, हे घर सोडून आम्हीच दोघंजण आपल्या शेतावर एक झोपडी बांधून राहू म्हणजे झालं! ते बरं दिसेल ना?"

हे ऐकताच आणखीनंच लाजून ललितेने सासूच्या पायावर लोटांगण घातले. ती म्हणाली–"सासूबाई, यापुढे मी आयुष्यभर कधीच निराळ्या बिऱ्हाडाचं नावही काढणार नाही. मला फार शरम वाटते आपल्या वर्तनाची! आपण 'क्षमा केली' म्हणेपर्यंत मी पाय सोडणार नाही आपले!"

ललितेला उठवून जवळ घेत शान्ता म्हणाली–"क्षमा करीन, पण आत्ता नाही. लवकरच आम्हाला एक नातवंड हवं. मगच क्षमा करू आम्ही तुला!"

ललितेने लाजून मान खाली घातली. शिवराजकडून मिळालेलं रुपयाचं नाणं अंगठ्याने उडवून झेलत अन् त्याचा खण्ण आवाज करत बीरू ललितेला म्हणाला–
"बेटी ललिता, सगळे दिवस सारखेच नसतात हं. आता पुन्हा कधी नख उगवलं तर मलाच बोलावणं पाठव बरं का!" आणि हसत हसत तो निघून गेला.

यानंतर मात्र ललितेने कधीही कसली कुरकुर केली नाही. सासूसासऱ्यांची ती पूर्वीपेक्षाही अधिक सेवा करू लागली, इतकेच नव्हे तर दोन नातवंडं जन्माला घालून तिने त्यांना खूषही केलं.





# कवींची मैत्री

एका गावात बहादूर, रामदेव आणि धनपत या नावांचे तीन मित्र रहात असत. या तिघांची तीन निरनिराळी वैशिष्ठ्यं होती. बहादुर हा पक्का नास्तिक होता. त्याचा कोणत्याही देवी किंवा देवावर विश्वास किंवा भक्ति नव्हती. तो कधीही, कुठल्याही देवळात जात नसे. उलट देवळात जाणाऱ्या भक्तांची तो टिंगल करी. या बहादुरच्या बरोब्बर उलट वैशिष्ठ्य होतं रामदेवचं! तो आस्तिक होता अन् देवावर त्याचा अढळ विश्वास होता. याबाबत आपली कोणी थट्टा किंवा टिंगल केली तर ती करणारालाच पाप लागेल अशी त्याची श्रद्धा असल्याने तो चुप राही. टिंगल करणाऱ्याशी तो कधीही भांडत बसत नसे. आता तिसरा राहिला धनपत. तो मोठा ख्यातिप्राप्त धनवान माणूस होता, पण मोठा कंजूष होता तो! दानधर्माचं तो कधी नावही घेत नसे. तहान किंवा भुकेनं मरणाराच्या तोंडातही तो कधी कुडवाभर पाणी घालायला तयार नसे.

पण ते तिघे एकमेकांचे मित्र होते हीच मोठी गमतीची, विशेष गोष्ट होती. अन् याहीपेक्षा जास्त विशेष गोष्ट अशी होती की त्यांना नुकताच अनंत नावाचा एक चौथा मित्र येऊन मिळाला होता.

या चारांनाही कविता या विषयात रुचि असल्यामुळे ते दररोज गावसीमेवरील वडाखाली एकत्र जमत आणि साहित्यचर्चा करीत, आपापल्या कवितांचे वाचन करीत. पण खरं पाहता त्यांच्या कविता कोणीही ऐकत नसे. लोकांची अशी धारणा होती, की त्यांच्या कविता ऐकणं, म्हणजे एक शिक्षाच आहे. त्यांच्याबद्दल गावचे लोक तऱ्हेतऱ्हेने बोलून आपसात त्यांची टिंगल करीत असत.

"वसुंधरा"

बहादुर मोठा नास्तिक होता. रामदेवचा परमेश्वरावर अतिशय विश्वास होता. धनपत चांगलाच श्रीमंत होता, पण फार कंजूस होता.

त्या गावचा जमीनदार कविराज हा आपल्या नावाला अनुरूप वागू इच्छित असे. म्हणून काव्याला प्रोत्साहन देण्यासाठी त्याने एक स्पर्धा आयोजित केली होती. आसपासच्या गावातले मिळून जवळपास दोनशे कवि स्पर्धेत भाग घ्यायला उपस्थित झाले. त्यात बहादुर, रामदेव, धनपत व अनन्त हे ही होतेच. या स्पर्धेत पहिल्या येणाऱ्या पाच कवितांच्या कवींना प्रत्येकी एक एक हजार रुपये देऊन त्यांचा सत्कार केला जाणार होता.

या स्पर्धेत बक्षिस मिळवणाऱ्या पाचात अनंतचीही वर्णी लागली. पण बहादूर, रामदेव व धनपतला विचारणारं कोणीच नसल्याने त्यांना अनन्तबद्दल असूया वाटू लागली. आणि ते त्याच्याबद्दल उदासीन राहू लागले.

त्यांच्या वागणुकीमुळे अनन्तला दुःख झाले. त्यांचं मन जिंकण्यासाठी त्याने एक उपाय योजला. त्या उपायाने या तिघांना सुधारायचाही त्याचा विचार होता.

सर्वात अगोदर अनन्त बहादुरकडे जाऊन त्याला म्हणाला–"तू आपला नास्तिकपणा सोडून दे बघ! देवाची कृपा झाली तर तुला चांगलं नावही मिळेल!"

नंतर तो सरळ रामदेवकडे गेला. त्याला अनंत म्हणाला–"तू कविराजलाही देवासारखं मानून त्याचा गौरव केला असतास, तर तुझ्याही काव्याचा सत्कार झाला असता. अज्ञात अशा परमेश्वराच्या नादी लागण्यापेक्षा आपल्या नेहमीच्या सान्निध्यातल्या लोकांच्यात देव पाहिलास तर तुझं भलं होईल. तुला चांगली कीर्तीही मिळेल."

यानंतर धनपतला गाठून अनन्त म्हणाला–"इतका कंजूषपणा नको करत जाऊस. कविराजने काव्यांची परीक्षा करण्याकरता एक परीक्षक नेमला होता नं, त्याला तू काही पैसे चारले असतेस तर तुलाही पहिल्या पाचात नंबर मिळाला असता. पण हा सगळा तुझ्या कंजूषपणाचा परिणाम आहे. लगेच सोडून दे तो!"

आता मात्र तीनही मित्र चांगले खूष दिसू लागले. पण अनन्तला दिसून आलं की अजूनही त्यांच्या वागणुकीत काही बदल झालेला नाही. अनन्तने तिघांनाही वेगवेगळं गाठून त्यांना सुधारायचा पुन्हा खूप प्रयत्न केला पण 'पालथ्या घड्यावर पाणी!' त्यांना तिघांनाही समाजाच्या रीतीभाती संभाळून रहाणं शिकवायचा अनन्तचा प्रयत्न वाया गेला. ते होते तसेच राहिले.

बहादुर अनन्तला म्हणाला–"हां, मला आत्ता कळलं की केवळ परमेश्वराच्याच कृपेनं तू आपल्या काव्याला बक्षिस मिळवलंस! माणसामाणसात इतका फरक





करणाऱ्या त्या परमेश्वराची मदत मला नकोच आहे! मी स्वतःच्या ताकतीने बक्षीस मिळवीन. मी देवाला मानत नाही, माझा विश्वास नाही त्याच्यावर! तो माझा दुश्मन आहे!"

आणि अनन्तची निन्दा करीत रामदेव त्याला म्हणाला–"अरे, आतापर्यंत मला तर वाटत होतं की तू एका फारच सुन्दर काव्याची रचना केली आहेस, अन् त्याबद्दल मला असूयाही वाटत असे. एकाद्या हलक्या दर्जाच्या, बेकार काव्याबद्दल बक्षीस मिळवणं मलाही पसन्त नाही. अन् त्यासाठी परमेश्वराची जागा मी कुणा माणसाला कधीच देऊ करणार नाही. मानवाला भगवान मानून मी त्याची खोटी स्तुति करूच शकणार नाही. एकादं महान् असं काव्य लिहूनच मी बक्षिस मिळवीन."

धनपत अनन्तला दूषण देत म्हणाला–"तुझ्यासारखी लाच देऊन बक्षिस खरीदणारी अधम माणसं जोपर्यंत अस्तित्वात आहेत, तोपर्यंत ज्येष्ठ दर्जाची काव्यं कधीच प्रकाशात येणार नाहीत, अन कोल्ह्याला वाघाचा मान मिळत राहील. तुझं बोलणं ऐकल्यावर माझी खात्रीच झाली की खरोखरीच श्रेष्ठतेच्या दृष्टीने काव्यांची परीक्षा केली गेली असती, तर माझ्या काव्यालाच बक्षिस मिळालं असतं."

आता कुठे अनन्तला कळलं की नेहमी दुसऱ्यांच्या बोलण्याचा विपर्यास करणाऱ्या अन् दुसऱ्यांची चामडी सोलून काढणाऱ्या लोकांशीच आपण आजपर्यंत मैत्रीचे संबंध ठेवले होते. यांच्याशी मैत्री केल्याची अनन्तला फार खंत वाटली. आपल्या काव्याला बक्षिस मिळाल्यामुळे आपली निंदा-नालस्ती करायला टपलेल्या या तिघांशी इथून पुढे मैत्रीचे संबंध ठेवणं शहाणपणाचं होणार नाही, हे ओळखून अनन्तने त्यांना भेटणंच बन्द करून टाकलं.

आणि नंतरही रोज संध्याकाळी बहादुर, रामदेव अन् धनपत त्याच मोठ्या वडाखाली जमत राहिले. अन् आपल्या कविता एक-मेकांना ऐकवत राहिले.





# वीर हनुमान

एकदा सीतेचा पत्ता लागल्यावर आता क्षण भर ही थांबणं रामाला कठिण झालं! ताबडतोब सीता-मुक्तीसाठी जावं असं त्याला वाटू लागलं. सीता राक्षसिणींच्या गराड्यात बंदिस्त आहे याचं त्याला फार वाईट वाटलं. हनुमानाच्या तोंडून ज्या ज्या गोष्टी रामाने ऐकल्या, त्यांनी तो फार आनंदित झाला. त्याने हनुमानाला खोद-खोदून सीतेबद्दल आणखी अनेक गोष्टी विचारल्या. तेव्हा सीतेकडून ऐकलेली कावळ्याची गोष्ट हनुमानाने सविस्तार रामाला सांगितली.

अशा रीतीने सीतेचे सर्व वृत्त ऐकून हनुमान रामाला म्हणाला–"सीता माईने मला विचारले की इतका शक्तिशाली राम इथं येऊन राक्षसांवर आपल्या शस्त्रांनी प्रहार का करीत नाही? मी इकडे इतक्या संकटांना तोंड देत आहे, नि तो तिकडे काय करीत आहे? माझ्यावर थोडं ही प्रेम असलं तर त्यांनी इथे येऊन ताबडतोब रावणाचा संहार करावा असं रामाला जाऊन सांग. निदान माझ्या संरक्षणासाठी रामाने लक्ष्मणाला तरी पाठवावे. मनात आल्यास देवांचा ही पराभव करू शकतील, अशा दोघांनी माझी उपेक्षा करून असं गप्प का बसावं? कोण जाणे मी काय पाप केलंय? नाही तर ते दोघे मला भेटायला न येते? मी इथे त्यांची रोज वाट पहात आहे आणि प्रत्यही माझी निराशा होत आहे. काय करावं हेच मला समजत नाही.



सीतामाई जेव्हा असं म्हणाली तेव्हा मी तिला सांगितलं की राम-लक्ष्मण दोघे ही दु:ख-सागरात बुडून गेलेले आहेत. मी तिला हे ही सांगितलं की आता तिची सर्व संकटं दूर होतील आणि आता तिने कसली ही काळजी करू नये. इतके दिवस तिचा ठाव-ठिकाणाच नव्हता. आता सर्व पत्ता मिळाल्यावर मुक्तीचा मार्ग शोधून काढण्यात राम-लक्ष्मण जरा ही कसूर करणार नाहीत. ती अगोदरच फार भयभीत झालेली होती. चारी दिशांकडे निरखून पाहून तिने आपल्या केसातील चूडामणी काढून माझ्या हाती दिला. तुम्हा सर्वांचे कुशल-क्षेम मला विचारले. राम-लक्ष्मण व सुग्रीव यांचे सैनिक येऊन रावणाचा अंत करतील, म्हणून आता मनात कसली ही शंका न ठेवता तिने धैर्याने काळ कंठावा असं सांगून मी तिथून निघालो."

हनुमानाचे बोलणे ऐकून रामाला खूप आनंद झाला. तो म्हणाला—"या हनुमानाने मोठेच काम केले आहे. या कामगिरीवर आपण हनुमानाला पाठवलं हे अगदी योग्य झालं. ते दुसऱ्या कुणाला कधीच जमलं नसतं. समुद्र पार करून जाण्याचं काम हनुमानानंतर गरुत्मान नि वायुदेवच कदाचित् करू शकतील. लंकेत प्रवेश करून जिवानिशी परत येणं काय सोपं का काम आहे? प्रथम प्रवेश करणेच मोठ्या मुश्किलीचे! हनुमान केवळ सुग्रीवाच्या आज्ञेचं पालन करणं एवढंच आपलं कर्तव्य समजला नाही. तर त्याने अशोक-वनाचा विध्वंस केला, राक्षसांना मारून टाकलं, नि लंका-दहनासारखी साहसी कामे पण केली. ही कामे करून त्याने सुग्रीवाला संपूर्णपणे संतुष्ट केलं. याने केलेल्या या कार्यामुळे रघुवंशाचे निश्चित कल्याणच होईल. पण आता मला एकाच गोष्टीचे दु:ख आहे की या हनुमानाचा योग्य प्रकारे सत्कार करण्याच्या परिस्थितीत मी नाही. अगोदर सीतेला सोडवून आणण्यासाठी काय करावं याचा विचार करणं अगत्याचं





आहे. माझे व सीतेचे प्राण वाचवणाऱ्या या हनुमानाला काय देऊन त्याच्या ऋणातून मी मुक्त होऊ? निदान त्याला एकदा आलिंगन तरी द्यावं!" असं म्हणून रामाने हनुमानाला घट्ट मिठी मारली.

यानंतर उदास अंत:करणाने राम हनुमानाला म्हणाला—"समुद्र पार करून वानर-सेना तिकडे कशी बरे पोचू शकेल? हा प्रश्न मनात येताच मला मोठं भय वाटू लागतं. सीतेला धीर देऊन तू आलास तर खरं, आता समुद्र पार करून जाण्यासाठी काय बरं उपाय करावा? तुला काही सुचतंय?"

तेव्हा सुग्रीव रामाला सांगू लागला—

"आता तू का काळजी करतोस? सीतेचा तर शोध लागला. शत्रूचं स्थान नि सीतेचा ठाव-ठिकाणा तर आपल्याला समजला. आता शत्रूच परिपत्य करण्यात काही ही अडचण नाही. समुद्रातून जाण्यासाठी आपण एक सेतु निर्माण करू! रावणाला ठार करून सीतेला सोडवून आणू. सेतु तयार झाला नि एकदा का लंका नगरी आपल्याला दिसली की रावण मेला असं समज. आता तुला चिंता करण्याचं कारण नाही. समुद्र पार कसा करायचा याचा आपण विचार करू. सेतूचं जमलं नाही तर अन्य कोणत्या ही मार्गाने आपण सागर पार करणारच. रावण नक्की मरणार, नि तुझा जय होणार."



तेव्हा राम हनुमानाकडे वळून म्हणाला—"समुद्रात सेतु बांधून, अथवा समुद्र पूर्णत: आटवून किंवा तपश्चर्या करून आपण लंकेत पोचू बरं, लंकेत किल्ले किती आहेत? तेथे सैन्य किती आहे? प्रवेश-द्वारावरील संरक्षण व्यवस्था कशी आहे? तू सगळं पाहिलेलं आहेस, ते मला नीट सांग."

हनुमानाने रामाला समजावून सांगितलं—"लंका नगरी अतिशय विशाल आहे. तिथे अगणित राक्षस सुखा-समाधानाने जीवन जगत आहेत. मला सर्वत्र रथ, हत्ती



नि घोडे दिसले. शत्रूला लंकेत प्रवेश करणं तसं सोपं काम नाही. लंका-नगरीला चार प्रवेश-द्वारे आहेत. त्यांचे दरवाजे उंच उंच व अति मजबूत आहेत. या प्रवेश-द्वारांवर बाण आणि दगड फेकण्यासाठीच मोठ-मोठी यंत्रे बसवलेली आहेत. कोणत्या ही बाजूने जेव्हा शत्रु-सेना येईल तेव्हा ही यंत्रे शत्रूचा धुव्वा उडवतील. अतिशय पराक्रमी राक्षस प्रवेश-द्वारांचे संरक्षण करीत आहेत. त्यांच्या जवळ असलेली लोखंडी शस्त्रे एका प्रहारात शंभर जणांचा वध करू शकतील नगरीच्या चारी बाजूंना सोन्याची भिंत बांधलेली आहे. या भिंतीवर ठिकठिकाणी रत्नांनी नक्षी-काम केलेले आहे. ही भित ओलांडून आत जाणे केवळ अशक्य आहे. या भिंतीच्या बाहेर चारी बाजूंना खोल खंदक बनवलेले आहेत. त्यात रक्तपिपासु सुसरी-मगरी नि मोठ-मोठे मासे आहेत. हा खंदक पार करण्यासाठी प्रत्येक प्रवेश-द्वारी पूल बांधलेले आहेत. हे पूल आवश्यकतेनुसार वर वा खाली करण्याठी यंत्रे बसवलेली आहेत. रावण हा मोठा जागरूक सामर्थ्य-संपन्न राक्षस-राजा आहे. शांतीच्या काळात ही तो आपल्या सेनेला प्रशिक्षण देत असतो. लंका नगरी त्रिकूट पर्वतावर बसलेली आहे. खालून वर जाण्यासाठी मार्ग नसल्यामुळे तेथील समाचार बाहेरच्या जगाला समजत नाहीत. लंका नगरीच्या प्रत्येक प्रवेश-द्वारी लाख-लाख सशस्त्र राक्षस पहारा करीत असतात. नगरी मध्ये ही असंख्य राक्षस-सैनिक गस्त घालीत असतात. पण मी खंदकाच्या वरील पूल उडवून टाकले. लंका नगरीला आग लावली. कित्येक राक्षस-वीरांना ठार मारले. म्हणून आता लंकेत पहिल्या सारखं सामर्थ्य शिल्लक राहिलं नाही. वाटेल ते करून आपण समुद्र पार करू. लंकेवर विजय मिळविण्यासाठी अंगद, द्विविद, मैंद, जांबवान, बनस आणि आपले सेनापति नील समर्थ आहेत. लवकरच एक चांगला मुहूर्त काढून आपण निघू या.





हे ऐकून राम सुग्रीवाला म्हणाला—"आपण आताच निघू या. सूर्य आपल्या डोक्यावर आलेला आहे. हा अभिजित् नावाचा मुहूर्त फार शुभदायी असतो."

सैन्याने कसे मार्गाक्रमण करावे हे त्याने सविस्तार सांगितले. सेनापति नीलला त्याने सांगितले की आपली सेना समृद्ध भूमीवरील रस्त्याने जावी. शत्रु अगोदरच या प्रदेशाचा नाश करील आणि खालच्या प्रदेशात लपून राहून एकदम आपल्यावर हल्ला करणार नाही, यासाठी आपण पूर्णपणे सावध राहिले पाहिजे. काही वानर-वीर प्रथम आकाश-मार्गाने जाऊन रस्त्यांचे नीट अवलोकन करतील. नि मग त्या मार्गावर आपली सेना कूच करील. या कामासाठी पराक्रमी वीरांनी पुढे जावं, मर्यादित शक्तिवाल्यांनी मागेच रहावे.

रामाबरोबर वानर-सेना निघाली. विशालकाय हत्ती, बलाढ्य गवय नि गवाक्ष सैन्याच्या पुढे पुढे चालू लागले. उडण्याच्या कलेत प्रवीण ऋषभ सैन्याच्या उजव्या बाजूच्या मागील भागाचे संरक्षण करू लागला. गंध-मादनाने डाव्या बाजूच्या मागील भागाची जबाबदारी आपणाकडे घेतली. सैन्याच्या मध्यभागी राम हनुमानाच्या भुजावर आरूढ झाला. लक्ष्मण अंगदाच्या भुजावर बसला. सैन्याने दक्षिणेकडे कूच केले. वानर-सेना उत्साहाने उड्या मारीत सिंहनाद करू लागली. रस्त्यात मिळणारे कंद व फळे भक्षण करीत सैन्य मार्गक्रमण करू लागले.

ती विशाल वानर-सेना एकाद्या महासागरासारखी दिसूं लागली. अनेक डोंगर, नद्या व जंगले पार करीत सैन्य पुढे जात राहिले नि शेवटी महेन्द्र पर्वताजवळ येऊन ठेपले.

रामाने महेन्द्र पर्वताच्या शिखरावर चढून समुद्राकडे पाहिले. नंतर आपल्या बरोबर आलेल्या सुग्रीव व लक्ष्मणाला तो म्हणाला—"आता आपण येथे मुक्काम करून विचार करू या की हा समुद्र



पार करून जाणं आपल्याला कसं शक्य होईल. कोणी ही सेनेपासून फार दूर जाऊ नये. सेनेची सर्व व्यवस्था ही नीट केली पाहिजे. आता या कामाला लागा." असं सांगून राम पर्वतावरून खाली उतरला.

वानर सेनेने तीन भागात विभाजित होऊन समुद्राच्या किनाऱ्यावर तळ ठोकला.

पलीकडचा किनारा दिसत नसलेला तो महासागर पाहून, त्यात उसळणाऱ्या गगनचुंबी लाटांकडे पहात नि या खोल समुद्रात राहणाऱ्या भयानक प्राण्यांचा विचार करून वानर-वीर अमळ सचिन्त होऊन आपापसात विचारू लागले–"हा समुद्र पार करून जाणं आपल्याला कसं शक्य होईल?"

तिकडे लंकेत हनुमानाने रावणाचा घोर अपमान केलेला होता. शत्रूंना अभेद्य अशा लंकेत हनुमान सहज पोचला नि त्याने सीतेला पाहून घेतलं. चैत्य प्रासाद त्याने ध्वस्त केले आणि अनेक राक्षसांना ठार मारले.

तेव्हा रावणाने आपल्या दरबारी जनांना विचारले–"आता आपण काय करू या? आपल्या कल्याणाचा काही उपाय कुणाला सुचतो आहे का?"

एवढ्यात लंकेत खबर पोचली की राम विशाल वानरसेनेसह लंकेवर आक्रमण करण्यासाठी आलेला आहे. रामाचे सैन्य समुद्र पार करू शकेल याबद्दल रावणाला जरा ही शंका नव्हती. जर रामाच्या नि आपल्या सैन्यात युद्ध झाले तर आपल्या सैन्याला धोका पोचू नये याबाबत रावण विचार करू लागला.

मंदबुद्धि राक्षस रावणाला म्हणाले–"प्रभु, आपल्याकडे असंख्य सैनिक आहेत. निरनिराळ्या प्रकारची शस्त्रास्त्रे व युद्ध-सामग्री आहे. आपण कसली चिंता करायची?" आता पर्यंत रावणाने मिळव-लेल्या विजयांचा ते उल्लेख करू लागले. शंकराचा मित्र कुबेर याला रावणाने पराभूत



केलेले होते. पाताळातील महासर्पांना त्याने लोळवलं होतं. रावणाशी झालेल्या युद्धात जय मिळवलेला असा कोणी राजा भूतलावर नाही. मग या रामाची काय कथा? हं, वानरांबाबत विचार केला तर केवळ इंद्रजितच वानरांना नष्ट करू शकेल.

तेव्हा प्रहस्त रावणाला म्हणाला—"राजन्, देव-दानव-गंधर्व-पिशाच यांचे तुमच्या पुढे काही चालत नाही, मग या वानरांची काय गोष्ट? आपण जेव्हा सावध नव्हतो, तेव्हा त्या हनुमानाने आपल्याला थोडा त्रास दिला. नाही तर तो काय जिवंत परत गेला असता? आपण आज्ञा द्यावी, मी आता जाऊन पृथ्वीवरील सर्व वानरांचा नायनाट करून येतो. समस्त प्राणी-सृष्टीत एक ही वानर उरणार नाही अशी व्यवस्था करून टाकतो."

दुर्मुख नावाच्या राक्षसाने ही हनुमानाची खूप निंदा केली आणि सर्व वानरांचा अंत करण्याची प्रतिज्ञा केली. वज्रदंष्ट्र नावाच्या राक्षसाने सांगितलं की तो एकटाच जाऊन सर्व वानरांसह राम, लक्ष्मण आणि सुग्रीव यांचा अंत करील. त्याने आणखी ही एक उपाय सांगितला. काही राक्षस मानव-रूप धारण करून रामाकडे जातील आणि सांगतील की भरताने रामाच्या मदतीसाठी काही सैन्य पाठविले आहे, ते थोड्याच वेळात इथे येऊन पोचेल. नंतर लंकेतून आकाश मार्गाने जाऊन राक्षस वानरांवर दगड व अग्नि यांचा वर्षाव करून त्यांना ठार मारतील. हे पाहून राम-लक्ष्मण अत्यंत दुःखी होतील नि व्याकुळ होऊन मरून जातील.

"मी एकटाच जाऊन राम, लक्ष्मण, सुग्रीव व हनुमान यांना ठार करून परत येतो!" निकुंभ गरजला. तो कुंभकर्णाचा मुलगा होता. वज्रहनूने सांगितले की तो जाऊन सर्व वानरांना खाऊन टाकील. असे बोलताच त्याच्या तोंडातून लाळ टपकू लागली.

शेवटी सर्व राक्षस उठले आणि शस्त्रास्त्रांसह युद्धासाठी तयार झाले.





# उलुकागाचे प्रसंगावधान

गोष्ट खूप जुनी आहे. त्यावेळीं आफ्रिकेमधे जंगलात निरनिराळ्या टोळ्या करून माणसं रहात असत. त्यापैकी एका लहानशा टोळीच्या सरदाराचं नाव होतं उलुकागा. आणि दुसऱ्या एका टोळीच्या सरदाराचं होतं ओहायो. या दोन्ही टोळ्यांचं बऱ्याच वर्षांपासून वैर होतं.

ओहायोच्या टोळीत चांगले धष्ट-पुष्ट आणि बलवान असे कित्येक तरूण होते. त्याची संघशक्तीही चांगली मजबूत होती. पण काय उपयोग? एका छोटयाशा टोळीचा नेता उलुकागा आणि त्याचे अनुयायी यांना मारून टाकणं काही ओहायोला जमत नव्हतं! त्याचं एक सबळ कारणही होतं.

उलुकागाजवळ एक अद्भुत असं वैद्यक-रहस्य होत. काही विशिष्ट वनस्पतींचा उपयोग करून तो एक मलम तयार करीत असे. कुठल्याही प्रकारची लहान-मोठी जखम हे मलम लावल्यावर काही मिनिटातच बरी होऊन जाई! उलुकागाच्या फौजेत खूप कमी सैनिक असूनही त्यांची संख्या यामुळे कधीच कमी होत नसे! पण ओहायोच्या टोळीची गोष्ट वेगळी होती. प्रत्येक वेळच्या चकमकीत त्याचे बहादुर जवान मात्र शेकडोंनी मरत असत.

उलुकागाच्या मुलाचं नाव होतं कियेंजी. तोच त्याचं एकुलतं एक अपत्य असल्यामुळे टोळीचा भावी नायक तोच होता. त्यामुळे ते दिव्य औषध बनवण्याची कृति उलुकागाने कियेंजीला शिकवून ठेवली होती.

ओहायो आणि त्याच्या प्रमुख साथीदारांनी एक उपाय योजला. संधी साधून त्यांनी उलुकागा आणि कियेंजी यांचं अपहरण करून त्यांना एका एकान्त पहाडावर नेऊन ठेवलं. त्यांच्याकडून त्या औषधाचं रहस्य जाणून घ्यायचा त्याचा बेत होता.

आफ्रिकेतील लोककथा



पहाडावरच्या उंच खडकांशी ओहायोने या दोघांना बांधून ठेवलं आणि त्यांच्याकडून रहस्य वदवून घेण्यासाठी त्याच्या साथीदारांनी त्यांचा छळ करायला सुरुवात केली. साथीदारांनी या दोघांच्या अंगावर मोठमोठ्या लाल मुंग्या सोडल्या! पण उलुकागा किंवा कियेंजी या दोघांनीही आपली तोंडं काही उघडली नाहीत!

नंतर ओहायोचा एक साथीदार दोन काळे, भयानक असे विंचू घेऊन आला. तो विंचू चावला, की मृत्यु निश्चित होता. विंचू पहाताच कियेंजी भीतीने थरथर कापू लागला! ते पाहून आता उलुकागा विचारात पडला.

ओहायोने कर्कश्य आवाजात आता उलुकागाला विचारले—"काय? आता तरी औषधाचं रहस्य मला सांगणार, की हे विंचू चाववून घेऊन मरण पत्करणार!" भिऊन गेलेल्या आपल्या पोराकडे एकदा एकटक पाहून उलुकागा उत्तरला—"मला अगोदर एक नियम पाळावा लागेल. हे रहस्य जाणून घेताना मला प्रतिज्ञा करावी लागली होती की मी याचा उपयोग केवळ आपल्या टोळीतल्या लोकांसाठीच करीन. तेव्हां आता माझ्याच टोळीतला एकजण समोर असताना मी दुसऱ्या टोळीतल्या कुणाला ते रहस्य सांगितलं, असं होऊ नये म्हणून अगोदर तुम्ही या माझ्या मुलाला मारून टाका, म्हणजे मी हे काम केल्याचं माझ्या जातीत कुणालाच कळणार नाही; अन् त्यांच्यासमोर मान खाली घालायचा प्रसंग माझ्यावर येणार नाही."

ओहायोला हे बोलणं पटलं अन् त्याच्या आज्ञेने त्याच्या एका साथीदाराने एक विषारी बाण सोडून उलुकागाच्या समोरच त्याचा मुलगा कियेंजी याला मारून टाकले. पाहता-पाहता कियेंजीचं शरीर काळं पडलं अन् त्याचे पंचप्राण शरीर सोडून गेले! आता कियेंजीच्या तोंडून रहस्य बाहेर पडायची भीती नाहीशी झाल्याने उलुकागाला मनोमन समाधान वाटलं.

ओहायो चालत उलुकागाजवळ पोचला आणि त्याची बंधनं कापून टाकत त्याला म्हणाला—"उलुकागा, तुझ्या म्हणण्याप्रमाणे आम्ही तुझ्या मुलाला मारून टाकलंय. आता निस्संकोचपणे मला ते रहस्य सांगून टाक."

उलुकागा आरामात एका दगडावर बसून म्हणाला—"तुम्ही लोकांनी माझ्या मुलाला मारून तर टाकलंत. पण ही गोष्ट तुमच्या लक्षात आली नाही, की ते रहस्य जाणून घेण्याची असलेली एकच एक संधी तुम्ही दवडलीत!"

उलुकागाचं बोलणं ओहायोला नीट समजेना! गोंधळून तो म्हणाला—"तू काय म्हणतोयस, ते कळलं नाही मला!"

"हो, हो! नीट सांगतो ना आता! तुम्ही काळे विंचू दाखवून आम्हाला घाबरवायचा विचार केलात. माझा मुलगा खरोखरच घाबरून कापू लागला. ते पाहून मी ओळखलं की आता काही फार वेळ तो ते रहस्य पोटात ठेवू शकणार नाही, विंचवाच्या भीतीने तो ते सांगून टाकील. ते सांगू नये यासाठी त्यानं ताबडतोब मरून जाणंच योग्य, असं मी ठरवलं. माझं सगळं खोटं बोलणं खरंच समजून तुम्ही त्याला मारूनही टाकलंत. अशा तऱ्हेनं तुम्हाला रहस्य कळायची शेवटची संधीही मी नाहीशी केली. आता काही केलंत तरी माझ्या तोंडून ते रहस्य बाहेर पडणार नाही. मी इतका भित्रा नाही, की मरणाच्या भीतीने शत्रुसमोर गौप्यस्फोट करीन! आपल्याच जातीच्या नाशाला मी कसा कारणीभूत बनेन? माझ्याकडून रहस्य जाणून घेतल्यावरही तुम्ही मला जिवन्त ठेवणार नाही, हे ही मी खूप समजून आहे. माझा जीव जाणार असला तरी, ते रहस्य तुम्हाला सांगून तुमच्या जातीचं, आमच्या जातीवर वर्चस्व वाढायला माझ्यामुळे तरी तुम्हाला संधी मी मिळू देणार नाही." इतकं बोलून कुणाला काही कळण्यापूर्वीच एकदम उलुकागाने एक झेप घेऊन खालच्या दरीत उडी मारली.





# माकडीण

जुन्या काळातील गोष्ट आहे. कनकसेन नावाचा राजा कांचीपुर राज्यावर शासन करीत असे. तो मोठं विलासमय जीवन जगत असे. दूरदूरच्या देशातून फुलझाडे व फलवृक्ष आणून त्याने राजवाड्यामागे एक सुंदर उद्यान तयार केले होते.

या अतिसुंदर उपवनात त्याने एक सुरेख सरोवर तयार केले होते. या सरोवराच्या भोवती मोठ-मोठे वृक्ष होते नि त्यांना निरनिराळ्या पुष्पलता प्रेमाने विळखा घालीत होत्या.

एक दिवशी कांचीपुरची महाराणी या सरोवरात स्नान करण्यासाठी निघाली. सरोवरात उतरण्यापूर्वी तिने आपले सर्व अलंकार काढून आपल्या सेविकेच्या हाती दिले. त्यात एक मूल्यवान नवलखा हार पण होता.

सेविकेने राणीच्या हातून दागिने घेतले नि सरोवारच्या किनाऱ्यावर एका ठिकाणी ठेवून जवळपासच्या वेलींवरील फुले तोडू लागली. इतक्यात तेथील एका माकडिणीने खाली उडी मारली आणि तो नवलखा हार घेऊन एका दमात ती झाडावर चढून गेली.

सेविकेने नवलखा हार घेऊन जाणाऱ्या माकडिणीला पाहिलं अवश्य. पण बिचारी काही करू शकली नाही. तिच्याकडे पहात राहिली. एवढ्यात राणी स्नान करून सरोवराबाहेर आली, कपडे घातले. आपल्या दागिन्यात नवलखा हार नाही असं पाहून तिने सेविकेला विचारले.

"राणीजी, आपले सर्व दागिने मी इथेच ठेवलेले होते. तुमचा हार कुठे गेला, मला काहीच माहीत नाही." महाराणी रागावेल अशी भीती वाटून सेविकेने खोटंच सांगितलं.

२५ वर्षांपूर्वीच्या चांदोबातील गोष्ट



महाराणीने जाऊन महाराजांच्या कानांवर ही गोष्ट घातली. राजाने महामन्त्र्याला बोलवून आज्ञा दिली–आज सूर्यास्तापर्यंत चोराला पकडून घेऊन या. मंत्र्याने ताबडतोब दण्डनायकाला बोलवून सांगितलं–आज संध्याकाळपर्यंत हार चोरणाऱ्या चोराला पकडलं नाही तर त्याला नोकरीवरून काढून टाकलं जाईल. दण्डनायक शेकडो सैनिकांसह निघाला. कुणाला ही चोराचा पत्ता लागला नाही. पण त्यांना असं वाटत होतं की चोर गरीब असला पाहिजे नि फाटके-मळके कपडे घातलेल्या वेशात कुठे तरी सापडेल.

शहरात आणि आसपासच्या जंगलात कसून तपासणी करून सूर्यास्ताच्या सुमारास त्यांनी फाटके कपडे घातलेल्या एका गरीबाला पकडून आणलं. चोराला पकडल्याची बातमी राजाला कळली तेव्हा राजा त्याला पाहण्यासाठी दरबारात आला.

त्या गरीब बिचाऱ्याला धमकी देत राजाने विचारले–"बोल, राणीचा नवलखा हार कुठे लपवून ठेवला आहेस?" बिचारा अगोदरच खूप घाबरला होता, शिवाय आपण चोर नसल्याचं सांगितलं तरी कोणी विश्वास ठेवणार नाही हे जाणून त्याने सांगून टाकलं–"मी तो हार कोषाध्यक्षाला दिला!" ताबडतोब खजिनदाराला पकडून आणलं गेलं. राजाने खजिनदाराला तोच प्रश्न विचारला–"बोल, हार कुठं लपवला आहेस?" खजिनदाराला माहीत होतं कि आता खरं सांगितलं तरी राजा त्याच्यावर विश्वास ठेवणार नाही. तो लगेच म्हणाला–"मी तर नवलखा हार राज-जोतिषाकडे दिला!"

आता दरबारी ज्योतिषाचे हात-पाय बांधून त्याला राजापुढे आणण्यात आलं. राजाने ज्योतिषाला ही पुन्हा तोच प्रश्न विचारला, कोषाध्यक्षाप्रमाणे ज्योतिषाने विचार केला नि सांगितलं–"मी तो हार मंत्र्याच्याच्या मोठ्या मुलाला दिला."



आता पर्यंत बराच उशीर झालेला होता. राजा म्हणाला–"आता पुढील चौकशी उद्या करू. आज दरबार बरखास्त. या सर्व चोरांना तळघरात बंद करून ठेवा." असं सांगून राजा सिंहासनावरून उठला नि आपल्या महालात गेला.

त्या रात्री मंत्र्याला झोप आली नाही. मंत्र्याला मोठं आश्चर्य वाटलं की नवलखा हार चोरला काय जातो नि शेवटी प्रकरण आपल्या मुळापर्यंत येऊन ठेपतं! अर्ध्या रात्री तो तळघराच्या दाराशी गेला नि लपून आतील कैद्यांची बोलणी ऐकू लागला.

आत कुणी तरी रडत होतं. रडणं थांबल्यावर त्या गरीबाचा आवाज ऐकू आला.

तो म्हणत होता–"खजिनदारजी, मला माफ करा. प्राणांवरील संकट टाळण्यासाठी मी खोटं बोललो. खरं म्हणजे त्या नवलखा हाराबद्दल मला काही ही माहीत नाही."

नंतर खजिनदार म्हणाला–"ज्योतिषि महाशय, आपण मला क्षमा करावी. मी पण आपले प्राण वाचविण्यासाठी माझ्यावर आलेला आरोप आपणावर ढकलला. मला वाटलं–आपण ज्योतिषि आहात. खरा चोर कोण ते आपण जाणू शकाल!"

आता ज्योतिषाने उत्तर दिलं–"माझं ज्योतिष......! असल्या चोऱ्यांचा तपास लावणं माझ्यासारख्याला काय जमणार? म्हणून मी आपल्या गळयातला फास मंत्र्याच्या मुळावर फेकला."

या सर्व गोष्टी ऐकून मंत्र्याला वस्तुस्थितीची जाणीव झाली. लगेच अर्ध्या रात्री मंत्री राजाकडे गेला आणि तळघरात ऐकलेल्या सर्व गोष्टी त्याने राजाला जशाच्या तशा सांगितल्या.

मंत्र्याचे बोलणे ऐकून राजाने एक दीर्घ सुस्कारा टाकला. राजा विचार करू लागला–तर मग आपल्या राणीचा मूल्यवान नवलखा हार खरंच कोणी बरं चोरला असावा?

सकाळ झाली. राजाने त्या सेविकेला बोलवून घेतले. रागाने डोळे लाल करीत राजाने तिला धमकी दिली–"खरं सांगशील की नाही? नाहीतर तुझी खांडोळी करून कावळे नि गिधाड यांना खाऊ घालीन! समजलं?"

सेविका बिचारी भीतीने थरथरू लागली. प्राणांचा मोह कोणाला नसतो? हळू हळू खरी गोष्ट ती सांगू लागली–"महाराज, मी चोरी केली नाही. पण सरोवराच्या किनाऱ्यावरील पिंपळाच्या झाडावरील माकडिणीवर माझा संशय आहे!"

डोळे वटारून राजाने विचारले–"त्या माकडिणीवर तुझा का संशय? ती काय तुझ्याहून अधिक सुंदर आहे?"

"नाही महाराज, माझ्या संशयाचं कारण आहे. त्या माकडिणीने महाराणीच्या सारखी हळू हळू चालण्याची नक्कल करायचा प्रयत्न केला. महाराणीजी स्नान करीत होत्या, तेव्हा तिने स्नान करण्याचा ही अभिनय केला. महाराणीसारखं स्मित हास्य करायचा ही तिने प्रयत्न केला–हे सगळं मी आपल्या या डोळयांनी पाहिलं!" सेविकेने कथन केलं.

सेविकेच्या या गोष्टी ऐकून राजाच्या रागाचा पारा आणखीनच चढला. त्याला वाटलं या सेविकेला सुळावर चढवली पाहिजे. पण आपल्या नवलखा हाराची आठवण येताच राजा अमळ शांत झाला.

"तर मग हार त्या माकडिणीने चोरला असावा असंच तुला म्हणायचंय ना? पण तिने तो हार कुठे लपवून ठेवला असावा



हे आम्हाला कसं समजेल?" राजाने विचारले.

"महाराज, ते काही फार कठीण नाही!" गालांतल्या गालात हसत सेविका म्हणाली.

"फार कठीण नाही! ते कसं?" गुश्श्यातच राजाने प्रश्न केला.

सेविकेने नम्रपणे प्रश्न विचारला– "महाराज, आपण जेव्हा महालात असता तेव्हाच महाराणी नवलखा हार परिधान करतात ना?"

"बरं मग?" राजाने भुवया ताणीत विचारले.

"महाराज, आपण माझ्यावर रागावणं शक्य आहे! मी विस्ताराने काय सांगू? पण माकडिणीचे नवलखा हार कुठं लपवला आहे हे जाणण्यासाठी आपल्याला अगोदर एक माकड आणलं पाहिजे!" सेविकेने आपला विचार सांगितला.

सेविकेच्या बोलण्यातील आशय लक्षात घेऊन राजा मनोमन हसला. राजाला समजलं की सेविका राणीची माकडिणीशी नि राजाची माकडाशी तुलना करीत आहे. वाटेल ते करून हार शोधून काढलाच पाहिजे असा विचार करून राजाने तावडतोब एक माकड घेऊन येण्याची मंत्र्याला आज्ञा दिली.

माकड आणलं गेलं. त्याला राजाप्रमाणे सजवून राजा, मंत्री नि दरबारी लोक उद्यानाकडे निघाले.

पिंपळाच्या झाडावरील माकडिणीने हे सर्व पाहिले. झटकन उडी मारून ती पिंपळावर गेली, लपवलेला हार तिने बाहेर काढला. हार आपल्या गळ्यात घालून ती सजलेल्या माकडासमोर नाचत नाचत आली.

आता चोर सापडला! शिपायांनी माकडिणीला पकडून नवलखा हार काढून घेतला. बिचारी माकडीण आरडा-ओरडा करीत पिंपळावर चढून बसली.

राणीला आपला नवलखा हार मिळाला. सर्व निर्दोष गुन्हेगारांना सोडून दिलं गेलं. सेविकेच्या बुद्धीची प्रशंसा करीत राजाने तिला एक छान बक्षिस दिले.





# योग्य वर

विजयपुरी राज्याच्या दरबारात रामशर्मा नावाचा एक महान ज्योतिषी रहात असे. एक दिवस सूर्योदयाचे वेळी नदीत स्नान करून परत येत असताना, वाटेत रस्त्याच्या कडेच्या एका झाडाच्या फान्दीला फास लावून, मरण्याच्या तयारीत असलेला एक तरूण त्याला दिसला.

त्या तरुणाला दटावून रामशर्मा त्याची चौकशी करू लागला–"तुझं नाव काय? कुठे रहातोस तू?"

"माझं नाव जयसिंह. मी विजयपुरीचा रहाणारा." तो तरूण उत्तरला.

"अरे, मग जिवाला इतका का कंटाळलास एवढ्यात?" रामशर्माने विचारले.

"जिच्यावर मनापासून प्रेम केलं, तिच्याशी जर माझं लग्न होऊ शकणार नसेल, तर जगायचं कशाला मी?" दुःखाने जयसिंह बोलला.

"आपला हात दाखव बरं मला!" असे म्हणून रामशर्माने त्या तरुणाचा हाथ जरा वेळ पाहून घेतला–"अरे, विवाहाचा तर महान योग दिसतोय तुझ्या हातावर!" रामशर्माने त्याचे भविष्य वर्तवले.

"असं? पण तुमच्या म्हणण्यावर मी कसा विश्वास ठेवू?" त्याच्याकडे पहात जयसिंहने विचारले.

"माझं नाव रामशर्मा, विजयपुरीचा दरबारी ज्योतिषी आहे मी!" मोठ्या अभिमानाने रामशर्माने माहिती दिली.

"पण तुमच्या ज्योतिषावर मी कसा विश्वास ठेवणार? मी एक अब्राह्मण आहे; अन् ती मुलगी आहे ब्राह्मण. तिचे आई-वडील कसे आपली मुलगी देतील मला?" जयसिहने विचारले.

"कपाळावर लिहिलेलं असेल, तर जात, कूळ काहीही हे लग्न थांबवू शकणार नाहीत.

सुदाम पवार

वराचे गुण अन् स्वभाव हेच मुख्य. मुलीचा बाप या विवाहाला नक्की संमति देईल." रामशर्मा अशा स्वरात बोलला, की जसं काही तो जयसिंहला अभयदानच देत आहे.

"पण आणखी एक अडचण आहे. मुलीचं कुटुंब श्रीमंत आहे, अन् मी आहे एकदम कंगाल! श्रीमन्त बाप आपल्या मुलीचा हात भिकाऱ्याच्या हाती कसा देईल?" जयसिंहने आणखी अडचण मांडली.

तरीही हसत रामशर्मा म्हणाला–"तू म्हणतोयस की मुलीचा बाप धनवान आहे. मग तो तुलाही थोडं धन देऊन श्रीमन्त बनवू शकेल की नाही?"

"तुमचं म्हणणं बरोबर आहे. पण तो दरबारात उच्च पदावर आहे. मी शिकला-सवरलेला आहे, पण बेकार आहे न! एका बेकार तरुणाला जावई करून घ्यायला त्याला कमीपणा वाटेल की नाही?" जयसिंहने विचारले.

"ही काय अडचण झाली? तुझा होणारा सासराच आपल्या कीर्तीच्या बळावर तुला राजदरबारात नोकरी लावून देऊ शकेल." तीही अडचण दूर करीत रामशर्मा बोलला.

"तुमचं बोलणं ऐकून माझ्या मनात आता आशा जागू लागलीय. मला वाटतंय की माझं लग्न त्या मुलीशी होऊ शकेल." असे म्हणून जयसिंहने रामशर्माला साष्टांग नमस्कार केला.

"वा वा! हे छान झालं! आता सांग बरं, कोणत्या मुलीवर प्रेम आहे तुझं?" रामशर्माने खुषीने हसत विचारले.

"तुमच्या दोन नंबरच्या मुलीवर, कावेरीवर प्रेम आहे माझं!" रामशर्माने आता सांगून टाकले.

"वा रे वा! भले शाबास! आपल्या बोलण्याने तू मलाच अडकवलंस तर!" रामशर्मा हसून बोलला. तो जयसिंहच्या वाक्चातुर्य आणि बुद्धिकौशल्यावर इतका मोहित झाला, कि कावेरीसाठी त्याला तो 'योग्य वर' वाटला. शुभ मुहूर्त पाहून रामशर्माने त्या दोघांचा थाटाने विवाह लावून दिला.





## नायगारा लुप्त होत आहे!

प्रवाश्यांना आनन्दविभोर करणारा सुप्रसिद्ध 'नायगारा धबधबा' हळू हळू एका सर्वसामान्य प्रवाहाचे रूप धारण करील, असा अन्दाज भूगर्भशास्त्रज्ञ व्यक्त करीत आहेत. प्रचंड वेगाने खाली कोसळणारे पाणी, त्याखालच्या चुन्याच्या दगडांना वर झिजवून टाकत आहे. त्यामुळे १०,००० वर्षांपूर्वी तयार झालेला हा धबधबा येत्या २०,००० वर्षांत एक सामान्य नदी बनून वाहत राहील.





## पेंग्विन पक्षी

अंटार्क्टिकाचे नाव घेताच जवळ-जवळ पावले टाकत इतस्ततः भ्रमण करणाऱ्या पेंग्विन पक्ष्यांची आठवण येते. दक्षिण ध्रुवाकडे बेसुमार संख्येने दिसणारे हे पक्षी उत्तर ध्रुवाकडे औषधालासुद्धा सापडत नाहीत! या पेंग्विन पक्ष्यांच्या एकूण सतरा जाती आढळतात.

## पितो, खात नाही!

कोळी आपले भक्ष मिळवून खातो? मुळीच नाही, तो फक्त भक्ष पितो! कारण नळीसारखे असणारे त्याचे तोंड फक्त पदार्थ पिऊ शकते. त्याच्या तोंडातून गळणारा एक प्रकारचा द्रव पदार्थ किडे वगैरेंना विरघळवून टाकतो, नंतर कोळी तो द्रव पितो. टेरन्टुला कोळी उंदीर व लहान पक्षी यांना एकाच दिवसात विरघळवून शोषून घेऊ शकतो.













# साहसाबद्दल नोबेल शांति - पुरस्कार

**या** वर्षीचा नोबेल शांति-पुरस्कार मियानमार (बर्मा) श्रीमती आंग सान् सू क्यीला देण्यात आला. भारतालाही ही बातमी संतोषप्रद आहे. कारण आंग सान् सू क्यीचे प्रारंभिक शिक्षण दिल्लीत झाले. त्या काळी तिची आई श्रीमती खिन् क्यी भारतात ब्रह्मदेशाची राजदूत म्हणून काम करीत असे.

दोन मुलांची आई आंग सान् क्यी ४६ वर्षे वयाची आहे. नोबेल पुरस्कार समिति द्वारा दिलेल्या प्रशंसापत्रात म्हटले आहे— "श्रीमती आंग सान् सू क्यी ने जगात स्वतंत्रता-प्राप्तीसाठी लढणाऱ्या नागरिकांना आणि मानवी अधिकारांचे संरक्षण करणारांना, तसेच मानवजाती बद्दल प्रेमपूर्ण सहानुभूति साठी शांतिपूर्ण मोर्चा काढणारांना सतत उत्तेजन दिले. गेल्या दशकात आशियात शांतिपूर्ण मोर्चे संगठित करून अपूर्व सामाजिक साहस दाखविण्याचे आगळे, विलक्षण व असामान्य कार्य आंग सान् सू क्यीने केले." श्रीमती सू क्यी आधुनिक ब्रह्मदेशाचे निर्माते यशस्वी आंग सान् यांची सुपुत्री होय. ब्रिटिशांच्या काळात ब्रह्मदेश भारतीय साम्राज्याचे एक अंग होता. आंग सान् या साहसी नेत्याने अखंड लढा लढून ब्रह्मदेशाला स्वातंत्र्य मिळवून दिले. परंतु ब्रह्मदेश स्वतंत्र झाल्यावर १९ जुलई १९४७ रोजी आंग सान् व त्याचे आठ सहकारी यांची अमानुष कत्तल करण्यात आली ही अत्यंत दुर्भाग्याची

गोष्ट आहे. त्यावेळी सू क्यी दोन वर्षांची होती.

दिल्लीतील कॉलेजचे शिक्षण संपवून सू क्यी ऑक्सफोर्ड विश्व-विद्यालयात दाखल झाली. तेथे राजनीतिशास्त्र व अर्थशास्त्राचे उच्च अध्ययन करून तिने पदवी मिळवली. यानंतर काही काळ लंडन विश्व-विद्यालयात व काही काळ संयुक्त राष्ट्रसंघात तिने नोकरी केली. एका इंग्रज युवकाशी विवाहबद्ध होऊन मग ती इंग्लंडला आली. नंतर संशोधन-कार्यासाठी ती भारतात आली व सिमला येथील इंडियन इन्स्टिटयूट ऑफ ॲडव्हान्स्ड स्टडीज मध्ये अध्ययन केले. इथे रहात असताना तिने दोन पुस्तके लिहिली. एक आहे आपल्या पित्याचे जीवन-चरित्र आणि दुसरे मुलांना ब्रह्मदेशाची माहिती देणारे 'लेट अस व्हिजिट बर्मा' नावाचे पुस्तक.

संशोधन-कार्यासाठी सू क्यी पुन्हा लंडनला आली. आई बरीच आजारी आहे असे समजल्यावर ती रंगूनला परतली. त्यावेळी जनरल नेविन यांच्या निरंकुश शासनात ब्रह्मदेशातील जनता हाल-अपेष्टा सहन करीत होती. सन १९८८ मध्ये ती जेव्हा पुन्हा मायदेशी आली, तेव्हा जनता तिच्या नेतृत्वाखाली लढ्यास तयार होती. शासन मात्र तिच्या हालचालीकडे शंकास्पद नजरेने पहात होते. ८ ऑगस्ट रोजी झालेले विद्यार्थी-आंदोलन शासनाने अत्यंत निर्दयपणे दाबून टाकले. स्वातंत्र्यासाठी गेली तीस वर्षे चालू असलेला लढा पाहून सू क्यी शांतपणे बसू शकली नाही. २ सप्टेंबर रोजी झालेल्या अधिवेशनात तिने मागणी केली की तात्कालिक सरकारची स्थापना ताबडतोब झाली पाहिजे आणि त्या सरकारच्या देखरेखीखालीच निवडणुका झाल्या पाहिजेत. अन्य दोन नेत्यांच्या सहकार्याने 'नॅशनल लीग फॉर डेमॉक्रसी' नावाच्या नव्या पक्षाची स्थापना केली. ता. २४ सप्टेंबर रोजी सू क्यी या नव्या एन्.एल्.डी. पक्षाची प्रधान मंत्री बनली.

१९ जुलई १९८९ रोजी 'हुतात्मा' दिनानिमित्त आपले वडील आंग सान् यांच्या ४२ व्या स्मृति-दिनानिमित्त एक विशाल वार्षिकोत्सवात एक प्रचंड मिरवणूक काढण्यात आली. दुसऱ्याच दिवशी सरकारने तिला नजरकैद केलं. १९९० मध्ये झालेल्या सर्वसाधारण निवडणुकीत तिच्या पार्टीला प्रचंड बहुमत मिळालं. पण शासनाने लोकमताला धाब्यावर बसवलं! गेल्या वर्षी 'मियामनार' हे नवे नाव घेतलेला ब्रह्मदेश स्वातंत्र्यासाठी आता आसुसलेला आहे.

लोकशाही व मानवमात्राच्या अधिकारांच्या संरक्षणासाठी आंग सान् सू क्यीने अहिंसा मार्गाचा अवलंब करून जे शांतिपूर्ण युद्ध आरंभिले त्याची नोबेल पुरस्कार-समितीने मुक्त कंठाने प्रशंसा केली. तिचे अभूतपूर्व धैर्य व साहस यांच्या स्मरणार्थ समितीने श्रीमती सू क्यीला नोबेल पारितोषिक देऊन तिचा सन्मान केला.



# जादूगारिणीची पाळीव कन्या

एक होती जादुगारीण. कोल्हापूरच्या जंगलात लाल मातीच्या टेकाडावर एका झोपडीत ती रहात असे. जादुगारीण आता म्हातारी झाली होती. तिची एक पाळलेली मुलगी होती. तिचे नाव होते कमला. कमला आता वयात आली होती. जादुगारिणीच्या गरजांची आता तीच व्यवस्था पहात असे. एके दिवशी संध्याकाळी पंचवीस वर्षांचा एक तरूण त्या टेकाडावर आला. त्यावेळी जादुगारीण आपले तांब्याच्या तारेसारखे दिसणारे केस कमलाकडून विंचरून घेत बसली होती.

त्या तरुणाला पहाताच जादुगारणीचे मांजरीसारखे असलेले डोळे रागाने लाल झाले. त्याच्याकडे रोखून पहात त्याला धमकावत जादुगारिणीने विचारले–"तुझं इतकं धाडस! कोण आहेस तू? हे टेकाड चढून येण्याचं साहस कसं करवलं तुला?"

"आत्याबाई, जो मरायला तयार झाला आहे, त्याला आणखी कशाचं भय? तू, वाटलं तर मला कोंबडा-कोंबडी बनव आणि शिजवून खाऊन टाक!" तो तरूण उदास आवाजात म्हणाला.

"हं, तुझ्यासारख्या एरंडेल प्यायल्या-सारखी तोंडं करणाऱ्या युवकांची मला शिसारी वाटते. पण प्रथम हे सांग न, की असं कोणतं संकट येऊन कोसळलंय तुझ्या डोक्यावर?" जादुगारणीने जरा शान्त होत विचारले.

या दरम्यान कमला झोपडीत गेली आणि लोटाभर थंड पाणी आणून तिने त्या तरुणाला दिले.

घटाघट पाणी पिऊन तो तरूण म्हणू लागला–"आत्याबाई, माझं नाव आहे सूर. आमच्या शेजारची मुलगी अखिला हिच्यावर फार प्रेम आहे माझं. पण तिचा बाप

स्वाती देशपांडे



तिच्यासाठी दुसरी स्थळं पहात आहे. आज सकाळी मी त्याला भेटलो आणि म्हटलं की मी लग्न करीन, तर अखिलाशीच करीन, नाहीतर आजीवन ब्रह्मचारी राहीन. तर तो माझ्यावर भलताच भडकला अन् म्हणाला की कवडीकिंमतीचा मी, आपल्या बायकोचं पोट कसं भरीन? माझा अपमान करून त्यानं ढकलून दिलं मला! आता माझी मलाच घृणा वाटू लागलीय. असलं जिणं जगण्यापेक्षा मरणंच बेहत्तर! म्हणूनच मुद्दाम तुला शोधत आलोय मी इथं!" इतके बोलून तो उसासे सोडू लागला.

जादुगारीण यावर काहीच बोलली नाही. टेकाडावरून उतरून ती तळ्याजवळ गेली अन् तियले काळे बदक मानेला पकडून घेऊन आली.

"तू काय मला बदकाच्या मासाची मेजवानी देणार आहेस?" सूरने आश्चर्याने विचारले.

"असं नाही रे!" ती त्याला म्हणाली— "हे एक विचित्र बदक आहे. तू त्याला जितक्या वेळा म्हणशील, तितक्या वेळा हे अंडं देत राहील. दिवसभर याच्याकडून अंडी मिळवून, ती विकून, त्या पैशातून आरामात तू बायकोलाही खायला घालू शकशील. अखिलाच्या बापाला हे सांग, म्हणजे तुझी अडचण दूर होईल."

ते बदक घेऊन सूर निघून गेला. पण दुसऱ्या दिवशी अंधार होण्यापूर्वीच तो बदकासह जादूगारणीकडे परत आला.

त्याला पाहून ती आश्चर्याने म्हणाली— "मला वाटलं होतं की बायकोला बरोबर घेऊनच तू आशिर्वाद घ्यायला माझ्याकडे येशील! मग असा चेहरा पाडून का परत आला आहेस?"

जवळच चमेलीची फुलं तोडत असलेली कमला लगेच झोपडीत गेली आणि लोटयातून थंड पाणी आणून तिने सूरला दिले. पाणी पिऊन सूर म्हणाला—"हे बदक पाहून अखिलाचा बाप मुळीच खूष झाला



नाही. तो उलट म्हणाला—'मी माझं पांढरं मांजर याच्यावर सोडलं, तर क्षणातच ती याचा चट्टामट्टा करील. मग कसं अखिलाचं पोट भरशील तू?' मी यावर काय उत्तर देणार? आता माझं जगणं अगदीच बेकार आहे आत्याबाई!"

जादूगारणीने यावर बराच विचार केला. नंतर तिने कोपऱ्यात ठेवलेला एक पेटारा पुढे ओढला आणि ती म्हणाली—"या पेटाऱ्याची करामत काय सांगू? आता तुझा सासरा नक्कीच आपल्या पोरीचं लग्न तुझ्याशी लावून देईल बघ. या पेटाऱ्यात हात घालून तू जी वस्तु मागशील, ती मिळेल तुला! हं, पण यातनं अखिला मागू नकोस हं! फक्त निर्जीव वस्तुच मिळतील यातनं."

सूर तो पेटारा डोक्यावर घेऊन निघून गेला. पण दुसऱ्या दिवशी संध्याकाळी झोपडीशी पोचताच त्याने तो जादूगारणीच्या दारातच खाली आपटला.

"तुझ्या सासऱ्याला हा पेटाराही निरुपयोगी वाटला की काय?" जादूगारीण रागाने बोलली.

"आता या बाबतीत माझ्याशी काही बोलूच नकोच आत्याबाई! त्याचं बोलणं आठवलं तरी माझ्या पोटात आग पेटतेय



नुसती! ते बोलणं तू ऐकलंस तर शान्त राहूच शकायची नाहीस तू! हां, इतके वाईट आहेत ते शब्द." सूर दम टाकत म्हणाला.

"हं? इतकं धाडस? काय म्हणला तो? आता तर नक्की ऐकायलाच हवेत ते शब्द मला! सांग लवकर सगळं!" जादूगारीण राग न आवरता ओरडली.

कमलाने सूरसाठी गार पाणी आणलं. पण ते जादूगारणीला देत तिने विचारलं— "तू का श्वास टाकतेयस आई? तुझी तर अगोदरच तब्येत बरी नाहीय." पण हे विचारताना कमलाचा आवाजही रडवेला झाला.



पाणी पिऊन जादूगारीण म्हणाली–"हां, आता सांग रे, काय म्हणाला तो घमेंडखोर?"

"त्यानं या पेटाऱ्याचा चमत्कार पाहिला. प्रथम तो काहीच बोलू शकला नाही. पण नंतर जरा सावरून संशयाने माझ्याकडे पहात त्यानं विचारलं–कुठून आणतोस या साऱ्या जादूच्या वस्तु? त्या लाल टेकाडावरच्या जादूगारणीकडूनच आणत असला पाहिजेस बहुधा? तिचीच मेहरबानी दिसतेय ही! मग माझ्या मुलीवर डोळा कशाला तुझा? जा, जा! त्या जादूगारणीच्याच पाळलेल्या – दत्तक-मुलीशी गाठ मारून घे ना आपली! असं म्हणून दातओठ खात पहात राहिला माझ्याकडे तो आत्याबाई!" सूरने सांगून टाकले.

हे ऐकून, जसे काही आपल्याला फार महत्वाचे काम आहे, असे दाखवत कमला घाई घाईने झोपडीत निघून गेली.

जादुगारीण जरा वेळ विचार करत गप्प राहिली. नतर ती म्हणाली–"तो जे काही बोलला, त्यात मला काही वाईट दिसत नाहीय. पण हो, तुझी ह्या प्रस्तावाला काही हरकत नसेल तरच हं."

यावर सूरची जीभ जरा अडखळली. तो म्हणाला–"पण......पण, कमलाला मी पसन्त असेन तर......!"

"कमलाचं सोड, मी म्हणेन ते ऐकेल ती! ठीक, मग हे लग्न कुठे अन् कसं करायचं सांग." जादूगारणीने विचारले.

"आता मला शहरात नोकरी मिळालीय आत्याबाई. लग्न साधंच आणि एकाद्या देवळात करू." सूर म्हणाला.

दोन दिवसात विवाह पार पडला.

सूर बायकोला घेऊन शहराकडे निघाला तेव्हा जादूगारणीने विचारले–"जावईबापू! त्या दोन जादूच्या वस्तु नाही नेणार बरोबर?"

"त्यांची काही जरूर नाही सासूबाई! मी जी नोकरी करीन, ती आमच्या उदर-निर्वाहाला पुरेशी होईल. जादूच्या वस्तूंवर किती दिवस अवलंबून राह्यचं?" सूर बोलला.

"शाब्बास, लाखाची गोष्ट बोललात जावईबुवा!" जावयाची प्रशंसा करत सासू म्हणाली.

ते दोघं शहराकडे निघाले. दुपारी ते एका तलावाजवळ पोचले. तेथे एका झाडाखाली बसून त्यांनी जादूगारणीने दिलेली भाकरीची पोटली सोडली. त्यातून जादूगारणीने लिहिलेली एक चिठ्ठी निघाली. तीत असे लिहिले होते–

"जावईबुवा! असं समजू नका, की तुम्ही आपल्या सासूपेक्षा अधिक बुद्धिमान आहात. पहिल्याच दिवशी मी ओळखलं होतं कि तुम्ही कमलासाठीच आला आहात. कित्येकदा जंगलात फिरता फिरता कमला-कडे पहात बसलेले मी तुम्हाला पाह्यलं आहे. माझी त्या सर्वांवर नीट नजर असे. पण तुमच्या प्रेमाचा खरेपणा पहाण्यासाठीच मी एक परीक्षा घेतली. जादूच्या वस्तूंची लालूच मी तुम्हाला दाखवली. 'अखिलाशी प्रेम' हा तुमचा केवळ एक बहाणा होता, हे मी केव्हाच ओळखलं होतं. काहीही मागितलं, तरी देणारा पेटाराही तुम्ही परत केलात, तेव्हां तुमचं कमलावरचं मना-पासूनचं प्रेमही मी ओळखलं. तुमचं आयुष्य सुखासमाधानात जावं हीच माझी प्रार्थना! हां, पण कमीत कमी वर्षातून एकदा तरी मला भेटायला आलात, तर मी आपलं भाग्य समजेन!"

चिठ्ठी वाचून कमलाचे डोळे अश्रूंनी डबडबले. पदराने ते पुसत ती सूरला म्हणाली–"पाहिलंत, माझी आई किती चांगली आहे! पण तरीही सगळे जण मला–'जादूगारणीची पाळलेली मुलगी'–असंच म्हणतात!"

"आता काळजी नको करूस! यापुढे तुला सर्वजण 'सूरची बायको' असं म्हणू लागतील." तिचे सान्त्वन करीत सूर म्हणाला.



# चांगली गोष्ट

वल्लभ पक्का लाचखाऊ होता. लाच घेताना एकदा तो पकडला गेला. राजाने त्याला सेवासदनमधे पाठवले. सेवासदनमधे मानसिक अस्वास्थ्य असणारे आणि दीर्घकाळ रोगाने ग्रस्त असलेले रोगी ठेवले जात. शिक्षा म्हणून, अशा रोग्यांची शुश्रूषा करायला अपराध्यांना सेवासदनात पाठवायची राजाची पद्धत असे.

एकदा धारास नावाचा मोठा नामवन्त महात्मा त्या सेवासदनमधे आला. त्याने तेथील सर्व रोग्यांची नावे घेऊन त्यांची विचारपूस केली. एक आठवडाभर तो तेथेच राहिला आणि मोठ्या तत्परतेने रोग्यांची सेवाही त्याने केली.

हे सर्व पाहून आश्चर्याने वल्लभने धारासला विचारले–"स्वामी ! आपण तर मोठे महात्मा आहात; तरीही आपण या रोग्यांची सेवा करत आहात. आपणाला याबद्दल काही शरम किंवा कमीपणा नाही वाटत ?"

"माणसांची सेवा करताना शरम कसली बेटा ? उलट याबद्दल अभिमान वाटायला हवा !" धारास म्हणाला.

यावर वल्लभने आपली कहाणी सांगितली आणि म्हटले–"इथे काम करणं ही शरमेची गोष्ट वाटे मला आजवर ! पण आता यापुढे मीही त्यात अभिमान बाळगीन."

तेव्हा त्याला दटावत धारास म्हणाला–"कुठलंही काम अर्धवट सोडणं बरं नव्हे. म्हणून तू लाज वाटणंच चालू ठेवणं ठीक होईल." आणि महात्मा धारास तेथून निघून गेला.

धारास हा मानवसेवा करण्यासाठी आणि वल्लभ हा शिक्षा भोगण्यासाठी एका सेवासदनात आले होते. कोणीही जर काही काम करत असेल तर त्या कामाचा चांगलेपणा वा वाईटपणा, हा त्या कामाच्या श्रेष्ठतेवर नव्हे, तर ते करण्यामागील कारणावरच अवलंबून असतो; ही गोष्ट आता वल्लभच्या ध्यानात आली. धारासशी आपली स्वतःची तुलना करण्यात आपण केलेल्या त्याच्या अवज्ञेबद्दल त्याला शरम वाटली. त्या क्षणापासूनच आपले वाईट गुण सोडण्याचा तो आटोकाट प्रयत्न करू लागला.





# साहसी अपूर्व

[ १० ]

[पूर्व कथा : अपूर्वने समीरला डाकूंच्या तावडीतून सोडवले होते. अपूर्वच्या सूचनेवरून समीरने समुद्री चाच्यांपासून गावातली मुले वाचवली होती आणि खजिना राजाच्या हवाली केला होता. त्या धनाचा उपयोग प्रजाहितार्थ व्हावा असेही त्याने राजाला सुचवले. समुद्री चाचे कैद केले गेले. —आता यापुढील कथा वाचा.]

वाटसरूंची वाटमारी करून त्यांना लुबाडणारे चोर आणि समुद्रात जहाजे लुटणारे चाचे पकडले गेल्यामुळे राज्यात चोरांचे भय बरेच कमी झालेले होते, नाहीसेच झाले होते जवळजवळ ! इतकेच नव्हे, तर प्रजेत अशीही बातमी पसरली होती की दिव्यशक्तिसंपन्न असा कोणीसा माणूस चांगल्या लोकांचे रक्षण करीत असतो. दुष्टांचा अंत झालेला पाहून या दिव्यपुरुषाला पूर्ण समाधान मिळेल. या बातमीच्या प्रसारामुळेच दुष्ट लोकांची दुष्कृत्ये एकदम बन्द होऊ लागली. धर्मप्रिय राजाने समीरला आपला 'सल्लागार' नेमले. कुठल्याही प्रकारची अडचण वा संकट न येता काही दिवस असेच निघून गेले.

आता अपूर्व हिमालयात निघून आला आणि सदानन्द मुनींच्या सान्निध्यात



राहून तो ध्यान वगैरे करत दिवस कंठू लागला. ही गोष्ट एकट्या समीरशिवाय कोणालाच माहीत नव्हती. निघताना अपूर्वने त्याला वरदान दिले होते की, समीरने केव्हाही एकाग्र मनाने ध्यान केलं तर तो समीरसमोर ताबडतोब प्रकट होईल. आणि त्याला सर्व प्रकारची मदत करील.

एके दिवशी हिमालयावर योगी सदानन्दाने अपूर्वला आपल्याजवळ बोलावून म्हटले–"यापूर्वी अनेक योग्यांनी तप करून योग-विद्या मिळवली आणि त्यात परिपूर्णता प्राप्त करून घेतली. तेच कार्य तुलाही करायची काही गरज नाही. तुला एका विशिष्ट कर्तव्याचे पालन करायचे आहे आणि ती धुरा केवळ तुझ्याच खांद्यावर आहे. मी जी योगशक्ति मिळवली आहे, त्यातली थोडीशी मी तुला देत आहे. तिचा तू मानवजातीच्या कल्याणासाठी उपयोग करावास. आता तीच तुझी जबाबदारी. तू आपली जबाबदारी उत्तम प्रकारे पार पाडशीलच.

"मी पहिल्यापासून तेच तर करत आलोय न बाबा! आपल्या इच्छेविरुद्ध मी काही केलंय आणि आपण त्याबद्दल नाराज आहात, असं तर काही नाही घडलं ना माझ्या हातून?" अपूर्वने नम्रतेने विचारले.

"नाही बेटा, असं काही नाही. मी जो जो संकल्प केला, तो तो तू पूर्णच केलास. हे सर्व मनात आलं की माझं मन आनन्दाने भरून जातं!" योगी सदानन्द म्हणाला.

"धन्य आहे बाबा, मी धन्य आहे! हल्ली राज्यात सर्व काही उत्तम चालू आहे. लहान लहान काही समस्या असतात, हे मला माहीत आहे. पण त्या त्यांच्या त्यांनीच सोडवायच्या आहेत. 'प्रयत्न करणे' हे मानवजीवनाचं प्रमुख अंग आहे, अन् समस्यांशी लढल्यावाचून प्रगती होत नसते-हे तुम्हाला माहीत आहे न बाबा?" अपूर्वने विचारले.

"होय, ही गोष्ट एकदम खरीच आहे बेटा! पण तरीही, मानवस्वभाव हा फार क्लिष्ट आहे. शांतीने जीवन व्यतीत करणं, हे काही लोकांना कठीण जातं. काही लोक नेहमीच काही न काही अडचणीत सापडत असतात; त्यांना त्याशिवाय झोपच येत नाही जणू!" योगी सदानन्द गंभीर होत म्हणाले.

हे ऐकून अपूर्वच्या चेहऱ्यावर आश्चर्याबरोबरच भीतीही प्रकटली. त्याने चटकन विचारले–"बाबा, अशी काही माणसं आत्ता काही दुष्कर्म करू पहात आहेत काय?"

"होय, बेटा! तू सन्मार्ग दाखवलेल्यांपैकीच असणारे हे लोक तर त्या चोर-डाकूंपेक्षाही जास्त धोकेबाज आहेत. चोर-डाकू तर अगदी सामान्य माणसं असतात. पण मी आत्ता ज्यांच्याबद्दल सांगणार आहे, ती समाजात चांगली 'प्रतिष्ठित' म्हणून गणली जाणारी माणसं आहेत. यांपैकी काही अधिकारी माणसं आहेत, तर काही जण अमाप पैसेवाले लोक आहेत. आणखी काहीजण असे आहेत की जे खूपच बुद्धिमान आहेत." योगी सदानन्द लांब उसासा सोडत म्हणाले.



"आत्ता ते कोणता उपद्रव माजवू पहात आहेत बाबा?" अपूर्वने अस्वस्थ होत विचारले.

"त्याचा तुला स्वतःलाच पत्ता लावायला हवा. एकदा मी मानवजातीच्या भविष्याबाबत विचार करीत ध्यानावस्थेत पोचलो असताना माझ्या दिव्य दृष्टीला एक दृश्य दिसलं. दोन मोठी माणसं कसलंसं अपवित्र कार्य करण्यासाठी गुप्त कारस्थान करीत होती. या दोघांपैकी एकाला मी ओळखलं. तो आहे रुद्रपुरीचा प्रधान! उद्या पुन्हा ते दोघं काही गुप्त मसलत करणार आहेत. पण ती कसली मसलत अन् ते कोणतं कारस्थान याबद्दल



मात्र मला काहीच माहीत नाही. तू ताबडतोब प्रधानाच्या घरी जा, आणि काय घडणार आहे हे माहीत करून घे. ते कारस्थान तू शोधून काढ बेटा!" इतके बोलून सदानन्द योग्याने अपूर्वला आशिर्वाद देऊन रवाना केले.

* * *

संध्याकाळ झाली. रुद्रपुरीतल्या देवळांच्या घंटा वाजू लागल्या. राजवाडा आणि प्रधानाचे घर यांमधील एका वडाच्या झाडावर अपूर्व लपून बसला होता. प्रधानाच्या घरात शिरायला योग्य संधीची तो वाट पहात होता. राजवाड्यासमोर काही लोक मोठ्या आनन्दाने व उत्साहाने काही गोष्टी बोलत उभे होते. त्यातच काही माणसे घाईघाईने इकडे-तिकडे करताना दिसत होती. त्या बाजूला आलेला एक माणूस राजवाड्या-बरच्या एका नोकराला विचारू लागला—"काय झालंय? ही गडबड कसली?"

"आपली राजकन्या कृष्णकुमारी आजच लावण्यपुरीहून येत आहे. सहा महिने लावण्यपुरीला मामाकडे राहिली होती ती! या गडबडीचं कारण तेच." तो नोकर उत्तरला.

आणखी थोड्याच वेळाने सजवलेल्या हत्तीवरच्या हौद्यात बसलेली राजकुमारी राजवाड्याजवळ येऊन पोचली. हत्तीवर सुवर्णाचे छत्र झळकत होते! त्या हत्तीच्या पुढे आणि मागे असलेल्या दोन हत्तींवर राजकन्येच्या चार-चार सख्या बसलेल्या होत्या. मागे, पुढे आणि दोन्ही बाजूंनाही काही अंगरक्षक घोडेस्वार होते.

प्रथम राजकुमारीच्या सख्या आपापल्या हत्तींवरून खाली उतरल्या आणि कृष्ण-कुमारीच्या हत्तीजवळ गेल्या. माहुताच्या इशाऱ्यावरून हत्ती हळूच खाली बसला आणि मऊ गादीवाल्या आसनावर पाय ठेवत राजकुमारी खाली उतरली.

तोपर्यंत राजा विश्ववर्मा स्वतः तेथे येऊन पोचला आणि हसतच आपल्या कन्येसमोर गेला. पित्याला पाहिल्या-बरोबर राजकुमारीने प्रेमाने आपले हात पुढे केले.

तिचे हात हातात घेत "ये, बाळ!" असे म्हणत राजाने प्रेमाने तिचे कुशल विचारले.

युवराणी कृष्णकुमारी ही रुद्रपुरीच्या राजा विश्ववर्माची एकुलती एक कन्या होती. ती अगदी शैशवावस्थेत असतानाच तिच्या मातेचे-महाराणीचे-देहावसान झाले होते. परन्तु राजाने पुनर्विवाह केला नाही. रुद्रपुरीजवळील लावण्यपुरीचा राजा जयवर्मा हाच युवराणी कृष्णकुमारीचा मामा होता. त्याला मूलबाळ नसल्याने कृष्णकुमारीलाच तो मुलगी माने आणि तिचे खूप कोडकौतुक करी. तिच्यामुळे जयवर्माला आपल्या बहिणीचाच भास होई. एवंच, सध्या राजकुमारी कृष्णकुमारी हीच रुद्रपुरी व लावण्यपुरी या दोन्ही राज्यांची वारस होती. तीही आपला मामा लावण्यपुरीनरेश जयवर्मा याला पित्यासारखेच मानी, लावण्यपुरीही तिला आपल्या रुद्रपुरीसारखीच वाटे. त्यामुळेच सहा महिने तिकडे राहून आता ती रुद्रपुरीला आपल्या पित्याकडे परतत होती.

युवराणीच्या गळ्यात मोत्यांचा एक कंठा रुळत होता. त्यातील पदकातला अद्‌भुत



कान्तीने चमकणारा मणि पाहून राजाने तिला विचारले—हे काय आहे बाळ?"

"लावण्यपुरीहून धन घेऊन आलेय मी बाबा!" युवराणी उत्तरली.

कंठहाराकडे नीट पहात राजाने विचारले—"हा चन्द्रकान्त-मणि आहे ना कृष्णे?"

"होय, बाबा! चन्द्रकान्तच हा! गळ्यात न घालताच किती दिवस खजिन्यात सुरक्षित ठेवायचा? आता आपल्या दोन्ही राज्यात काही कमी सुरक्षितता नाही. म्हणूनच हा बाहेर काढायचं ठरवलं मी; आणि मामांनीही लगेच एक विशेष प्रकारच्या मोत्यांचा



कंठा बनवून मणि अडकवून दिला त्यात! आवडला हा कंठा तुम्हाला?" राजकुमारीने लाडाने विचारले.

"तुझा मामा महान् आहे बाळ!" असे म्हणत राजाने कृष्णकुमारीला प्रेमाने आलिंगन दिले.

*   *   *

"आजपर्यंत तुला तुझं नशीब सापडलं नव्हतं, आता ते तुझ्याकडे चालून आलंय. बास, हात पुढे पसरायचाच अवकाश आहे; समजलास!" आनन्दाने जादुगार बोलला.

प्रधान गप्प राहून ऐकत होता.

"तुला वाटत असेल की नशीब आपोआपच चालत आलंय. पण खरं नाही ते. मी आपल्या मन्त्रशक्तीचा उपयोग केलाय. लावण्यपुरीच्या राजाच्या मनात मी परिवर्तन घडवून आणलंय. राजकुमारीच्या गळयात चन्द्रकान्त मणि घालायची बुद्धि त्यामुळेच झालीय त्याला!" आपल्या टोकदार बोटांनी दाढी कुरवाळत जादुगार गर्वाने बोलला.

"महात्मा! आपली शक्ति मला माहीतच आहे!" प्रधान म्हणाला.

"अं! हा जादुगार 'महात्मा' कसा काय झाला?" लपून त्यांचे संभाषण ऐकत असलेला अपूर्व मनाशीच म्हणाला.

"जयवर्मा किंवा विश्ववर्मा या दोघांनाही चन्द्रकान्त-मण्याचा प्रभाव ठाऊक नाही, हे आपल्या पथ्यावरच आहे! त्यांना फक्त इतकंच माहीत आहे की हे जगातल्या मौल्यवान रत्नांपैकी एक आहे. त्याची अद्भुत अशी शक्ती मात्र त्यांना मुळीच माहीत नाही." असे म्हणून खो खो हसायची आपली इच्छा जादुगाराने दाबून टाकली.

जवळजवळ एक तासभर त्या दोघांची गुप्त मसलत चालू होती. ते ऐकून अपूर्वला कळून चुकले की प्रधान व जादुगार हे दोघं बालपणचे मित्र आहेत. दोघांनी एकाच गुरूपाशी विद्या ग्रहण केली होती. त्यांच्या गुरूच्या गुरूनेच



लावण्यपुर-नरेशाला तो अद्भुत् शक्ति-संपन्न चन्द्रकान्त मणि भेट दिला होता. त्यावेळेचा राजा हा आजच्या जयवर्माचा आजा. तेव्हांपासून तो मणि खजिन्यातच पडून होता.

जादुगार एकदा प्राचीन ताडपत्र-ग्रन्थ पहात असताना त्याला कळून चुकले की तो मणि धारण करून एक विशेष पूजा केली असता तो पूजक सर्व राजांचा राजा-म्हणजेच 'सम्राट'–बनतो. त्या क्षणापासून हा मणि कसा मिळवावा याच विचारात होता तो जादुगार. नन्तर त्याने लावण्यपुरीचा राजा जयवर्मा याला भेटून म्हटले की-युवराणी कृष्ण-कुमारीवर काही दुष्ट शक्तींचा पगडा आहे. त्यापासून तिला वाचवायचे असेल, तर चन्द्रकान्त मणि जडवलेला हार तिच्या गळयात घालून ठेवणे आवश्यक आहे. भाचीवरील आपल्या प्रेमामुळे राजा जयवर्मा याने तो मणि बाहेर काढून, कंठा बनवून तिच्या गळयात घातला. पण दुष्टशक्तींबद्दल मात्र तो युवराणीशी काहीही बोलला नाही. त्यामुळे ती याबाबत अनभिज्ञच होती.

'मन्त्रशक्तीने आपण जयवर्माचं मन चन्द्रकान्त मण्याबद्दल आकर्षित केलं' हे जे जादुगार प्रधानाला म्हणाला, ती शुद्ध थाप होती! प्रधानाने मात्र त्याच्यावर विश्वास ठेवला, आणि तो जादुगाराच्या मदतीने स्वतःच सम्राट बनायचे स्वप्न पाहू लागला. पण जादूगार स्वतःच त्या मण्याच्या साह्याने 'सम्राट' बनू पहातोय ही गोष्ट त्याला कळली नाही.

लोकांच्या डोळयात पाहून त्यांच्या मनचे विचार जाणायची शक्ति अपूर्वमधे होती. प्रधान मूर्ख होता अन् जादुगार होता अप्पलपोटा आणि आपला स्वार्थ साधण्यासाठी दुसऱ्यांचे गळे कापणारा!–ही गोष्ट अपूर्वने ओळखली. हा जादुगार जर सम्राट बनला, तर मानवजातीचे काय होईल, त्यांचे भविष्य कसे घडेल याबद्दल अपूर्वला भीती वाटू लागली. (क्रमशः)





# योग्यता आणि कीर्ति

जिद्दी राजा विक्रम पुन्हा झाडाजवळ गेला आणि ते प्रेत फान्दीवरून काढून त्यानें आपल्या खान्द्यावर टाकले. नेहमीप्रमाणे मौन धारण करून तो स्मशानाची वाट चालू लागला. तेव्हां प्रेतातला वेताळ बोलू लागला–"राजा, कशासाठी तू इतका त्रास घेत आहेस हे काही मला कळत नाही! तू एका देशाचा राजा आहेस; तेव्हा आणखी मिळवण्याच्या स्वार्थबुद्धीने तू हे करत असशील असं मानायला मी तयार नाही. पण मग, तुझी एकाद्या मुनि किंवा गुरूवर श्रद्धा असली पाहिजे, अन् बहुधा त्याच्या सांगण्यावरूनच तू हे काम करत असावास. पण कित्येक गुरु किंवा मुनि असे असतात की ते नीटपणे विचारही करू शकत नाहीत. विश्वमीत नावाच्या गुरूने एक सारखीच लायकी असणाऱ्या आपल्या शिष्यांवर कसे प्रेम केले, आणि नंतर

## वेताळाच्या गोष्टी



विनाकारणच त्यांना द्वेषयुक्त वागणूक कशी दिली याची गोष्ट मी सांगतो. सावध चित्ताने ती ऐक. तुझा श्रमपरिहारही होईल त्यामुळे." आणि वेताळ गोष्ट सांगू लागला.

हा विश्वमीत एका जंगलात राहून बऱ्याच शिष्यांना तप करण्याची पद्धत आणि मोक्षसाधना वगैरे विषय शिकवत असे.

विश्वमीतच्या शिष्यांत लोकप्रिय आणि शक्तिकिरण नावाच्या दोन शिष्यांनी तपोबलाने अनेक अद्भुत शक्ति प्राप्त करून घेतल्या आणि ते बाकी सर्व शिष्यांत अग्रणी बनले. एक दिवस या दोघांना जवळ बोलावून मुनी म्हणाला-"तुम्ही माझ्या इतर सर्व शिष्यात विशेष आहात. तुम्हाला नव्याने शिकवण्यासारखं आता माझ्याजवळ काहीच राहिलं नाही. तेव्हां आता तुम्ही आपापल्या घरी जा आणि पारिवारिक जीवन जगा."

दोन्ही शिष्यांनी होकारार्थी माना हलवल्या. नंतर मुक्त-कंठाने ते गुरूला म्हणाले-"गुरुजी, आम्हा दोघांजवळही अद्भुत-शक्ति आहेत. त्यामुळे सामान्य जनांना आमच्यामुळे त्रास होण्याची शक्यता आहे. आम्हाला फक्त शाप देता येतो, चुकून कुणाला आम्ही शाप दिला, तर त्याला शापमुक्त करणं हे ही आमचंच कर्तव्य आहे ना? तेव्हां ती शक्तीही प्रदान करावी गुरुदेव!"

विश्वमीतने त्या दोघांना आणखी एक महिना आपल्या जवळच रहायला सांगितले. महिना गेल्यावर तो शक्तिकिरणला म्हणाला-"शाप-विमोचनाची शक्ति मिळवायला तुला फार कठीण अशी उपासना करावी लागेल. तो विषय सर्वांनाच साध्य होणारा नव्हे. मी तुला त्या उपासनामार्गाबद्दल सर्व काही सांगेन."

शक्तिकिरणला फारच आनन्द वाटला आणि त्याने उपासना सुरू केली. त्याची उपासना सुरू असतानाच विश्वमीतने एकदा लोकप्रियला म्हटले-"मुला! तुला मी शापविमोचनाचा मार्ग शिकवू शकणार नाही. प्रत्येक विद्येकरता शिष्याची योग्यता पहावी



लागते. म्हणून तुला नेहमी खूप सतर्क व सावधान रहायला हवं! आता तुला इथं रहायची आवश्यकता नाही, घरी जाऊ शकतोस तू!" अशा तऱ्हेने सावधगिरीची सूचना देऊन विश्वमीतने लोकप्रियला रवाना केले. नंतर उःशापाची विद्या शिकून घेऊन शक्तिकिरणही आपल्या घरी निघून गेला.

पाच वर्षे निघून गेली. एक दिवस तेथील शासनकर्ता राजा मानसिंह याचे विश्वमीतला बोलावणे आले. राजाने पाठवलेल्या रथात बसून तो राजधानीत आला.

वास्तविक राजा मानसिंह 'राजगुरु' पदासाठी योग्य व्यक्तीच्या शोधात होता. सर्वांनी त्याला या पदासाठी लोकप्रिय व शक्तिकिरण हेच योग्य असल्याचे सुचवले. मधल्या अवधीत 'महाशक्तिमान' म्हणून शक्तिकिरणने चांगलेच नाव मिळवले होते. अन्याय करणारे लोक त्याला वचकून रहात, आणि नीट वागत. शक्तिकिरणचे शेकडो शिष्य असून ते 'शक्तिसेना' या रूपात देशभर पसरलेल्या दुष्टांची शिकार करत. त्यांचा गुरु शक्तिकिरण हा शाप देईल ही भीती लोकांच्या मनात घर करून असे, त्यामुळे या शिष्यांना कोणी टक्कर देऊ धजत नसे.

परन्तु लोकप्रियची कीर्ती शक्तिकिरण-इतकी पसरली नव्हती. त्याचे शिष्यही खूप कमी होते. ते नेहमी जनतेत जाऊन तत्त्वोपदेश करत असत. प्रजेला उत्तम अशा कथा





सांगून त्यांना सन्मार्गावर आणायचा प्रयत्न हे शिष्य करीत. प्रजेच्या मनात त्यांच्याबद्दल अपार श्रद्धा, आदर असे. परंतु त्यांच्याजवळच्या अद्‌भुत शक्तींबाबत मात्र कोणालाच काही माहिती नव्हती.

राजा मानसेनने शक्तिकिरणलाच राजगुरु बनवायचा विचार केला. पण लोकप्रियबद्दल राजाला सांगून तो म्हणाला—"महाराज, आम्ही दोघंही प्रत्येक बाबतीत सारखेच आहोत. आमच्यापैकी या पदासाठी योग्य कोण, हे आमचे गुरु विश्वमीत हेच सांगू शकतील. त्यांच्या आज्ञेशिवाय आम्ही दोघंही कशाचीच स्वीकृति देऊ शकत नाही. क्षमस्व महाराज!"

ही सर्व हकिकत राजाच्या तोंडून ऐकून विश्वमीत म्हणाला—"माझे दोन्ही शिष्य योग्यतेने समान आहेत ही गोष्ट खरी नव्हे! दोघांच्यात सर्वसमर्थ आहे लोकप्रिय! तोच 'राजगुरु' बनायला योग्य आहे, अन् माझी तशीच इच्छाही आहे राजा!"

विश्वमीतच्या सांगण्यावरून मानसेनने लोकप्रियची 'राजगुरु' पदासाठी निवड केली आणि गुरूची आज्ञा घेऊन लोकप्रियने ते पद ग्रहण केले.

आपली गोष्ट इथे संपवून वेताळ राजा विक्रमला म्हणाला—"राजा आपल्याला पहिल्यापासूनच लक्षात येतं ना की गुरु विश्वमीतचं वागणं आपल्या दोन्ही शिष्यांबाबत समान नाहीये, पक्षपातीपणाचं आहे! प्रथम त्याने लोकप्रियला नाकारून केवळ शक्तिकिरणलाच प्रेम दाखवून शाप-विमोचन विद्येसाठी आवश्यक ती उपासना शिकवली. यानंतर गुरुपदाची समस्या उभी राहिली, तेव्हां मात्र त्याने शक्तिकिरणला डावलून त्यासाठी लोकप्रियची शिफारस केली! यावरून आपल्याला कळून चुकतं ना, की विश्वमीतची विचारसरणी ठीक नाही, समतोल नाही? त्याचं प्रेमही काही कारण नसतानाच एकदा इकडे अन् एकदा तिकडे असं बदलत राहिलं. या शंकांचं उत्तर माहीत असूनही तू दिलं नाहीस, तर हे राजा, तुझं मस्तक धडावेगळं होऊन त्याचे तुकडेतुकडे होतील."

यावर तावडतोब राजा उत्तरला—"जगात अशी अनेक माणसं असतात की खूप योग्यता असूनही त्यांचं कधी योग्य मूल्यमापन होत नाही, त्यांना सफलता मिळत नाही. पण यशोकामना ही केवळ सामान्य जनांतच असते. आपल्या अद्‌भुत शक्तींच्या जोरावर कीर्ति मिळवायचा प्रयत्न शक्तिकिरणने केला, म्हणून तो एक सामान्य माणूस ठरतो. पण उलट त्या शक्ति आपणात असूनही ते प्रकट करायचा प्रयत्न लोकप्रियने कधीच केला नाही, म्हणूनच तो असामान्य ठरतो. शाप देणं आणि त्यातून मुक्त करणं ही शक्ति शक्तिकिरणमधे आहे, पण लोकप्रियमधे नाही. त्यामुळे दोघात योग्य कोण हे खूप विचारपूर्वक ठरवूनच विश्वमितने आपला निर्णय जाहीर केला. त्याचा हा निर्णय पक्षपातीपणाचा मुळीच नव्हे, उलट खूप विचारीपणाचा आणि न्यायपूर्ण आहे. वास्तवत: जो शाप देण्याचा उतावळेपणा करू शकतो, त्यालाच त्याच्या निवारणाचे शिक्षणही आवश्यक असतं. जो शान्तस्वभावी, ज्ञानी असतो तो लहानशा गोष्टीवरून रागावून पटकन् शापवाणी उच्चारतच नाही. मग शाप-मुक्तीच्या मार्गाची माहिती त्याला कशाला हवी? लोकप्रियच्या बाबतीत गुरूने सुरुवातीला हाच विचार केला होता. त्याच्या वर पूर्ण विश्वास असल्यामुळे शापविमोचनाची विद्या गुरुने त्याला शिकवली नाही. पण ती विद्या शक्तिकिरणला शिकवण्यात, शक्तिकिरणची अपरिक्वताच त्याने विचारात घेतली. ती शिकल्यामुळे शक्तिकिरणचा मोठेपणा जराही जाहीर होत नाही. या कारणामुळेच विश्वमीतने 'राजगुरु' पदासाठी लोकप्रियला योग्य ठरवलं. कीर्तिवरून श्रेष्ठता ठरवणं हे नेहमीच योग्य होत नाही."

राजाने अत्यन्त समर्पक असेच उत्तर दिले. पण त्यामुळे त्याचे मौन भंग झाले आणि प्रेतासह अदृश्य होऊन वेताळ पुन्हा त्या झाडावर जाऊन बसला. (कल्पित)





# खिकाळणारा अग्रहार

गौतमपुर गावात सोमू नावाचा एक शेतकरी रहात असे. त्याला लीमन नावाचा एक मुलगा होता. पण सोळा वर्षांचा झाला, तरी तो आपल्या बापाला शेतकामात कसलीही मदत वगैरे न करता नुसताच शेतातून अन् जंगलातून रिकामटेकडा भटकत राही.

एकदा सोमू लीमनला म्हणाला—"अरे असं नुसतं रिकामं फिरत राहून काय उपयोग! रिकामं बसून खात राहिलं, तर डोंगराएवढी संपत्तीही खर्चून जायला वेळ लागणार नाही. जरा काही मिळवायचा प्रयत्न कर रे! म्हणजे उपाशी मरायची वेळ नाही यायची आपल्यावर!"

लीमनने मान हलवली अन् तो शेतावर राखणीला गेला. तेथे त्याला तसे काहीच काम नव्हते. काहीतरी करत रहायचाच त्याला छन्द होता, नुसते एके जागी बसून कसे रहायचे! मग तेथे बसून तो पक्ष्यांच्या चिवचिवाटाचे आणि अन्य प्राण्यांच्या ओरडण्याचे अनुकरण करू लागला. तेही मग लीमनच्या आवाजाला प्रतिसाद देऊ लागले.

हळूहळू लीमनचे हे काम मनोरंजक होऊ लागले. आसपासच्या शेतांची राखण करणारे लोक त्याच्याजवळ येऊन बसत आणि मजेत आपला वेळ घालवीत.

गौतमपुर हे श्रीपुरच्या जमीनदाराच्या जमीनदारीतलेच एक गाव होते. घोडेस्वारी करणे हे जमीनदाच्या मनोरंजनांपैकी एक प्रमुख अंग होते. दरवर्षी दसऱ्याच्या वेळी तो आपला जुना घोडा कोणाला तरी दान करून नवा घोडा घेऊन आपल्या जमीनदारीतल्या गावांतून रपेट करीत असे. असे फिरत असताना आपल्या रयतेला तो त्यांची खुशाली विचारत असे.

यावेळी दसऱ्याला जमीनदाराने घेतलेला नवा घोडा दिसायला मोठा सुंदर, सुलक्षणी होता. पण तो अगदीच अडेलतट्टू होता. कोणाला तो फारसा आपल्या पाठीवर टिकू देत नसे.

एकदा या घोड्यावर स्वार होऊन, अधूनमधून त्याला ताळ्यावर आणायचा प्रयत्न करीत जमीनदार आपल्या जमीनदारी गावांतून फिरायला लागला. पण त्या दिवशी घोड्याला काबूत ठेवणे जमीनदाराला अशक्य होऊन घोडा बेफाम धावत सुटला. धावता-धावता तो गौतमपुरमधे शिरला.

हे सर्व पाहून गावचे लोक घाबरून जमीनदाराला वाचवण्यासाठी घोड्यामागे पळू लागले. पण ते त्याला पकडू शकेनात. घोडा जोराने खिकाळत, फुरफुरत उधळतच राहिला. पुढे येणाऱ्यांना लाथा मारत तो शेतातून खळ्यातून बेफाम धावू लागला.

जिवाच्या भीतीने जमीनदार थरथरू लागला. लगाम खेचत, घोड्याची आयाळ घट्ट पकडून त्याला थांबवायच्या प्रयत्नात तो ओरडू लागला—"भीम! अरे थांब, थांब!"

त्यावेळी लीमन आपल्या ज्वारीच्या शेतातच होता. त्याला ताबडतोब परिस्थितीचे गांभीर्य कळून चुकले. धावत जाऊन जवळच्या झाडीत तो लपला, आणि घोड्याच्या फुरफुरण्याची नक्कल करत तो अधून-मधून खिकाळूही लागला. ते ऐकून जमीनदाराचा घोडा अचानक थांबला; आणि आपले तोंड त्या झाडीकडे वळवून



सचिन आंबेकर

स्तब्ध उभा राहिला. नंतर तो झाडीकडे पाहून फुरफुरायला आणि खिकाळायला लागला. पण यावेळचे त्याचे खिकाळणे रागाचे नसून आनंदाचे होते. आता जमीनदाराच्या जिवात जीव आला. आपल्या घोड्यावरून उतरून आपला जीव वाचवणारा दुसरा घोडा कुठे आहे हे तो पाहू लागला. इतक्यात काही गाववाले तेथे पोचले. लीमनही झाडीमागून निघून तेथे आला.

जमीनदार आश्चर्याने थक्क होऊन लीमनकडे पहात राहिला! इतक्यात लीमनचा बाप सोमू जमीनदाराला म्हणाला–"मालक, घोड्याच्या आवाजाची नक्कल या माझ्या मुलाने, लीमननेच केली. असाच निरनिराळ्या आवाजांची नक्कल करत रिकामटेकडा भटकत असतो हा!"

हे ऐकून जमीनदार आश्चर्याने म्हणाला–"असं? अद्‌भुतच आहे हे! हा रिकामपणचा खेळ नव्हे–आज या आवाजाच्या नकलेनंच माझा जीव वाचवला आहे. इतक्या अडेल घोड्याला-भीमला थांबवणारा हा आवाज खरोखरच मोठ्या मोलाचा आहे. अशी नक्कल करण्याची कला सर्वजण प्राप्त करू शकत नाहीत. एकादाच हे प्रभुत्व मिळवू शकतो! तुझ्या मुलावर-लीमनवर मी फार खूष आहे आज! त्या खुषीनिमित्त या तलावापासून, तिकडे त्या झऱ्यापर्यंत पसरलेलं हे शेत आज मी तुझ्या लीमनला बक्षिस देत आहे! या अपूर्व अशा कलेची आणखी उन्नति व्हायला हवी! पुढल्या दसऱ्याला या बाजूला हत्तीवरूनच यावं असं वाटतंय मला!"

अशा तऱ्हेने लीमनला जमीनदारीतली जी जमीन बक्षिस मिळाली, तिला लोक 'खिकाळणारा अग्रहार' असे म्हणू लागले. थोड्याच दिवसात आवाजांची नक्कल करण्याच्या कलेत तो अजोड झाला आणि इतरांनाही तो ही कला शिकवू लागला. नकलेच्या कलेत प्राविण्य मिळवणारे लोक आपल्या कलेचे पहिले प्रदर्शन-म्हणजेच कार्यक्रम या 'खिकाळणाऱ्या' अग्रहारातच करू लागले. पुढे तसा पायंडाच पडला.



# चांदोबा पुरवणी–३८



भारताची दैवते :

## भगवान् बुद्ध

आजचा उत्तरप्रदेश व नेपाळ यांचा सीमेवरील कपिलवस्तु या प्रांतातील एका राजघराण्यात राजकुमार गौतम याचा जन्म झाला. या ऐहिक संसारातील सुखदु:खांचा त्याग करून त्याने अनेक वर्षे तपस्या केली. फलस्वरूप अखेर त्याला ज्ञानाची, म्हणजेच बोधोदयाची प्राप्ति झाली. या बुद्धत्व-प्राप्तीनंतर तो 'गौतम-बुद्ध' किंवा 'भगवान् बुद्ध' म्हणून प्रसिद्ध झाला. त्याचा जीवनकाल इ. स. पू. ५६६ ते इ. स. पू. ४८६ हा मानला जातो. म्हणजे एकूण गौतम बुद्ध ८० वर्षे जगले.

त्यांनी लोकांना सांगितले की–मनुष्याच्या दु:खाचे मूळ कारण म्हणजे त्याच्या इच्छा! या इच्छांवर नियन्त्रण करून त्या जर जिंकता आल्या, तर या दु:खाचे निर्मूलन होईल. इतकेच नव्हे, तर त्यामुळे मानवाला जन्म व मृत्यु यांच्या शृंखलेतून कायमची मुक्ति मिळेल.

भगवान् बुद्धाच्या उपदेशांना, चारही दिशांना खूप प्रसिद्धी मिळाली. हिन्दू धर्मियांनी बुद्धाला परमेश्वर मानून, भगवान् विष्णूच्या दशावतारातील 'एक अवतार' असे मानले. आज जगातील एक-तृतीयांश जनता बौद्ध-धर्मीय आहे.

# भारतातील सर्वात लहान खेळाडू

१९९१ च्या जुलै महिन्यात कलकत्त्याला एका आठ वर्षांच्या खेळाडूच्या सन्मानार्थ एक स्वागत-समारंभ घडवून आणण्यात आला ! कोण होता हा खेळाडू ? या अद्‌भुत अशा छोट्या खेळाडूचे नाव आहे 'सूर्यशेखर गांगुली.' पोलंडमधील वार्सा येथे आयोजित झालेल्या 'सब-ज्युनिअर चेस चॅम्पियन-शिप्स' मध्ये याला 'कांस्य-पदक' मिळाले. अकराव्या फेरीच्या अखेरपर्यंत याला एकूण आठ गुण मिळाले. फ्रान्सची लॅरोस आंद्रिया हिला ८.५ गुण मिळून 'सुवर्ण-पदक' मिळाले. पाको वालेका याला 'रौप्य-पदक' मिळाले. त्यालाही सूर्यप्रमाणेच ८ गुण मिळाले होते, परन्तु त्याचे बाकीचे रेकॉर्ड जास्त प्रगतिशील होते.

टूर्नामेंटच्या दुसऱ्या दिवशीच्या खेळात सूर्यच्या मागे उभा राहून खेळ पहात असलेला विश्वविजेता गॅरी कस्पारोव्ह, सूर्यने केवळ सोळाच चालीत प्रति-स्पर्ध्यावर कशी मात केली, हे आश्चर्याने पहातच राहिला ! कस्पारोव्हचा कोच एड्डी गुफेलड नन्तर म्हणाला की-"येत्या १०-१२ वर्षांच्या अवधीत हा 'लिट्लमास्टर' 'वर्ल्ड चॅम्पियन शिप्स' मध्येही खेळू लागेल."



स्कॉटिश चर्च कॉलिजिएट स्कूलमधे तिसऱ्या इयत्तेत शिकणारा हा खेळाडू श्री. पंकज व आरती गांगुली यांचा सुपुत्र होय. पंकज गांगुली व्यवसायाने ज्योतिषी आहेत. 'सहा उत्तम अशा मित्रग्रहांच्या कृपेमुळे आपला मुलगा चांगला हुशार आहे' असा त्यांचा विश्वास आहे. त्यांनी आपल्या मुलाच्या हातात प्रभावकारी अशा दोन अंगठ्या घालून ठेवलेल्या आहेत-एक मोती बसवलेली आणि दुसरी नीलमणी जडवलेली ! सूर्यच्या आईच्या माहेरी सर्वच जण 'शतरंज के खिलाडी' आहेत. वयाच्या तिसऱ्याच वर्षी आपले आजोबा (मातामह) अनिश बसू यांचे बोट धरून या बाळाने बुद्धिबळाच्या खेळात प्रथम पदार्पण केले. पाच वर्षांचा असतानाच सूर्य आपल्या आयुष्यातली पहिली पद्धतशीर अशी मॅच खेळला. आजपर्यंत या छोट्या मास्टरच्या नोन्दीत ३७ राष्ट्रीय स्तरावरच्या आणि २७ राज्य स्तरावरच्या स्पर्धांबरोबरच, दोन अखिल भारतीय ओपन टूर्नामेण्ट्सही दाखल आहेत. त्याच्या पहिल्या आंतर्राष्ट्रीय खेळांचा पहिला दर्शक वार्साच.

सूर्य त्यावेळी ४ फुट २ इंच उंचीचा होता. फुटबॉल व क्रिकेट हे त्याच्या विशेष आवडीचे खेळ. कोणत्याही प्रकारच्या क्रीडा प्रकारात सूर्य हाच त्यावेळी सर्वात कमी वयाचा खेळाडू होता. गणित हा त्याचा प्रिय विषय, पण 'बायबल क्लास' ही त्याचा खास प्रिय ! एकाद्या गोष्टीच्या पुस्तकासारखेच तो बायबल वाचत असतो. त्याची स्मरण-शक्ति चांगली आहे. अनुमानाचा त्याचा वेग छान आहे आणि काहीतरी नाविन्य आणण्याची त्याची इच्छाही तीव्र आहे. बुद्धिबळात 'एका कॉम्प्यूटरप्रमाणेच जलद निर्णय घेणारा चतुर खेळाडू' असे त्याचे वर्णन केले जाते.

भारतातील भूतपूर्व विश्व ज्यूनियर चॅम्पियन दिव्येन्दु बरुआ (१९७८) आणि विश्वनाथ आनन्द (१९८७) यांचा सूर्य हा योग्य अनुगामी होय.

## तुम्हाला माहीत आहे ?

१. चहाच्या रोपांची लागवड पहिल्या प्रथम कोणत्या देशाने केली ?
२. दूध व लोणी, यात जास्त वजनदार कोणते ?
३. इस्लाम धर्मातील प्रसिद्ध पाच 'मौलिक सिद्धान्त' कोणते ?
४. कुराणात येशूचे नाव काय लिहिले आहे ?
५. 'ख्राइस्ट' हे नाव कोठून आले ?
६. एका नदीच्या पाण्यामुळे येशूला पावित्र्य आले. त्या नदीचे नाव काय ?
७. 'बेथलहेम' चा अर्थ काय ?
८. अंतरिक्षात पोचलेल्या रशियाच्या पहिल्या अंतरिक्षयानाचे नाव काय ?
९. सर्वात अधिक षटके मारण्याचा मान कोणत्या क्रिकेट खेळाडूकडे जातो ? त्याने कोणाचा उच्चांक मोडला ?
१०. कोणत्या युद्धात प्रथमच विषारी वायूचा उपयोग केला गेला ?
११. 'संगीताचे रक्षण करणारा संत' असे कोणाला मानतात ?
१२. शाईचा उपयोग करणारी पहिली लेखणी कोणती ?
१३. आशियातील सर्वात मोठे वाळवंट कोणते ?
१४. ख्रिस्तोफर कोलंबस हा कोणत्या देशाचा रहिवासी ?
१५. कागदी चलनाची सुरुवात प्रथमतः कोणत्या देशात झाली ?

## उत्तरावली

१. चीन.
२. दूध.
३. धार्मिक विश्वास, दैनिक प्रार्थना, दान-धर्म करणे, रमजानच्या महिन्यात उपास करणे आणि मक्केची यात्रा.
४. ईसा.
५. 'दैवी अधिकार प्राप्त' अशा अर्थाच्या 'ख्रिस्टोस' या ग्रीक शब्दापासून.
६. इस्राएलमधील जॉर्डन नदी.
७. परमेश्वराचे घर किंवा रोटीचे स्थान. बेथलहेम हे येशू ख्रिस्ताचे जन्मस्थान होय.
८. 'स्पुटनिक.' हे यान ४ ऑक्टोबर १९५७ रोजी अंतरिक्षात सोडले गेले.
९. इयान बोथम (सॉमरसेट)-याने १९८५ मधे ८० षटके मारुन आर्थर वेलार्ड याचा १९३५ मधील ६६ षटकांचा उच्चांक मोडला.
१०. पहिल्या जागतिक महायुद्धात (१९१४-१९१८) युक्रेसच्या पहिल्या लढाईत.
११. संत सिसीलिया.
१२. पक्ष्याच्या पिसाची लेखणी.
१३. अरबचे वाळवंट.
१४. इटलीचा.
१५. चीनमधे.



### एव्हरेस्टवर बलून-प्रवासी

गेल्या ऑक्टोबरच्या तिसऱ्या आठवड्यात गरम हवेचे दोन बलून्स प्रथमच एवरेस्ट शिखरावरून उडून तिबेटमध्ये सुखरूप पोहोचले. नेपाळहून निघाल्यापासून ही साहसयात्रा एक तासाची झाली. एका बलूनमध्ये एक ऑस्ट्रेलियन माणूस, तर दुसऱ्यात दोन ब्रिटिश माणसे होती. ही धाडसी बलून-यात्रा 'ऑस्ट्रेलिया-ब्रिटन सहकारी बलून-यात्रा' होय. ८,८४८ मीटरच्या शिखरावरून ३०० मीटरच्या उंचीवरून या बलून्सनी उड्डाण केले. या शिखराला नेपाळी लोक 'माउंट सागरमता' असे म्हणतात.

## चांदोबाच्या बातम्या

### पूर्वानुभव नसतानाच

तिचे नाव होते पेटी शार्प. आपल्या ६२ वर्षे वयाच्या पित्यासह ती टू सीटर विमानातून यात्रा करत होती. विमानचालक होता तिचा पिताच. एकच एंजिन असलेले हे 'पिप्परकब' विमान ओरेगॉन (यू.एस्.अे.) येथून फोटो काढणे व साहस करण्यासाठी निघाले होते. २३ वर्षांची पेटी आपल्या पित्याशी गप्पा मारत होती. बोलता-बोलता अचानकच पिता त्याच्या सीटवर कोसळला! हे पहाताच पेटी भीतीने कापू लागली! पण ताबडतोब तिला कन्ट्रोलची बटणे व अन्य स्विचेस समजून घेण्यासाठी पुढे वाकावे लागले. शेवटी ती कशीतरी एका छोट्याशा धावपट्टीवर विमान उतरवण्यात सफल झाली. विशेष म्हणजे, तिने यापूर्वी कधीही विमान चालवले नव्हते!





# जय-पराजय

सोमनाथशास्त्री एक महान संगीतज्ञ होते.

सभा-समारंभात जेव्हा जेव्हा त्यांचा कार्यक्रम होई, तेव्हा श्रोते मन्त्रमुग्ध होऊन त्यांचे गाणे ऐकत रहात. या महान् संगीतज्ञाबद्दल ख्याती ऐकून त्या देशचा राजा श्रवणवर्मा याने त्यांना आपल्या दरबारात बोलावले.

राजदरबारात गायन करून सोमनाथ-शास्त्रींनी महाराजांबरोबर साऱ्या दरबाऱ्यांनाही आनन्द सागरात बुडवले. गाण्यामुळे प्रभावित होऊन राजाने आपल्या गळ्यातला हार काढून शास्त्रींना बक्षिस दिला आणि 'दरबारी संगीताचार्य' हे पद देऊन आपल्या संगीत-प्रेमाचे प्रमाणही दिले. शास्त्रींचा भव्य सत्कार करण्यात आला. राजाने व अनेक मंत्र्यांनी सोमनाथ शास्त्रींच्या गायनाची तारीफ केली. महाराणी मैथिलदेवीच्या कानीही सोमनाथशास्त्रींच्या संगीत-विद्वत्तेची वार्ता पोचली. तिने राजाला विनन्ती केली की त्यांच्या संगीत-सभेचे खास आयोजन केले जावे. एवढ्या महान् संगीतकाराचे गायन ऐकून राणीला आपले कान तृप्त करायचे होते. राजाने ताबडतोब सोमनाथशास्त्रींना निरोप पाठवला आणि दुसऱ्याच दिवशी अंत:पुरात संगीतसभेचे आयोजन केले गेले.

संगीतसभेची सुरुवात होताच महाराणीने सोमनाथशास्त्रींची गाणी आणि त्यांचे राग यांबद्दल नापसन्ती व्यक्त केली. शास्त्रींना हा सर्व प्रकार फारच अपमानकारक वाटला. परंतु राणीच्या मतांचे खंडन करून ते उत्तर देऊ शकले नाहीत. त्याबरोबरच आपल्या गायनात कुठे बेसूरपणा नसल्याचीही त्यांना खात्री होती.

"वा! फारच मोठ्या संगीतज्ञाला बोलावलंत आपण! आणि काही विचार न करता

ललकारी इनामदार



तडकाफडकी संगीताचार्यचं पदही देऊन बसलात! हे काय संगीत आहे? मला तरी संगीत ऐकून जराही आल्हाद वाटला नाही." असे म्हणून राणीने राजाचीही अवहेलना केली, सोमनाथशास्त्रींच्या समोरच!

यावर शास्त्री नम्रपणे म्हणाले–"क्षमा असावी, महाराणी! माझ्या संगीतात काही दोष नाहीत असं समर्थन नाही करत मी. पण मला आत्ता कळून चुकलं की, माझं गायन आपणाला सुखवू शकलं नाही. तेव्हां मी 'दरबारी संगीताचार्य' या पदाला अयोग्य ठरलो आहे. आपण अनुमति द्या, मी ते पद सोडून इथून कायमचा दूर निघून जाईन."

परंतु मधेच दखल देत राजा श्रवणवर्मा म्हणाला–"दरबार सोडून जायला तुम्हाला कोणी सांगितलं? महाराणीला हवं, असं संगीत ऐकवणं हा तुमचा धर्म आहे. दरबार सोडून जायचं असलं, तरी त्याला माझी परवानगी हवी, ही गोष्ट विसरू नका!"

आयुष्यात प्रथमच सोमनाथशास्त्रींवर पश्चात्ताप करायची पाळी आली. स्वतंत्रपणे प्रजेतच संगीताच्या बैठकी करत राहिलो असतो, तरी सुखाने कालक्रमणा झाली असती. त्यांना आताच कळून चुकले की राजाश्रय हा केवडयाच्या बनासारखा असतो. तिथे सुगंधाबरोबरच विषारी सापांचे भयही असते.

आपले दुःख व क्रोध प्रकट होऊ न देता सोमनाथशास्त्री राजाला म्हणाले–"महा राज! महाराणींना कशा प्रकारचं संगीत हवं, हे जाणायची इच्छा आहे माझी!"

"आपले राग-स्वर आणि शास्त्रीयता यांच्याशी कसलाही संबंध नसणारी काही लोकगीतं, आपणाला जमली तर ऐकवा शास्त्रीजी." महाराणीने सुचवले.

"मग मला एक आठवडयाची मुदत द्यावी महाराणी! मी आपणासाठी आपल्या आवडीची लोकगीतं गाईन." शास्त्री म्हणाले.

महाराणीने मान्यता दिली अन् राजानेही ते स्वीकारले.



बरोबर एका आठवडयातच शास्त्रींनी अंतःपुरात संगीताच्या बैठकीचे आयोजन करवले. बैठकीत त्यांनी विविध प्रकारची लोकगीते गाऊन दाखवून महाराणीकडून वाहवा मिळवली. आता सोमनाथशास्त्रींना राणीच्या रुचीचा स्तरही कळून चुकला.

राजा श्रवणवर्मानेही संगीत-विज्ञ शास्त्रींची खूप प्रशंसा केली आणि म्हटले–"शास्त्रीजी! केवळ शास्त्रीय संगीतातच नव्हे, तर लोकसंगीतातही आपण तितकेच विद्वान आहात हे आपण सिद्ध केलंत. आता इथून पुढे दरबारातही महाराणींना प्रिय असलेलं लोकसंगीतच ऐकवत जा."

मौन राहून सोमनाथशास्त्रींनी डोके हलवले.

यानंतर पंधरवडयाने शेजारच्या देशातला एक संगीतज्ञ राजा श्रवणवर्माच्या दरबारात आला आणि म्हणाला–"महा-राज! अनेक राजदरबारात मी, शास्त्रीय संगीतातल्या स्पर्धा कित्येक वेळा जिंकल्या आहेत. सर्वच संगीतज्ञांनी माझं वर्चस्व मान्य केलं, आपली हार मानून सोन्याची कडी आणि तोडे मला अर्पण केले. मला शास्त्रीय संगीतात हरवणाराला मी ही सर्व कडी आणि तोडे देऊन टाकून त्याचा दास बनेन. पण तसं न घडलं तर आपणालाही माझा योग्य असा सत्कार करावा लागेल, आपला पराजय मान्य करावा लागेल!"

या परदेशी संगीतज्ञाचे बोलणे राजाला अपमानकारक वाटले. राजा श्रवणवर्माने



एकवार वळून सोमनाथशास्त्रींकडे असे पहिले की जणू त्यांना विचारायचं असावं–काय विचार आहे? 'याच राजाने आपणाला दरबारात लोकसंगीत गायची आज्ञा दिली होती, अन् आता शास्त्रीय संगीतात स्पर्धा करायला सांगत आहेत. सोमनाथशास्त्रींच्या मनात क्रोधच जागा झाला. परंतु देशाच्या इभ्रतीसाठी त्यांनी स्पर्धेला आपली अनुमति दिली.

संगीत-स्पर्धा खूपच आकर्षक पद्धतीने झाली. शास्त्रीय संगीताचे खरे माधुर्य काय असते याचा प्रत्यय राजा श्रवणकुमारला त्याच दिवशी आला! सारी सभा शुद्ध हरपून ऐकतच राहिली!

थोड्याच वेळात परदेशी विद्वान हरला आणि त्याने आपल्या हाता-पायातली कडी, तोडे वगैरे काढून सोमनाथशास्त्रींपुढे ठेवत त्यांच्या पायावर डोके ठेवत म्हटले–"मी हरलो, आपण जिंकलात. मी आपला दास आहे. माझी घमेंड आता पार नाहीशी झाली आहे." तो गर्विष्ठ संगीतज्ञ जसा आला तसा चालता झाला.

भर सभेतच राजा श्रवणवर्माने सोमनाथशास्त्रींचा सत्कार केला आणि त्यांची तोंड भरभरून प्रशंसा केली.

सोमनाथशास्त्रींचा हात पकडून गद्गद् स्वरात राजा म्हणाला–"शास्त्रीजी, आपण महाविद्वान आहात! इथून पुढे कुठेही आपण शास्त्रीय संगीतच गात जा. लोकगीतांची गोष्ट आपण विसरूनच जा, कायमची!"

परंतु सोमनाथशास्त्रींना त्यावेळी मात्र स्पर्धेत मिळालेल्या आपल्या जयाबद्दल जराही संतोष वाटला नाही. महाराणीचे अगोदरचे बोलणे आणि संगीतातली तिची हलक्या दर्जाची रुचि यांची त्यांना आठवण झाली. त्यांचे मन अशांत झाले. दुसऱ्याच दिवशी सकाळी कोणालाही न सांगता राजदरबारांतल्या पदाचा त्याग करून ते कुठेसे निघून गेले. कोणालाच कळले नाही की त्या महान विद्वानाने असा अचानक निर्णय का घेतला.





# सासूबाईंचा रोग

सुमतीला सासरी येऊन एक आठवडा होतोय न होतोय तोच घरातली सारी परिस्थिती तिच्या छान लक्षात आली. तिने ओळखले की आपली सासू मनोरमा ही चांगली कर्तबगार बाई आहे, ती कुठल्याही कठीण अडचणीला यशस्वीपणे तोंड देऊ शकते.

एक दिवस एक आश्चर्यकारक गोष्ट सुमतीच्या दृष्टीस पडली. रोज सकाळ-संध्याकाळ ताटात जेवण वाढून घेऊन जाणाऱ्या नणंदेला–राधाला–तिने विचारले–"कुठं जाताय हे घेऊन?"

चेहऱ्यावर काहीच भाव न दाखवता राधा म्हणाली–"मी आजीला जेवण घेऊन जाते आहे, वहिनी!"

हे उत्तर ऐकून सुमती चकित झाली. तिने अविश्वासाने विचारले–"काय म्हणताय? तुमची आजी जिवन्त आहे अजून?"

डोके हलवत राधा म्हणाली–"हो, तुला पाह्यची असली तर चल माझ्याबरोबर, मी दाखवते तुला."

सुमती मुकाट्याने राधाबरोबर निघाली. गावाबाहेर असलेल्या आपल्या गुरांच्या गोठ्याजवळ राधा तिला घेऊन गेली. तेथे एका कोपऱ्यात जुन्या-पुराण्या एका खाटेवर झोपलेली एक म्हातारी दाखवून–"ही बघ माझी आजी, वहिनी!" राधा सुमतीला म्हणाली.

आश्चर्याने आपल्या नातसुनेकडे पाहून म्हातारीने विचारले–"तू माझ्या नातवाची बायको ना ग?"

इतक्यात राधाने सुमतीला तेथून लवकर निघण्याबद्दल सुचवत म्हटले–"वहिनी, आपल्याला लवकर जायला हवं ग परत."

वाटेत सुमतीने तिला विचारले–"तुमची आजी अशी गोठ्यात का?"

ज्योत्स्ना गोखले



“अहं! आजीला कसलासा मोठा रोग झालाय. ती घरात राहिली तर सर्वांनाच रोगाचा संसर्ग होईल, म्हणून आईनं तिला इथे गोठ्यात ठेवली आहे.” राधाने माहिती दिली.

याच्या दुसऱ्याच दिवशी आपली आई आजारी असल्याची बातमी मिळाल्यामुळे मनोरमा आपल्या माहेरी निघून गेली. जाताना घरातल्या सर्व किल्ल्या तिने सुमतीच्या हाती सोपवल्या.

चार दिवसांनी सुमतीचा मोठा भाऊ सुदर्शन आपल्या बहिणीचे नवे घर अन् कुटुंबीय माणसं पहावी म्हणून तिच्या घरी आला. तो आसपास चांगला प्रसिद्ध असा वैद्य होता. सुमतीने त्याला आपल्या आजेसासूची दयनीय अवस्था सांगून म्हटले की, तिला बरी करायचा काही उपाय त्याने सांगावा.

सुदर्शनने जाऊन म्हातारीला तपासले आणि सांगितले की, तिला झालेली व्याधि ही केवळ म्हातारपणामुळेच झालेली आहे. नीट औषधापणी के[illegible] होऊ शकेल. त्याने असेही सांगितले की प्रथम म्हातारीला गोठ्यातून आणून चांगल्या स्वच्छ जागी ठेवणं फार आवश्यक आहे.

सुमतीने आपल्या नवऱ्याला ही गोष्ट नीट समजावून सांगून आजेसासूला घरी आणवले. तिला नीट औषधपाणी करून सुमती स्वतः तिची सेवा-सुश्रूषा करू लागली. तेथून परत निघताना सुदर्शनने सुमतीच्या हातावर कसल्याशा दोन गोळ्या ठेवून तिची सासू मनोरमाला कसा चांगला धडा शिकवायचा याची योजना सांगितली.

मनोरमा माहेरून परत आली तोपर्यंत म्हातारी चांगली बरी होऊन इकडे-तिकडे फिरू लागली होती. तिला पहाताच पारा चढून मनोरमा आरडाओरडा करू लागली— “म्हातारीला इथे कोणी आणलं? तिचा रोग आपल्या सर्वांना लागला म्हणजे?”



पण सासूला समजावत सुमती म्हणाली— “माझा मोठा भाऊ चांगला प्रसिद्ध वैद्य आहे. तुम्ही इथून गेल्यानंतर तो इथे आला होता. त्यानेच यांची उत्तम परीक्षा केली, चांगली औषधं दिली त्यांना. पहाता पहाता आजींचा रोग नहीसा झाला. आता त्या एकदम चांगल्या बऱ्या झाल्या आहेत.

आता मनोरमेचे काहीच चालण्यासारखे [illegible] राहिली. दुसऱ्या दिवशी, भावाने सांगितल्याप्रमाणे, सुमतीने एक गोळी कुणाला न कळत पाण्यात विरघळवून ते पाणी सासूला प्यायला दिले. दोनच दिवस खोकत-खोकत मनोरमेने अंथरूण धरले.

हे पाहिल्याबरोबर आरडाओरडा करून घर डोक्यावर घेत सुमतीने नाटक आरंभले— “या अशा खोकत राहिल्या तर घरात आपण सर्वांना त्यांच्या रोगाची बाधा होईल. थोड्याच दिवसात माझं बाळंतपण येणार आहे. माझ्या बाळाच्या दृष्टीने हे गैर नव्हे का? मी का गप्प बसीन आता?”

बास! मनोरमेची बदली गोठ्यातल्या खाटेवर व्हायला वेळ लागला नाही. खाणे घेऊन आलेल्या राधाला मनोरमा एकदा म्हणाली—“मी इथे राहू नाही शकत राधा! मला घरी घेऊन जा ना!”



“मग! आजीच्या आजारात तू नव्हतं तिला इथे ठेवलंस? तुलाही आता इथेच राहायला हवं.” राधा म्हणाली.

त्याच वेळी बलरामही तेथे येऊन पोचला. तो बायकोला म्हणाला—“तुला आता कुणावर रागवायचा हक्क राहिलेला नाही. स्वतःचीच करणी आता तुला भोवत आहे. मोठ्यांचं पाहूनच लहान माणसं शिकतात न? तुझ्याकडून शिकलेल्या या विद्येचा उपयोग उद्या तुझी मुलगीही सासरी गेल्यावर करू लागली, तर आश्चर्य वाटायला नको. तू आपल्या सासूचा जसा मान ठेवलास, तसाच तुझी सून तुझा ठेवत आहे. त्यात तिची काहीच चूक नव्हे ना? या बाबतीत



हे बोलणं ऐकून रावणाला आनन्द झाला. तो महापार्श्वला म्हणाला–"एक रहस्यात्मक गोष्ट आहे. गेल्या काही दिवसात ब्रह्मदेवाकडे निघालेल्या पुंजिकस्थला नावाच्या एका अप्सरेशी मी सभ्यता सोडून अनुचित व्यवहार केला होता. त्या अप्सरेने ब्रह्मदेवाला याबाबत सांगितलं असेल. ब्रह्मदेवाने मला सावध केलं आहे की जर परस्त्रीवर बलात्कार केला तर माझ्या डोक्याचे शेकडो तुकडे होतील. माझ्या पराक्रमाची नीट कल्पना नसल्यामुळे राम माझ्याशी युद्ध करायला निघाला आहे. अज्ञानाने तो मृत्यूशी सामना करीत आहे."

कुंभकर्ण नि रावण यांचा हा संवाद ऐकून विभीषण म्हणाला–"हे राक्षसराज, तू सीतेवर का मोहित झाला‍स? सीता म्हणजे एक महासर्प आहे. तिच्या छातीत सापाचा फणा आहे. त्यात चिंता नावाचं विष आहे. स्मित-हास्यात अणकुचीदार दंष्ट्रा आहेत. वानरांनी लंकेत प्रवेश करण्यापूर्वीच सीतेला रामाकडे परत पाठव. रामाशी वैर करू नकोस. हा कुंभकर्ण, इंद्रजित अथवा महापार्श्व युद्धात रामाला पराभूत करू शकणार नाही. राम तुला जिवंत सोडणार नाही."

विभीषणाला विरोध करीत प्रहस्त म्हणाला की रावणाचा सामना करणे कोणाला ही शक्य नाही. विभीषणाला भेकड म्हणून इंद्रजितने त्याची अवहेलना केली–"पुलस्त्य वंशात तुझ्यासारखा पराक्रमहीन कोणी ही सापडणार नाही. राम व लक्ष्मण यांना मारण्यासाठी राक्षसवीरातील कोणी ही एक पुरेसा आहे. मग तू इतका का घाबरतो आहेस? इंद्राला पराजित करून देवांना सळो की पळो करून सोडणारा मी काय एका मानवावर जय मिळवू शकणार नाही?" रावणाने विभीषणाला विचारले.

"माझं म्हणणं ऐक. नाहीतर आपल्या राक्षस-वंशाला मोठा धोका आहे बघ! रामाच्या बाणांपुढे कुणाचा ही टिकाव लागणे शक्य नाही. सीतेला परत पाठवणं सर्वांसाठी शुभदायक होईल." विभीषणाने आपला विचार सांगितला.

आता मात्र रावणाला हे सहन होईना. विभीषणाची कठोर शब्दात निंदा-नालस्ती करीत तो म्हणाला–"तू माझा भाऊ आहेस, म्हणून अजून जिवंत आहेस. असले विचार अन्य कोणाच्या तोंडून ऐकले असते, तर आता पर्यंत त्याचा मृत देहच दिसला असता!"

हे ऐकून विभीषणाच्या रागाचा पारा चढला. तो रावणाला म्हणाला–"तू माझा मोठा भाऊ आहेस, मला पित्यासमान आहेस. तुला राग येईल असं काही मी बोललो, क्षमा कर मला. हा निघालो मी. तू सुखी रहा. स्वतःचं रक्षण कर. या राक्षसांचं नि लंकेचं नीट रक्षण कर."

विभीषणाने हातात गदा घेतली नि चार अन्य राक्षसांसह आकाशात उडाला व राम-लक्ष्मण जेथे होते, त्या ठिकाणी पोचला. वानरांनी या पाच राक्षसांना आकाशमार्गाने आपल्याकडे येताना पाहिलं. सुग्रीवाच्या मनात शंका आली की हे पाच राक्षस इकडील रहस्य जाणण्यासाठी वा आपल्याला मारण्यासाठी तर येत नसावेत? हा विचार त्याने हनुमान व अन्य वानर-वीरांना सांगताच ते मोठ-मोठे वृक्ष व शिला घेऊन तयार झाले आणि त्या राक्षसांना मारून टाकण्याची परवानगी त्यांनी सुग्रीवाला विचारली.





विभीषण आणि त्याचे साथी अनल, शरभ, संपाति नि प्रघत सर्व जण आकाशातच उभे राहिले. सुग्रीव आणि अन्य वानरांना उच्च सुरात विभीषण म्हणाला–

"राक्षस राजा दुष्ट रावणाचा मी धाकटा भाऊ आहे. माझं नाव विभीषण. माझ्या उपदेशावर रागावून एकाद्या यःकश्चित् दासाप्रमाणे त्याने माझा अपमान केला. म्हणून मी घरदार व मुलाबाळांना सोडून लंकेतून निघालो. आता मी रामाचा शरणागत म्हणून आलो आहे."

हे सर्व ऐकून सुग्रीव रामाला म्हणाला–"रावणाचा धाकटा भाऊ विभीषण आपल्या चार सहकाऱ्यांसह तुला शरण आला आहे. आता आपण सावध असलेलं बरं! यांच्यावर विश्वास ठेवणं योग्य होणार नाही. आपला मित्र बनून, आपल्यात राहून हे इथं भांडणाची आग लावून देतील अशी ही शक्यता आहे. अथवा संधि साधून हे आपल्याला मारून ही टाकतील. हा साक्षात रावणाचा भाऊ आहे. याच्यावर आपण विश्वास ठेवणं योग्य होणार नाही. म्हणून याला नि याच्या चार साथीदारांना मारून टाकण्यात आपलं हित मला दिसत आहे."

सुग्रीवाचं बोलणं ऐकून जवळ असलेल्या हनुमानाला राम म्हणाला–"सुग्रीव विचारपूर्वक जे सांगत आहे, ते सर्व तू ऐकलंस ना? तुला काय वाटतं ते सांगशील?"

प्रथम अंगदाने आपला विचार सांगितला–"काही ही असो, शत्रु-पक्षाकडील कोणावर डोळे झाकून विश्वास ठेवणं योग्य नाहीच. नाही तर या चुकीचं फळ नंतर आपल्याला भोगावं लागेल. हा विभीषण कसा आहे, त्याचा स्वभाव कसा आहे, हे आपण प्रथम जाणून घेतलं पाहिजे."

"आपला एक हेर याच्याकडे पाठवणं इष्ट होईल." शरभाने सुचवले.

जांबवान म्हणाला–"शत्रु रावणाच्या भावाने असं शरणागत म्हणून येण्याचं काही कारण मला तरी दिसत नाही. याच्या बाबत शंका आल्याशिवाय राहावत नाही.



"आपल्याकडील कोणी तरी जाऊन विभीषणाला रावणाकडील वृत्त विचारावं! म्हणजे आपल्याला 'विभीषणाचा स्वभाव कळेल." मैंद म्हणाला.

शेवटी हनुमान सांगू लागला–

"येथील सर्व जण मुक्त कंठाने सांगत आहेत की विभीषणाची नीट परीक्षा करूनच त्याला आपल्यात येऊ द्यावं. पण मला हे योग्य वाटत नाही. त्याला आपण जवळ बोलवलं तरच त्याचा चांगुलपणा वा वाईटपणा आपल्याला कळू शकेल ना! त्याचे गुण-दोष समजल्यावर मग त्याला आपल्यात घेणं कसं शक्य आहे? समोर असलेल्या व्यक्तीची शहा-निशा करण्यासाठी गुप्तचर पाठवणं योग्य असतं. जांबवानचं म्हणणं ही मला बरोबर वाटत नाही. स्थल-कालानुसार विशेष परिस्थितीत अघटित घटना घडू शकतात. विभीषण ही असाच इथे आला असेल. राम आणि रावण यांच्या गुण-दोषांचे परीक्षण करून रावणाच्या चुकीबाबत याला समजाऊन सांगण्याचा प्रयत्न त्याने केला असणे शक्य आहे. रावणाकडून अपमानित होऊन तो आता शरणागत म्हणून आपल्याकडे आला असेल. त्याचं इथं येणं मला अकारण व संशयास्पद वाटत नाही. मैंद म्हणतो आहे त्याप्रमाणे कोणी जाऊन विभीषणाला विचारलं तर तो काय लगेच रावणाकडील सर्व वृत्त सांगत बसेल? तो कशासाठी आला आहे हे त्याने स्वतःच अगोदर सांगून टाकलेलं आहे. यात मला काही त्याची चूक दिसत नाही. त्याच्याबाबत संशय घेण्यासारखं काही नाही. त्याच्यात चोराची लक्षणं मला दिसत नाहीत. मला तो निर्भय आणि निर्मळ वाटतो. वालीचा वध करून आपण सुग्रीवाला वानर-राज्याचा राजा बनवलं, त्याप्रमाणे रावणाचाच वध करून आपण विभीषणाला लंकेचं राज्य द्याल अशा आशेने ही तो आपणास शरण आला असावा. मला काय वाटतं ते मी आपणास सांगितलं. आता यावर आपली मर्जी!"





# असंतुष्ट माणूस

खूप पूर्वी चुवांग राज्यात एक महान् शिल्पकार रहात असे. त्याच्या हातात अजब कौशल्य होते! त्यामुळे त्याचा चांगला नावलौकिक झालेला होता!

एकदा एका धनवान माणसाने या शिल्पकाराला काही मूर्ति बनवून घेण्यासाठी बोलावून घेतले. तो तेथे पोचल्यावर धनवान माणसाची संपत्ति आणि नोकरचाकरांनी भरलेली त्याची टोलेजंग इमारत पाहून, त्याच्या मनात धन-दौलत व ऐष-आरामाबद्दलचे आकर्षण जागृत झाले. आपला धन्दा सोडून देऊन चैनीत रहावे असे त्याला वाटू लागले.

सुदैवाने एका देवीने त्याची ही इच्छा पूर्ण केली! त्याला अपार संपत्ति मिळाली. शिल्पकाराला खूप आनन्द झाला.

त्याच्या मनात आणखी एक विचार आला. नुसते धन आपल्या जवळ असून त्याचा काही उपयोग नाही. त्याच्याबरोबर आपल्याला अधिकार ही असायला हवा. पैसा नि अधिकार यांच्या साह्याने आपले जीवन खूप संतोषमय होईल.

देवीने पुन्हा त्याची इच्छा पूर्ण करून त्याला एक संपन्न अधिकारी बनवले. आता त्याच्या डोक्यात अधिकाराचेच भूत संचारले.

एके दिवशी शिल्पकार आपल्या काही साथीदारांसह एका डोंगरी मुलुखात गेला आणि तेथील सुंदर मुली पाहून तो त्यांची छेड काढू लागला. यावर त्या मुली किंचाळू लागल्या. सारा हंगामा ऐकून काही पहाडी माणसे हातात फावडी-कुदळी घेऊन तेथे आली आणि त्यांनी शिल्पकाराच्या साथीदारांवर हल्ला चढवला. त्या लोकांपुढे शिल्पकाराचे काहीच चालले नाही!

"हट! या पहाडी माणसांसमोर तर अधिकारीही टिकू शकत नाही. मी पण

एक पहाडी माणूस झालो तर!" शिल्पकार विचार करू लागला.

बास! तो लगेच एक पहाडी माणूस बनला.

एकदा रणरणत्या उन्हात शिल्पकार शेतात काम करत होता. पण उष्णतेमुळे त्याचे डोके गरगरू लागले. इतक्यात एक काळा ढग आला, आणि त्याने सूर्याला झाकून टाकले. शेतकऱ्याला – त्या शिल्पकाराला – वाटले "अरे, खरा शक्तिशाली तर तो ढगच आहे! मी ढग असतो तर काय मजा आली असती!" एक क्षणही गेला नाही, तोच शिल्पकार एक ढग बनला! देवीनेच बनवले त्याला ढग! इतक्यात जोरदार वारा आला आणि तो ढगाला उडवत नेऊ लागला.

'ढगापेक्षा मी वाराच झालो असतो तर!' त्याने विचार करायचाच अवकाश, की शिल्पकार देवीच्या कृपेने वारा बनून हवेत फिरू लागला.

थोड्याच वेळात वाऱ्याने एका पहाडाला टक्कर दिली. पण पहाडावर त्याचा किंमुद्धा परिणाम झाला नाही! तो मुळीच हलला नाही अन् वारा पुढे सरकू शकेनासा झाला!

'इतका शक्तिशाली वारा सुद्धा पहाडापुढे कुचकामाचा झाला! मी पहाडच झालो तर!' असा विचार सहाजिकच शिल्पकाराच्या मनात आला. अन् पहातापहाता देवीने त्याला पहाड करून टाकले!

एक दिवस काही शिल्पकार तेथे आले अन् शिळेत रूपान्तर झालेल्या शिल्पकाराला पाहून म्हणाले–"ही शिळा छान वाटतेय! आपण ही फोडून टाकू आणि त्यातून सुन्दर सुन्दर मूर्ति बनवू!"

हे ऐकून शिलारूपी शिल्पकार एकदम घाबरून मनातच तो ओरडला–"देवी! वाचव मला!"

"तू शिल्पकार बनूनच रहावंस, हे उत्तम!" देवी म्हणाली आणि तिने त्या शिलेला पुन्हा शिल्पकाराचे मूळ रूप देऊन टाकले! यानन्तर शिल्पकाराने आपला असंतुष्ट स्वभाव सोडून दिला.



# शिक्षण कशासाठी ?

कुन्तल देशावर राजा कुशलसेनचं राज्य होतं. 'शिक्षण कशासाठी आवश्यक असतं?' असा एक प्रश्न त्याच्या मनात उत्पन्न झाला. भरल्या राजसभेत राजाने हा प्रश्न उपस्थित केला.

"शिक्षणामुळे चांगल्यापैकी नोकऱ्या मिळू शकतात. खूपसं धन जोडता येतं त्यामुळे." एक पंडित बोलला.

"शिक्षणामुळे कीर्ती मिळते." प्रधान मंत्र्याचा अभिप्राय आला.

"शिक्षणामुळे माणसाला मान मिळतो, म्हणून शिकणं आवश्यक आहे." कवीने मत प्रदर्शित केलं.

"विद्यावान् माणसाची प्रत्येक ठिकाणी, प्रत्येक देशात पूजा होते. इतकंच नव्हे, तर विद्या हे धन असे आहे, की ते कोणी चोरू शकत नाही; म्हणून विद्या-धन हेच श्रेष्ठ धन आहे." दरबारी विद्वानाने आपली विद्वत्ता प्रदर्शित केली.

तरीही या सर्व उत्तरांमुळे राजाचे समाधान झाले नाही. राजाला आपल्या प्रश्नाचं योग्य उत्तर मिळालेलं नाही, आणि तो त्यामुळे नाखूष आहे–हे विदुषकाने हेरले. तो उठून म्हणाला–"महाराज, मी जे उत्तर देणार आहे, त्यामुळे आपणाला राग येईल!"

"नाही, नाही! तुझं उत्तर आवडलं नाही, तरी मी तुला शिक्षा करणार नाही. निर्भयपणे तू उत्तर दे. सांग कशासाठी शिकणं आवश्यक आहे?" राजाने पुन्हा विचारले.

आता आश्वस्त होऊन धाडकन विदुषक बोलला–"होय महाराज! तेच उत्तर देतो. असले प्रश्न मनात उभे राहू नयेत, अन् आले तरी ते विचारून लोकांना सतावू नये–यासाठी शिक्षण फार आवश्यक आहे."

विदुषकाचे उत्तर ऐकून सारे दरबारी खो खो हसू लागले!

राजा कुशलसेन क्षणभर आश्चर्यचकित होऊन गप्पच झाला! पण लवकरचं भानावर येऊन तोही इतर सर्वांबरोबर अगदी मनापासून हसू लागला!





# धर्मयुद्ध

अलकापुरी राज्याचा राजा होता विक्रम-देव. त्याच्या सेनानायकांपैकी कंठीरव हा फारच शूर होता. एका विजयादशमीच्या रात्री राजा सारा राजपरिवार आणि आपल्या सेनानायकांसह चांदण्यात बसून गप्पागोष्टी करत होता.

इतक्यात एक विचित्रसा घोडेस्वार तेथे येऊन आपल्या घोड्यावरून खाली उतरला. "कोण आहेस तू? शत्रु कि मित्र?" राजपरिवारातील एकाने विचारले.

तो घोडेस्वार उत्तरला–"मी शत्रु नाही, अन् मित्रही नाही. मी केवळ एक योद्धा आहे."

"ठीक आहे. मग तुला इथं काय पाहिजे बोल बरं!" राजा विक्रमदेवने विचारले.

"आपल्या शक्तीची, पराक्रमाची कसोटी पाहून घेण्याशिवाय एका योध्याला दुसरं काय हवं असणार?" त्याने प्रश्नाचे उत्तर प्रश्नानेच दिले, अन् त्याच वेळी तो हसलाही. सर्वच जण त्याच्याकडे लक्षपूर्वक पहात राहिले. तो चांगला पुऱ्या उंचीचा, धष्ट-पुष्ट आणि रुबाबदार असा होता. त्याची काळीभोर दाढी चांदण्यात चमचमत होती. अन् तशीच त्याच्या हातात असलेली कुऱ्हाडही चमकत होती. त्याचे हे रूप पाहूनच सर्वांची हृदये भीतीने धडधडू लागली.

"ठीक आहे, तुझ्याशी लढायला आमचा सेनानायक आणि योद्धा कंठीरव तयार आहे." राजाने असे म्हणताच कंठीरव चटकन् उठून उभा राहिला.

यावर तो दाढीवाला योद्धा म्हणाला–"छे, छे! मी असा लढाई करायला नाही आलो. पहा ही माझी कुऱ्हाड! तुमच्यापैकी कोणीही येऊन या कुऱ्हाडीने माझ्या गळ्यावर प्रहार करावा. पण फक्त एकच प्रहार! आणि अशा तऱ्हेने जो माझ्या गळयावर प्रहार करील त्याने पुढच्या वर्षी याच सणाच्या दिवशी, याच कुऱ्हाडीचा माझ्या हातचा एक प्रहार आपल्या गळयावर झेलायला तयार असावे!"

२५ वर्षांपूर्वीच्या चांदोबातील गोष्ट

ही विचित्र अट ऐकून सर्वजण खो खो हसू लागले. या धारदार कुऱ्हाडीचा आपल्या गळयावर जोरदार प्रहार खाऊन कोणी जगणं शक्य तरी आहे का?

कंठीरवने पुढे होऊन त्याच्या हातातली कुऱ्हाड घेतली आणि त्याने योध्याच्या गळयावर एक जोरदार प्रहार केला.

पण काय आश्चर्य! ती कुऱ्हाड योध्याच्या गळयात अर्धीच घुसली अन् इतके होऊनही त्या जखमेतून रक्ताचा एक टिपूसही बाहेर आला नाही! योद्धाही तसाच खिळून उभा होता, जणू काही घडलेच नाही! त्याने कुऱ्हाड बाहेर काढली आणि आपल्या गळयाला हात लावून पाहिला. तेथे जखम वगैरे काही नव्हतीच!

मग पुन्हा शांतपणे कंठीरवकडे पहात तो योद्धा म्हणाला–"दिलेलं वचन मात्र विसरू नकोस हं! पुढल्या वर्षी, याच दिवशी तू गिरिदुर्गात ये. तिथेच रहातो मी." इतके बोलून तो एकदम उडी मारून घोड्यावर बसला आणि आला तसाच घोडा दामटत निघून गेला.

या घटनेने सर्वचजण आश्चर्याने आपापल्या जागीच खिळून राहिले!

* * *



पहाता पहाता एक वर्ष असेच निघून गेले. विजयादशमीचा दिवसही जवळ आला. त्या योध्याच्या महिम्याबद्दल राजा किंवा मन्त्रीही काही माहिती काढू शकले नाहीत, काही निर्णयही घेऊ शकले नाहीत. काहीही असो, वचनपूर्तीसाठी कंठीरवला गिरिदुर्गात जाणे भागच होते! त्या योध्याला कंठीरवाच्या कंठावर प्रहार करू देणे आवश्यकच होते. दिलेले वचन निभावले नाही तर राज्यावर कलंक येणार होता. त्यामुळे योग्य निर्णय घेऊन विक्रमदेव व त्याच्या परिवाराने कंठीरवाला योध्याकडे पाठवून दिले.

पाठवले तर खरे, पण कंठीरव वाचून जिवन्त परत येईल अशी कोणालाच आशा



उरली नव्हती. आपण एका उत्तम योध्याला मुकत आहोत, याबद्दल सर्वच दुःखी होते.

कंठीरव मात्र मोठ्या आनन्दानें गिरिदुर्गाकडे निघाला. रात्रंदिवस जंगले पार करीत राहिला. खूप थकल्यावर जरा विश्रान्ति घेण्यासाठी घोड्यावरून उतरून तो एका झाडाखाली बसला. इतक्यात कंठीरवला कोणाची तरी किंकाळी ऐकू आली. त्याने पटकन उठून त्या दिशेने पाहिले तर एका तरुणीला चोरांनी घेरले असल्याचे त्याला दिसले. चटकन आपली तलवार उपसून तो त्या चोरांशी भिडला. थोड्याच वेळात चोर......पाय लावून पळून गेले.

कंठीरवने त्या तरुणीचे बंधन कापून टाकले. चौकशी करता त्याला कळले की ती एक राजकन्या आहे. आपल्याला चोरांपासून वाचवल्याबद्दल कंठीरवला एक अंगठी देत ती म्हणाली–"ही अंगठी मी तुम्हाला बक्षिस देत आहे. जादूची आहे ती. ती बोटात असली म्हणजे तुमच्या शरीरावर कोणत्याही हत्याराचा काहीही परिणाम होणार नाही."

परंतु अंगठी नाकारत कंठीरव म्हणाला–"नाही. मी नाही घेऊ शकत ही अंगठी. त्या दिवशी त्या योध्याच्या गळ्यावर मी धारदार कुन्हाड चालवली होती. आता दिल्या वचनाला मी बांधला गेलोय. त्याच्या हातून आता कुन्हाडीचा वार माझ्या गळ्यावर चालवून घेणं हा माझा धर्म बनतो. अशा परिस्थितीत जादूची अंगठी धारण करणं हा अधर्म होईल. स्वतः वीर असूनही अशा अधर्माची मदत घेणं मला योग्य नव्हे." इतके बोलून कंठीरव पुन्हा त्या झाडाखाली निघून गेला.

थोड्या वेळाने कंठीरव स्नानासाठी नदीकडे निघून गेला. तो निघून गेलेला पाहून राजकुमारी त्या झाडाखाली गेली. पण तो परत आला, तेव्हां मात्र ती त्याला कुठे दिसली नाही.

कंठीरव नंतर गिरिदुर्गात पोचला तेव्हां तो योद्धा कुन्हाड हाती घेऊन तयार असलेला त्याला दिसला. आपले वचन पाळल्याबद्दल त्याने कंठीरवची तारीफ केली.

स्वतः तयार होऊन कंठीरव योध्याला म्हणाला–"आता उशीर कसला, श्रेष्ठ योध्या? चल, चालव आपली कुन्हाड! पण हां, एकच प्रहार हं!"

हे आव्हान ऐकून योद्धा जोरजोरात हसू लागला–"एकच वार करीन मी! पण तुला काय वाटतं? वार खाऊनही तू जिवन्त राहू शकशील? अगदीच मूर्ख आहेस तू!" इतके बोलून योध्याने कंठीरवच्या गळ्यावर धारदार कुन्हाडीने जोराचा प्रहार केला.

पण हे काय? कुन्हाडीचा फाळ कंठीरवच्या गळ्यात अर्ध्यापर्यंतच रुतला! रक्ताचाही कुठे मागमूस नाही! कंठीरव होता तसाच उभा होता. जसे, काही घडलेच नाही! योद्धाच काय, पण स्वतः कंठीरवही आश्चर्यचकित झाला. हा परिणाम पाहून त्याचा स्वतःच्या डोळ्यावर विश्वासच बसेना! त्याने कंठात रुतलेली कुन्हाड काढली तरी गळा जसाच्या तसाच! एकादी खूणही नाही कुठे!

योद्धा रागावून ओरडू लागला–"फसवलं! फसवलं मला!" आणि तो पुन्हा कुन्हाड घेऊन धावला.

आता कंठीरवही चिडला अन् त्याने आपली तलवार उपसली.

इतक्यात गिरिदुर्गचा राजा आणि राजकुमारी तेथे आले. त्यांनी दोघांना लढायला मनाई केली.

राजकुमारीने राजाला सांगितले की कंठीरवनेच तिला चोरांपासून वाचवले होते आणि अंगठी घ्यायलाही नकार दिला होता. पण तिथेच तो स्नानाला गेलेला पाहून अंगठी तिने त्याच्या कपड्यात टाकून ठेवली.

सत्य गोष्ट कळल्यावर योध्याने कंठीरव आणि राजकुमारी या दोघांचीही तारीफ केली, कारण त्या दोघांनीही आपापले कर्तव्य निभावले होते. कंठीरवच्या साहस व धैर्य या गुणांवर खूष होऊन राजाने आपल्या कन्येचा विवाह त्याच्याशी लावून दिला, आणि त्याला आपल्या 'राज्याचा वारस' म्हणूनही घोषित केले.





# जितूची सहनशक्ती

जितू नावाच्या एका माणसाला राज-दरबारात नोकरी मिळाली. त्याच्या कुटुंबखर्चाला तसे रोज पाच रुपये पुरेसे होत, पण त्याला दर महिना चांगला पाचशे रुपये पगार होता त्यामुळे तो जरा चढेलपणे वागे.

मितू हा जितूचा लहानपणापासूनचा मित्र. तो मोठा कष्टाळू होता. गल्ली-गल्लीतून भाजी विकत फिरून किंवा अशीच काही कामं करून तोही महिन्याकाठी पाचशेंच्याही वर कमाई करी. पण जितूला मिळणारा मानमरातब मितूला कसा मिळणार?

राजदरबारातला नोकर असल्याने सर्वजण जितूला मान देत. तो समोर दिसला तर त्याला हात जोडून नमस्कार करीत, मान लववून त्याच्याशी आदराने बोलत. या सर्वांमुळे जितू मर्यादे बाहेर गर्विष्ट झाला होता.

जितूला दरबारात कसा मान मिळतो, हे पहायला मितू एकदा राजवाड्यात गेला. नेमकी त्यावेळीच कोणीतरी जितूची चांगलीच हजेरी घेत होता! तोंडाने वाटेल ते बोलत होता!

मितूने जवळच्याच एका नोकराला अदबीने प्रश्न विचारला–"याला विरोध का करीत नाही हा?"

"विरोध करायला तितकं धैर्य हवं ना! सगळं निभावून न्यायला तितकी ताकत हवी. ताकतीशिवायच कोणी असा विरोध करू धजेल, तर नोकरीच जाईल की हातची! नोकरी गेली की बाहेर कोण मान देईल त्याला?" नोकर म्हणाला.

"मग काय हा अधिकारी असाच सर्वांवर भुंकत रहाणार?" हैराण होऊन मितूने विचारलं.

अशोक ठकार

"सर्वांनाच रागावलं तर सर्वच कुठे गप्प रहातात? प्रत्येकाच्या सहनशक्तीची एक मर्यादा असतेच की! पण जितूच्या सहन-शक्तीला काही मर्यादाच नाही, तुम्हीच पहात रहा न!" तो नोकर म्हणाला.

खोली स्वच्छ नव्हती, म्हणून अधि-काऱ्याने जितूला चापलं होतं. जितूने त्याला सांगितलं की, झाडूवाला आला नाही, मग आपण स्वतःच खोली झाडली. नंतर अधिकारी पुन्हा ओरडू लागला की स्वच्छता बरोबर झालेली नाही. पुन्हा जाऊन झाडूवाल्याला बोलावून आणायला हवं. जितूने पुन्हा पाहून येऊन सांगितलं की, 'तो नोकर अजून आलाच नाही.' मग अधिकाऱ्याने त्याला स्वतः जाऊन त्याचा पत्ता लावून धरून घेऊन यायला सांगितलं. जितू बिचारा पुन्हा जाऊन इकडे-तिकडे खूप शोधाशोध करून त्या माणसाला घेऊनच परत आला. पण आता 'इतका उशीर का केला?' म्हणून अधिकाऱ्याने पुन्हा त्याची खरडपट्टी काढली.

हे सर्व पाहून मितूला वाटलं की–'जितूचं जीवन हे तर गुलामाच्या जीवनापेक्षाही खडतर आहे.' तो मनात म्हणू लागला–"त्यापेक्षा माझं जीवन लाख बरं! भले कोणी माझ्यासमोर हात जोडत नसेल! पण विनाकारणच कोणी मला अपशब्द तर



बोलत नाही. माझ्याकडून उगाचच चाकरी तर करून घेत नाही!"

मितूला राजवाड्यात येऊन आपली ही परिस्थिती पाहून निघून जाताना जितूनं पाहिलं होतं. जितूला तो आपला मोठाच अपमान वाटला. मितू इतरांना हे सर्व सांगेल असेही त्याला वाटलं. म्हणून संध्या-काळी काम संपवून घरी आल्याबरोबर आपल्या बायकापोरांना घेऊन जितू मितूच्या घरी गेला. त्याच्या मनात होतं की–"जरा इकडच्या-तिकडच्या लंब्याचौड्या आपल्या बढाईच्या गोष्टी करू, खूप डींग मारू, म्हणजे मग आपला मान होता तसाच राहील!"

जितू जेव्हा मितूच्या घरी पोचला, तेव्हा मितू आपल्या बायकोला-'राजवाड्यातलं काम कसं अगदीच हलक्या दर्जाचं, गुलामीचं आहे.' वगैरे हकिकती सांगत होता. जितू नेमका तेव्हाच आपल्या लवाजम्यासह तेथे पोचला.

त्याला पहिल्याबरोबर 'अरे जितू, बरा वेळेवर आलास बघ! आमचा नोकर दोन दिवस येतच नाहीये! घरामागे खूपच केरकचरा जमलाय, जरा स्वच्छ कर ना तू! म्हणशील तितकी मजुरी देईन मी तुला!' असं मितू म्हणाला.

हे बोलणं ऐकून जितू फारच रागावला. पण तरीही तो तसाच मितूला म्हणाला- "घरी आलेल्या आपल्या बालपणातल्या मित्राचा इतका अपमान करतोस तू?" आणि मग तो जितूला त्याबद्दल दूषण देऊ लागला.

जितूची पत्नीही दुःखाने म्हणाली- "भावजी, चेष्टा करायचीही एक हद्द असते नं! तुमचं हे बोलणं मुळीच आवडलं नाही मला!"

त्याबरोबर मितू तिला म्हणाला- "वहिनी, माझं बोलणं नीट कळलं नाही तुला! राजदरबारात काम करणारी माणसं रागबीग अजिबात विसरून जातात. इतर कोणी काही म्हणालं, शिव्या दिल्या तरी ते मुकाट्याने ऐकून घेतात-हीच गोष्ट आता मी आपल्या बाळबच्चांना उदाहरणासह सांगत होतो. दरबारातली जितूची सहनशक्ती पाहून मी तर आश्चर्यचकितच झालो! पण मला आत्ताचं कळून चुकलं, की त्यांची ही सहनशक्ती केवळ राजवाड्यापर्यंतच मर्यादित असते! बाहेर आलं की, मग मात्र त्यांना आपला मानमरातब आठवतो, आता मात्र समजलं की दरबारात कसाही रहात असला, तरी अखेर हा माझा लहानपणचा स्वाभिमानी दोस्त जितूच आहे! त्याचा अपमान झालेला मला आवडणार नाही."

हे ऐकून जितू-मितूच्या बायका खो खो हसू लागल्या. आणि लाचारीने जितूही हसण्यात सामिल झाला.



## निसर्गातील आश्चर्य :



### कांगारूंचा देश

ऑस्ट्रेलिया हा कांगारूंचा देश मानला जातो. कांगारू हा शाकाहारी प्राणी आहे. त्याचे पुढचे दोन पाय बुटके आणि मागचे पाय चांगलेच लांब असतात. लांब लांब उड्या मारत जाणे अशा पायांमुळेच त्यांना शक्य होते. मोठ्या शरीराच्या जातीचे जे कांगारू असतात त्यांचा माथा शेळीच्या डोक्याच्या एवढा असतो आणि त्यांची उंची ७ फूट (२.१३ मीटर) असते. यांच्यात लहान जातीचे कांगारूही असतात. सर्वात लहान कांगारू सामान्य सशापेक्षा मोठा नसतो.

### नक्राश्रु



माणूस जर माणसाला मारून खाऊ लागला तर त्याला नरभक्षी म्हटले जाते. पण मगर आणि मासे सोडून इतर कुठलाही प्राणी आपल्याच जातीच्या प्राण्यांना खात नाही. पण असं केल्यावर त्याच्या डोळ्यांतून काय दुःखाने अश्रु येतात? मगरीचे अश्रु (नक्राश्रु) हे खरे अश्रु नसतातच. काही ग्रंथींच्या द्वारा हे जे अश्रु निघतात, ते म्हणजे त्यांच्या शरीरात तयार झालेल जास्तीचं मीठ बाहेर फेकण्याचा एक मार्ग होय.



### सापाचे कान

तुम्ही कधी गारुडी पाहिलाय? 'त्याच्या पुंगीच्या आवाजानेच नाग आपली फणा खोलून डोलतो ही कल्पना मुळीच बरोबर नाही. गारुड्याने आपली पुंगी हलवली नाही, तर तो फणाही डोलवणार नाही. खरी गोष्ट अशी, की सापांना कानच नसतात. पण त्यांच्या जिभेत मात्र आवाज ग्रहण करण्याची शक्ती असते. अशा तऱ्हेने, आपण इतकेच म्हणू शकू की साप आपल्या जिभेचाच कानासारखा उपयोग करतो.


















विश्व - वार्ता

# हेल्मट कोलला नेहरू पुरस्कार

आपला देश खंडित करण्याची मोठी किमत मोजून चव्वेचाळीस वर्षांपूर्वी भारत स्वतन्त्र झाला. अशाच प्रकारे सेहेचाळीस वर्षांपूर्वी विभाजित झालेले देशाचे दोन तुकडे पुन्हा एकत्रित आणण्यासाठी अखंड प्रयत्न केलेल्या एका नेत्याचा आपला भारत खास सन्मान करत आहे. आंतरराष्ट्रीय एकता घडवून आणणाऱ्यासाठी 'नेहरू ॲवॉर्ड' ची योजना केली गेलेली आहे. स्वातन्त्र्यासाठी प्रेरित होऊन शान्तिपूर्ण पद्धतीने प्रयत्न करून पूर्व व पश्चिम जर्मनीचे एकत्रीकरण घडवून आणल्याबद्दल डॉ. हेल्मट कोल यांना १९९० सालचा नेहरू पुरस्कार १४ नोव्हेंबर रोजी दिला गेला आहे.

पंडित नेहरूंच्या जन्म दिवशी या पुरस्काराची घोषणा केली गेली. १९८९चे नेहरू ॲवॉर्ड दक्षिण आफ्रिकेतील वर्णभेद दूर करण्यासाठी प्रयत्न केल्याबद्दल झिबाब्वेचे अध्यक्ष डॉ. रॉबर्ट मुगाबे यांना दिले गेले होते. शेवटचा सम्राट द्वितीय कैसर विल्हेल्म आणि त्यानंतर ॲडॉल्फ हिटलरच्या हुकुमशाही राजवटीतही जर्मनी एक अखंडित देशच होता. सन १९८९च्या सप्टेंबर महिन्यात नाझी जर्मनीने पोलंडवर हल्ला केला आणि दुसऱ्या जागतिक महायुद्धाला (१९३९-१९४५) सुरुवात झाली. युद्धात अखेर जर्मनीचा पराजय झाला आणि हिटलरने आत्महत्त्या केली.

जर्मनी ज्या वेळी ताब्यात आला, त्या वेळी त्याचे चार तुकडे अमेरिका, ब्रिटन, फ्रान्स व सोव्हिएट सेनेच्या ताब्यात आले आणि सन १९४९ मधे पूर्वेकडील जर्मनी 'जर्मन डेमॉक्रॅटिक रिपब्लिक' या नावाने स्वतन्त्र झाला. यालाच 'पूर्व जर्मनी' असे संबोधले जाऊ लागले. त्याची राजधानी होती पूर्व-बर्लिन. त्याच वर्षी 'फेडरल रिपब्लिक ऑफ जर्मनी' 'पश्चिम जर्मनी'चीही स्थापना झाली. बॉन ही त्याची राजधानी.

सन १९५३ मधे जी आन्दोलने झाली, ती सोव्हिएट सेनेने दाबून टाकली. यानंतर पूर्व जर्मनीतील लोकांनी

पश्चिम जर्मनीत पळून जाऊ नये, यासाठी 'बर्लिनची भिंत' बांधण्यात आली.

सन १९७३ मधे या दोन्ही जर्मनीत स्नेहसंबंध प्रस्थापित झाले. सन १९७६ मधे कम्यूनिस्ट नेता एरिक होनेकर हा पूर्व-जर्मनीचा अध्यक्ष बनला आणि स्वत: सोव्हिएट संघाचा मित्र असूनही तो दोन्ही जर्मनींमधे मैत्रीचे संबंध वाढवण्याचे काम करत राहिला. त्याने सन १९८७ मधे प्रथमच पश्चिम जर्मनीचा दौरा केला. त्यावेळी डॉ. हेल्मट कोल पश्चिम-जर्मनीचा चॅन्सेलर होता.






सन १९९० च्या एप्रिलमधे आयोजित केल्या गेलेल्या १२ देशांच्या 'युरोपियन कौन्सिल'ने, दोन्ही जर्मनींच्या एकमेकात विलीनीकरण्याच्या कामी डॉ. कोलने केलेल्या प्रयत्नांची प्रशंसा करून त्याला प्रोत्साहन दिले. त्या दिवसापासून डॉ. कोल यांना युरोपियन देशांच्या संबंधात प्राधान्य दिले गेले. ३ ऑक्टोबर १९९० रोजी दोन्ही जर्मनींचे एकत्रीकरण झाले. मोठ्या आनन्दाने आणि उत्साहने लोकांनी 'बर्लिनची भिंत' पाडली. आज ८ कोटी लोकसंख्या असलेले 'संयुक्त जर्मनी' हे राष्ट्र जगातील एक महान शक्ती म्हणून ओळखले जाण्याची शक्यता आहे.

सन १९९० च्या निवडणुकीत डॉ. कोल जर्मनीच्या चॅन्सेलर पदावर निवडून आले. त्यांनी आपल्या एका भाषणात सांगितले की भांडणे व गुटबंदी नसलेल्या नव्या विश्वाचे स्वप्न पाहणाऱ्या महात्मा गांधी व जवाहरलाल नेहरू यांच्या पासून त्यांना स्फूर्ति मिळाली. नेहरू पुरस्कार समितीने आपल्या निवेदनात म्हटले आहे की दोन जर्मन राष्ट्रांच्या विलीन करण्यामुळे युरोपच्या इतिहासातील एक नवा अध्याय सुरू होत आहे.

जगाचा एक नवा आकृति-बंध तयार करण्याच्या कामी ही घटना उपयुक्त सिद्ध होणार आहे.



# पंडिताचा उदरनिर्वाह

विमलपुरीचा राजा विवेकवर्मा याचे साहित्यावर मोठे प्रेम! 'सरस्वतीची खास दया' असल्याशिवाय कोणाला पांडित्य प्राप्ति होत नसते – अशी त्याची धारणा होती. त्यामुळे भेटायला आलेल्या कवि-पंडितांचा तो खूप आदरसत्कार करी. त्याच्या स्वत:च्या दरबारात श्रीमुख नावाचा एक कवि-पंडित होता. तोच राजाचा दरबारी-पंडित होता. परन्तु मन्त्री बुद्धिप्रिय याला मात्र पंडितांची मुळीच कदर नव्हती. त्याची धारणा होती की, धनापुढे पांडित्य हे केवळ कवडीमोलाचे!

एकदा बोलताबोलता राजा विवेकवर्मा बुद्धिप्रियला म्हणाला–"महामन्त्री, या श्रीमुखचं पांडित्य पाहिलं, की मला असं वाटतं, की माझं सारं ऐश्वर्य त्याच्या पांडित्यापुढे फुटक्या कवडीच्याही लायकीचं नव्हे!"

यावर हसत बुद्धिप्रिय म्हणाला–"महाराज, माफी असावी! पण मी आपल्या या विचाराशी सहमत नाही! 'धनापुढे पांडित्य कवडीच्याही लायकीचं नव्हे' असं मला वाटतं. पांडित्याशिवाय माणसाची गुजराण होऊ शकेल, पण धनाशिवाय कशी होणार? त्या श्रीमुखची उदरंभरणाची सोय आपण केली नसतीत, तर मोठा पंडित असूनही त्याला काय फायदा झाला असता?"

विवेकवर्माला मन्त्र्याचे मत रुचले नाही. तो म्हणाला–"मला असं वाटतं की तुम्हाला साहित्याची फारशी समज नसावी, म्हणूनच असं बोलत आहात तुम्ही!"

यानन्तर काही दिवसांनी राजा विवेकवर्मा व मन्त्री बुद्धिप्रिय एका गुरुकुलाला भेट द्यायला गेले. माधवानन्द नावाचे आचार्य ते गुरुकुल चालवीत असत. राज्यातल्या अन्य गुरुकुलांपेक्षा माधवानन्दचे

श्रुतिश्रया डोंगरे



विद्यार्थीच जास्त प्रतिभा-संपन्न व ज्येष्ठ ठरले जात.

राजा माधवानन्दांना म्हणाला–"आचार्य, आपल्याकडे विद्यार्जन करणारे विद्यार्थीच नेहमी अन्य गुरुकुलातल्या विद्यार्थ्यांपेक्षा जास्त प्रज्ञावान म्हणवले जातात, याचं काही कारण आपण सांगू शकाल काय?"

माधवानन्द स्मितहास्य करत म्हणाले– "राजा, गुरुकुलातलं शिक्षण पूर्ण झाल्यावर मी प्रत्येक विद्यार्थ्याला श्रीमुखने रचलेलं काव्य वाचायला देतो. जो त्या काव्यातून एकादी चूक काढून दाखवू शकेल, अशा विद्यार्थ्यालाच मी योग्यता-पत्र देतो."

हे ऐकून विवेकवर्माला फारच राग आला–"असं काय? म्हणजे माझ्या दरबारी पंडिताच्या चुका काढणं हे तुमच्या विद्यार्थ्यांचं विशेष कर्तव्य आहे होय? माझ्या दरबारचा तर हा महान अपमान आहे!"

माधवानन्द यावर नम्रतेने म्हणाला– "राजा, श्रीमुखच्या काव्यातून चूक काढणं, ही काही साधीसुधी गोष्ट नव्हे. त्याकरता अपार पांडित्य असणं आवश्यक आहे. विद्यार्थ्यांच्या पांडित्याची कसोटी म्हणून जर दरबारी पंडिताचा आधार केतला जात आहे, तर ती गोष्ट आपणाला अभिमानास्पदच आहे, अपमानकारक नव्हे. आपण हे नीट समजून घ्यावे!"

हे ऐकून मात्र राजा जरा शान्त झाला. त्याने विचारले–"मग आतापर्यंत आपण किती जणांना अशी योग्यता-पत्र दिलीत?"

"काय सांगू महाराज? मागल्या वर्षापर्यंत दरवर्षी एक किंवा दोनच विद्यार्थी उत्तीर्ण होत. पण या वर्षी मात्र पंधरा विद्यार्थ्यांना ही योग्यतापत्र मिळाली. मला चिंतेची गोष्ट अशी वाटत आहे की हे योग्यता-प्राप्त सारे विद्यार्थी सामान्य बुद्धीचे आहेत. मला मोठं आश्चर्य वाटत आहे ते याच गोष्टीचं!" माधवानन्द चिंता प्रकट करत उत्तरले.

"पण महाकवि श्रीमुखच्या चुका काढणारे सामान्य बुद्धीचे कसे असतील, याचं मला आश्चर्य वाटतंय." राजा म्हणाला.

आत्तापर्यंत गप्प असलेला मन्त्री बुद्धिप्रिय चट्कन म्हणाला–"यात आश्चर्य करण्यासारखं काय आहे? आपण माधवानन्दच्या गुरुकुलातल्या विद्यार्थ्यांना प्रामुख्य देता, हे जाणून कोणी महापंडित श्रीमुखच्या काव्यातल्या चुका काढून त्या गुरुकुलातल्या विद्यार्थ्यांना विकत असेल, अशीही शक्यता आहे नं महाराज?"

मन्त्र्याची ही व्यवहारकुशलता पाहून विवेकवर्मा चकित झाला!

राजाने तावडतोब या कामावर आपले गुप्तचर नेमले! आणि आठवडाभरातच सत्य प्रकाशात आले. मन्त्री बुद्धिप्रियचा अंदाज खराच निघाला. राजधानी जवळीलच रामापुर नावाच्या गावात रहाणारा विष्णुशर्मा नावाचा पंडित श्रीमुखचं काव्य धांडोळून, त्यातील दोष शोधून ते माधवानन्दकडून योग्यता-पत्र मिळवण्यास इच्छुक विद्यार्थ्यांना काही धन घेऊन विकत होता, असे आढळले.

ही खबर मिळाल्यावर स्वतः राजा विवेकवर्मा विष्णुशर्माला भेटायला गेला आणि म्हणाला–"पंडितश्रेष्ठ, आपल्यासारख्या विद्वानाने असले काम करावे, हे





योग्य आहे काय? आपणामुळे प्रतिभाहीन विद्यार्थी परीक्षा उत्तीर्ण होऊन पदवी मिळवत आहेत. आपल्या पांडित्याचा आपण असा दुरुपयोग का करत आहात?"

हात जोडून राजापुढे उभा राहून विष्णु-शर्मा म्हणाला–"महाराज, इतक्या काळा-नन्तर या मिषाने का होईना, आपली भेट मिळाली, धन्य झालो मी! कित्तीतरी दिवसांपासून आपली भेट घेण्यासाठी धडपडत होतो मी, कित्ती फिरलो, पण उपयोग झाला नाही. आपली-माझी भेट घडली, तर माझ्या पांडित्यापुढे आपलं पांडित्य फिकं पडेल असं वाटून आपल्या दरबारी पंडिताने – श्रीमुखने प्रयत्नपूर्वक, मला आपणाला भेटू दिलं नाही. श्रीमुखच्या चुका शोधून काढण्यांत मी सफल झालो, म्हणून मला वाटतंय, की माझी प्रतिभा त्याच्या पांडित्यापेक्षा श्रेष्ठ असावी. लायकी नसणाऱ्या विद्यार्थ्यांना योग्यता-पत्र मिळाल्याबद्दल आपल्याला दुःख होतंय! मग प्रतिभावान असूनही पोट भरण्यालायक व्यवसाय न मिळाल्याबद्दल मला किती दुःख वाटत असेल? केवळ आपलं पांडित्य प्रकट मार्गाने विकून मी आपला उदर-निर्वाह चालवत आहे. मला आपली गुजराण करायला हा एकच मार्ग सापडला. मी यात काही अपराध करत आहे, असं मला वाटलं नाही.

राजा मुकाट्याने राजधानीला निघून गेला. बरोबर असलेला मन्त्री बुद्धि-प्रिय राजाला म्हणाला–"महाराज, अशा प्रकारे लक्ष्मी मिळवण्यासाठी सरस्वती विकणारे पंडितही अस्तित्वात आहेत, तेव्हां माझं म्हणणं खरंच ठरतं ना, कि पांडित्यापेक्षा धन-संपत्तिच महान् अन् श्रेष्ठ आहे?"

मन्त्र्याच्या प्रश्नावर हसन राजा विवेक-वर्मा उत्तरला–"हे बरोबर नव्हे मन्त्रीवर! पैशामुळे जीवनाची गुजराण होत असेल, पण पांडित्य आणि साहित्य यांचा दर्जा याहूनही उच्च आहे. धनाशी त्याची तुलना करणं ठीक होणार नाही. धनासाठी एका पंडिताने आपल्या पांडित्याचा विक्रय केला, तेव्हा आपणच विचार करायला हवा की त्या पंडिताच्या निर्वाहाची आपण काय सोय केली? विष्णुशर्माच्या या वर्तनाबद्दल खरा अपराधी तर मीच आहे! हां, पंडितांबद्दल आपल्या मनात जो अनादर आहे, त्याचं कारण श्रीमुख-सारखे अप्पलपोटे पंडित नक्कीच आहेत ही गोष्ट कबूल आहे मला!"

यानन्तर राजाने 'दरबारी पंडित' या पदावरून श्रीमुखला काढून ते स्थान विष्णुशर्माला दिले आणि अशा तऱ्हेने राजाचा सहवासही त्याला प्राप्त करून दिला.

एके दिवशी काही बोलत असताना राजा पंडित विष्णुशर्माला म्हणाला–"पंडितश्रेष्ठ, आता आपण दरबारी पंडित-पदावर आहात. तेव्हां आता माधवानंदांच्या गुरुकुलांतील विद्यार्थ्यांची योग्यता मापण्या-करता आपल्या काव्यातील दोष शोधून काढण्याची अट घालली जाईल. आपलं काव्यच प्रमाणभूत मानलं जाईल."

विष्णुशर्मा चटकन म्हणाला–"नाही महाराज! असं न केलं तरच बरं होईल. नाहीतर आजवर जे मी केलं, तेच करायला आणखी एकाद्या पंडिताला भाग पडेल."

पण राजा विवेकवर्मा त्याचं बोलणं थांबवत म्हणाला–"पण आता राज्यातली परिस्थिति बदलली आहे, पहिल्यासारखी ती नाही राहिली. प्रतिभावान पंडित आता विनासायास माझी भेट घेऊ शकतील, कारण श्रीमुखच्या जागेवर आता आपण आहात. मग कसली भीती? माधवानन्द आचार्यांच्या एकाही शिष्याला 'योग्यता-पत्र' यापुढे मिळू नये–अशीच इच्छा आहे माझी!"

राजाच्या बोलण्यातले मर्म जाणून विष्णुशर्माने स्वीकारात्मक मान हलवली.



# धाडसी

केसू देवगडला रहात असे. एकदा भयानक जंगलात, जंगली जनावरांच्या सान्निध्यात एक रात्र घालवून, सकाळी तो सहीसलामत गावात परत आला. या त्याच्या धाडसी कृत्या-बद्दल जमीनदाराला समजले. त्याला वाटले की याबद्दल केसूला काही बक्षिस द्यायला हवे; म्हणून जमीनदाराने आपला नोकर केसूच्या घरी पाठवला.

त्यावेळी केसू घरात नव्हता. नोकराने त्याच्या बायकोला निरोप सांगितला.

तो ऐकून चिडचिडत त्याची बायको लखिमा बोलली–"ओहो, ही बातमी जमीनदारा-पर्यंतही पोचली काय? त्या दिवशीची कमाई कुठे जुगारात घालवली, अन् माझ्यापुढे यायची शामत नव्हती म्हणून जंगलात राहून आला तो. पण आल्यावर मी साफ त्याला सांगितलं की - आजची अन् कालचीही मजुरी आणून माझ्या हातावर ठेवलीस तरच घरात ये, नाहीतर नको. तेव्हां तुझ्या मालकाला सांग कि काय बक्षिस द्यायचं असेल, ते मला दे!"

नोकराने परत येऊन लखिमाचे बोलणे जमीनदाराला सांगितले. जमीनदाराला ते ऐकून हसूच आले. तो म्हणाला–"बरोबरच आहे! केसूला इतका धाडसी बनवणाऱ्या बरं म्हणजे लखिमालाच हे बक्षिस द्यायला हवं!"





# साहसी अपूर्व

[ ११ ]

[सदानन्द मुनीच्या आज्ञेवरून दुष्टांचे दमन करण्यासाठी अपूर्व हिमालयावरून निघून रुद्रपुरीला गेला. रुद्रपुरीच्या युवराज्ञीच्या गळ्यातील मोत्यांच्या माळेत जडवलेला चन्द्रकान्त मणी चोरण्यासाठी दुष्ट तान्त्रिक प्रधानमन्त्री मित्राबरोबर कारस्थान रचू लागला. त्यांची बोलणी लपून अपूर्वने ऐकून ठेवली.] —त्यानंतर

तान्त्रिक प्रधानमन्त्र्याच्या भवनातून बाहेर पडला, तेव्हां अर्धी रात्र उलटली होती. त्याने घातलेली वस्त्रे काळी होती आणि त्याचे केस आणि लांब दाढीही अगदी काळी कुळकुळीत होती, त्यामुळे तो भोवतालच्या अंधारात जणू काही विरघळूनच गेला.

चन्द्रकान्त मण्याच्या साह्याने हा तान्त्रिक कसकसल्या पूजा करणार होता, कोणकोणत्या वेळी त्या होणार होत्या, पूजा करण्याची पद्धत त्याने कोणाकडून शिकून घेतली होती – वगैरे गोष्टी जाणून घेण्याची अपूर्वला मोठीच उत्सुकता लागून राहिलेली होती. त्यामुळे, मधे काही ठरीव अन्तर राखून अपूर्व त्या तान्त्रिकाचा पाठलाग करत राहिला. तो दबल्या पावलांनी चालत असल्याने त्याची चाहूल लागत नव्हती. यामुळेच आपला पाठलाग



होत असल्याचे तान्त्रिकाच्या लक्षात आले नाही.

नगराची सीमा ओलांडल्यावर रस्त्याच्या कडेच्या झाडीतून एक लठ्ठ अस्वल बाहेर आले व तान्त्रिकाच्या पुढ्यात वाकून उभे राहिले. तान्त्रिक पाठीवर बसताच अस्वल वेगाने जंगलाकडे धावू लागले. वेगाने धावणे म्हणजे तर अपूर्वच्या हातचा मळच! त्यामुळे अस्वलामागे धावायला त्याला जराही कष्टाचे वाटले नाही.

थोड्या वेळाने ते सर्वजण एका लहानशा नदीच्या काठी पोचले. अस्वलाच्या पाठीवरुन उतरुन त्याचा कान जोराने पिरगळत तान्त्रिक त्याला रागाने म्हणाला—"मूर्खा, पळायलाही विसरलास की काय? चल त्या वेताळवडापाशी माझी वाट पहात थांब, मी येईन तिथे!"

अस्वलाने मुंडके हलवून आपला आज्ञाधारकपणा व्यक्त केला, आणि मागे वळून ते पुन्हा काळोखात विलीन होऊन गेले. बिचाऱ्या त्या जनावराची अवस्था पाहून अपूर्वला त्याची फार कीव आली. तो स्वतः ही कधी कधी प्राण्यांच्या पाठीवरुन फिरत असे, पण तो कधीही त्यांना धमकावत नसे, की सतावत नसे. उलट तो त्यांच्यावर खूप प्रेम करी, त्यांच्या बद्दल कृतज्ञता व्यक्त करी. ते प्राणीही त्याच्यावर प्रेम करीत. पण या तान्त्रिकाने मात्र आपल्या मन्त्रबळाने अस्वलावर आपला अधिकार मिळवला होता, अन् त्याला खूप छळून तो त्याच्याकडून आपले काम करुन घेत होता.

तान्त्रिकाने नदीजवळ जाऊन कसलासा मन्त्र म्हटला आणि तीनदा टाळी वाजवली. थोड्याच वेळात एक मगर पाण्यावर पिचकाऱ्या उडवत तान्त्रिकाजवळ येऊन हजर झाली. तान्त्रिक पटकन उडी मारुन या मगरीवर स्वार झाला अन् त्याने आज्ञा केली—"चल, चल भरभर!"





ती मगर पश्चिमेकडे वळून तीरासारखी सरसरत पुढे निघाली. तिचा पाठलाग करत अपूर्व किनाऱ्यावरूनच धावत राहिला.

आकाशात चन्द्र एकाद्या बारीक रेषेसारखा दिसत होता. आकाशात कुठेकुठे अस्पष्टसे तारेही दिसत होते. नदीच्या दोन्ही किनाऱ्यांवरून कोल्हेकुई अन् घुबडांचे चित्कार ऐकू येत होते. अधून-मधून दूरवरून एकाद्या वाघाची गर्जनाही ऐकू येत होती. पण भीती कशाला म्हणतात, हे काही अपूर्वला ठाऊक नव्हते! त्यामुळे तोही एका तीरासारखा धावत तान्त्रिकाचा पाठलाग करत राहिला.

अशा प्रकारे खूप दूर गेल्यावर नदीच्या पात्राचे दोन भाग झाले. त्यातला एक प्रवाह दोन्ही बाजूंनी पहाडांनी वेष्टिलेल्या एका भुयारी मार्गात घुसला. हा भुयारी मार्ग मिट्ट काळोखाने भरलेला होता. मगर त्या भुयारात सहजपणे घुसली! आता अपूर्वही नाइलाजाने नदीत उतरला, आणि मगरीचा पाठलाग करत तोही त्या भुयारात शिरला.

मगर भुयारातल्या एका गुहेच्या तोंडाशी जाऊन थांबली. तांत्रिक लगेच तिच्या पाठीवरून उडी मारून जवळच्या एका दगडावर उभा राहिला.

"कोण आहे तिकडे?" एक भयानक किंचाळा आवाज त्या गुहेत घुमला. असला विचित्र आवाज अपूर्वने यापूर्वी कधीच ऐकला नव्हता. पण त्याने ओळखले, की हा आवाज एकाद्या जख्खड म्हातारीचाच असावा.

"मी तुझा सेवक वीरविकट! येऊ का आत?" तान्त्रिकाने विचारले.

"तू आलायस ते ठीक रे! पण तुझ्या मागे असलेला कोण आहे तो?" त्या आवाजाने दरडावत विचारले.

"मी आणि मगरीशिवाय तिसरा कोणीही प्राणी इथे नाहीये आई!" तान्त्रिक उत्तरला.





"मूर्खा! आपल्या आसपास नीट डोळे उघडून बघ तरी!" रागातच तो आवाज पुन्हा बोलला.

अपूर्वने ओळखले की, आपल्या अस्तित्वाची चाहूल गुहेतल्या म्हातारीला नक्कीच लागलेली आहे. त्याने लगेच आपल्या गुरूकडून शिकलेला अदृश्य होण्याचा मन्त्र जपला व तो ताबडतोब अदृश्य झाला.

तान्त्रिकाने गुहेत खूप बारकाईने शोधून पाहिले, पण त्याला कोणीच दिसले नाही.

"नाही आई! इथे आसपास मी आणि मगर यांच्याशिवाय कोणीही नाही." तान्त्रिकाने पुन्हा खातरजमा केली.

"बरं ठीक आहे. ये आत." त्या आवाजाने आज्ञा दिली.

वीरविकट आता गुहेत शिरला आणि गुहेतल्या घसरड्या दगडांवरून अपूर्वही हळूहळू त्याच्यामागे सरकू लागला.

एका मानवी कवटीत जळत ठेवलेली ज्योत त्या गुहेत मन्दसा पिवळा प्रकाश पसरवत होती. म्हातारी जादुगारीण त्या गुहेत पाय पसरून बसलेली दिसत होती. तिचे वय नक्की सांगणे कठीण होते, पण ती नक्कीच तीनशे वर्षांची तरी वाटत होती. तिचे शरीर केवळ अस्थिपंजरच दिसत होते, साऱ्या अंगावर सुरकुत्या पडलेल्या होत्या; तरीही त्या शरीरातून एक प्रकारचा प्रकाश झरत होता! तिचे डोळे तर पेटत्या विस्तवासारखे लाल दिसत होते! तिची बोटे वेटोळे घातलेल्या सापासारखी दिसत होती!

"काय बातमी आहे? तुझी योजना सफल झाली का?" म्हातारीने तान्त्रिकाला विचारले.

विकटवीराने प्रथम म्हातारीच्या पायावर लोटांगण घालून तिला नमस्कार केला, आणि नन्तर तो म्हणाला–"होय माते! तो मणी युवराणीच्या गळ्यातल्या मोत्यांच्या माळेत गुंफलेला आहे. मला आशा आहे की आता तो नक्कीच आपल्या हाती येईल."



"तुझ्या हाती काय फक्त मणीच येईल?" म्हातारीने विचारले.

वीरविकट पटकन उत्तर देऊ शकेना; तो नुसताच आ वासून पहात राहिला. त्याचा हा अवतार पाहून म्हातारी अशी खो खो हसली, की सारी गुहाच त्या हास्याने निनादली!

"मला तुझा उद्देश समजला नाही माते! त्या मण्याबरोबर आणखीही काही हवं आहे तुला?" तान्त्रिक वीरविकटने विचारले.

"मला आणखी काय हवं मूर्खा? तू जो चन्द्रकान्त मणी फार महान समजत आहेस, तो काय मी मागितला होता तुझ्याकडे?" जादुगारणीने विचारले.

"नाही, फक्त तो मणी कसा मिळवायचा इतकंच सांगितलं होतंस तू! अन् ते सुद्धा केवळ माझ्यासाठीच न? या करता केवळ तुझं पवित्र असं प्रेमच कारण असतं, आणखी दुसरं काय!" वीरविकट, म्हणजेच तो तान्त्रिक मोठ्या नम्रतेने जादुगारणीला म्हणाला.

"याचं कारण माझं प्रेम नव्हे रे मूर्खा! खरं तर प्रेम म्हणजे काय हेच तर माहीत नाही मला! अन् शिवाय तू ते 'पवित्र' म्हणत आहेस. 'पवित्र' म्हणजे कसल्या पाल्याचं नाव असतं? मला धन-दौलत वगैरेही विशेष प्रिय नाही, अधिकार-लालसाही नाही माझ्या मनात. तूच तर राजा बनण्यासाठी उतावळा झाला आहेस. राजा बनायचं रहस्य मला ठाऊक होतं, म्हणून मी तुला मदत करीत आहे, इतकंच! तुला मी केवळ साधा राजाच नव्हे, तर साऱ्या विश्वाचा सम्राटच बनवणार आहे." जादुगारीण म्हणाली.

"तुझी ही मदत मी आयुष्यभर विसरणार नाही." वीरविकट जास्तच नम्र होत बोलला.

"तुसल्या रिकाम्या आश्वासनांचा काय उपयोग? मी तुला जी मदत करत आहे, त्याचं योग्य असं मोल मला मिळायला हवं." म्हातारीने आशय प्रकट केला.

"नक्कीच देईन. पण माते, सांग तर खरं, की तुला काय हवंय?" तान्त्रिकाने विचारले.

"माझी केवळ एकच इच्छा आहे. माझं गेलेलं तारुण्य मला परत हवं. त्यासाठी त्या अद्भुत मण्याबरोबर युवराज्ञीलाही तू इथं आणलं पाहिजेस. त्या युवराणीचं यौवन मी आकर्षून घेणार आहे तिच्या शरीरातून!" खदखदून हसत जादुगारीण म्हणाली.

हे ऐकून अपूर्वचाही थरकाप झाला! वीरविकट विचारात पडला.

यापूर्वीही काही तरुणींचा बळी देऊन त्यांचं तारुण्य आकर्षून घ्यायचा प्रयत्न केला होतास ना तू? अन् तरीही तू होतीस तशीच राहिलीस. काहीही बदल झाला नाही तुझ्यात!" वीरविकटने शंका प्रदर्शित केली.

"अपशकुनाच्या गोष्टी नको करूस, शुभ बोल. आतापर्यंतचे माझे प्रयत्न विफल झाले, म्हणून काय प्रयत्न करणंच सोडून देऊ मी मूर्खा! माझी खात्री आहे की यावेळचा माझा प्रयत्न नक्कीच सफल होईल. कारण या कार्यासाठी आवश्यक अशी सर्व शुभलक्षणं रुद्रपुरीच्या युवराज्ञीत आहेत. मी त्या राजकुमारीचं सारं तारुण्य आकर्षून घेईन. वा, वा! पुन्हा मी तरुण झाले तर...वा, वा! मी तेव्हां किती सुंदर दिसेन याची काही कल्पना करू शकतोस?" हसत हसत म्हातारीने तान्त्रिकाला विचारले.

"तू तर आत्ता सुद्धा सुन्दरच आहेस की!" वीरविकट चापलुसी करत बोलला.

"बन्द कर आपलं तोंड मूर्खा! तुझं कपट, तुझं तोंडदेखलं बोलणं, हे सर्व माझ्यासमोर नाही चालणार हं! आपला मतलब साध्य करण्यासाठी, माझी खोटी प्रशंसा करायची काही जरुरी नाही बरं! ऐकतोयस ना, मी जसं सांगितलं तसंच कर. नाहीतर आत्ताच्या आत्ता चालता हो माझ्या दृष्टीपुढून!" किंचाळत्या आवाजात म्हातारी ओरडली. (क्रमशः)



# राजाचा स्वयंपाकी

सिंहकेतु राजाच्या स्वयंपाक्याचं नाव होतं सिबू. तो फक्त राजाचाच स्वयंपाक करत असे; म्हणून सर्वजण त्याला 'राजाचा स्वयंपाकी' असं म्हणत.

एकदा राणीचा धाकटा भाऊ तिला भेटायला म्हणून आला होता. तेव्हां राणीने राजाच्या जेवणाबरोबर आपल्या भावासाठीही जेवण बनवायला सिबूला सांगितले. पण सिबूने 'आपण फक्त राजासाठीच स्वयंपाक करतो' असे सांगून राणीला नकार कळवला. रागावून राणीने शिपायांना आज्ञा दिली की "सिबूला बांधून नेवून राजाकडे तक्रार गुदरावी."

सिबू समोर आल्यावर राणीचा आज्ञाभंग करण्याचं कारण राजाने त्याला विचारलं. सिबू उत्तरला–"महाराज, मी केवळ आपलाच स्वयंपाकी आहे, हे तर सर्वांनाच माहीत आहे!"

राजाने मोठ्या गर्वाने आपल्या मिशा पिळत सिबूला एक मोत्यांचा हार बक्षिस दिला आणि त्याचा अभिमान दरबारात प्रकट करण्यासाठी म्हटले–"मी तुला शंभर मोहोरा बक्षिस देईन; राणीच्या भावासाठीही तू भोजन बनव."

यावर मान हलवत सिबू म्हणाला–"होय महाराज! बनवीन."

त्याचं हे उत्तर ऐकून चकित होत राजाने विचारलं–"अरे, आत्ताच तर तू म्हणालास न, की मी फक्त राजासाठीच स्वयंपाक करतो? मग आता शंभर मोहोरांसाठी दुसऱ्या कुणाचा स्वयंपाक करायला कसा तयार झालास? काय भानगड आहे ही?"

सिबू उत्तरला–"यात माझी काय चूक महाराज? 'राजाचा स्वयंपाकी' या नात्याने मी राणीसाहेबांच्या कामाला नकार दिला. पण आता आपल्या आज्ञेचं पालन करायचं म्हणून मी त्या कामाला तयार झालो. 'मालकाची आज्ञा एका स्वयंपाक्याने मोडली' ही गोष्ट आपला अपमान झाल्यासारखी होईल ना? म्हणूनच मी आत्ता मान्यता दर्शवली."

या उत्तराने आणखीनच खूष होऊन राजाने शंभरच्या ऐवजी, दोनशे मोहोर सिबूला देववल्या.





# नियमभंग

दृढनिश्चयी विक्रम पुन्हा त्या झाडाकडे गेला. झाडावरून प्रेत उतरवून त्याने ते आपल्या खांद्यावर आडवे टाकले आणि नेहमीप्रमाणे मौनव्रत घेऊन तो स्मशानाची वाट चालू लागला. तेव्हां प्रेतातला वेताळ बोलू लागला–"राजा, तुझं साहस, हट्टीपणा आणि सहनशक्ती पाहून मला असं वाटतंय की, आपला उद्देश सिद्ध होईपर्यंत, वेळ आल्यास, तू आयुष्यभर या स्मशानातच राहशील. मी तुला एक खास गोष्ट सांगू इच्छितो. जी माणसं कठोर व्रताचं पालन करतात ती अत्यन्त दृढनिश्चयी असतात. पण कधीकधी अशी माणसंही काही विशिष्ट परिस्थितीत स्वतःच स्वतःचे नियम मोडतात. बाकीच्या लोकांना खरी परिस्थिती न कळून ते अशा घटनांना दानशीलता, त्यागबुद्धि वगैरेंचे मुखवटे चढवतात. उदाहरण म्हणून एक धनवान माणूस अन्

## वेताळाच्या गोष्टी



त्याचा राजा असलेला मित्र यांची गोष्ट मी तुला सांगतो. नीट लक्ष देऊन ती ऐक. तुझा श्रमपरिहारही होईल काहीसा." आणि वेताळ गोष्ट सांगू लागला.

स्वर्णदीप राज्यात श्रीचन्द्र नावाचा एक धनिक रहात असे. लाखो-करोडोंचा व्यवसाय होता त्याचा. पण आपल्या उदार स्वभावामुळेच तो जास्त प्रसिद्ध होता. राजा जयसेनचा तो बालपणचा मित्रही होता.

श्रीचन्द्र एक नाणावलेला चित्रकारही होता. इतर कलांबद्दलही त्याला खूप आदर वाटे. प्राचीन काळची सुंदर शिल्पं अन् विशेष अशा पुराणवस्तुंवर तो खूप खर्च करी. अशा खुपशा वस्तूंचा श्रीचन्द्रने संग्रह जमवला होता आपल्याजवळ. या छन्दात त्याला खूप आनंद मिळे.

पण आपल्या या वस्तूंबद्दलचं श्रीचन्द्रचं अखंड प्रेम राजाला आवडत नसे. कारण एकाद्या वेळी त्यापैकी एकादी वस्तु खूप आकर्षक वाटली, अन् ती खरीदायची इच्छा जरी राजाने त्याच्याकडे व्यक्त केली, तरी तो ती वस्तु राजा जयसेनला द्यायला तयार नसे.

एक दिवस शिवदत्त नावाचा एक तरूण श्रीचन्द्रकडे आला. अंगावरचे फाटके कपडे, वाढलेली दाढी इत्यादि चिन्हं त्याचं दारिद्रय सूचित करत असली तरीही त्याच्या चेहऱ्यावर मात्र तो राजकुलातला असावा असं तेज होतं. ते पाहूनच श्रीचन्द्रने त्याला आदराने आपल्या जवळ बसवून घेतलं.

"महाशय, माझा अवतार पाहूनच कितीतरी जण माझ्याशी बोलायलाही तयार नव्हते. पण आपण माझ्याकडे पाहिले, माझ्या परिस्थितीकडे नाही! मी आपला फार आभारी आहे. माझं नाव शिवदत्त. एका मोठ्या जमीनदार परिवारातला असूनही आज मी भुकेकंगाल आहे. आपण पुराणवस्तुंचा संग्रह करता, हे जाणून मी एक तैलचित्र आपणाला दाखवायला घेऊन आलो आहे. आपण ते विकत घ्यावं अशी



माझी इच्छा आहे." इतके बोलून शिवदत्तने एक तसवीर त्याच्यापुढे धरली.

श्रीचन्द्र शिवदत्तला म्हणाला–"माझा अंदाज बरोबर असेल तर हे चित्र केवळ काल्पनिक नव्हे, हे सजीव व्यक्तींचं चित्रण असावं?"

"होय! आपला अंदाज अगदी बरोबर आहे. या चित्रातली मातृमूर्ति म्हणजे प्रत्यक्ष माझी आईच, अन् ते बाळ म्हणजे मी स्वत:! त्या काळात, चित्रकाराच्या कलेवर खूश होऊन माझ्या बाबांनी त्याला शंभर एकर जमीन बक्षीस दिल्याचं ऐकिवात आहे माझ्या! पण आता बदलत्या परिस्थितीचा गुलाम बनून चित्र विकायची वेळ आलीय माझ्यावर." उदास आवाजात शिवदत्त म्हणाला.

काळजी नको करू मित्रा, मी मोठ्या प्रेमाने जतन करून ठेवीन. याची किंमत करूच शकत नाही मी! तुला मी आपल्या खजिन्यात घेऊन जातो. या चित्राच्या बदल्यात तुला हवी तितकी रक्कम उचल तू" असे म्हणून श्रीचन्द्रने शिवदत्तला आपल्या खजिन्याजवळ नेऊन सोडले.

शिवदत्तने नि:संकोचपणे खजिन्यातून केवळ शंभर नाणीच उचलली आणि म्हटले–"मला एवढी रक्कम पुरेशी आहे. हेच भांडवल मानून मी काही व्यापार करीन. बाकी देवाची कृपा!"



आश्चर्यचकित होत श्रीचन्द्र म्हणाला–"असल्या अपूर्व चित्राची विक्री इतक्या कमी किमतीत करतोस? अरे, कमीत कमी एक लाख नाणी तरी उचल ना!"

"नाहीं, यापेक्षा जास्तीची मला जरूर नाही. हीच रक्कम मला लाखमोलाची आहे." असे म्हणून शिवदत्त तेथून निघून गेला.

श्रीचन्द्रने ते तैलचित्र राजा जयसेनला दाखवले. ते पाहून राजा चित्रावर फिदा झाला! तो मित्राला म्हणाला–"हे चित्र मला फार आवडलं! आपल्या अन्त:पुरात ते टांगून ठेवावंसं वाटतंय मला. पाहिजे ती रक्कम माग यावदली. विकायची नसेल



ही तसबीर निदान थोड्या दिवसांसाठी तरी मला आपल्या कक्षात ठेवायला दे ना! चित्र पाहून मनाला खूप शान्त वाटतंय!"

पण हसतच ती मागणी नाकारत श्रीचन्द्र म्हणाला–"राजा, तुला चांगलं माहीत आहे की ज्या वस्तूंचा मी संग्रह करतो, त्यापैकी कोणतीही माझ्या घराबाहेर गेलेली मला आवडत नाही. माझा नियम आहे तो. माफ कर मला!"

या घटनेनंतर काही वर्षे निघून गेली. एक दिवस राजा जयसेन अन् मित्र श्रीचन्द्र असेच गप्पा मारत आरामात बसले होते. इतक्यात शिवदत्त तेथे आला. आता त्याची परिस्थिती खूपच सुधारलेली दिसत होती. चांगला धनवान दिसत होता तो! मोठ्या प्रेमाने श्रीचन्द्रने त्याला बसवून घेतले. राजाशी त्याचा परिचय करून देऊन श्रीचन्द्रने त्याला विचारले–"हूं बोल. कसा आहेस तू शिवदत्त आता?"

"महाशय, आपणाकडून मी जी शंभर नाणी घेतली त्यातून व्यापार करून खूप लाभ झाला मला! मी आता लखपती बनलो आहे. आपणाबद्दल कृतज्ञ आहे मी फार. आताही मदतीसाठी आपणाकडे आलो आहे मी." तो म्हणाला.

"मदत? बोल, कसली मदत हवी तुला? कोणतीही मदत करीन मी तुला. व्यापार वाढवायचा आहे?" श्रीचन्द्रने विचारलं.

"आपणाकडे धनाच्या मदतीसाठी नाही आलो. मनाची शान्ति मागण्यासाठी मोठ्या आशेनं आलो आहे. मी आपल्या आईचं ते चित्र विकल्यापासून माझ्या मनाला शान्ति नाही राहिली. माझी अशी विनंती आहे की ते तैलचित्र आपण मला द्यावं. आपण मागाल ते मूल्य द्यायची तयारी आहे माझी! मला फक्त आता मनःशान्ति हवी." शिवदत्त याचनापूर्ण आवाजात बोलला.

हे ऐकून श्रीचन्द्र विचारात पडला. एकदा खरीदलेली वस्तु विकणं, हे तर त्याच्या नियमाविरुद्ध होणार होतं. खुद्द



राजाची मागणीही त्यानं नाकारली होती. ते चित्र शिवदत्तला दिलं तर राजाचा राग नक्कीच ओढवणार!

राजाही आता उत्सुकतेनं श्रीचन्द्रकडे पाहू लागला. 'आपली मागणी नाकारणारा श्रीचन्द्र आता शिवदत्तची मागणीही नाकारणार की भावनेच्या आहारी जाऊन त्याला चित्र परत करणार?'

परिस्थितीचा नाजुकपणा लक्षात घेऊन श्रीचन्द्र शिवदत्तला म्हणाला–"मी एकादी वस्तु घेतली की ती कधी पुन्हा विकून टाकत नाही. नियम आहे तसा माझा."

हे उत्तर ऐकून शिवदत्त बिचारा निराश झाला. पण पुन्हा विनन्ती करीत तो म्हणाला–"महाशय, तसा तर प्रत्येक नियमाला अपवाद असतोच की! तेव्हां या एकाच वेळी आपला नियम मोडा नं! मला आपल्या मातृमूर्तीच्या दर्शनाचं भाग्य मिळवून द्या."

त्याचं हे बोलणं श्रीचन्द्रच्या मनावर आघात करू लागलं. थोडा विचार करून तो म्हणाला–"ठीक आहे शिवदत्त, तुझं आपल्या आईच्या चित्रावरच प्रेम पाहून तुला एक संधी देईन मी. मलाही चित्रकारीत खूप रुचि आहे. मीही चित्र काढू शकतो. मी तुझ्या आईचं ते तैलचित्र पाहून हुबेहूब तसंच तैलचित्र रंगवीन. कोणतं मूळ



चित्र आहे हे तू ओळखायचंस नंतर. तू खरं चित्र ओळखून काढलंस, तर मी ते चित्र तुला देऊन टाकीन. या परीक्षेत निर्णय द्यायचं काम महाराजच करतील."

शिवदत्तने ती अट मान्य केली. एका पंधरवड्यानंतर परत यायला सांगून श्रीचन्द्र त्या चित्राची हुबेहूब नक्कल करायच्या उद्योगाला लागला. पंधरवडाभर अविश्रान्त काम करून श्रीचन्द्रने चित्र पूर्ण केले.

अवधि संपल्यावर शिवदत्त ठरल्याप्रमाणे हजर झाला. राजाच्या समोरच श्रीचन्द्रने दोन्ही तसबिरी ठेवून शिवदत्तला मूळ चित्र ओळखून काढायला सांगितले.



थोडा वेळ बारकाईने निरीक्षण करून शिवदत्तने आपलं चित्र सहजपणे ओळखून काढलं. पण याचा अर्थ असा नव्हे, की दोन्ही चित्रं हुबेहूब एकमेकांसारखी नव्हती. इतर कोणी त्यात काही फरक करूच शकला नसता. पण ही कमाल केवळ शिवदत्तच करू शकला.

श्रीचन्द्र आनन्दाने म्हणाला–"तू जिंकलास शिवदत्त! आपली तसबीर घेऊन जा तू!"

राजा जयसेन दोन्ही चित्रं निरखत म्हणाला–"दोन्ही चित्रं तर अगदी एकसारखी आहेत. तू खरं चित्र कसं ओळखलंस शिवदत्त?"

शिवदत्त उत्तरला–"महाराज, श्रीचन्द्र कलाकार आहेत. त्यांनी बनवलेलं चित्र शंभर टक्के खरं वाटत होतं. माझ्या आईच्या कानाखालचा छोटासा तीळही लक्षात घेऊन रंगवला त्यांनी. पण खऱ्या चित्रात माझ्या आईच्या गळ्यातल्या पदकात निळा खडा होता. मी ते कधीच विसरू शकलो नाही. कारण मी रोज सकाळ-संध्याकाळ आईच्या तसबिरीचं दर्शन घेत असे. पण नकली चित्रात यांनी चुकून तो खडा लाल रंगवला. मला स्वत:लाच आश्चर्य वाटतंय की इतक्या कुशल चित्रकाराने अशी चूक कशी काय केली असेल?" इतके बोलून शिवदत्त तेथून निघून गेला.

यानन्तर आपल्या गळ्यातला अमूल्य असा रत्नहार श्रीचन्द्रच्या गळ्यात घालत राजा जयसेन म्हणाला–"मित्रा, आजपर्यंत तुझ्यात दानगुण असूनही त्यागगुण नाही, म्हणून मला वाईट वाटे. पण आता ती अतृप्तीही राहिली नाही. तुझ्याबाबत चित्रात चूक कशी झाली हे समजलं मला!"

गोष्ट इथेच थांबवून वेताळ म्हणाला–"राजा, जे घडलं त्यावरून इतकं तर कळलं की, चित्र शिवदत्तला परत करायचं श्रीचन्द्रच्या मनात नव्हतं. एकदा घेतलेली वस्तु परत न देणं हा त्याचा कठोर नियम होता न? नियमभंग करायचा नव्हता म्हणून शिवदत्तवर दया दाखवायचं ढोंग करून त्याने शिवदत्तची परीक्षा घेण्याची कल्पना काढली. स्वत: एक श्रेष्ठ कलाकार असल्यामुळे आपण अगदी हुबेहूब चित्र काढून शिवदत्तला हरवू असा त्याचा बेत होता. चित्राची नक्कल करताना खड्याच्या रंगाची त्यानं जी चूक केली, त्यामुळेच शिवदत्त खरं चित्र ओळखून काढू शकला. जे घडलं ते खरं असंच होतं. पण राजाने–आपल्याला खरी गोष्ट कळली–म्हटलं, आणि श्रीचन्द्रला 'त्यागी' म्हणून त्याची प्रशंसा केली. हे सर्व निरर्थक आणि ढोंगीपणाचं नाही वाटत? माझ्या या प्रश्नांची उत्तरं माहीत असूनही न दिलीस, तर हे राजा, तुझं मस्तक फुटून जाईल."

विक्रम उत्तरला–"श्रीचन्द्रने शिवदत्ताच्या मातेचं चित्र काढताना मुद्दामच खड्याच्या रंगात चूक केली की नाही, हे ठरवण्यापूर्वी आपण हे न विसरलं पाहिजे की, राजा आणि श्रीचन्द्र यांची गाढ मैत्री आहे. राजाने थोड्या दिवसांसाठीच चित्र मागितले असूनही श्रीचन्द्रने नकार दिला होता. 'नियमभंग करणं आपल्याला आवडत नाही' असं तो म्हणाला होता. अशा नाजूक स्थितीत शिवदत्तने येऊन चित्र परत मागितलं. ते तावडतोब देऊन टाकलं तर राजा नक्कीच श्रीचन्द्रवर रागावला असता. शिवदत्तच्या मागणीमागील हृदयस्पर्शी प्रेमभावना जाणूनही राजाच्या भयाने श्रीचन्द्रने ते द्यायला प्रथम नकार दिला. तरीही आईच्या चित्राबाबतची पुत्राची भावना दुखवावी, असंही त्याला वाटत नव्हतं म्हणून जाणूनबुजूनच त्यानं खड्याचा रंग बदलला. शिवदत्त ते सहज ओळखेल असं त्याला वाटलं होतं, अन् ते खरंही झालं. कानाखालचा लहानसा तीळही बरोबर लक्षात घेणारा कुशल कलाकार श्रीचन्द्र अशी चूक करील असं मानणं चूकच होईल. ही गोष्ट जाणूनच राजाने त्याच्या त्यागीपणाची प्रशंसा केली."

अशा तऱ्हेने उत्तर दिल्यामुळे विक्रम राजाचा मौनभंग झाल्यामुळे वेताळ प्रेतासह अदृश्य होऊन पुन्हा झाडाकडे गेला.



# तीळ

चित्रसेन राजाचा 'अंगावरच्या तिळांच्या शास्त्रा' वर खूपच विश्वास होता. या शास्त्राबद्दल अगदी थोडीशी माहिती असणारे लोकही, राजाच्या कमकुवतपणाचा फायदा घेऊन, काहीतरी बडबडून, त्याच्याकडून चांगली रक्कम वसूल करून निघून जात. पण राजाचा मन्त्री सुवर्ण राजाची ही अंधश्रद्धा दूर व्हावी अशा योग्य संधीची वाट पहात होता.

एकदा 'आपण या तिळांच्या शास्त्रातले महान पंडित आहोत' असे म्हणत शेजारच्या राज्यातला शिवनाथ नावाचा शास्त्री राजा चित्रसेनकडे आला. राजाने त्याला आपल्या शरीरावरच्या तिळांची नीट परीक्षा करून, त्यांचे 'फल' सांगण्याची आज्ञा दिली.

शिवनाथ राजाच्या शरीरावरचे तीळ तपासायच्या कामाला लागला. एक एक तीळ पाहून तो त्या त्या तिळाचे फल सांगू लागला. शिवनाथने राजाच्या मनगटावरचा तीळ जेव्हां पाहिला, तेव्हा म्हणाला–"महाराज, हा तीळ तर फारच महत्त्वाचा आहे! हा जर आणखी थोडा मोठा–म्हणजे चिचोक्याच्या आकाराचा असता, तर त्याने आपल्याला एका विशाल साम्राज्याचा सम्राटच बनवले असते!"

यावेळी प्रधानमन्त्री सुवर्णही जवळच होता. त्याने ताबडतोब तेथे बाहेर उभ्या असलेल्या पहारेकऱ्याला बोलावून, त्याला आपले उजवे मनगट शिवनाथला दाखवायला सांगितले. पहारेकऱ्याने तसे करताच त्याच्या हातावरचा बरोबर चिचोक्याएवढा तीळ शिवनाथला दिसला. 'शिवनाथ इतका वेळ उगाचच इकडचे-तिकडचे काहीतरी बडबडत होता' हे समजून यायला राजाला मुळीच वेळ लागला नाही.

अन् शिवनाथबद्दल तर विचारायलाच नको! त्याचा चेहरा पांढरा पडून तो थरथर कापू लागला होता! त्या दिवसापासून राजाचा 'तीळ' शास्त्रावरला विश्वासही उडून गेला.



# चांदोबा पुरवणी–३९



भारतातील पक्षी व जनावरे :

## मोर

आपल्या देशातील पक्ष्यांमध्ये मोर हा सर्वात सुंदर पक्षी होय. पूर्ण वाढलेल्या मोराचे विशेष आकर्षण म्हणजे त्याची लांबलांब मोरपिसे! मोरपिसाची लांबी जवळजवळ १.२ मीटर इतकी असते. आपला पिसारा उभारून मोर जेव्हां नाचू लागतो, तेव्हां ते मयूर-नृत्य मोठे विलोभनीय दिसते. पिसाऱ्याचा चमकदार रंग पहाणाऱ्यांचे मन आकर्षून घेतो. त्याच्या डोक्यावर मुकुटासारखा शोभणारा तुराही फारच सुन्दर असतो. लांडोरीला मोरासारखा सुन्दर पिसारा नसतो. तिच्या अंगावर भुरक्या रंगाचे ठिपके असतात आणि मानेच्या खालील भागावर हिरव्या व निळ्या रेषा असतात. लांडोरीच्या डोक्यावरही तुरा असतो. लांडोर एका वेळी पाच-सहा अंडी घालते. साधारतः सर्व मोर धान्याचे दाणे, परागतंतु व कीटक खातात. कधीकधी ते सरडे व सापही पकडून खातात.

आपल्या पुराणात मोराला 'कार्तिकेयाचे वाहन' म्हणून स्थान प्राप्त झाले आहे. आपले सौन्दर्य व आकर्षकता यामुळे पहाणाराचे मन रिझवणारा मोर हा आपल्या देशाचा 'राष्ट्रीय पक्षी' आहे.

बातम्यांतील बालक :

# वर्गणी मिळवण्यासाठी स्केटिंग

बडोद्याच्या एका मुलीने मुंबई ते दिल्ली हे १,६०० कि. मी. चे अंतर 'रोलर-स्केटिंग' वरून पार करून जनतेचे लक्ष आपल्याकडे वेधून घेतले आहे. गिनीज बुकमध्ये आपले नाव यावे या उद्देशाने काही तिने हे अपूर्व साहस केलेले नाही. गुजरात राज्यातील नवसारी येथील 'कॉलेज ऑफ ऑफ्थाल्मालॉजी' साठी वर्गणी मिळवण्याकरता तिने हे अद्भुत स्केटिंगचे साहस केले. आणि विशेष म्हणजे, ती काही त्या कॉलेजची विद्यार्थिनीही नव्हे. वयाची आठच वर्षे पुरी झालेल्या या बालिकेचे नाव शीतल पांडेय असे असून ती बडोद्यातील एका शाळेत तिसऱ्या इयत्तेत शिकत आहे.

ही घटना मागील उन्हाळ्यात घडली. तिचे वडील जगदीश पांडेय आणि आणखी दोन व्यक्ति या प्रवासात तिच्या बरोबर होत्या. शीतल मे महिन्याच्या पहिल्या तारखेस मुंबईहून स्केटिंग करत निघाली. योच्या मदतीसाठी आणखी दोन माणसे कारमधून बरोबर निघाली. प्रसिद्ध फिल्मी अभिनेता आणि संसद-सदस्य सुनील दत्त यांच्या उपस्थितीत, त्यांचे शुभ आशिर्वाद घेऊन ही यात्रा सुरू झाली. महाराष्ट्र, गुजराथ, राजस्थान व हरियानातील एकूण ४३ शहरे फिरून २२ जूनला शीतल दिल्लीला पोचली. या पूर्ण वाटेत एकूण २ लाख रुपये जमा झाले. मुंबईतील एका प्रसिद्ध हॉटेलने ५०,००० रुपये वर्गणी दिली. एका बॅटरी निर्माण करणाऱ्या संस्थेने शीतलच्या या साहसी यात्रेची पूर्ण व्यवस्था केली व अशा तऱ्हेने त्या संस्थेने आपले योगदान दिले.



होय, अशा तऱ्हेने स्केटिंग करणे, हा शीतलचा पहिलाच अनुभव नव्हता ! वयाच्या सातव्या वर्षी तिने कलकत्ता ते कानपुर हे १००० कि. मी. चे अन्तर स्केटिंगने तोडले होते. त्यावेळी या बालिकेला मदर थेरेसाने निरोप दिला होता.

शीतलच्या या साहसी यात्रांचा प्रणेता तिचा पिता जगदीश पांडेय हाच होय. स्वतः क्रीडा-प्रेमी असणारा जगदीश पांडेय एका कॅमेरा निर्माण करणाऱ्या संस्थेत कर्मचारी आहे. आपल्या मुलीत असणारे क्रीडाप्रेम व सामर्थ्य ओळखून त्याने ती तीन वर्षांची असतानाच तिला प्रशिक्षण द्यायला सुरुवात केली. एक वर्षातच तिला 'मॅरेथॉन स्केटिंग' साठी नेले गेले होते. सध्या शीतल रोज ६० कि. मी. स्केटिंग करण्याचा सराव करीत असते.

आपली ताकत पाहून विदेशी लोकांनीही आपली 'वाहवा' करावी इतकीच शीतलची इच्छा आहे. चला, आपणही आशा करू या की शीतलला आंतरराष्ट्रीय कीर्ती प्राप्त होवो !

# तुम्हाला माहीत आहे ?

१. एलेफंटा लेणी कुठे आहेत ?
२. एव्हरेस्ट शिखरावर सर्वात प्रथम कोणी व केव्हां पाऊल ठेवले ?
३. पंधराव्या शतकातील एका महात्म्याला हिन्दु व मुसलमान दोन्हीही आपल्याच धर्मांचा मानतात. हा महात्मा कोण ?
४. इ. स. पू. पहिल्याच शतकात एक धर्मप्रचारक आपल्या देशात आला, अनेक लोकांना ख्रिश्चन बनवून शेवटी त्याने आपल्याच भूमीवर देह ठेवला. हा धर्मप्रसारक कोण ?
५. भारतातील पहिली महिला-डॉक्टर कोण ?
६. आपल्या देशातील सुप्रीम कोर्टाची पहिली महिला-न्यायमूर्ति कोण ?
७. आपल्या देशातील इंडियन एअरलाईनचे विमान सर्वात प्रथम कोणी चालवले ?
८. भारतीय वैमानिक-दलाची सुरुवात केव्हां झाली ?
९. भारतीय वैमानिक-दलाचा सर्वात पहिला नायक कोण ?
१०. आपल्या देशातील अति प्राचीन नौका-निर्माण-संस्था कोणती ? तिची स्थापना कोणी केली होती ?
११. आपल्या देशात 'चिल्ड्रेन्स फिल्म सोसायटी' केव्हां व का निर्माण झाली ?
१२. आपल्या देशातील अति समृद्ध असा पशु-संपत्तिचा प्रान्त कोणता ?
१३. वाघाला 'राष्ट्रीय जनावर' म्हणून मान्यता केव्हां मिळाली ?
१४. भारतात प्रथम डाक-तिकिट केव्हा निघाले ?
१५. शिखांचे अतिपवित्र यात्रा-स्थल कोणते ?

## उत्तरावली

१. मुंबई बंदराजवळील असणाऱ्या एलेफंटा बेटावर.
२. सन १९५३ मध्ये तेन्सिंग नोर्के व एडमंड हिलेरी यांनी.
३. कबीर.
४. येशूच्या बारा शिष्यांपैकी एक सेंट थॉमस हा ५२ साली त्या काळच्या केरळ प्रान्तात आला होता. सोळा वर्षांनंतर मद्रासजवळील एका टेकडीवरील चर्च मध्ये त्याचा खून झाला.
५. डॉ. आनन्दीबाई जोशी. सन १८८६ मध्ये एम. डी. पदवी अमेरिकेत मिळवून महाराष्ट्रात तिने वैद्यकव्यवसाय सुरू केला. पण २६ फेब्रु. १८८७ रोजी तिला मृत्यु आला.
६. केरळची जस्टिस फातिमाबीबी.
७. जे. आर. डी. टाटा यांनी.
८. सन १९३२ मध्ये ८ ऑक्टोबर रोजी. हाच दिवस 'वैमानिक दल दिवस' म्हणून साजरा केला जातो.
९. सुब्रतो मुखर्जी.
१०. विशाखापट्टणची 'हिन्दुस्तान शिपयार्ड' मुंबईच्या स्टीम नॅव्हिगेशन कंपनीने हिची स्थापना केली होती.
११. बाल-चित्रपटांच्या निर्मितीला प्रोत्साहन देण्यासाठी व आंतरराष्ट्रीय फिल्मोत्सवाची व्यवस्था करण्यासाठी १९५५ मध्ये ही सोसायटी स्थापन झाली. मागच्या नोव्हेंबरमध्ये तिरुअनंतपुरम येथे सातवा आंतरराष्ट्रीय बाल फिल्मोत्सव साजरा झाला.
१२. उत्तर प्रदेश.
१३. सन १९७२ मध्ये. तोपर्यंत हा मान सिंहाचा होता. वाघांची संख्या कमी झाल्याने हे परिवर्तन केले गेले.
१४. सन १८५२ मध्ये.
१५. अमृतसर येथील गुरुद्वार हरमिन्दर साहेब (सुवर्णमन्दिर)

## चांदोबाच्या बातम्या

### शिवभक्त माकड



दिल्लीत एका शिवमन्दिराजवळील एका झाडावर एक माकड रहात असे. ते रोज पहाटे चार वाजता झाडावरून उतरून येऊन मन्दिरात देवाच्या प्रतिमेसमोर भक्तीने हात जोडून उभे रहात असे, आणि काही वेळाने निघून जात असे. त्यावेळी देवदर्शनाला येणारे लोक ते विचित्र भक्त-माकड पाहून आश्चर्यचकित होत. अशी दहा वर्षे निघून गेली आणि मागील नोव्हेंबरच्या पहिल्या तारखेला या माकडाचे निधन झाले. त्याच्या पार्थिव शरीराला गंगोदकाने स्नान घालून, मिरवणूक काढून यमुनाकिनारी नेण्यात आले आणि त्याची मंत्रोच्चारांसहित अंत्येष्टी साजरी केली गेली.

### कावळे खाणारे



आपण माना वा न माना. पण गोष्ट खरीच आहे. जपानमधील किसाकटा नावाच्या तटवर्ती शहरातील लोकांचा प्रमुख व्यवसाय आहे शेतीवाडी. त्यांच्या पिकांचे कावळ्यांमुळे प्रचंड नुकसान होऊ लागले. दरवर्षी ७,५०० डॉलर्स इतके हे नुकसान असे. त्यामुळे शहरातील लोकांना कावळ्यांचा इतका राग आला, की त्यांनी कावळे मारून खाण्याची सवय लावून घेतली. मागील तीन वर्षांत, दरमहिना कमीत कमी दोनशे कावळ्यांच्या हिशो-बाने इथे कावळे मारले जात असत आणि मजेने खाल्लेही जात असत.



# भुताटकीचे घर

किसन नावाच्या तरुणाला शहरात नोकरी तर मिळाली, पण रहायला घर काही मिळेना. घरासाठी हिंडूनहिंडून तो अगदी रंजीस आला. अशातच त्याची अमीर नावाच्या माणसाशी गाठ पडली. तो किसनला म्हणाला–"या शहराच्या टोकाला माझं एक घर आहे. पण लोक त्याला भुताटकीचं घर समजतात, कोणी तिथे रहायला तयार नसतं. तुला वाटलं, तर तू रहा तिथे. माझी काहीच हरकत नाही. मला पैशांचीही गरज नाही; तेंव्हा तू अगदी फुकट रहा तिथं. भाडंबिडं काही नको मला."

किसन एकदम खूशच झाला! त्याच रात्री मुक्कामाला तो त्या घराकडे गेला. घराला कुलूप लावलेले होते. पण किसन जेंव्हा पायऱ्या चढू लागला, तेंव्हा कुलूप आपोआपच उघडले गेले! दरवाजे आपोआप उघडले गेले! हे पाहून किसन मनातल्या मनात जरा घाबरलाच, पण धैर्य एकवटून तो तसाच पुढे जात राहिला.

तो घरात पोचला, अन् मागे दरवाजा आपोआप बन्द झाला! किसनच्या समोर एक मोठासा प्रकाश फाकला अन् हळूहळू त्या प्रकाशाने एक अस्पष्टसा आकार धारण केला.

धुरासारखा दिसणारा तो आकार बोलू लागला–"मी या घरातलं मोठ्यात मोठं भूत आहे. माझ्याबरोबर इथं रहाणारी इतर तीन भुतं माझ्या आज्ञेत रहातात. तुला इथं रहायचं असेल तर आम्हाला फक्त खूश ठेवलंस की पुरे!"

किसनने त्या भुताला नमस्कार करून म्हटले–"मी तर इथेच, या घरात रहाणार आहे. तू म्हणशील, तसं करीन मी." तेंव्हा त्या मोठ्या भुताने इतर तीन

"वसुंधरा"



भुतांना बोलावून किसनशी त्यांचा परिचय करून दिला–"ही माझी बायको, अन् या दोघी माझ्या मुली. या दोघीत कोण अधिक सुन्दर आहे, हे ठरवता न आल्याने मी त्रासून गेलो आहे. तेव्हा ती अडचण तू सोडवायचीस. पण खरं उत्तर अशा रीतीने सांगायला हवंस की दोघींपैकी कुणालाही वाईट वाटू नये."

आपले दात विचकून हसत त्याच्याकडेच पहात असलेल्या त्या दोघींकडे किसनने एकदा पाहिले. आपली भीती आतल्या आत दाबत खोटेच गांभीर्य दाखवत किसन म्हणाला–"मी खरं सांगितलं तर एकीला कुणाला तरी नक्कीच राग येईल. पण मला थोडा वेळ दिलात तर मी तो रागही शान्त करून टाकीन. आहे तयारी तुमची?" किसनने त्या बाप-भुताला विचारले, आणि त्याने संमतीही दिली.

किसनने त्या दोघी तरुणी-भुतांकडे पहात, त्यापैकी एकीकडे बोट दाखवत म्हटले–"दोघीच्यात हीच फार सुंदर आहे. पण इतकी सुन्दर असून आपल्या आई-बापांकडेच कशी राहिली ही? एखाद्या जंगलात निघून गेली असती तर एखाद्या सुन्दर नौजवान भुताशी आत्तापर्यंत हिचं लग्न नसतं होऊन गेलं? चांगली चांगली भूतं आतासुद्धा हिच्याशी विवाह करायला आपसात चढाओढी लावतील, यात संशय नाही."

तेव्हा ती छोटी भूत-मुलगी बापाला म्हणाली–"हा मानव बरोबर बोलतोय. मी जंगलात निघून जाते. आशिर्वाद द्या मला." असे म्हणून आईबापांना नमस्कार करून ती तेथून निघून गेली.

पण दुसऱ्या तरुणी-भुताला, किसनने आपल्याला सुन्दर न म्हटल्याबद्दल राग आला. ती रुसून एका कोपऱ्यात जाऊन बसली. किसन तिच्याजवळ जाऊन म्हणाला–"अग, खरं म्हणजे तूच सुन्दर आहेस. पण मी तसं म्हटलं असतं म्हणजे तू घरातून निघून गेली असतीस. तू रोज



मला दिसावीस असं वाटतं, म्हणून खोटंच सांगून मी तुझ्या बहिणीला घराबाहेर काढलं."

किसनच्या या बोलण्याने ती तरुणी-भूत खुश झाली. तिने किसनला विचारले–"तू स्वतःच माझ्याशी लग्न करशील."

"पण मी एक मानव आहे; अन् तू आहेस भूत. आपलं लग्न कसं शक्य होईल?" भीतभीत किसनने विचारले.

"माझ्या मनात येईल तेव्हा मी मानव-रूप धारण करू शकते न! एका मानवाशीच लग्न करायची इच्छा आहे माझी." प्रेतबाला लाडात आली.

इतक्यात बाप-भूत तेथे आले अन् त्याने विचारले–"राग शान्त झाला की नाही?"

ती भूत-तरुणी बापाला म्हणाली–"बाबा! हा मानव माझ्याशी लग्न करायला तयार झाला आहे."

हे ऐकून ती आई-वडील भुते फार खुश झाली. आनन्दाने आरडत-ओरडत ती नाचू लागली.

यावर किसन एकदम रागाने म्हणाला–"हे गाणंबजावणं थांबवा अगोदर! नुसतं 'हो' म्हणून लग्न होत नसतं! मला हुंडा पाहिजे हुंडा!"

"काय हुंडा पाहिजे तुला?" बाप-भूत म्हणाले.



"मला दुसरं काहीही नको. फक्त हे घर द्या मला! इतकंच पुरे!" किसनने मागणी केली.

"ठीक आहे! घे." मोठे भूत कबूल झाले.

"हूं! मग ऐका तर! या घरात फक्त मी अन् माझी बायकोच राहू. तुम्ही दोघं निघून जा इथून." किसन बोलला.

"वा, वा! हा तर मोठाच अन्याय आहे! आम्ही दोघं राहिलो, तर तुझं काय बिघडणार आहे?" बाप-भुताने विचारले.

"तुम्ही इथे राहिलात, तर लोक समजतील की मी आपला घरजावई आहे,



आणि सासू-सासऱ्यांच्या जिवावर जगतोय! छी:, असली अपकीर्ति नको बुवा मला! मला आणखी एक विचारायचंय. हे घर सोडून अन्यत्र काय तुम्हाला जगता येणार नाही कुठे?" किसनने विचारले.

"हं! तुमचं म्हणणं बरोबर आहे जावईबुवा! मी अन् माझी बायको कुठेही राहू शकतो. मुलगी सुखात रहावी, इतकीच इच्छा आहे आमची." असे म्हणून आई-बाप भुते तेथून निघून गेली. निघण्या-पूर्वी त्यांनी मुलीला चांगला उपदेश केला, खूपशा सूचनाही दिल्या.

ते दोघे गेल्यानंतर किसन आपल्या भूत-पत्नी कडे पहात म्हणाला–"मी तुझ्या सर्व नातेवाईकांना घालवून दिलं, याबद्दल फार वाईट वाटतंय मला."

पण किसनच्या कृत्याचे समर्थन करीत ती भूतकन्या म्हणाली–"तू केलंस, ते सारं चांगलंच केलंस. आईवडिलांची इच्छा होती की माझं लग्न व्हावं. आम्ही जेव्हा मानव होतो, तेव्हा मी अन् माझ्या बहिणी साठी त्यांनी स्थळं निश्चित करून ठेवली होती. त्यावेळी अमीर नावाच्या माणसानं आमचं शेत आम्हाला फसवून हडपलं, अन् त्यामुळे आमची लग्न राहून गेली. आम्हाला कुठेच आसरा राहिला नाही. माझ्या बहिणीचा आपल्या रूपावर भारीच विश्वास होता. तिला वाटे की आपल्या सौन्दर्यावर भाळून ठरलेला मुलगा आपल्याशी विवाह करीलच. पण त्याच्याकडे जाऊन तीं अपमानित होऊन परत आली. नंतर तिनं आत्महत्या केली. त्या दु:खाने आम्ही बाकी सर्वजण इतके बेजार झालो की विष खाऊन आम्हीही आत्महत्या केली. आम्हाला त्या अमीरचा सूड घ्यायचा होता, म्हणून त्याच्या नव्याने बांधलेल्या घराचाच आम्ही ताबा घेऊन बसलो. आता माझी बहीण तर स्वत:च स्वत:चं लग्न जमवण्याच्या इरादाने धैर्याने बाहेर पडली आहे. माझाही विवाह तुझ्याशी झाला. मला आता दुसरी कसलीही इच्छा नाही."

"तुझी जर काही इच्छा उरली नाही, तर आता तुला भूत म्हणून रहायची काय आवश्यकता?" किसनने विचारले.

झालं! ती भूत-पत्नी एकदम अदृश्यच झाली! तिला बहुधा भूत योनीतून मुक्ति मिळाली असावी.

त्या रात्री किसन त्या घरात आनन्दाने झोपला; अन् सकाळ होताच अमीरकडे जाऊन सारी हकिकत त्याला सांगितली.

अमीरने किसनची त्याच्या साहसाबद्दल अन् अपूर्व अशा सफलतेबद्दल खूप तारीफ केली. तो किसनला म्हणाला–"तू मला सर्वच बाबतीत श्रेष्ठ वाटतोस. मी तुला आपला जावई बनवून घेऊ इच्छितो. माझ्या एकुलत्या एका कन्येशी तुझा विवाह करून देऊन मी ते घर तुला आंदण देईन. आम्हाला आमच्या मुलीला सोडून रहाणं कठीण वाटेल म्हणून आम्ही पति-पत्नीही तुझ्याबरोबर त्याच घरात राहू इच्छितो."

अमीरची मुलगी खूपच सुन्दर होती, त्यामुळे किसनने या विवाहास आपली मान्यता दिली. आणि म्हणाला–"आपल्या मुलीशी विवाह करायला माझी काही हरकत नाही. पण मी तुमचा घरजावई म्हणून रहाणार नाही. तसं असतं, तर मी त्या भुताच्या दुसऱ्या मुलीशी विवाह नसता का केला? तिचं रूप कदाचित चांगलं नसेल, पण मन तर धुतल्या तांदुळासारखं स्वच्छच होतं! हुंड्याबद्दल म्हणाल, तर मी त्या विरुद्ध आहे. मला चांगली नोकरी मिळालेली आहे, तेव्हा त्या पैशात मी आणि तुमची मुलगी आरामात निर्वाह करू."

यावर अमीर काय बोलणार? त्याने फक्त इतकेच म्हटले की–"पण एक गोष्ट तर तुला ऐकावीच लागेल. त्या घराला 'भुताटकीचं घर' असं नावं पडलं आहे, त्यामुळे तिथे रहायला इतर कोणी तयार होणार नाही. तेव्हां तुम्ही दोघं त्याच घरात रहा."

किसनने ही गोष्ट मान्य केली. किसन अन् अमीरच्या मुलीचा विवाह धूम-धडाक्याने साजरा झाला.





# वायफळ खर्च

गोष्ट खूप जुनी आहे. सौरतपुर नावाच्या छोटघाशा गावात रामसिह नावाचा एक व्यापारी रहात असे. पैसे खर्च करणं त्याच्या जिवावर येई. स्वतःच्या गरजां-साठीही तो पुरेसा खर्च करीत नसे.

काही कामासाठी तो एकदा शेजारच्या गावी जायला निघाला. वाटेत त्याला एक खजुराचे झाड दिसले. झाडावर चढून त्याने पोटभर खजूर खाल्ला, खिशातही भरून घेतला. आता झाडावरून उतरायचे म्हणून तो खाली पाहू लागला. पण खाली खोलवर जमीन पाहून त्याचे डोळेच फिरू लागले. चुकून हातपाय सरकला तर गच्छन्तीच! आता तो देवाची प्रार्थना करू लागला–"देवा! मी सही-सलामत खाली उतरलो, तर पाचशे लोकांना जेवण घालीन." थोडे उतरल्यावर त्याला वाटू लागले "पांचशे लोकांना अन्नदान करणं हा वायफळ खर्च होईल. त्यापेक्षा शंभर लोकांना जेवण घालून भागवावं झालं!"

शेवटी जेव्हां धड हातीपायी त्याचे पाय जमिनीला लागले तेव्हां तो विचार करू लागला–"शंभर नालायक माणसांना जेवण देण्यापेक्षा एकाच सद्‌ब्राह्मणाला पोटभर जेवू घालून जास्त पुण्य मिळेल." तेव्हां त्याने ठरवून टाकले की, बस्! एकाच ब्राह्मणाला जेवायला घालायचं!

कोणाला बोलवावे, याचा विचार करत तो घराची वाट चालू लागला. 'एकाद्या चांगल्या तगड्या, जाडजूड ब्राह्मणाला बोलावले तर अन्नखर्च जास्त होईल, तेव्हां आपल्या गावात 'पाप्याचं पितर' असा एकादा कोणता बरं ब्राह्मण सापडेल? हं, राममन्दिराचा पुजारी रामशास्त्री बरा काडी-पहिलवान आहे. त्यालाच बोलावू या."

२५ वर्षांपूर्वीच्या चांदोबातील गोष्ट

गावात पोचल्याबरोबर प्रथम रामशास्त्र्या-कडे जाऊन, त्याला दुसऱ्या दिवशीचे जेवणाचे आमंत्रण देऊनच रामसिह आपल्या घरी गेला.

या कंजूस प्राण्याने भोजनाचे आमन्त्रण दिलेले पाहून पुजारी रामशास्त्री आश्चर्य-चकित झाला! त्याने आमन्त्रण तावडतोब स्वीकारले.

रामसिहने घरी पोचल्याबरोबर आपल्या बायकोला म्हटले–"आजचं माझं काम झालं नाही. मला तसंच परत यावं लागलं. उद्या परत जायचं आहे मला. पण मी त्या राम-शास्त्र्याला उद्या जेवायचं आमन्त्रण दिलेलं आहे. हे काम कमीत कमी खर्चात कसं उरकायचं ते बघ तू." नंतर त्याने गावाला जाताजाता घडलेली सारी हकिकत तिला सांगून टाकली.

दुसऱ्या दिवशी सकाळीच रामसिह पुन्हा शेजारच्या गावाकडे निघून गेला.

ठरल्याप्रमाणे दुपारी रामशास्त्री जेवणा-साठी रामसिहच्या घरी आला, राम-सिहच्या बायकोने त्याला जेवायला वाढले. दिसायला रामशास्त्री बारीक असला, तरी तो पक्का भोजनभाऊ होता. तीन माण-सांचे अन्न तर त्याने सहज सफाचट करून टाकले! बाकीचे पक्वान्न पोटलीत बांधून घेऊन, विडा तोंडात घालताना त्याने



पाहिले की आपल्याला दक्षिणा म्हणून काहीच पैसे ठेवलेले नाहीत!

"माई, उदक सोडताना ब्राह्मणाला विड्याबरोबर दक्षिणाही द्यावी लागते, नाहीतर गृहस्थ धर्माला बट्टा लागतो! तेव्हां दोन रुपये तरी ठेव विड्याबरोबर माई!" रामशास्त्री रामसिहाच्या बाय-कोला म्हणाला.

नाइलाज होऊन विड्याबरोबर दोन रुपयेही देऊन तिने पुजाऱ्याला संतुष्ट करून पाठवून दिले.

दुसऱ्या दिवशी रामसिह घरी परतला. बायकोने उदक सोडून विड्याबरोबर दोन रुपये दिल्याचे त्याला सांगितले. ते ऐकताच रामसिहला डोक्यावर आकाशच कोसळल्या-

सारखे झाले! त्याने बायकोला खूप शिव्या मोजल्या अन् हातात सोटा घेऊन बाहेर पडत तो म्हणाला–"फसवून मला लुटलं काय त्या बेटचानं! थांब, आता त्याला चांगलाच धडा शिकवून येतो परत."

पुजारी रामशास्त्र्याला 'असं काही तरी घडेल' याचा अंदाज होताच, त्यामुळे त्याने आवश्यक ती तयारी करूनच ठेवली होती. रामसिंहाला येतासा दुरूनच पाहून तो खाटेवर पडून राहिला. त्याची बायको आणि मुलगा खाटेच्या दोन्ही बाजूंना बसून जोरजोरात रडू लागले!

रामसिंह तेथे पोचल्यावर रडतरडतच रामशास्त्रीचा मुलगा म्हणाला–"रामसिंहजी, आम्ही तुमचं काय घोडं मारलं होतं? तुम्ही जेवणांत त्यांना काय चारलंत? जेवून आल्यापासून त्यांना उलट्या होऊ लागून आता त्यांनी खाटच पकडली आहे! वैद्याला बोलावलं, तर तो म्हणाला की त्यांना अन्नातून विष खायला घातलं गेलंय! आता ते विष नाहीसं करायला औषधपाण्यावर दहा रुपये खर्च होणार आहे. तुम्ही माझ्या वडलांच्या खुनाचा प्रयत्न केलात याबद्दल न्याय व्हायला हवा. चला, आत्ताच आपण ग्रामाधिकाऱ्याकडे जाऊ या."

'गोष्ट ग्रामाधिकाऱ्याकडे गेली तर वैद्याचा खर्च तर द्यावा लागेलच अन् वर दंडही भरावा लागेल.' या विचाराने रामसिंह घाबरून गेला आणि हळूच त्या मुलाला म्हणाला–"बेटा, वैद्याकडून नीट औषधपाणी करून घे हं! खर्च मी देईन सगळा, काळजी नको करूस. मग आता ग्राम अधिकाऱ्याकडे कशाला जायला हवं?" असे बोलत तो पुजाऱ्याच्या मुलाची विनवणी करू लागला.

रामशास्त्रीच्या मुलाने असा आव आणला, की जणू काही आपण रामसिंहावर मोठी कृपाच करत आहोत, आणि त्याच्याकडून आणखी दहा रुपये वसूल करून आपला कायद्याचा बडगा मागे घेतला.

यानन्तर खजुराचे नाव निघाले तरी रामसिंहाच्या छातीत धडधडू लागे!





# वीर हनुमान

हनुमानाने विभीषणाबाबत दिलेले आपले मत रामाने ऐकले आणि नंतर तो म्हणाला–"विभीषण जरी दुष्ट असला, तरी आता तो शरणागत म्हणून आपल्याकडे आलेला आहे, म्हणून त्याची उपेक्षा करणं आपणास योग्य होणार नाही."

"विभीषण दुष्ट असो वा सुष्ट, त्याच्याशी आपल्याला काय करायचंय?" सुग्रीवाने आपले म्हणणे मांडले. विभीषण संकटात सांपडलेल्या आपल्या थोरल्या भावाला सोडून इकडे आला. तेव्हा हा केव्हा ही आपणास सोडून जाऊ शकेल, त्याच्यावर विश्वास ठेवणं योग्य होणार नाही असा त्याचा विचार होता. सुग्रीवाच्या या विचाराचे खंडण करीत राम लक्ष्मणाशी बोलू लागला. "आपल्या बांधवांचा विरोध करणं एक सामान्य गोष्ट आहे. आपल्या थोरल्या भावाच्या भीतीने विभीषण इकडे आलेला आहे, कदाचित् आपल्या मोठ्या भावाचं राज्य याला पाहिजे असेल."

पण लक्ष्मणाच्या विचाराची दिशा थोडी निराळी होती. तो म्हणाला–"माझी अशी शंका आहे की रावणाने याला आपल्याला मारून टाकण्यासाठी पाठवलेलं असावं." सुग्रीव म्हणाला की हा तर आपला शत्रु रावण याचा धाकटा भाऊ आहे. याच्यावर विश्वास कसा ठेवावा?

रामाला हे युक्तिवाद पटले नाहीत. तो म्हणाला–"शरणागताला आश्रय देणं,

२०. शुकाचे दूत-कार्य

त्याला अभयदान देणं हे तर क्षत्रियाचं परम कर्तव्य आहे. अशा शरणागताला आधार न देणं हे महापाप होय! म्हणून मला असं वाटतं की त्याला तावडतोब इथं घेऊन यावं."

रामाने असं म्हटल्यावर आता सुग्रीवाला काही विरोध करता येईना. तो लगेच विभीषणाकडे गेला आणि त्याला घेऊन रामाकडे आला. विभीषणाने आपल्या चार राक्षस-सहकाऱ्यांसह रामाला वंदन केलं नि नम्रपणे म्हणाला–"मी रावणाचा छोटा भाऊ विभीषण. माझ्या मोठ्या भावाने माझा अपमान केला, म्हणून मी तुम्हाला शरण आलो. आता माझं राज्य, माझं जीवन नि माझं सुख सगळं तुमच्या हातात आहे."

या सगळ्या गोष्टी आपल्या कानांनी ऐकून रामाला फार बरं वाटलं. तेव्हा रामाने बिभीषणाला राक्षसांच्या सामर्थ्याबाबत विचारले. विभीषणाने माहिती दिली.

"ब्रह्मदेवाकडून रावणाला असं वरदान मिळालं आहे की गंधर्व, नाग, राक्षस वा कोणत्याही भूतांशी होणाऱ्या लढाईत त्याचा कधी पराजय होणार नाही. त्या अजेय रावणाचा धाकटा भाऊ आणि माझा थोरला भाऊ आहे कुंभकर्ण. तो पराक्रमात इन्द्राहून कोणत्याही प्रकारे कमी नाही. रावणाचा मुलगा इन्द्रजित हा युद्ध करता करता अदृश्य होऊ शकतो आणि त्याचे शरीर व बोटे यांवर अभेद्य असं कवच असतं! या शक्तिमुळे तो युद्ध चालू असता



अग्नीची पूजा करतो. रावणाचे सेनापति पराक्रमात दिक्पालां सारखे आहेत. मनास येईल ते रूप धारण करणारे असंख्य राक्षस लंकेत आहेत. अशा राक्षसांच्या साह्याने रावणाने दिक्पालांना पराजित केले."

या सर्व गोष्टी ऐकून राम म्हणाला–"मी रावण व सर्व राक्षस-वीरांचा संहार करून तुला लंकेचा राजा बनवीन. ही माझी प्रतिज्ञा आहे असं समज. रावणाचा सपरिवार संहार करून मगच मी अयोध्येला परत जाईन. आपल्या भावांची शपथ घेऊन मी तुला हे सर्व सांगत आहे."

हे सर्व ऐकून कृतज्ञतेने भारावून विभीषणाने रामाला साष्टांग नमस्कार केला नि म्हणाला–"राक्षसांचा अंत करण्यासाठी नि लंकेवर विजय मिळविण्यासाठी मी पण आपणास यथाशक्ति मदत करीन. आता आपले शत्रु हे माझे शत्रु आहेत, आणि मी शत्रूंशी युद्ध करणार!"

संतोषाने विभीषणाला आलिंगन देत राम लक्ष्मणाला म्हणाला–"लक्ष्मणा! समुद्राचं पाणी आणून या विभीषणाला राक्षस-राजा म्हणून अभिषेक कर."

वानर-समुदायात राक्षस-राजा म्हणून विभीषणाला अभिषेक करण्यात आला. वानरांनी उत्साहाने उच्च स्वरात रामाचे कीर्तिगान केले.

यानंतर सुग्रीव नि हनुमानाने एकांतात विभीषणाला विचारले–"वानरां सह आम्ही सर्व जण हा समुद्र कसा पार करून जाऊ?"





तेव्हा विभीषणानें सांगितले—" रामानें समुद्राला शरण जावे. रामाचा एक पूर्वज सगर याने समुद्रावर खूप उपकार केलेले आहेत, म्हणून आता समुद्र रामाला निःसंशय सर्व प्रकारे साह्य करील!"

सुग्रीव तेथून राम-लक्ष्मणाकडे गेला आणि विभीषणाची सूचना त्यांना सांगितली. विभीषणाचा सल्ला रामाला आवडला आणि मग त्याने लक्ष्मण व सुग्रीव यांना आपले मत विचारले. त्यांनी पण विभीषणाचा सल्ला योग्य असल्याचा निर्वाळा दिला.

मग समुद्र-किनाऱ्यावर दर्भासन टाकून राम त्यावर बसला.

या दरम्यान रावणाचा एक हेर शार्दूल तेथे आला नि त्याने वानर-सेना नीट पाहून घेतली आणि मग त्याने रावणाकडे जाऊन निवेदन केले—

" वानर-सेना अफाट सागरासारखी आहे. राम लक्ष्मण यांच्याकडे उत्तम प्रतीची आयुधे आहेत. सीतेची मुक्ति करण्यासाठी ते निघण्याच्या तयारीत आहेत. ते समुद्र किनाऱ्यापर्यंत पोचलेले आहेत. मी सर्व काही खबर पाहून आलो, बारकाईने सर्व निरीक्षण करण्यासाठी दुसऱ्या कोणाला तरी पाठवावे."

रावणाने शुक नावाच्या राक्षसाला सुग्रीवाकडे पाठवलं आणि आपणाविषयी खालीलप्रमाणे निवेदन करायला सांगितलं—

" सुग्रीवा, रामाची पत्नी सीतेला मी लंकेत घेऊन आलो, म्हणून तुझं काय बिघडलं? खरं म्हणजे तुझा त्याच्याशी काही संबंध नाही. तू बुद्धिमान आहेस. जरा विचार कर नि किष्किंधा नगरीला निघून जा. देवता नि गंधर्व ज्या लंका नगरीत पोचू शकत नाहीत, त्या राज्यात तुझी वानर-सेना जाऊ शकेल हा नुसता भ्रम आहे!"

शुकाने रावणाचा निरोप नीट समजून घेतला, पक्षाचं रूप धारण केलं आणि वानर-सेना जिथे तळ ठोकून होती, त्या





उत्तर-किनारी पोचला. आकाशात दूर उंचावरूनच त्याने रावणाचा संदेश सुग्रीवाला सांगितला.

वरून संदेश सांगणाऱ्या शुकाला मारण्याच्या इराद्याने काही वानर आकाशात उडाले आणि त्यांनी शुकाला जमिनीवर पाडलं. बिचारा रामाला म्हणाला–"हे राम, अशा रीतीने दूताला मारणं योग्य आहे का? हे वानर मला ठार करायला निघाले आहेत. त्यांना थांबव."

तेव्हा राम दर्भासनावरून उठला आणि वानरांना थांबायला सांगितलं. आपले पंख फडफडवीत शुक आकाशात उडाला नि उडता उडता त्याने विचारले–" सुग्रीवा, रावणाकडे जाऊन काय सांगावं बरं?"

सुग्रीवाने रावणाला आपला निरोप कळवला–

"मी तुझा मित्र नाही, आणि तू माझ्यावर काही उपकार केलेले नाहीस. माझ्या मित्र रामाचा तू शत्रु आहेस. माझ्या शत्रु वालीचा तू मित्र आहेस. म्हणून दोन्ही प्रकारे तू माझा शत्रुच आहेस. जसा वाली मेला, तसाच तू ही मरशील! मी तुला, तुझ्या मुलांना, तुझ्या मित्र-बांधवांना आणि सहकाऱ्यांना ठार करीन. लवकरच मी आपल्या विशाल सेने सह लंकेवर आक्रमण करीन आणि लंकेचा सत्यानाश करीन. रामाच्या बाणांपासून इंद्र वगैरे देव ही तुझं रक्षण करू शकणार नाहीत. राम नि लक्ष्मण यांना भिऊन त्यांच्या अनुपस्थितीत तू सीतेला पळवून नेलीस. आता त्यांच्या हस्ते तू निश्चित मरणार!"

हा निरोप घेऊन शुकाला पुढे जाऊ न देता अंगद पुढे येऊन सुग्रीवाला म्हणाला–"हा दूत नाही, हा रावणाचा हेर असावा. हा आपल्या सेनेचं नीट निरीक्षण करीत आहे असं दिसतंय."

सुग्रीवाने ताबडतोब शुकाला पकडण्याची आज्ञा दिली. हा हा म्हणता वानरांनी शुकाला पकडून आणलं.



वानरांच्या हाती तडफडत असताना शुक ओरडून म्हणाला–"हे काय? माझे पंख कापले जात आहेत! माझे डोळे बाहेर काढले जात आहेत!" हे ऐकून राम पुढे आला नि त्याने शुकाला सोडवलं.

यानंतर रामाने सागराला नमस्कार केला नि हात डोक्याखाली घालून दर्भ-शय्येवर निजून राहिला. त्याचं तोंड सागराच्या दिशेला होतं. अशा रीतीने पडल्या पडल्या रामाने तीन रात्रि व तीन दिवस सागराचं ध्यान केलं. पण तरी ही रामाला सागराचं दर्शन घडलं नाही.

रामाला राग आला. त्याचे डोळे जळत्या निखाऱ्यासारखे लाल झाले. त्याने लक्ष्मणाला म्हटले–"हा सागर का येत नाही? त्याला इतका गर्व? मी आपल्या बाणांनी त्याचा प्राण घेईन. समुद्रात प्रचंड खळबळ माजून जाईल. माझे धनुष्य-बाण घेऊन ये."

लक्ष्मणाने धनुष्य-बाण आणून दिले. रामाने धनुष्यावर बाण चढविला आणि वज्रायुधासारखे बाण सागरावर सोडले. ते बाण सागरावर पडताच समुद्राच्या पोटात एकदम खळबळ माजली. लहरींच्या बरोबर धुराचे लोट निघू लागले.

राम आणखी बाण फेकू लागला, तेव्हा त्याला थांबवीत लक्ष्मण म्हणाला–"थांब, आतां अधिक बाण फेकू नकोस. अन्यथा तिन्ही लोक भस्म होऊन जातील." असे म्हणत त्याने रामाचे धनुष्य आपल्या हातांनी पकडले.



तरी पण सागर कोठे दिसेना. तेव्हा राम सागराला म्हणाला–"हे सागरा, मी आपल्या बाणांनी तुला शुष्क करून येथे रेगिस्तान करून टाकीन. दानवां बरोबर असलेल्या तुझ्या मैत्रीमुळे हे तुझे अज्ञान आहे."

असे म्हणून रामाने ब्रह्मास्त्र आपल्या धनुष्याला लावले आणि धनुष्याची प्रत्यंचा आपल्या कानापर्यंत ओढण्याची तयारी केली. त्यावेळीं आकाश नि पृथ्वी दुमदुमून

गेली. पर्वत थरथर कापू लागले. एकदा असं वाटलं की जणू सर्वत्र अंधकार पसरला आहे. आकाशात जोरदार वारे वाहू लागले. सर्व प्राणी आर्त ध्वनि करू लागले. समुद्र एक योजन मागे हटला. हे पाहून रामाने आपला बाण सोडणे स्थगित केले.

इतक्यात समुद्राच्या पाण्यात सागर दिसला. त्याचं शरीर वज्रासारखं प्रकाशमान होतं. त्याच्या गळ्यात दिव्य पुष्प माळा होत्या. त्याने स्वर्णभूषणे परिधान केली होती. त्याच्या बरोबर गंगा, सिंधु यांच्यासारख्या नदी-कन्या ही होत्या.

रामाजवळ येऊन हात जोडून सागर म्हणाला–"हे रामा, गंभीरता हा माझा सहज गुण आहे. मी माझ्या पाण्याला आवरू शकत नाही. सागर पार करून जाईपर्यंत सागरी प्राण्यांपासून तुला धोका पोचणार नाही एवढी व्यवस्था मी करीन."

रामाने सागराला विचारले–"असं असेल तर मी धनुष्यावर जो बाण चढविला आहे, तो कुणावर फेकू?"

"इकडे उत्तरेकडे एक प्रदेश आहे. तिथे आभीर नावाचे पापी लोक राहतात आणि नित्य पाप-कर्मे करीत असतात. तू आपला बाण त्यांच्यावर सोड नि त्यांचा अंत कर." सागर रामाला म्हणाला.

सागराने केलेल्या सूचनेनुसार रामाने केले. रामाचा बाण जिथे जाऊन पडला, तो सारा प्रदेश उध्वस्त झाला. ज्या ठिकाणी बाण पडला, तेथून पाताळगंगा वर निघाली. तिचे नाव पडले व्रणकूप.

नंतर सागर रामाला म्हणाला–"नील नावाचा वानर विश्वकर्म्याचा मुलगा आहे. तो समुद्राच्या पाण्यावर सेतु बांधण्याचे काम करील. आणि हा सेतु पाण्यात बुडणार नाही याची व्यवस्था मी करीन." एवढं सांगून सागर अदृश्य झाला.

नल रामाला म्हणाला–"विश्वकर्म्याचे वरदान मला प्राप्त झालेले असल्यामुळे मी सेतु बांधू शकतो. आता व्यर्थ वेळ न घालविता या क्षणापासून मी अन्य वानर सहकाऱ्यांसह सेतु बांधण्याचे काम सुरू करतो."





# तीन प्रश्न

चन्दन देशातील सुगंधगिरीजवळून वाहणाऱ्या शारदा नदीपासून तीन कोसांच्या अंतरावर गौरीपुर नावाचे एक छोटेसे गाव होते. त्या गावात रामशर्मा नावाचा एक विद्वान पंडित रहात असे. तो एक उत्तम कवीही होता. पण चांगला पंडित असूनही तो आपल्या चार बिघे जमिनीवर शेती करून आपला निर्वाह चालवत असे.

रामशर्माचा गौरीनाथशास्त्री नावाचा एक नातेवाईक राजाच्या दरबारात पंडित म्हणून होता. तोही एक चांगला कवि होता, परंतु दरबारी पंडिताच्या स्थानामुळे तो खूप गर्विष्ठही होता. एकदा रामशर्माच्या मुलीच्या बारशाच्या निमित्ताने गौरीनाथशास्त्री आपल्या परिवारासह गौरीपुरला आला. त्याला एक मुलगा होता. त्याच्या पत्नीची इच्छा होती की रामशास्त्रीची ही मुलगी पुरेशी मोठी झाली, की तिला आपली सून करून घ्यावी.

इकडे गौरीनाथशास्त्री रामशर्माची दैन्यावस्था पाहून त्याला म्हणू लागला–"तू राजधानीत ये आणि राजाला जाऊन सांग की, मी गौरीनाथशास्त्रीचा नातेवाईक आहे. तुला राजा नक्कीच दरबारात चांगलीशी नोकरी देईल."

आपल्या परिस्थितीचा असा अपमान केलेला रामशर्माला मुळीच आवडला नाही. तो चटकन् उत्तरला–"मला खेडवळाला दरबारी हुद्दा कशाला हवा? आपलं काव्य-अपत्य राजाला विकून उदरंभरण करण्यापेक्षा या कुग्रामात राहून शेतीवर गुजराण करणं कित्येक पट उत्तम अन् मानाचंही!"

त्याचे हे उत्तर गौरीनाथशास्त्र्याला आवडले नाही. या घटनेनंतर गौरीनाथशास्त्र्याने रामशर्माकडे जाणे येणे वा

सौ. एम्. डी. देसाई



त्याच्याशी कोणताही संबंध ठेवणे बंद करून टाकले.

पहाता पहाता पंधरा वर्षे निघून गेली. रामशर्माची मुलगी शारदा वयात आली. याच काळात गौरीपुरजवळच्या कल्याण दुर्गात रामशर्माच्या कोणा नातेवाईकाकडे एक लग्न होते. त्या लग्नासाठी गौरीनाथ-शास्त्रीची बायकोही आली होती. तिला पाहून रामशर्माने खुशाली विचारली. गौरीनाथ का आला नाही, वगैरेही विचारले.

"ते नाही आले व्याहीबुवा! मी आपल्या मुलाला बरोबर घेऊन आले आहे." पार्वती रामशर्माला म्हणाली. नंतर आपल्या वीस वर्षांच्या माधवला बोलावून तिने त्याची रामशर्माशी ओळख करून दिली.

मोठ्या नम्रतेने माधवने रामशर्माला नमस्कार केला. माधवची नम्रता आणि बुद्धिकुशलता पाहून रामशर्मा फार खूष झाला. रामशर्माबरोबर त्याची बायको व मुलगीही आलेली होती. रामशर्माची कन्या शारदा हिचे सौन्दर्य व सुशीलता पाहून पार्वतीही तिच्याकडे खूपच आकर्षित झाली.

ती रामशर्माला म्हणाली–"व्याहीबुवा, तुमच्या शारदेला पाहून माझ्या मनात वारंवार विचार येतोय की, ती माझी सून व्हावी."

पार्वतीच्या बोलण्याने रामशर्मा अन् त्याच्या पत्नीला खूप आनन्द वाटला. रामशर्मा म्हणाला–"जी गोष्ट मी बोलायला हवी, ती तुमच्या तोंडून बाहेर पडली. पण गौरीनाथशास्त्री काय हा प्रस्ताव मान्य करतील?"

यावर सुटकेचा निश्वास टाकत पार्वती म्हणाली–"तुम्ही ती काळजी सोडा हो! मला वाटतं की ते आता सर्व विसरूनही गेले असतील. तेव्हां व्याहीबुवा, आता चांगला मुहूर्त पाहून आमच्याकडे या आणि आपल्या व्याहीबुवांना म्हणा की – माझ्या मुलीला आपली सून करून घ्या."

काही दिवस गेल्यावर एका शुभदिनी रामशर्मा मुलीच्या लग्नाची बोलणी करण्यासाठी राजधानीकडे निघाला. मधल्या अवधीत पार्वतीनेही आपल्या नवऱ्याला सुचवून ठेवले होते की रामशर्मा मुलीला आपल्या घरी देऊ इच्छित आहे आणि त्याबद्दल बोलणी करण्यासाठी लवकरच तो इकडे येईल.

पण हे ऐकून गौरीनाथशास्त्री म्हणाला– "वा:! छान झालं! येऊच दे त्याला, मुलगी मला पसन्त तर पडायला हवी ना! मग पाहीन संमति द्यायची की नाही ते!"

आता मात्र पार्वती समजून चुकली की की पंधरा वर्षांपूर्वीची आपल्या नवऱ्याची ती अपमानाची जखम अजूनही भरून आलेली नसावी. प्रत्यक्ष रामशर्मा जेव्हां येऊन पोचला तेव्हां त्याची फारशी दखल न घेताच गौरीनाथशास्त्री म्हणाला–"किती शिकलीय मुलगी तुझी?"

गौरीनाथच्या आवाजातली अवहेलना उमजूनही रामशर्मा तिकडे दुर्लक्ष करत उत्तरला–"आपल्या मुलीच्या शिक्षणाचे गोडवे आपल्याच तोंडून गायला मला आवडत नाहीय!"

हे उत्तर ऐकूनही त्याची उपेक्षा करत करत गौरीनाथ म्हणाला–"हं, कावळ्याला आपलं पोर आवडणारच!"

गौरीनाथशास्त्र्याचे हे बोलणे ऐकून रामशर्मांच्या आशेवर बोळाच फिरल्यासारखा झाला! तरीही देवावर हवाला ठेवून रामशर्माने मुलगी पाहून मागणीचा रिवाज पूर्ण करण्यासाठी गौरीनाथला





त्याच्या परिवारा सह आपल्या गावी येण्याचे आमन्त्रण दिले.

त्या दिवशी नदीकिनारी गाडी पाठवण्याचा वायदा करून रामशर्मा आपल्या गावी निघून गेला. ठरल्या दिवशी गौरीनाथशास्त्री आणि त्यांच्या परिवाराला बसवून घेऊन येण्यासाठी रामशर्माने शारदा नदीच्या किनारी एक बैलगाडी पाठवून दिली. गाडीबरोबर स्वागतासाठी रामशर्माचा एक नातेवाईक, गाडीवान आणि घरकामाचा दहा वर्षांचा मुलगा अर्जुन हे ही गेले.

अर्जुन चांगला चलाख बुद्धीचा मुलगा होता. गौरीनाथ आणि कुटुंबीय नावेतून उतरून गाडीपर्यंत पोचेस्तोवर त्यांचे सामान घेऊन त्यांच्याशी बोलत त्यांच्या मागे मागे चालत चालत त्याने त्यांना आपल्याकडे चांगलेच आकर्षून घेतले.

अचानक शास्त्रीबुवांना एक मुंगी चावली, तेव्हां वेदनेने 'ससू' करीत त्यांनी मुंगी चिरडून टाकली, अन् अर्जुनकडे पहात त्याने विचारले–"हं, सांग बरं, तुझ्या छोट्या मालकिणीचं शिक्षण कुठपर्यंत झालंय ?"

यावर खळखळून हसत अर्जुन उत्तरला– "मी स्वतःच तर माझ्या छोट्या मालकिणीजवळ शिकत असतो. तेव्हां मालकीण शिकली-सवरलेली आहे की नाही, हा प्रश्नच कुठं रहातो ?"

"ओहो ! तर तू आपल्या मालकिणीचा शिष्य आहेस. मग तू कुठवर शिकला आहेस ?" गौरीनाथने विचारले.

"ते नाही मला सांगता येणार. पण आपल्याला काही प्रश्न विचारायचे म्हटले, तर सहज विचारू शकेन मी !" अर्जुन निष्पाप आवाजात बोलला.

"अरे वा ! तूच माझ्या पांडित्याची परीक्षा घेणारा निघालास होय ? बरं, विचार आपले प्रश्न. पण एक अट आहे." गौरीनाथ म्हणाला.

"काय अट आहे आपली ? बोलावं आपण !" अर्जुनने नम्रता दाखवत विचारले.

गौरीनाथशास्त्री अट सांगू लागला– "तू जिंकलास, तर मी समजेन की तुझी छोटी मालकीण जिंकली. पण तू हरलास तर तीच हरली असंही समजेन मी. चालेल ?"

त्याची ही अट ऐकून गाडीत बसलेली पार्वती अन् माधव घाबरून गेले, ती दोघं एकमेकांच्या चेहऱ्याकडे पाहू लागली. शास्त्रीबुवांना अडवावं म्हणून त्यांनी काही बोलायचा प्रयत्न केला, पण त्यांनी तिकडे दुर्लक्षच केले. अर्जुनला ते म्हणाले–"हं, विचार आपले प्रश्न."

"ठीक आहे. मी फक्त तीनच प्रश्न विचारणार आहे. आपण त्याची बरोबर उत्तरं देऊ शकला नाहीत तर आपणाला पराजय स्वीकारावा लागेल." अर्जुन म्हणाला. शास्त्रीजींनी होकारार्थी मान हलवली.

"हं, मग सांगा बरं मुंग्यांचा राक्षस कोण ?" अर्जुनने विचारले.

हा प्रश्न ऐकून शास्त्रीबुवा आश्चर्यात पडले. ते म्हणाले–"हे तर एकाद्या गोष्टीतलं पात्र असावं. असे प्रश्न नाही विचारायचे."

अर्जुन यावर बोलला–"अंहं, हे गोष्टीतलं पात्र नक्कीच नाही. आपण जरा विचार करावा. उत्तर सापडेल आपणाला. उत्तर न सापडलं तर तसं सांगावं म्हणजे मीच सांगतो."

शेवटी गौरीनाथशास्त्र्याला सांगावे लागले-"मला नाही सांगता येत. तूच सांग."





अर्जुनने उत्तर सांगितले–"मुंग्यांचा राक्षस दुसरा-तिसरा कोणी नव्हे, तो मनुष्यप्राणीच होय. करंगळीनंही दाबली एकाद्यानं, तर बिचारी तावडतोब मरून जाते. तेव्हां मुंगीला, माणूसच राक्षसा-सारखा आहे नं?"

शास्त्री मनात आनन्दित झाला अन् म्हणाला–"ठीक, आपला दुसरा प्रश्न विचार आता."

"माणसाला सर्वात कशाकशाची अधिक आवश्यकता असते?" अर्जुनने विचारले.

"ज्ञान आणि पांडित्य!" शास्त्रींनी उत्तर दिले.

हे ऐकून अर्जुन हसत म्हणाला–"नाही मालक. हुशारी आणि व्यवहारकौशल्य! मी केवळ याच गुणांच्या जोरावर आपणा-सारख्या महापंडिताला आपल्या पहिल्या अन् आताच्या या दुसऱ्या प्रश्नात जिंकले की नाही?"

शास्त्रींना 'हो' म्हणून कबूल करावेच लागले. अर्जुनच्या बोलण्याच्या पद्धतीवरून गौरीनाथचे स्वतःबद्दलच्या गौरवाचे आणि अहंभावाचे पापुद्रे हळूहळू गळून जाऊ लागले.

"हं, आता माझा तिसरा प्रश्न ऐकावा–सुनेला सासू-सासऱ्याच्या बाबतीत कोणता भाव मनात बाळगायला हवा?" अर्जुनने विचारले.

"भय, भक्ति आणि मान!" शास्त्री चाचरत उत्तरले.

"मुळीच नाही, अढळ प्रेम!" हसत हसत अर्जुन म्हणाला–"कारण, सासू-सासरे चांगले असतील, तर आदर आणि भक्ति सुनेच्या मनात आपोआपच उद्भवेल. पण अढळ प्रेम बाळगणारी सून नात्याच्या मोलाचा आदर ठेवून नेहमीच प्रेम व मान देत राहील."

आता गौरीनाथ पुढे काही बोलूच शकला नाही. त्यांच्या बायको व मुलाच्या मनावरचा भार उतरला, त्यांना हायसे वाटले. शास्त्रीबुवांनी विचारले–"म्हणजे हे प्रश्न विचारायला सांगूनच तुला तुझ्या छोट्या मालकिणीने इकडे पाठवले, होय ना?"

अर्जुन एकदम चमकलाच! तो लगेच म्हणाला–"नाही मालक, माझी छोटी मालकीण मला नेहमी कसा विचार करावा, कशी पारख करावी हे मात्र सांगत असते. ती म्हणते की आपण योग्य दिशेने विचार केला, तर सर्व काही आपल्याला आपोआप समजते. आपण येणार हे ऐकून मी खूश झालो, तेव्हा ती म्हणाली की–हा संबंध जुळून येणार नाही. म्हणून मीच स्वतः धैर्याने पुढे होऊन माझ्या प्रश्नांच्या द्वारे आपले विचार बेधडक आपणाला ऐकवले. यात छोट्या मालकिणीचा काडीइतकाही संबंध नाही."

गाडी घरी पोचली, तेव्हा रामशर्मा पुढे होऊन सर्वांना आदराने घरात घेऊन गेला. पित्याच्या बोलावण्यावरून शारदा पुढे आली. तिने आदराने शास्त्री दंपतीला नमस्कार केला आणि ती आत निघून गेली. भोजनानंतर आरामात बसल्यानंतर रामशर्माने गौरीनाथला विचारले–"बोलावू मुलीला इथे?"

"कशाला?" गौरीनाथने विचारले.

"हेच, मुलीच्या शिक्षणाची आपण परीक्षा घेऊ इच्छिता न?" रामशर्माने आश्चर्याने विचारले.

यावर हसत हसत गौरीनाथ म्हणाला–"तुमच्या मुलीच्या वतीने तिचा शिष्य अर्जुन यानं मला तीन प्रश्नातच हरवून टाकलं व्याहीबुवा! इतकंच नव्हे, तर त्याने मला योग्य दिशेने विचार करायलाही शिकवलं आहे! तेव्हा आता नीट विचार करूनच सांगतोय की, तुमच्या मुलीला आपली सून करून घ्यायला माझी पूर्ण संमती आहे. आता विवाह-मुहूर्त शोधणं, हे तुमचं काम."

गौरीनाथशास्त्रीचे हे बोलणे ऐकून सर्वांच्याच चेहऱ्यावर आनंद पसरला अन् सर्वांना सुखद आश्चर्यही वाटले.





# पांढरा हत्ती

**त्या** काळात ब्रह्मदेशातील एका लहानशा राज्यावर ह्लोलांग नावाच्या राजाचे शासन चालू होते. त्या राजधानीच्या नगरात क्वांगयू नावाचा एक माणूस रहात असे. तो कितीही घाणेरडा कपडा असला तरी अगदी स्वच्छ धुवून चमकदार करत असे. फारच कुशल धोबी होता तो.

मातीची भांडी बनवण्यात कुशल असा एक कुंभार एके दिवशी क्वांगयूकडे आला व म्हणू लागला—"राणी-साहेबांची तब्येत बरी नसल्यामुळे त्यांचं औषध बनवण्यासाठी एक विशेष प्रकारचं मातीचं भांडं बनवण्या-बद्दल राजाकडून आज्ञा आली आहे."

"वा! खूपच भाग्यशाली आहेस की तू! राजाचं दर्शन लुंग्यासुंग्यांना मिळतं थोडंच!" क्वांगयू त्याची स्तुति करत म्हणाला.

"ते खरं रे बाबा! पण राजाकडे जाताना चांगल्या स्वच्छ पोशाखात जायला हवं ना! माझे मळके उद्या सकाळपर्यंत चांगले स्वच्छ धुवून दे मला."

त्या दिवशी दुपारी क्वांगयूने कपडे गरम पाण्यात भिजवले, पण कच्च्या रंगाचे ते निळे कपडे रंग जाऊन फिक्के पडले.

दुसऱ्या दिवशी कुंभार आला आणि झालेला प्रकार पाहून चांगलाच भडकला! क्वांगयूला अद्वातद्वा बोलून त्याने वर धमकी दिली की "आता याबद्दल मी राजाकडे तक्रार गुदरणार आहे."

कुंभार राजाकडे पोचला तेव्हां खूश होऊन राजा एकदम म्हणाला—"अरे वा! कपडे स्वच्छ करणारा धोबी कोण आहे?"

कुंभार राजाला म्हणाला—"महाराज, आपल्या नगरात क्वांगयू नावाचा एक धोबी आहे. तो प्रत्येक वस्तु धुवून एकदम पांढरी-सफेद करू शकतो. फारच कुशल आहे तो आपल्या कामात. आपण पांढरा हत्ती मिळवण्याच्या खटपटीत आहात न? मग गजशाळेतला कुठलाही हत्ती त्याच्याकडे द्या पाठवून. तो धुवून पांढरा करून देईल!"

राजाने ताबडतोब क्वांगयूकडे शिपाई पाठवला. शिपायाचे बोलणे ऐकून क्वांगयूने ताडले की—'ही सारी करामत त्या कुंभारा-चीच! आपला सूड घेण्यासाठीच त्याने हा बनाव केला असला पाहिजे!' पण क्वांगयू-ही काही कमी नव्हता. त्याने ताबडतोब शिपायाला म्हटले—"अरे एकच काय? गजशाळेतले सगळे हत्ती ही मी धुवून सफेद करून देईन. पण कपडे धुण्यासाठी जसे उकळावे लागतात ना, तसे हत्तीही उकळून काढावे लागतील. त्यासाठी आवश्यक असे मोठे मातीचे हंडे लागतील मला. तो जो कुंभार आला होता न, तो मोठा कुशल आहे या कामात! हत्ती मावेल असा मोठा हंडा लगेच बनवून घ्यायचा, की लगेच हत्ती धुवून पांढरा करून देतो!"

आता राजानेही कुंभाराला ताबडतोब मोठा हंडा बनवायची आज्ञा दिली. "उद्या सकाळपर्यंत हंडा न बनला, तर तुला माझ्या राज्यातून हाकलून देईन." असा दमही भरला वर!



कुंभार समजून चुकला की—"क्वांगयूने आल्या संकटाला धैर्याने तोंड देऊन डाव आपल्यावरच उलटवला आहे!" नाइलाजाने तो घरी गेला. घरच्या सर्वांना हाताशी धरून त्याने रात्रभर माती वाहून आणून चिखल तुडवून एक हंडा बनवला. तो हंडा सकाळी राजाकडे पोचता झाला.

क्वांगयूने त्यात पाणी भरायला लावून त्याच्याखाली मोठा जाळ केला. माहुताला गजशाळेतून एक हत्ती आणायला लावून त्या हंड्यात चढवायला सांगितले. पण हत्तीच्या पाय लागताच हंडा तुटून गेला!

हे पाहून रागाने डोळे तांबरून राजा कुंभाराला म्हणाला—"हे तर तुझ्या पेशाला काळं फासणारं काम झालं! उद्या पुन्हा सूर्योदयाच्या दोन घटका अगोदरच नवा

ब्रह्मदेशातील लोककथा

हंडा आणून हजर कर! नाहीतर तुझं डोकंच उडवलं जाईल, समजलास?"

"जी हुजूर!" असे म्हणून कुंभार तेथून निघाला आणि रातोरात राज्याची हद्द ओलांडून तो बाहेर पडला.

ती खबर ऐकून रागाने तलवार म्याना-बाहेर काढत राजा क्वांगयूला म्हणाला–"कायरे! तूही असा द्रोह करायचा विचार नाही नं केलास?"

राजाला लवून लवून तीनतीनदा मुजरा करत क्वांगयू म्हणाला–"महाराज, आपण हत्ती माझ्या घरी पाठवा. उद्या या वेळी हत्ती पाहून आपणाला वाटेल की, हा आपलाच हत्ती, की इन्द्राचा ऐरावत?– इतका आपला हत्ती बदलून जाईल पहा!"

त्या रात्री हत्तीला एक शिडी लावून क्वांगयूने चुन्याचे पाच थर त्याच्या शरीरावर चढवले.

सकाळी हत्ती पाहून राजा खूश झाला! "वा:! सफेत हत्तीची माझी हौस पुरी झाली." असे म्हणून त्याने क्वांगयूला एक लाख अशर्फ्या आणि एक उमदा घोडा बक्षिस दिला.

ते घेऊन घरी आल्याबरोबर क्वांगयूने आपले बिऱ्हाड-बाजले आवरले अन् घोड्या-वरून जाऊन संध्याकाळच्या आत राज्याची सरहद्द ओलांडली! तो एका नदीच्या किनारी पोचला.

तेथे क्वांगयूला चिंध्या झालेल्या कपड्या-तला एक माणूस मासे पकडत असलेला दिसला. त्याला ओळखून क्वांगयू म्हणाला– "ओहो! तूच होय? मला धूळ चारायला गेलास अन् स्वत:ची ही अवस्था करून घेतलीस? छान! कुंभाराचा कोळी झालास न?" क्वांगयूला पाहून कुंभार घाबरला. त्याने विचारले–"पण तू इथे का आलास? तुझ्याजवळ हा घोडा कसा?"

क्वांगयूने कुंभाराला सर्व हकिकत सांगितली व म्हटले–"चल, ही नदी ओलांडून आपण दुसऱ्या राज्यात जाऊ या आणि आपापला धंदा करून गुण्या-गोविन्दाने राहू या."



## निसर्गातील आश्चर्य :



### छोटा पण चिवट प्राणी

ज्याला डास चावला नाही, असा कोणीही माणूस जगाच्या पाठीवर नसेल! जगातल्या कोणत्याही भागात पहा, डास हे तुम्हाला दिसतीलच! उत्तर कॅनडा व सैबेरियासारखे अतिथंड देशच नव्हेत, तर खुद्द उत्तर ध्रुव प्रान्तातही, हे डास जिवन्त राहून, आपली प्रजा वाढवत असलेले आढळतात. कायम ऊन्ह आणि कधी-कधी सारखा पाऊस पडत असणाऱ्या सघन जंगलांबद्दल तर विचारूच नये, तिथेही डास आहेत. याचाच अर्थ असा की 'डास हा दिसायला लहान, पण अत्यन्त चिवट प्राणी आहे.'

### कीटकांचे विश्व

जमिनीवरील प्राण्यांच्या प्रकारात जवळजवळ १०,००,००० प्रकारच्या प्राण्यांची नोन्द आहे. त्यात जवळजवळ ८,००,००० जाती तर कीटकांच्याच आहेत! या सर्वांची नावे एकदम लिहायची म्हटली तर सामान्य आका-राच्या पुस्तकाची ६,००० पाने लागतील; अन् ही सर्व नावे वाचायला सुरुवात करून शेवटपर्यंत वाचणे म्हटले, तर तेवढ्या अवधीत, हे किडे हजारपट वाढलेलेही असतील!





### कोंबडीच्या पिल्लांची गणती

असे म्हणतात, की जोपर्यंत अंडी उबवली जात नाहीत, तोपर्यंत पिल्लांची गणती करू नये! विशेषत: जाहिरातीत. ही गोष्ट सोडून देऊ. पण अंडी उबवली जाऊन पिल्लं बाहेरही आलीत. आता ती मोजायची म्हटली तर? तर आपल्याला असे आढळून येईल की, पृथ्वीवरील एकेका माण-साणीक एकेक पिल्लू येईल, इतकी ही संख्या होईल! आणखी एक गोष्ट, अंड्याचे टरफल फोडून बाहेर निघायला, प्रत्येक पिल्लाला दोन दिवस, म्हणजे ४८ तास लागतात!

श्री. बौट्रोस घाली संयुक्त राष्ट्रसंघाचे सहावे महासचिव होत. यांच्यापूर्वी नॉर्वेचे श्री. ट्रिग्वेली (१९४६-५३), स्वीडनचे श्री. डॅग हॅमर्स शुल्ड (१९५३-६१), ब्रह्मदेशाचे यू थांट (१९६१-७१), ऑस्ट्रियाचे डॉ. कुर्ट वालधीम (१९७२-८१) आणि पेरूचे श्री. फेरेज डी. क्येल्लर (१९८२-९१) संयुक्त राष्ट्रसंघाचे महासचिव होते.

शांतता प्रस्थापित करण्याची जबाबदारी संयुक्त राष्ट्रसंघाची आहे. म्हणून राष्ट्रसंघाने कंपूशियांतील गेल्या वीस वर्षे चाललेला संघर्ष संपुष्टात आणून तात्पुरत्या 'सुप्रीम नॅशनल कौन्सिल'ची स्थापना केली आणि अशा रीतीने खऱ्या लोकशाही सरकारची स्थापना करण्याचे प्रयत्न केले.

युगोस्लाविया व क्रोशिया यांनी फेडरेशन मधून आपल्या स्वातंत्र्याची घोषणा केली, त्यामुळे इथे युद्धाचे वातावरण निर्माण झाले. या प्रदेशात शांति प्रस्थापित करण्याचे प्रयत्न अमेरिका, रशिया व अन्य देशांनी केले. या दोन देशात संयुक्त राष्ट्रसंघाची शांति-सेना सुद्धा पोचली.

संयुक्त राष्ट्रसंघाच्या प्रमुख उद्देशात एक आहे–आपापसातील युद्धाचे वातावरण नष्ट करून जगातील सर्व देशात शांति व सुरक्षा यांची स्थापना करणे. आजच्या संयुक्त राष्ट्रसंघाच्यां महासचिवाने एक आणखी जबाबदारी पण पार पाडायची आहे. संयुक्त राष्ट्र-संघाच्या अंतर्गत व्यवहाराच्या ध्येय-धोरणात काही सुधारणा घडवून आणण्याची मागणी सतत होत राहिली आहे. जर्मनी व जपान यांना स्थायी सदस्य बनवून सुरक्षा-परिषद अधिक विस्तृत करण्याची आवश्यकता वाटत आहे. नुकतेच भारतातील अमेरिकेचे राजदूत पॅट्रिक मोनिहन म्हणाले की सुरक्षा परिषदेत भारताला ही स्थायी सदस्यत्व मिळाले पाहिजे.

संयुक्त राष्ट्रसंघाच्या महासचिव पदावर श्री. घाली यांची निवड झाली तेव्हा ते म्हणाले–"माझ्या या निवडीला मी आपल्या देशाचा महान् सन्मान समजतो. आज जगात अनेक बदल होत आहेत, आणि या बदलत्या परिस्थितीत संयुक्त राष्ट्रसंघाला आपले महान् दायित्व पूर्ण करावयाचे आहे. त्यासाठी त्याने सज्ज झाले पाहिजे. आपले कर्तव्य पूर्ण करण्याचा मी यथाशक्ति कसोशीने प्रयत्न करीन."

संयुक्त राष्ट्रसंघाची स्थापना सन १९४५ मध्ये झाली, त्यावेळी ५१ देश या संघाचे सदस्य होते. आज संघाच्या सदस्यांची संख्या १६६ पर्यंत पोंचलेली आहे. गेल्या सप्टेंबर मध्ये, नुकत्याच स्वतंत्र झालेल्या बाल्टिक रिपब्लिकला, उत्तर व दक्षिण कोरियाला, पॅसिफिक द्वीप देश मायक्रोनेशिया आणि मार्शल द्वीप-समूहाला संयुक्त राष्ट्रसंघाचे सदस्य करून घेण्यात आले.



# मूल्यवान मेखला

**पा**लमपुरच्या कचेरीत प्रकाश एक छोटीशी नोकरी करत असे. एक दिवस त्याला कचेरीच्या काही कामासाठी शेजारच्या गावी जावे लागले. निघण्यापूर्वी त्याने आपली बायको जानकी हिला सावध रहायला सांगितलं. इतक्यात कोणी एक म्हातारा हळू हळू आपल्याच घराकडे येत असलेला तिला दिसला. त्याच्या हातात एक मोठीशी पेटी होती. त्याच्या बरोबर भाड्याच्या बैल-गाडीचा जो गाडीवान होता, तो जोराने ओरडत होता–"शहरापर्यंत जायची बोली करून तुम्ही असे मधेच का उतरलात?"

पण मागे वळून म्हातारा त्याला म्हणाला–"पण तुला मी पुरं भाडं दिलंय ना, मग मी कुठेही उतरून गेलो, तर तुझं काय जातंय?"

जानकीने या म्हाताऱ्याला पूर्वी कधीच पाहिले नव्हते, म्हणून तिने आश्चर्याने त्याला विचारले–"आपण कोण आहात? घर कुणाचं समजून आपण आत येत आहात?"

"अगोदर थोडं पाणी तर आण मुली." म्हातारा म्हणाला आणि हे बोलता बोलता जवळच्या आरामखुर्चीत स्थानापन्न झाला.

जानकीने लोटाभांडं आणून दिल्यावर पाणी पिऊन म्हातारा म्हणाला–"खरं तर हे घर कुणाचं हे मला माहीतच नाही. पण आजची रात्र काढायला मला इथे कोपऱ्यात जागा मिळाली, तर सकाळी उठून मी आपल्या गावी निघून जाईन."

हे ऐकून जानकीने म्हाताऱ्याकडे नीट पाहून घेतले. तिला काही हा म्हातारा लबाड असेल असे वाटले नाही. तेंव्हा जरा अडखळतच ती म्हणाली–"रात्री-पुरते इथे राहिलात तर माझी काही हरकत नाही काका! पण मला तुम्ही जरा घाबरलेले वाटताय. काय झालंय?"

तारा देसाई



"होय मुली. घाबरलो आहेच मी जरासा. अन् माझ्या भीतीचं कारण आहे–" असे म्हणत जवळची पेटी उघडली. ती पेटी दागिन्यांनी भरलेली होती! त्यातच एक मोठीशी मेखलाही होती. ती उचलून जानकीला दाखवत म्हातारा म्हणाला–"माहीत आहे तुला, हिचं वजन काय असेल? साठ तोळे वजनाची आहे ही मेखला!"

हा सर्व प्रकार आश्चर्याने पहात असलेल्या जानकीला म्हाताऱ्याने आपली सर्व हकीकत सांगितली.

त्या म्हाताऱ्याचे नाव होते नीलकण्ठ. तो एक सधन शेतकरी होता. तीन मुलगे होते त्याला. तिघांचेही विवाह झाले. तिघांनाही शेतीवाडीत विशेष रुचि नव्हती, त्यांना व्यापाराचेच मोठे आकर्षण होते. त्यांच्या हट्टासाठी नीलकण्ठने आपली सारी शेती विकून टाकली. चांगली साठ एकर जमीन होती त्याची! आलेली रक्कम त्याने मुलांना त्यांच्या व्यापारासाठी भांडवल म्हणून देऊन टाकली. गावातलं आपलं घरही त्याने विकून टाकले. शेवटी एकदा गावात असलेले आपले दागिने घेऊन तो शहरात यायला निघाला. परंतु गाडीवाल्याचे वागणे नीलकण्ठला संशयास्पद वाटू लागले. जानकीच्या गावी पोचता पोचताच रात्र होऊ लागली. इतके सारे सोने बरोबर घेऊन गाडीवाल्यावरोबर पुढे जाणे नीलकण्ठला जोखमीचे वाटू लागले, म्हणून धाकट्या भावाची खोटीच गोष्ट सांगून गाडीवाल्याला पूर्ण भाडे देऊन तो तेथेच उतरला.

"चांगलं केलंत काका तुम्ही. चला हात पाय धुवून या अन् थोडंसं जे वाढीन ते खाऊन घ्या." असे म्हणून जानकी स्वयंपाकघरात गेली. जेवणानन्तर बोलता बोलता नीलकण्ठ जानकीला म्हणाला–"उद्या गावात पोचल्यावर मला एका अडचणीला तोंड द्यावं लागणार आहे."

"कसली अडचण काका?" जानकीने कुतूहलाने विचारले.

"हे माझ्या बायकोचे एकूण शंभर तोळ्यांचे दागिने आहेत. त्यातली ही मेखलाच एकटी साठ तोळ्यांची आहे. ही



मी आपल्या बायकोला आमच्या लग्नाच्या पहिल्या वाढदिवशी घेऊन दिली होती. ती वितळवावी असं काही मला वाटत नाही. तेव्हा एका सुनेला साठ तोळे अन् बाकीच्या दोघींना वीस वीस तोळे सोनं द्यावं लागणार मला. माझी अडचण हीच आहे." नीलकण्ठ म्हणाला.

"बाकी दोघींना चाळीस चाळीस तोळे सोनं कमी मिळतंय, तेव्हा त्यांना तेवढ्या ऐवजाचे पैसे देऊन टाका ना काका!" जानकीने अडचण सोडवायचा प्रयत्न करत म्हटले.

पण जोरात हसत नीलकण्ठ म्हणाला–"अग पण शेत अन् घर विकून आलेली रक्कम तर मी तीन्ही मुलांना सारखी-सारखी देऊन चुकलो ना! आता माझ्या जवळ केवळ हे सोनंच आहे. हे ही तीन्ही सुनांना वाटून दिलं की उरलेलं आयुष्य त्यांच्याजवळ राहून आरामात घालवीन मी. मग मला कसला विचारही करायला नको."

थोडासा विचार करून आता जानकीने सुचवले–"मग तुमच्या तीन सुनांपैकी जी तुमचं सारं जास्त प्रेमाने करते, तिला द्या ही मेखला."

"पण माझ्या तीनही सुना माझ्यावर सारखंच प्रेम करतात. खूप आदर आहे त्यांना माझ्याबद्दल. म्हणून तर मेखला



कुणाला द्यावी हे ठरवू शकत नाहीये मी." नीलकण्ठ म्हणाला.

"तुमच्या सुनांना हे माहीत आहे का, की तुम्हाला ती मेखला मोडायची नाहीय, अन् त्यांच्यापैकी एकीलाच कुणाला तरी ती मिळणार आहे?" डोक्यात काही विचार येऊन जानकीने काकांना विचारले.

"हो हो! माहीत आहे तर! सोनं आणायला जातोय, असं सांगून तर निघालो होतो मी घरून!" नीलकण्ठ उत्तरला.

काहीतरी ठरवून जानकी म्हणाली–"मी एक नाटक करून तुमच्यावर कोणती सून जास्त प्रेम करते हे शोधून काढू म्हणते. पण मी सांगेन तसं करायला कबूल व्हायचं हं काका!"



"भला काहीतरी करून ही अडचण सोडवायचीच आहे. तू मदत केलीस तर उत्तमच! म्हणशील तसं करीन मी." नीलकण्ठने कबुली दिली.

सकाळ झाल्याबरोबर काही कागद लिहून जानकीने त्यावर काकांना सही करायला सांगितले. नंतर गावातल्या एका माणसाला बोलावून त्याच्याकडून नील-कण्ठच्या सुनांना निरोप देववला की– "त्यांचे मामंजी इथं आहेत अन् त्यांनी फक्त त्या तिघींनाच इथे बोलावलं आहे."

दुपारी नीलकण्ठच्या तिघी सुना येऊन जानकीच्या घराशी गाडीतून खाली उतरू लागलेल्या पहाताच, जानकीने काकांना आतल्या खोलीत येऊन खाटेवर झोपायला सांगितले, अन् एक चादर त्यांच्या डोक्या-वरून सबंध अंग झाकेल अशी घालत ती त्यांना म्हणाली–"आता मेल्यासारखं सोंग करून पडून रहा. अन् ऐका तुमच्या सुना काय काय बोलतील ते. हीच तुमच्या सुनांच्या परीक्षेची वेळ आहे."

नंतर सकाळी सही करून घेतलेले कागद घेऊन जानकी पुढल्या खोलीत आली.

तिला पहाताच नीलकण्ठाच्या सुनांनी विचारले–"आपण कोण आहात. आमचे मामंजी कालच शहरात यायला हवे होते. इथे का थांबले ते?" आणि असं बोलत त्या घरात आल्या.

तिघींचे चेहरे नीट न्याहाळत जानकी त्यांना म्हणाली–"माझे यजमान सरकारी कचेरीत वकील आहेत. त्यांच्याशी बोलणं करून नीलकण्ठरावांनी जवळचं सारं सोनं शहरातल्या वृद्धाश्रमाला देणगी म्हणून दिलं. त्या कामासाठीच ते इथे आले." अन् तिने ते कागद सुनांना दाखवले.

ते पहाताच नीलकण्ठच्या तीन्ही सुनांचे चेहरे पडले, रागात येऊन त्यांनी विचारले– "काय घोर अन्याय केला त्यांनी हा! आत्ता आहेत कुठे ते?"

"आतल्या खोलीत आहेत ते. पण आता ते तुमच्या प्रश्नांची उत्तरं देण्याच्या स्थितीत नाहीत. आज सकाळीच अचानक हृदयक्रिया बन्द पडून त्यांचा मृत्यु





ओढवलाय." कोणास काही वाव मिळू नये अशा गंभीर स्वरात जानकीने आतल्या खोलीकडे इशारा करत म्हटले.

खाटेवर पडलेल्या नीलकण्ठला दुरूनच पाहून तीन्ही सुनांनी 'म्हातारा खरंच मरून गेलेला आहे' असे गृहित धरले.

"हं!" नीलकण्ठची मोठी सून म्हणाली– "या खत्रूड म्हाताऱ्याला तीनदा चांगलं गरम गरम खायला घालून मी काही बरं केलं नाही. तो असं काही करील, हे माहीत असतं, तर उपाशी मरून दिलं असतं मी याला!"

दुसरी सून दातओठ खात म्हणाली– "स्वतःची झोप खराब करून मी त्याला औषधं पाजून त्याची सेवा करत राहिले. पण त्यावेळीच औषधाऐवजी थोडंसं वीष खायला घातलं असतं, तर असं हातचं सोनं घालवण्याची पाळी आली नसती माझ्यावर!"

तिसरी, सर्वात धाकटी सूनही थोरल्या दोघींप्रमाणेच तापून म्हणाली–"मी रात्री उशीरापर्यंत जागून थेरड्याला पुराणं वगैरे वाचून दाखवून आपल्या झोपेचं खोबरं केलं, माझा आवाज सुद्धा चिरकायला लागायचा वाचूनवाचून! कित्ती न कित्ती वेळ याला पंख्यानं वारा घालून हात दुखून जायचे माझे! मला काय माहीत की हा जिवट म्हातारा असा खुसट असेल? नाहीतर अंधारातच टाळक्यात काठी घालून निकाल नसता लावला याचा तेव्हांच?"

यानन्तर तिघीही जानकीकडे वळून म्हणाल्या–"पाहिलंत, हे म्हातारे कधीकधी आपल्याला असंच खोड्यात टाकतात. पण बाई ग, त्यावेळी तुझी तरी अक्कल कुठे गेली होती? काहीतरी इकडचं-तिकडचं बोलून त्यास असं करण्यापासून थांबवलं का नाहीस? अन् मेला म्हातारा, तर त्याच्या मुलांना बोलावून घ्यायचं सोडून आम्हा सुनांना कशाला बोलावून घेतलंस? आता हे मढं आपल्याच घरात घे ठेवून· संध्याकाळी आम्ही या थेरड्याच्या मुलांना

देऊ पाठवून." अन् चिडलेल्या त्या सुना आल्या तशाच पाठ फिरवून पुन्हा गाडीत बसल्या व निघूनही गेल्या.

आपल्या सुनांचे प्रलाप नीलकण्ठ ऐकतच होता. त्याचा आपल्या कानांवर विश्वासच बसेना! सुनांचे खरे रूप कळून आल्यावर त्याचा गळा भरून आला, दु:ख उसळू लागले!

जानकीने त्याला आपला खरा काकाच मानून त्याचे सांत्वन करत म्हटले—"काका, पाहिलंत ना मानवी स्वभाव कसा असतो? यासाठीच म्हातारपणी आपला पैसा राखून ठेवूनच तुम्हाला नीट वागवायचं नाटक केलं. अजूनही काही गेलं नाही. आता हे धन स्वत:जवळच ठेवा. माझ्या बाबांनी तुमच्याचसारखं सर्व काही मुलांना देऊन टाकलं. नंतर त्यांना तिथे पोटपर खायलाही मिळेनासं झालं. मुलींकडे जाऊन रहाणं प्रशस्त वाटेना, म्हणून सध्या ते वृद्धाश्रमात रहातात. तुमच्यावर तशी पाळी येऊ नये म्हणून हे नाटक करून मी तुम्हाला सुनांचं खरं स्वरूप दाखवून दिलं. माझे वडील चांगले अनुभवी, हुशार आहेत. सारी संपत्ति मुलांना दिली नसती तर आज आम्हा सर्वांना योग्य सल्ला-मसलत देत; आपल्या माणसात सुखानं राहू शकले असते. तुमचा आपल्या कुटुंबाला कायम उपयोग होत रहावा, अशीच माझी इच्छा आहे." इतके बोलून जानकी आपल्या हातातले कागद फाडायला निघाली.

परन्तु तिला थांबवत नीलकण्ठ म्हणाला—"नाही मुली, हे कागद फाडू नकोस. मी खरोखरच हे सोनं त्या वृद्धाश्रमाला देऊन टाकतो, अन् माझं उरलेलं आयुष्यही मी वृद्धाश्रमातच घालवीन. माझ्या बायकोच्या सोन्याच्या मेखलेनं आज माझे डोळे उघडले! मला त्या वृद्धाश्रमाचा पत्ता सांग मुली!"

हे ऐकून जानकी आश्चर्याने काकांकडे पाहू लागली. तिच्या डोळ्यातून झर झर अश्रू वाहू लागले. काकांच्या जागी तिला तिचे बाबाच दिसू लागले.





# साहसी अपूर्वा

[ १२ ]

[ रुद्रपुरीचा प्रधानमन्त्री आणि तान्त्रिक वीरविकट या दोघांनी मिळून युवराणीच्या गळ्यातला चन्द्रकान्त मणी चोरण्याचे कारस्थान रचले; आणि तान्त्रिकाने ती बातमी म्हाताऱ्या जादुगारणीला जाऊन सांगितली. युवराणीला जिवन्त पकडून आणून आपल्या हवाली करायची आज्ञा त्या म्हातारीने तान्त्रिकाला दिली. —यानंतर...]

वेळेवर पाऊस पडल्यामुळे रुद्रपुरीत पीक-पाणी चांगले आले. कसलाही अभाव नसल्याने लोक सुखी झाले. राजा विश्ववर्माने युवराणीचा यन्दाचा वाढदिवस धुमधडाक्यात साजरा करायचे ठरवले. ते ऐकून प्रधानमन्त्री मोठ्या उत्साहाने म्हणाला—"होय महाराज, आपल्या युवराणीचा वाढदिवस असा धुमधडाक्याने करू, की आत्तापर्यंत दुसऱ्या कोणाचा झाला नसेल!" युवराणीवरील प्रेमामुळे मन्त्री हे बोलत असावा असेच राजाला वाटले आणि तोही मन्त्र्याच्या राजभक्तीवर फार खूश झाला.

त्या दिवशी आभाळ काळ्या ढगांनी भरून आले. सर्वत्र काजळकाळा अन्धार दाटला होता, भयंकर गडगडाट करीत विजा चमकत होत्या अन् मुसळधार पाऊसही थोड्याच वेळात कोसळू लागला.



तशा पावसातच काळा पोशाख चढवून आणि आपल्या अस्वलाच्या वाहनावर बसून वीरविकट रुद्रपुरीच्या एका टोकाला असलेल्या दुर्गामंदिराकडे मोठ्या वेगाने निघाला होता! केवळ राजपरिवाराचीच नव्हे, तर साऱ्या रुद्रपुरीचीच आराध्य-देवता होती माता दुर्गा. हे मंदिर जंगलाच्या अगदी जवळ असल्याने ते रात्री अगदी मोकळे असे. तिथे वेळी-अवेळी यायला बहुधा कोणी धजत नसे. पुजारी रात्र होण्यापूर्वीच तेथे दिवा लावून ठेवून निघून जात असे.

या मंदिरापासून शंभर मीटर दूर, जंगलाला लागून असलेले वडाचे एक विशाल असे झाड होते. तेथे पोचल्या-बरोबर वीरविकट अस्वलावरून खाली उतरला अन् भयाने कापत असलेल्या त्या अस्वलाला त्याने कठोर आवाजात आज्ञा दिली—"इथेच वाट पहात थांब माझी. ही जागा सोडून अन्यत्र कुठे ही जाऊ नकोस. समजलं?" आणि तो सरळ मन्दिराकडे चालू लागला.

उंच अशा त्या मन्दिराच्या द्वाराशी उभ्या असलेल्या व्यक्तीला उद्देशून वीर-विकट म्हणाला—"मला यायला जरा उशीर झाला, क्षमा असावी. मी जादुगारणीकडे पुन्हा एकदा गेलो होतो. तिच्याशी मसलत करूनच आत्ता येतो आहे मी. तिने तुझ्या-साठी एक ताईत दिला आहे. तो धारण केलास की तुझी सगळीच्या सगळी भीती पळून जाईल, तुला कसलाही धोका संभवणार नाही. अगदी निर्भयपणे आपलं काम सगळं पूर्ण करायचं."

तिथे उभी असणारी ती व्यक्ती दुसरी कोणी- नसून खुद्द प्रधान मन्त्रीच होता तो. तो म्हणाला—"मी आभारी आहे तुझा. तुझे हे उपकार मी जन्मभर विसरणार नाही." आणि त्याने वीरविकटला नमस्कार केला.

वीरविकटने पिशवीतून ताईत काढून प्रधान मन्त्र्याच्या मनगटावर बांधला. पण तो ताईत, खरे पाहता, मन्त्र्याने वीर-विकटच्या म्हणण्याप्रमाणे वागावे, पूर्णत: त्याच्याच अधीन रहावे यासाठीच जादु-गारणीने वीरविकटकडे दिला होता. ही खरी गोष्ट माहीत नसल्याने मन्त्री मात्र खूपच आनन्दित झाला होता.

वीरविकटने आपली लांब दाढी कुरवाळत मन्त्र्याला विचारले—"युवराणीच्या जन्म-दिनी, तिच्या दुर्गामातेच्या दर्शनाला येण्याची वेळ पंचांग पाहून पक्की केली आहे की नाही? त्यात काही ही चूक राहता कामा नये."

"हो, हो! सूर्यास्तापासून एका तासा-नंतरचा मुहूर्त निश्चित केला आहे. आपण अगदी निश्चिंत असा त्या बाबतीत." मन्त्री उत्तरला.

"ती रात्रही अशीच काजळकाळी असायला हवी. म्हणजेच आता आपलं काम पुरं व्हायला अजून एक महिन्याचाच अवधि आहे. तोपर्यंत वाट पहायला हवी आपल्याला. होय नं?" वीरविकटने गर्वाने विचारले.

"होय मित्रा, आपला बेत अगदी सहजपणे सफल होईल, याबद्दल शंकाच नको. आत्ता मन्दिराचा दरवाजा उघडण्या-साठी किल्ल्या आणल्या आहेत मी. राजपरिवाराच्या लोकांना संकटकाळी



निसटून निघून जाण्यासाठी या मन्दिराच्या गर्भगारातून एक गुप्त द्वार आहे. ते द्वार एका भुयारी मार्गात उघडतं! ते कसं उघडायचं, वा बंद करायचं हे मला माहित आहे. पण आजपर्यंत कधीच या मार्गाचा उपयोग करायची वेळ आली नाही. आज प्रथमच आपली योजना पुरी करण्यासाठी त्याचा उपयोग होणार आहे. आता आपण आत जाऊन पाहू या का? सगळं काही अगोदर नीट पाहून ठेवलेलं बरं नाही का?" असे विचारत, मोठ्या उत्साहाने तो गर्भगाराकडे निघाला.

"हो, हो, पाहू या की! तेवढ्या साठीच तर आलोय ना! आयत्या वेळी



काही अडचण नको यायला!" असे म्हणून वीरविकट त्याच्या मागोमाग निघाला.

मन्त्र्याने मन्दिराचा दरवाजा उघडला, अन् दोघे आत शिरल्यावर पुन्हा तो लावून टाकला. मन्त्र्याने आतल्या बाजूची एक मशाल हातात घेतली. दोघेही गर्भागारात पोचले. दुर्गामातेच्या मूर्ती-समोर छोटया छोटया पणत्या तेवत होत्या. मूर्तीच्या मागे एक लहानशी रिकामी जागा होती. आणि भिंतीवर तऱ्हेतऱ्हेची शिल्पे कोरलेली होती. मन्त्र्याने मशाल बाजूला ठेवली आणि कोरलेल्या शिल्पांपैकी राक्षसाच्या शिल्पाचा जबडा दोन्ही हातांनी धरून उघडला. आणि त्यामागचा भुयारी मार्ग उघडा झाला दोघांना हीं फार आनंद झाला.

मंत्री आणि तान्त्रिक दोघेही त्या भुयारी मार्गात उतरले. चारी बाजूंना त्यांनी एकदा नजर टाकली.

आतापर्यंत अपूर्व त्यांच्या मागेमागेच होता. क्षणभर त्याच्या मनात आले की–'या भुयारी मार्गाचं दारच बन्द करून टाकलं तर! पण असं करून तरी काय फायदा? ते दुष्ट तर या मार्गातून सुरक्षितपणे निघून जातील. तेव्हा हा मार्ग बन्द करून तर विशेष काही फायदा होणार नाही! तेव्हां या दोघांच्या पाठोपाठ जाणंच योग्य होईल.' अपूर्वनेही भुयारात उतरायचे ठरवले, पण त्या राक्षसाचे तोंड तर एव्हाना बन्द झाले होते. त्यामुळे आता काय करावे या विचारात तो पडला. अपूर्वला कळून चुकले की भुयारी मार्गात आतच कुठे तरी ते बन्द करायची कळ असली पाहिजे.

मन्दिराचे दरवाजे तर उघडेच होते. ते बन्द केल्याशिवाय मन्त्री व तान्त्रिक यांनी निघून जाणे ठीक नव्हते. तेव्हां ते बन्द करण्यासाठी ते दोघे नक्कीच पुन्हा इथे येतील हे अपूर्वच्या लक्षात







आले. म्हणून गर्भागाराच्या बाहेर येऊन तो एका खांबामागे जाऊन बसला. आता पुढे काय काय होते ते सर्व त्याला नीट पहायचे होते!

मन्त्र्याने येऊन मन्दिराचे दरवाजे बन्द केले आणि तो तान्त्रिकाला म्हणाला—"मी युवराणीला भुयाराच्या तोंडात ढकलल्याबरोबर तिला आत घेऊन जाऊन मी आत्ता दाखवल्याप्रमाणे भुयारी दार आतून बन्द करून घ्यायचं काम तुझं. भुयारी मार्गातून तिला घेऊन जाऊन नंतर जंगलात आपल्या लोकांच्या हवाली करून टाक. नंतर ते तिला तेथून जादुगारणीकडे घेऊन जातील."

"माझी माणसं नव्हेत, तिथे खुद्द ती म्हातारीच वाट पहात बसलेली असेल. एखादी घार जशी कोंबडीचं पिल्लू झडप घालून घेऊन जाते, तशीच ती युवराणीला पळवून नेईल." तान्त्रिक वीरविकटने मन्त्र्याला माहिती पुरवली.

"शाब्बास! हे सगळं काही मिनिटातच घडून जायला हवं; कारण जन्मोत्सव किती धामधुमीनं होणार असला, तरी युवराणी पाच मिनिटं जरी नजरेआड झाली तरी तिच्या सख्यांच्या ते तावडतोब लक्षात येईल अन् तिची शोधाशोध सुरू होईल. तेव्हां सावध रहा!" मन्त्री म्हणाला.

"शोधाशोध सुरू झाली तरी युवराणीला भुयारात ढकललेलं कुणाला कळणार? होय, आणि या भुयारी मार्गाबद्दल तरी अशी कितीकांना माहिती असेल?" वीरविकट म्हणाला.

"राजा, राणी, या देवळाचा पुजारी यांच्याशिवाय मी आणि सेनापती—बास, इतक्यांनाच फक्त या गुप्त मार्गाची माहिती आहे. आणखी कोणालाही नाही." मन्त्री म्हणाला.

"असं?...पुजाऱ्याला आपल्यात सामिल करणं कठीण आहे असं तुझं म्हणणं. त्याला आपला कट समजला, तर तो राजाला जाऊन सांगेल, अशीही शक्यता आहे ना?" वीरविकटने शंका प्रदर्शित केली.

"हो, कळलं तर नक्कीच सांगेल. पण याबाबत आपण काय करू शकू?" मन्त्र्याने विचारले.

"संध्याकाळी युवराणी मंदिरात येण्यापूर्वीच आपण त्याची यमसदनात रवानगी करून टाकू. मीच पुजाऱ्याचा वेष घेऊन युवराणीला इथे घेऊन येईन. नंतर तिला दुर्गामातेला प्रदक्षिणा करणं शुभप्रद आहे असं सांगून मूर्तीच्या मागे आणीन अन् तिला भुयारात ढकलून मीही तिच्यामागे उडी घेऊन भुयारी प्रवेशद्वार आतून बन्द करून घेईन." वीरविकटने आपली योजना सांगितली.

"कल्पना काही वाईट नाही! पण यासाठी पुजाऱ्याचा जीवच घेणं आवश्यक आहे काय? दुसरा एखादा मार्ग पहाना. पुजारी बिचारा फारच चांगला आणि प्रामाणिक माणूस आहे." मन्त्री म्हणाला.

"मला नव्हतं वाटलं की तू इतका भित्रा असशील! मग तू या विशाल भूमीवर राज्य कसं करशील? चन्द्रकान्त हिरा तुला या विश्वाचा राजा बनवील, काळजी नको करूस. तुझ्या इच्छेप्रमाणेच करीन. आपलं काम होईपर्यंत पुजाऱ्याला एखाद्या गुप्त स्थानी अडकवून ठेवीन मी. जीव नाही घेणार त्याचा. चल आता." असे म्हणून वीरविकट वडाच्या झाडाकडे चालू लागला.

मन्त्रीही नगराकडे निघून गेला.

इतका वेळ खांबामागे लपून अपूर्वने त्यांचे सारे बोलणे ऐकले होते. आता कुणाच्या पाठलागावर निघावे याचा त्याला क्षणभर विचार पडला. पण त्यांचे कारस्थान कळल्यामुळे त्यांचा पाठलाग करणे आवश्यक नाही असे त्याला वाटले. त्यापेक्षा सर्व गोष्टी राजा विश्ववर्माच्या कानी घालणेच योग्य होईल असे त्याने ठरवले. तोच हा बेत हाणून पाडण्यास समर्थ आहे. पण राजाला तरी कसे कळवावे, या विचारात पडला अपूर्व!

(क्रमशः)



# योग्य उत्तर

शिवराम एक सामान्य शेतकरी होता. एका अपघातात त्याचा मुलगा व सून दोघेही मरून गेले आणि दोन नातवांची जबाबदारी शिवरामवरच येऊन पडली. आजोबांनी नातवांचे लालनपालन मोठ्या प्रेमाने आणि लाडाने केले. इस्टेटीच्या नावाने शिवरामजवळ त्याचे छोटेसे घरच काय ते होते. तो जसजसा म्हातारा होऊ लागला तसतशी त्याला आपल्या नातवांची चिन्ता वाटू लागली; कारण ते दोघेही आपली जबाबदारी समजून न घेता नुसताच उडाणटप्पूपणा करीत असत.

अशातच एकदा शिवरामचा मित्र रामचन्द्र त्याला भेटायला आला. शिवरामने आपल्या दोन्ही नातवांबद्दलची चिन्ता त्याच्याजवळ व्यक्त केली.

रामचन्द्रने दोन्ही पोरांना समोर बोलवून म्हटले–"हे पहा, मला तुम्हाला एक प्रश्न विचारायचाय. नीट विचार करून त्याचं उत्तर द्या. जो जास्त हुशारीनं उत्तर देईल, त्याला मी दहा रुपये बक्षिस देईन."

दोन्ही नातवांनी डोकी हलवून संमति दिली. रामचन्द्रने विचारले–"देवानं दर्शन देऊन तुम्हाला एकच वर मागायला सांगितला, तर तुम्ही काय मागाल? पहा हं, तुम्ही जे मागाल त्यात तुमचा जास्तीत जास्त फायदा व्हायला हवा. नीट विचार करून बोला."

विचार करून मोठा नातू म्हणाला–"मला जीवनात काही कमी पडू नये, म्हणून मी देवाकडे एक शेत मागून घेईन."

यावर धाकटा पट्कन उत्तरला–"अरे शेत कुणाला हवंय! मी तर देवाकडे एक अशी अंगठी मागून घेईन की जी मी मागेन ते मला देत राहील! मग मला कसला अभाव?"

हसून धाकट्याला दहाची नोट देत रामचन्द्र शिवरामला म्हणाला–"तू आपलं घर थोरल्याला देऊन टाक. तो कसाही आपल्या या गावात गुजराण करील. धाकट्याची तू काळजीच नको करू. तो मोठा व्यवहारकुशल आहे. मी त्याला आपल्याबरोबर घेऊन जाऊन असा शहाणा करून पाठवीन, की पुढे तो तुझ्या आणि आपल्या मोठ्या भावाच्याही कामाला येईल."





# राजाचा वचनभंग

हट्टी विक्रमराजा पुन्हा त्या झाडावर चढला आणि फान्दीला लटकणारे प्रेत काढून, खांद्यावर टाकून, नेहमीप्रमाणे मुकाट्याने तो स्मशानाची वाट चालू लागला. चालता-चालता त्या प्रेतातला वेताळ बोलू लागला–"राजा, अशा मध्यरात्री हे हाल सहन करताना तुला पाहून मला फार वाईट वाटतंय. हे सर्व तू कुणा करता करत आहेस, ते मला माहीत नाही. पण तू एका देशाचा राजा आहेस, तेव्हां कुणा सर्वसामान्य माणसासाठी तू हे कष्ट नक्कीच उपसत नसणार! कुणी एकादा राजा किंवा सम्राट यांच्यासाठीच हा उद्योग असणार. पण एक नीट लक्षात ठेव, हे राजे सम्राट आपण केलेले वायदे नंतर पाळत नाहीत. त्यांच्यासाठी धडपडणाऱ्यांना त्यामुळे बहुधा निराश व्हायचीच पाळी येते. उदाहरण म्हणून शब्द देऊन तो न पाळणारा राजा, बहादुर

**वेताळाच्या गोष्टी**



असूनही भित्रटासारखा वागणारा एक भिल्ल युवक आणि अगदी शेवटच्या क्षणी अविवेक दाखवणारी एक राजकुमारी यांच्याबद्दलची मला माहीत असलेली एक गोष्ट मी तुला सांगतो. नीट ऐक ती, म्हणजे थोडी करमणूक होऊन तुझे कष्ट कमी होतील." आणि वेताळ गोष्ट सांगू लागला.

सुवैशाली राज्यावर राजा पद्माक्षचे राज्य होते. खूप दिवसपर्यंत राज्यात शांतता नान्दत होती. परन्तु अलिकडेच काही दिवसांपासून एका रानटी रक्तपिपासू जनावराने राज्यात धुमाकूळ घातला होता.

त्या नरपिपासु जनावराला मारण्यासाठी राजा पद्माक्षने कित्येकदा आपले शिपाई पाठवले, पण दर वेळी ते शिपाईच त्या जनावराच्या भक्ष्यस्थानी पडले! शेवटी आपला मन्त्री व युवराज्ञी विवेकवती यांच्याशी चर्चा करून राजाने एक निर्णय घेतला.

पद्माक्षने राज्यात दवंडी पिटवली, की 'जो कोणी या भयानक, रक्तपिपासु प्राण्याला मारून टाकील, त्याला अर्धे राज्य दिलं जाईल आणि राजकुमारी विवेकवतीशी विवाह करून दिला जाईल.'

यानन्तर राज्यातले बरेचसे तरुण त्या जनावराला मारायला पुढे सरसावले, पण स्वतःच त्या प्राण्याकडून मारले गेले.

अशातच, त्या राज्याजवळील जंगलातल्या भिल्लांच्या नायकाचा मुलगा त्या जनावराला मारायला निघाला. त्या युवकाचे नाव होते वीरबाहु. एक पंधरवडाभर जागरूक राहून रात्रीच्या वेळी तो त्या जनावराचा शोध घेत राहिला. शेवटी हा प्राणी एका पहाडी झऱ्याजवळच्या झाडीत लपून बसला असल्याचा शोध त्याला लागला.

वीरबाहु जवळच्या एका झाडावर चढला आणि त्या जनावराचे नीटपणे निरीक्षण केल्यावर तो दचकलाच. कारण डोक्याभोवती असलेल्या आयाळीमुळे तो एकीकडे सिंहासारखा दिसत होता, तर दुसरीकडे अंगावरील पट्ट्यापट्ट्यांमुळे तो वाघासारखाही वाटत होता! असला प्राणी त्याने पूर्वी कधीच पाहिला नव्हता.

इतक्यात त्या विचित्र जनावराला वीरबाहुची चाहूल लागली अन् वाघ आणि सिंहाच्या मिश्र आवाजात एक गर्जना करून झाडीतून बाहेर पडून तो प्राणी वीरबाहु बसला असलेल्या झाडाकडे आला. ही संधी घालवायची नाही, असे ठरवून वीरबाहूने प्रथम त्या प्राण्याच्या काळजाचा वेध घेऊन सर्रकन एक बाण धनुष्यातून सोडला.

त्या बाणाचा आघात झाल्याबरोबर त्या जनावराने झाडाच्या पानात लपलेल्या वीरबाहुच्या दिशेने उसळी मारली. आता वीरबाहुने भाला असा फेकला की तो घस्सकन त्या क्रूर जनावराच्या गळ्यात घुसला! त्याबरोबर तो प्राणी जोरात जमिनीवर आदळला, पण पटकन् उठून तो झऱ्याकडे धावू लागला. वीरबाहु त्याला तसा बरा जाऊ देणार? झाडावरून चपळपणे उतरून त्याने त्या प्राण्यावर बाणांचा पाऊसच पाडला! शेवटी भयंकर जखमी होऊन तो विचित्र प्राणी झऱ्याकाठी कोसळून तडफडू लागला आणि अल्पावधीतच त्याने प्राण सोडला!

सकाळ होताच आसपासच्या जंगली कबिल्यांचे लोक मोक्यावर पोचले. आणि ते विचित्र जनावर पाहून आश्चर्यात पडले! आपल्याच नायकाच्या मुलाने—वीरबाहूने त्याची शिकार केल्याचे जाणून त्यांना फारच आनन्द वाटला. कारण आता





लवकरच राजकुमारीशी विवाह होऊन तो अर्ध्या राज्याचा राजाही बनणार होता.

राजा पद्माक्षला ही खबर पोचली, की एका भिल्ल युवकाने एकट्यानेच मोठ्या धैर्याने त्या भयानक जनावराची शिकार केली आहे. बातमी ऐकून प्रथम त्याला खूप आनन्द झाला. पण लगेच त्याला फार दुःखही झाले. कारण त्याला असे कळले की ज्या भिल्ल युवकाने जनावराची शिकार केली आहे, तो अगदीच अडाणी आणि मागास समाजातला आहे, संस्कारहीन आहे! अशिक्षितही आहे हा युवक! असला जंगली माणूस आपला जावई होणार म्हणून तो फार विचलित झाला.

घोषणा करते वेळी राजा पद्माक्षला वाटले होते की एकादा शूर राजकुमार त्या जनावराची शिकार करील, पण घडले ते विपरीतच! एका कुरूप-असंस्कारित अशा युवकाने ही कामगिरी पार पाडली होती.

राजाने पुन्हा आपला मंत्री व राजकन्या यांच्याशी काहीं विचार-विमर्श केला. ते दोघंही फारच विचारात पडले होते, त्यांची बुद्धीच काम करीनाशी झाली होती. त्यांना असेही वाटत होते की राजवंशावर हा डाग लागल्यासारखे होणार होते.

"बाबा, त्या भिल्ल युवकाशी एकान्तात बोलून त्याला सांगा की–तुला फक्त अर्ध राज्यच दिलं जाईल." युवराज्ञी विवेकवती म्हणाली.

मंत्र्यानेही तिला दुजोरा देत राजाला सुचवले–"होय महाराज, असंच करावं आपण. अर्ध राज्य मिळालं की वीरबाहु नक्कीच खूष होईल. पण त्याच्याच तोंडून वदवून घ्यायला हवं की–आपण युवराज्ञीच्या लायकीचे नाही आहोत. आपण अगदीच अशिक्षित व जंगली असल्यामुळे स्वतः होऊनच राजकुमारीशी विवाह करणं आपल्याला मान्य नाही. म्हणजे 'राजाने वचनभंग केला' असं होणार नाही. तो डाग नको लागायला."



हा सल्ला राजाला आवडला. वीरबाहु स्वतःच म्हणत असेल की–'आपण राजकुमारी विवेकवतीसाठी अयोग्य आहोत व त्यासाठी हा विवाह आपल्याला अमान्य आहे', तर प्रजेच्या मनातले राजाचे स्थान डागळणार नाही. राजाने वीरबाहूला बोलावून घेऊन मोठ्या थाटाने त्याचा सत्कार केला व गुप्त मसलतीच्या खोलीत त्यांच्या रहाण्याची सोय केली. नंतर राजा, मन्त्री व स्वतः राजकुमारी विवेकवती असे तिघे जण त्याच्याकडे गेले व त्यांनी आपल्या मनातली गोष्ट त्याच्यासमोर उघड केली. लोकांसमोर 'आपण सांगितल्याप्रमाणे बोलण्याचे त्याने मान्य करावे' अशी त्यांनी त्याला विनन्ती केली. क्षणभर काही विचार करून वीरबाहु म्हणाला–"महाराज, मला तर अर्ध राज्यही नकोय. आपल्या घोषणेप्रमाणे मिळणाऱ्या पुरस्कारासाठी काही मी ही शिकार केलेली नाही. एक चांगला नागरिक म्हणून मी आपलं कर्तव्य केलं इतकंच! लोकांचे प्राण वाचवण्यासाठीच केवळ मी हे साहस केलं. मी स्वतः लोकांना सांगेन की–मीच अर्ध राज्य व युवराणीशी विवाह या दोन्हीला नकार दिलाय." इतके बोलून वीरबाहु तेथून परत फिरला.

समस्या इतक्या सहजपणे सुटलेली पाहून राजा व मन्त्री–दोघांनाही फार आनन्द



वाटला. परंतु वीरबाहुला थांबायला सांगून युवराणी विवेकवती राजाला म्हणाली–"बाबा, या भिल्ल युवकाला तुम्ही अर्ध राज्य द्या, वा न द्या, पण मी मात्र याच्याशीच विवाह करणार आहे. मला क्षमा करा आणि मला याच्याबरोबर जायला अनुमति द्या."

हे ऐकून राजा पद्माक्ष व मंत्री दोघेही अवाक् झाले!

ही गोष्ट सांगून वेताळ पुढे म्हणाला–"राजा, वीरबाहुने खरं तर अर्ध राज्य आणि राजकुमारीशी विवाह यांसाठीच प्राण संकटात घालून त्या भयानक प्राण्याची शिकार केली होती. आणि त्या आशेनंच

राजाकडून आमन्त्रण मिळताच तो राजवाड्यात पोचला. पण युवराज्ञीशी आपला विवाह होऊ शकत नाही असे कळल्यावर तो–आपण बक्षिसाच्या आशेनं नव्हे, तर एका नागरिकाचं कर्तव्य म्हणून ही शिकार केली–असं खोटं का बोलला? एखाद्या भिश्या माणसाप्रमाणे हाती येत असलेल्या अर्ध्या राज्याचाही त्याग त्याने का केला? आणखी कुरूप व जंगली मानून त्या वीरबाहुशी विवाह नाकारणाऱ्या राजकुमारीत अचानक बदल होऊन तिने त्याच्याशी विवाह करण्याचा निर्णय का घेतला? या प्रश्नांची उत्तरं माहीत असूनही ती देण्याचं टाळलंस तर, हे राजा, तुला माहीतच आहे, की तुझं मस्तक फुटून त्याचे शतशः तुकडे होतील."

राजा विक्रम या प्रश्नांची उत्तरे देण्यासाठी लागलीच बोलू लागला–"पद्माक्ष हा त्या देशाचा राजा होता, उत्तम प्रजापालक होता. अशा उच्चपदस्थ व्यक्तीने आपला वायदा पाळला नाही–वचनभंग केला. युवराणीचा वीरबाहुशी विवाह न व्हावा या इच्छेने त्याने स्वतः वीरबाहुला स्वतःलाच म्हणायला भाग पाडलं की–आपण स्वतःच या सर्वांचा त्याग केला आहे. जो राजा वचन पाळू शकत नाही, अशा राजाकडून अर्ध राज्य घेणंही अविवेकपूर्ण होईल हे ओळखून स्वतःला धोक्यातून वाचवण्यासाठी पूर्ण विचारान्तीच वीरबाहु खोटे बोलला. विवेकवतीने प्रथम वीरबाहुला अशासाठी नापसन्त केले होते की, तो हीनकुलीन व असंस्कारित होता. पण अशिक्षित असूनही तो किती सभ्य व सुसंस्कृत आहे, योग्य समयी योग्य निर्णय घेण्यात कुशल आहे–हे पाहून ती स्वतःच त्याच्याकडे आकर्षित झाली आणि तिने त्याच्याशी विवाह करण्याची अनुमति आपल्या पित्याकडे मागितली."

अशा तऱ्हेने योग्य उत्तर दिल्यावर राजाचा मौनभंग झाल्यामुळे वेताळ प्रेतासह अदृश्य होऊन पुन्हा त्या झाडाच्या फान्दीला लटकू लागला. (कल्पित)





# पुष्पक विमान

खूप जुनी गोष्ट आहे ही. विक्रमपुरीचा राजा धीरसिंह एक दिवस आपल्या अधिकाऱ्यांसह राजोद्यानात बसून गप्पागोष्टी करत होता. अचानकच आकाशाकडे नजर उचलून पहात राजा म्हणाला–"अरे पहा, पहा! आकाशातून विमानासारखं काहीतरी चाललंय पहा! त्याचा विलक्षण आकार पाहून मला तर वाटतंय की कोणी देवदेवता किंवा गंधर्वच त्यात बसून जात असावेत."

चन्द्रकेतु नावाचा एक अधिकारीही लगेच आकाशाकडे पहात म्हणू लागला–"खरंच की! काय अद्भुत् प्रकार हा महाराज! आपली नजर तर एकदम तीक्ष्ण खरीच! हे विमान अगदी पुष्पक विमानासारखं दिसतंय, शंकाच नाही!"

सूर्यबाहु नावाचा आणखी एक अधिकारीही त्यांची री ओढत म्हणू लागला–"हां हां महाराज! चन्द्रकेतुचं म्हणणं अगदी शंभर टक्के खरंच आहे हं!"

तक्षशिला नगरीत आपलं अध्ययन संपवून आलेला राजपुरोहिताचा पुत्र पद्मनेत्रही तिथे जवळच उभा होता. पण तो सोडून बाकी सर्वचजण चंद्रकेतु व सूर्यबाहु यांच्या सुरात सूर मिळवून म्हणू लागले–'महाराज मोठे भाग्यवान खरेच! म्हणूनच त्यांना हे अद्भुत् दृश्य प्रथम दिसलं!' परंतु पद्मनेत्र मात्र काहीच न बोलता उभा असलेला पाहून राजा धीरसिंह त्याला विचारू लागला–"काय झालं पद्मनेत्र? तू गप्प का?"

पद्मनेत्र यावर नम्रपणे म्हणाला–"क्षमा असावी महाराज? माझ्या दुःसाहसाबद्दल क्षमा करणार असाल तर मी अवश्य आपल्या प्रश्नाचं उत्तर देईन."

"हो, हो! बेलाशक! अगदी निर्भयपणे उत्तर दे पद्मनेत्र!" हसत हसत धीरसिंहने

पद्मनेत्रला आश्वासन दिलं. पद्मनेत्र उत्तरला–" महाराज, आत्ता आकाशातून विमानबिमान काहीही गेलं नाही. आपल्याला केवळ भास झाला!"

जरासा रागाचा आव आणत राजा म्हणाला–" अरे वा! माझ्याबरोबरच विमानं पाहिलेली ही इतकी माणसं इथे असताना, तू मात्र फक्त 'भास आहे, संशय आहे' असं काहीतरी बोलतोयस!"

पद्मनेत्र पुन्हा नम्रपणे बोलू लागला–" महाराज, पुष्पक विमान किंवा गन्धर्वांचा आकाश-विहार वगैरे केवळ काल्पनिक गोष्टी असतात. पण जर कधी, कुठे आपल्या कानांना वा डोळ्यांना असाधारण असं काही ऐकू आलं, वा दिसलं, तर त्याचं कारण एकच असू शकतं–ते म्हणजे आपली मानसिक दुर्बलता किंवा काही शारीरिक रुग्णता! पण आपल्याला जसा भ्रम झाला, तसाच भ्रम इथे उपस्थित असणाऱ्या सर्वांना का झाला असावा, याचं कारण आपणास नक्कीच माहीत आहे!"

हे ऐकून धीरसिंह सर्वांना उद्देशून म्हणाला–" हा पद्मनेत्र जे काही बोलला, ते सर्व अक्षरशः खरं आहे. मी कुठलं विमानही पाहिलं नाही, अन् गन्धर्वंही नाही पाहिला! मी फक्त अशा एकाद्या सल्लागाराच्या शोधात आहे, की जो राज्यातली सर्व परिस्थिति जशी पाहील, अगदी तशीच मलाही सांगेल; आणि यासाठीच मी आत्ताचं हे विमान स्वतःच उत्पन्न केलं. पण माझ्या दरबारातले तुम्ही सर्व अधिकारी माझ्या बोलण्याचं समर्थन करून, सन्मान मिळवण्यासाठी उगाचच वेड्यासारखे धावत आहात. खऱ्या परिस्थितीकडे माझं लक्ष वेधून घेऊन माझं शासन चांगलं घासूनपुसून नीट करण्याबाबतची तुमची जबाबदारी तुम्ही विसरला आहात. पण हा तरुण मुलगा पद्मनेत्र मात्र आपली जबाबदारी न विसरता माझं मन जिंकून घेण्यात सफल झाला आहे. म्हणून मी त्याची आपला 'मुख्य सल्लागार' म्हणून नेमणूक करत आहे."



# चांदोबा पुरवणी–४०



## भारतातील पक्षी न जनावरे : वाघ

एके काळी 'शाही बंगाली वाघ' म्हणवले जाणारे हे वैभवपूर्ण वन्य प्राणी बंगालमधील सुंदरबन या भागात मोठ्या संख्येने दिसत असत. खरोखरच, वाघ हा जंगलाचा अनभिषिक्त राजाच होय! यामुळेच शिकारप्रिय राजा-महाराजांना वाघाच्या शिकारीबद्दल फारच आकर्षण वाटे. 'वाघाची शिकार' म्हणजे एक 'शाही क्रीडा' मानली जाई. परन्तु, या शाही क्रीडेमुळेच कोणे एके काळी ४०,००० पर्यंत असणारी वाघांची संख्या खूप घटली. वीस वर्षांपूर्वी, सन् १९७२ च्या मोजणीत ही संख्या २,००० पेक्षाही कमीच भरली होती! त्यावेळी वाघाला 'राष्ट्रीय पशु' म्हणून स्थान देऊन, 'वाघ विस्तरण योजना' आखून असे जाहीर केले गेले की, संपूर्ण जातच नष्ट होण्यापासून बचाव केल्या जाणाऱ्या हिंस्र पशुंमध्ये वाघाचीही गणना केली गेलेली आहे. सध्या खास वन्य पशु संरक्षणासाठी १६ केन्द्रे आणि अन्य काही ठिकाणे यांच्यात एकूण वाघांची संख्या ४,००० च्याही काहीशी अधिकच आहे.

'मांजर' परिवारातला प्राणी वाघ हा सदैव शिकारीच्या शोधात फिरत असतो व तो कोणत्याही प्राण्याला खातो. त्यातल्या त्यात त्याचे प्रिय भक्ष म्हणजे जंगली हरण, सांबर, काळे हरण व डुक्कर. वाघ हा उत्तम पोहोणारा प्राणी असून काही शिकार न मिळाल्यास मासेही पकडून खातो. हा प्राणी दाट अशा हिरव्या जंगलात रहातो. मस्तकापासून शेपटापर्यंतची याची लांबी ८ ते ९ फूट, म्हणजेच २८०–२९० सें. मी. असते व वजन जवळजवळ २७० किलो इतके असते.

जखमी झालेला वाघ मात्र एकाएकी नरभक्षी बनतो.



# बालक कोविद

मद्रासमधे नुकटयाच झालेल्या संगीतोत्सवात बारा वर्षाच्या बाल कोविद शशांकने दोन तासपर्यंत अद्भुत असे वेणु वादन (बासरी) करून श्रोत्यांना आनन्दसागरात बुडवून ठेवले होते. साधारणपणे संगीतोत्सवात संध्याकाळी ६ ते ९ ही वेळ केवळ प्रतिष्ठाप्राप्त विद्वानांसाठीच राखून ठेवलेली असते. पण अशी प्रतिष्ठाप्राप्त वेळ कार्यकर्त्यांनी या बाल-कोविदाला दिली अन् या संगीतज्ञ बालकाने कार्यकर्त्यांचा विश्वास दुणावून हे सुंदर बासरीवादन केले व संगीत-प्रेमी रसिकांना मोहवून टाकले. इतकेच नव्हे, तर टीकाकारांनाही खूष करण्यात शशांक सफल झाला.

शशांक अगदी शैशवावस्थेतच संगीताकडे आकृष्ट होत असे. शशांकचे वडील सुब्रह्मण्यमही एक बासरीवादकच. ते जेव्हां बासरीवर एकादा राग आळवत, तेव्हां शशांक ते मोठ्या आवडीने ऐकत राही. काही राग तर त्याला फारच आवडायचे. हे राग जेव्हां त्याचे वडील वाजवत, तेव्हां तो शुद्धबुद्ध हरपून व विश्रान्तीही न घेता ते ऐकत राही. शशांक जेव्हां अवघा तीनच वर्षाचा होता; तेव्हांच तो ७० मुख्य मुख्य असे राग ओळखत असे. मुलाचे संगीताबद्दलचे हे आकर्षण पाहून पित्याने मुलाला पद्धतशीर संगीत शिकवण्याची व्यवस्था करून टाकली. मुलाला व्हायोलिन शिकवण्याचाही पित्याने प्रयत्न केला. परंतु व्हायोलिन सोडून, त्याने आपल्या वडिलांची बासरीच उचलली. पित्याचे बासरीवादन त्याने खूपच लक्षपूर्वक पाहिले–ऐकले होते. त्यामुळे शशांक ती सहज वाजवू शकला. शशांकला उच्च प्रतीचे संगीत-शिक्षण मिळाले. यासाठी त्याच्या संपूर्ण परिवारानेच आतापर्यंत रहात असलेले बेंगलोर हे शहर सोडून कर्नाटक संगीताचे प्रमुख स्थान मद्रास येथे स्थलांतर केले. अर्थात त्यासाठी पित्याने कॉलेज मधील आपली प्राध्यापकाची नोकरीही सोडून दिली.

शशांकने परदेशात प्रथमतः ऑस्ट्रेलियातील ॲडलेड येथे जेव्हा आपला पहिला कार्यक्रम केला, तेव्हां त्याचे वय अवघे दहा वर्षाचेच होते. तेथून स्वदेशी परतताना सिंगापुर व मलेशिया येथेही त्याचे कार्यक्रम झाले.

आपल्या देशात प्रथम १९९० मधे मुंबईच्या एका प्रतिष्ठित अशा संगीत-सम्मेलनात शशांकने आपले बासरी-वादनाचे प्रदर्शन केले. यानंतर अन्य संगीत-सांस्कृतिक संस्थाही त्याला कार्यक्रमासाठी आमन्त्रणे देऊ लागल्या. तो जेथे जातो, तेथे श्रोते त्याचे बासरी-वादन ऐकून मंत्रमुग्ध होतात.

इतर विषयात मात्र शशांकची गति अन्य सर्वसाधारण मुलांप्रमाणेच आहे. शाळेत जायला मात्र त्याला फारसे आवडत नाही. कधीकधी तो हट्ट करतो, आणि बासरी हातातच धरत नाही. अशा वेळी त्याला समजावणे, त्याच्या नाकदुऱ्या काढणे किंवा क्वचित त्याला रागावणेही भाग पडते असे, असे त्याच्या वडिलांनी सांगितले. इतर मित्रांबरोबर खेळण्यापेक्षा आपल्या बहिणींबरोबर खेळणे त्याला जास्त आवडते. त्याला मोकळे सोडले की तो फक्त ऑडियो कॅसेट ऐकतच आपला वेळ घालवतो.

इतके असूनही, शशांकचे पूर्ण कुटुंब आज केवळ त्याच्या कमाईवरच जगत आहे, हे कळले की आश्चर्य वाटते ना?

# तुम्हाला माहीत आहे?

१. संयुक्त राष्ट्रसंघाचा पहिला मुख्य सचिव कोण होता?
२. कॉमनवेल्थ-दिवस केव्हां साजरा केला जातो?
३. जवाहरलाल नेहरूंनी 'डिस्कव्हरी ऑफ इंडिया' हे पुस्तक कोणत्या जेलमधे असताना लिहिले?
४. 'द लेडी विथ द लॅम्प' या नावाने प्रसिद्ध झालेली स्त्री कोण?
५. महम्मद पैगंबरचे माता-पिता कोण?
६. 'उडती तबकडी' पाहिल्याची वार्ता प्रथम केव्हां मिळाली?
७. येशूला सुळावर चढवले तेव्हां आपल्या आईची काळजी वाहण्याबद्दल त्याने कोणत्या शिष्याला सांगितले?
८. 'ओल्ड टेस्टामेंट' मधे नोहाचे आजोबा म्हणून कोणाचा उल्लेख आहे?
९. चन्द्रमंडळावर उतरलेली पहिली मानवनिर्मित वस्तु कोणती?
१०. माओ त्से तुंगने 'पीपल्स रिपब्लिक ऑफ चायना' ची स्थापना केव्हां केली?
११. आपल्या लेखनात अटलांटिसचा उल्लेख कोणी केला?
१२. राइट-बंधूंनी प्रथम आकाश-यात्रा केली. व्यवसायाने ते कोण होते?
१३. इटलीतल्या एका महिला डॉक्टरने आपल्या व्यवसाया पेक्षा विपरीत अशा निराळयाच एका क्षेत्रात नाव कमावले. ही महिला कोण?
१४. अमेरिकेतील कोणत्या सिनेनटीचे चित्र पोस्टाच्या तिकिटावर छापले गेले?
१५. कोणत्या देशाचा क्रिकेट हा 'राष्ट्रीय खेळ' आहे?

## उत्तरावली

१. ट्रिग्वे ली.
२. २४ मे.
३. अहमदनगरचा किल्ला.
४. क्रिमियन युद्धात (१८५३-५६) जखमी सैनिकांची शुश्रूषा करणारी फ्लॉरेन्स नाइटिंगेल.
५. अमीना व अब्दुल्ला.
६. जून २४, १९४७ रोजी. या दिवशी एका वैमानिकाने उडती तबकडी प्रथम पाहिली.
७. जॉन.
८. मॅथ्युसेला. हा एकूण ९६९ वर्षे जगला असे बायबलमधे म्हटले आहे.
९. रशियाने पाठवलेले अंतराळयान लूना-२. हे १३ सप्टेंबर १९५९ रोजी चन्द्रमंडळावर पोचले.
१०. २१ सप्टेंबर १९४९. सोवियट संघाने त्याला सर्वात अगोदर मान्यता दिली.
११. ग्रीकचा तत्त्वज्ञ प्लेटो.
१२. सायकलचे दुकान व कारखाना चालवत असत.
१३. मारिया मॉंटेसरी. या सुप्रसिद्ध शिक्षण-तज्ञेच्या नावे काही शैक्षणिक सिद्धांत प्रसिद्ध आहेत.
१४. ग्रेस केली. 'द कंट्री गर्ल' या चित्रपटातील कामाबद्दल तिला ऑस्कर ॲवॉर्ड मिळाले होते.
१५. ऑस्ट्रेलिया.

## छोट्या बालकाचे सोन्यासारखे मन



नुकतेच उत्तरप्रदेशात भूकंपामुळे अनेक लोकांचे अतिशय नुकसान झाले. भूकंप-पीडितांच्या मदतीसाठी अनेक सरकारांकडून खूपसे धन आले. या भूकंपामुळे दुःखी झालेली बालके टी. व्ही. मधे पाहून एका चिनी मुलाचे मन द्रवले. त्याने ६०० रुपये त्यांच्या मदतीसाठी पाठवले. चीनमधील शांघाय येथे रहाणाऱ्या या दहा वर्षाच्या मुलाने आपल्या पित्याकरवी बीजिंगमधील भारतीय दूतावासाकडे १०० येन या भूकंप-पीडितांसाठी पाठवले. ही रक्कम म्हणजे त्याला एका टी. व्ही. सीरियलमधे काम केल्याबद्दल मिळालेल्या मेहेनतान्याचा अर्धा हिस्सा होय. बाकीचा अर्धा भाग त्याने अगोदर चीनमधील पूर-पीडित लोकांच्या मदतीसाठी दिला होता.

# चांदोबाच्या बातम्या

## नावेमधून पॅसिफिक-सफर

"एकेक मिनिट एकेका तासासारखे वाटले. एक-एक तास एकेका दिवसासारखा भासला." पॅसिफिक महासागराची सफर नावेतून पार करणाऱ्या जेरॉल्ड डी. अवोयिल या ४१ वर्षाच्या फ्रेंच माणसाचे हे उद्गार आहेत.

८ मीटर लांबीच्या नावेत बसून जपानच्या पूर्व तटावरून त्याने आपली सफर सुरू केली; व नाव वल्हवत १३३ दिवसात १०,००० कि. मी. अंतर कापून तो २१ नोव्हेंबरला अमेरिकेतील ओरिगान या पोर्टलॅण्ड समीपच्या स्थानी पोचला. शारीरिक रूपाने खूप थकलेला असला, तरी मनाने तो फारच आनन्दी दिसत होता.





# जावे त्याच्या वंशा

श्रीपुर गावात गोवर्धन नावाचा एक धनवान इसम रहात असे. त्याचे अनेक प्रकारचे व्यवसाय असल्यामुळे त्याच्याकडे नोकर-चाकरही खूप असत. पण हा गोवर्धन आपल्या नोकरांकडून कसून काम घेणेच फक्त जाणत असे, त्यांच्या काही अडचणी, आजार वगैरेंचा तो कधी विचारच करत नसे. बिचाऱ्या नोकरांना जेमतेम एकवेळ पोट भरेल इतकीच मजुरी मिळे. पण करणार काय? मुकाट्याने सारे सहन करण्यापलिकडे त्यांना गत्यन्तर नव्हते!

हे सर्व पाहून पाहून गोवर्धनची पत्नी सुजाता व पुत्र गिरिधर या दोघांनाही फार वाईट वाटे. पण तेही याबाबत काही करू शकत नसत.

गोवर्धनजवळ एक देखणीशी बग्गी होती. त्या बग्गीतून तो नेहमीच कामानिमित्त जवळच्या शहरी किंवा अन्य गावी जात असे. बग्गीच्या घोड्याची तो मोठ्या प्रेमाने खूप काळजी घेई, पण बग्गी चालवणारा बीरू मात्र त्याच्या लेखी कोणीच नव्हता.

शहरात जाताना एका जंगलातून जावे लागे. त्यात केवळ हींस्र पशुच नव्हे, तर राक्षसी वृत्तीचे चोर–दरोडेखोरही असत. एके दिवशी बायको व मुलाला बरोबर घेऊन गोवर्धन कुणा नातेवाईकाकडील लग्नासाठी बग्गीत बसून शहराकडे निघाला. सुजाताने बरोबर बरेचसे सामान घेतले होते आणि मुलाच्या सूचनेवरून गोवर्धनने व्यापारासाठी काही मालही बरोबर घेतला होता. पहाटेच ते सर्व घरून निघाले आणि दुपार होता होता जंगलात पोचले.

वाटेत बीरू अचानक लगाम सोडून, आपली छाती चोळत बग्गीतच कोसळला अन् जोरजोरात कण्हू लागला. दुसऱ्याच

सौ. राधा भागवत



क्षणी घोडा बग्गीपासून सुटून सैरावैरा धावत झाडीत दिसेनासा झाला. इकडे वेगात असलेली बग्गी तशीच घोड्याविना उताराच्या रस्त्यामुळे पुढे सरसरत राहिली आणि एका झाडाला टक्कर देऊन थांबली! गोवर्धन, सुजाता व गिरिधर कसेबसे बग्गीतून खाली उतरले. बीरू मात्र बग्गीत कण्हत राहिला. त्याला काही बोलण्याइतकीही शुद्ध नव्हती!

"नशीब आपलं! नाहीतर बग्गीच उलटली असती!" जोराने सुस्कारत गोवर्धन म्हणाला.

"आता काय करायचं?" गिरिधर विचारू लागला.

"काय करणार? आपण तिघं थोडं-थोडं सामान उचलून चालायला लागू या, दुसरा मार्गच काय?" सुजाता म्हणाली.

खरे तर तिघेही हींस्र पशु आणि दरोडे-खोरांच्या भीतीने मनोमन इतके घाबरले होते, की बीरूचा विचारही त्यांना शिवला नाही. थोडे थोडे सामान डोक्यावर घेऊन तिघेही चालू लागले.

पण जरा दूर जाताच सुजाताला बीरूची आठवण झाली. ती म्हणाली–"आपण बीरूला तसाच सोडून आलो की! बिचाऱ्याची जंगलात काय परिस्थिति होईल कुणास ठाऊक!"

"याचा आत्ता काय विचार करायचा? शहरात पोचलो की त्याच्यासाठी माणूस पाठवू. तुम्हाला फक्त बीरूच सुचतोय; पण घोडा आणि बग्गीचं काय? त्यांची किंमत किती आहे माहित?" गोवर्धन चिडून गेला.

मोठ्या कष्टाने फर्लांगभरही चालले नसतील, इतक्यात 'ओझं वहाणं म्हणजे काय असतं' हे त्यांना कळून चुकले. जंगल पार करून आता ते कडक उन्हात ताप-लेल्या रेतीच्या उघड्या माळावर येऊन पोचले होते. तोपर्यंत तिघेही अतिशय थकून गेले होते. त्यातल्या त्यात सर्वात जड पेटी डोक्यावर घेतलेल्या गोवर्धनला आता एक पाऊलही पुढे टाकणे अवघड झाले. पेटी खाली ठेऊन त्यावर बसत तो बायकोला म्हणाला–"फार तहान लागली ग, घशाला शोष पडलाय नुसता! पाण्याचा तांब्या कुठंय तो दे बघू?"

दचकून सुजाता म्हणाली–"तो तर गाडीतच राहिला हो!"

आता मात्र कडक उन्हात ओझी वहा-णाऱ्या आपल्या नोकरांचे तहानेने व्याकुळ-लेले चेहरे गोवर्धनच्या नजरेसमोर नाचू लागले! 'पाणीही पिऊ न देता ओझी वहायला लावून आपण त्यांना किती सतावत होतो!' याची जाणीव आता त्याला होऊ लागली. इतक्यात हृदयविकाराने छातीत दुखत असलेल्या, अन् आपण तसेच बग्गीत सोडून आलेल्या म्हाताऱ्या बीरूचीही गोवर्धनला आठवण आली. त्याला एकटाच सोडून आल्याबद्दल गोवर्धनला स्वत:चीच लाज वाटू लागली.

गोवर्धन तसाच उठला अन् मागे वळून म्हणाला–"गाडीतून तो फिरकीचा तांब्या घेऊन येतो. तुम्ही दोघं इथंच थांबा तोवर."

यावर गिरिधर म्हणाला–"बाबा, तुम्ही थांबा इथेच, मीच जाऊन आणतो पाणी."

पण गिरिधरला थांबवत गोवर्धन म्हणाला–"मी खरं तर पाण्यासाठी नव्हे, पण म्हाताऱ्या बीरूसाठी जायला निघालो होतो! चल, आपण घोडा शोधून काढू अन् बीरूला शहरात नेऊन प्रथम एकाद्या वैद्याकडे नेऊ. चल बेटा!"



गोवर्धनच्या तोंडून हे शब्द ऐकून सुजाता व गिरिधर एकमेकांच्या चेहऱ्याकडे पहातच राहिले. त्यांना पाहून गोवर्धन म्हणाला– "आजपर्यंत मी बरोबरच्या लोकांशी अमानुषपणे वागलो. आजचा अनुभव म्हणजे मला एक धडाच झाला! म्हणतात नं–'जावे त्याच्या वंशा, तेव्हां कळे'? मला आत्ता कळलं की तहान-भुकने व्याकुळलेले माझे नोकर उन्हात कशी ओझी वहात असतील!"

इतक्यात त्यांना घोड्याच्या टापांचा आवाज ऐकू आला. बग्गी घेऊन बीरू त्यांच्याकडेच येत होता!

लवकर लवकर बग्गीजवळ पोचत गोवर्धन म्हणाला–"बीरू, छातीत दुखत असताना हा त्रास कशाला घेतलास बाबा? घोडा शोधून, बग्गी जोडून अशा आजारात आलासच कसा?" हे विचारणाऱ्या गोवर्धनच्या आवाजात दया, करुणा ओत-प्रोत भरलेली होती.

"मालक गेली सोळा वर्षं हे दुखणं मागं असूनच काम करत आलोय न मी! ते काही खाणार नाही मला, सवय झाली आता! अन् हा घोडा तरी जाणार कुठं? झक्कत परत आला गाडीजवळ. पण माझ्या-मुळे आज आपणावर ओझं उचलायची पाळी आली. माफ करा मालक मला!" बीरू बोलला.

हे ऐकून गोवर्धनचा चेहरा प्रसन्न झाला. बीरूची पाठ थोपटत तांब्या उचलून त्याने घटाघटा पाणी प्यायले. आणि म्हणाला– "अरे पण काही चूकच नाही, तर माफी कसली? झालं ते छानच झालं! आता मला कळून चुकलं की नोकरांना निर्दयपणे वागवू नये. ओझं वहाणाराचा बोजा, नुसते पहाणाराला काय करणार? जावे त्याच्या वंशा...."

नंतर बायको व मुलासह बग्गीत बसून गोवर्धन शहरात पोचला. या घटनेनंतर गोवर्धनन पार बदलून गेला, नोकरांच्या बाबतीत तो खूप उदार झाला. तेही गोवर्धनला आपला भगवान मानून सर्वां-समक्ष त्याची स्तुतिस्तोत्रे गाऊ लागले!



# हिंसा

जंगलाजवळच्या गावात रहाणारा एक शेतकरी संध्याकाळपर्यंत शेतातलं काम उरकून परत येत होता. रस्त्याच्या बाजूनं त्याला वाघाची डरकाळी ऐकू आल्यानं तो वळून तिकडे पाहू लागला. चार-फुटांवरच दोन झाडांच्या खोडांमधे अडकलेला वाघ बाहेर निघण्यासाठी धडपडत असलेला दिसला त्याला!

शेतकऱ्याला भीति वाटली की, वाघ आता जर स्वतःला सोडवण्यात सफल झाला तर प्रथम तो आपलीच चटणी उडवील! म्हणून त्याने विचार केला की वाघाला आत्ता मारून टाकलं, तरच आपली खैरियत! झटकन तो वाघाजवळ गेला आणि त्याने त्याचे मागचे दोन्ही पाय घट्ट पकडले. पण जवळच्या कोयत्याने ते पाय कापून टाकणं त्याला अशक्य होऊ लागलं. इकडे वाघही धडपडून शेतकऱ्याच्या पकडीतून आपले पाय सोडवून घ्यायचा प्रयत्न करू लागला. 'आता काय करावं?' शेतकरी विचारात पडला. इतक्यात त्या रस्त्याने जाणारा एक संन्यासी, शेतकऱ्याला दिसला. त्याला तो म्हणाला–"महाराज, आपल्याला दिसतंच आहे ना? मी हे पाय असेच धरून ठेवतो. तुम्ही तेवढे वाघाचे पाय या धारदार कोयत्याने कापून टाका."

पण मान हलवत संन्यासी म्हणाला–"छे, छे! मी हिंसा नाही करणार, माफ कर बाबा मला! मी कधी हत्याराला स्पर्शही करत नाही."

"बरं, मग तुम्ही हे पाय पकडा; मी वाघ मारतो!" शेतकरी म्हणाला.

संन्याशाने वाघाचे पाय धरले. पण शेतकरी मात्र पटकन कोयता घेऊन तिथून निघून जाऊ लागला! आश्चर्यानं संन्यासी विचारू लागला–"अरे, निघून का चाललास बाबा? वाघाला कोण मारणार मग?"

शेतकरी उत्तरला–"स्वामीजी, तुमचं बोलणं ऐकून मी ही विरक्त झालो; हिंसा सोडून दिली मी! आता तुम्ही मला वाघ मारायला सांगाल तर ते ठीक नाही होणार, कारण पाय पकडून राहिलेल्या तुम्हालाही त्यातलं पाप लागेल ना? ते ही नकोय मला!" अन् इतकं बोलून शेतकरी गावाकडे निघून गेला.





# गुरु व शिष्य

राजा यशपालला दोन पुत्र होते. मोठा श्रीधर चांगला चलाख व बुद्धिमान होता, पण धाकटा जलंधर मात्र एक नंबरचा मूर्ख होता. दोघांना एकाच गुरूकडे शिकायला पाठवायचे असे राजाच्या मनात होते. यासाठी तो दंडकारण्यात रहाणाऱ्या सांदीपकडे गेला.

राजाची इच्छा ऐकून सांदीप म्हणाला– "मी आता म्हातारा झालोय. गुरुकुल चालवायची शक्ती माझ्यात उरली नाही. पण माझे दोन शिष्य राजधानीतच रहातात. त्यांना चांगलं नावही मिळालंय आतापर्यंत! त्यांच्यापैकी एकाकडून आपली इच्छापूर्ति होऊ शकेल."

राजा प्रथम बृहस्पति नावाच्या शिष्याकडे गेला व त्याने आपल्या मनातली गोष्ट त्याला सांगितली. ते बोलणे ऐकून बृहस्पति म्हणाला–"राजाचंच काय, पण खुद्द देवाचा मुलगा जरी माझ्याकडे आला, तरी त्याची परीक्षा घेतल्यावाचून मी त्याला आपला शिष्य बनवून घेत नसतो."

बृहस्पतीचे हे बोलणे ऐकून राजा चांगलाच संतापला, आणि तो सांदीपचा दुसरा शिष्य शिलासंस्कारी याच्याकडे गेला.

मोठ्या आदराने राजाला बसवून घेत शिलासंस्कारी त्याला म्हणाला–"खूप कष्ट करून का होईना, पण जो एखाद्या पशूलाही माणसासारखा ज्ञानी बनवू शकेल, तोच खरा गुरु!"

राजा यशपाल राजवाड्यात परतल्यावर त्याने आपल्या मन्त्र्याला बोलावून या साऱ्या घटना सविस्तर सांगितल्या आणि त्याला विचारले–"माझ्या राजधानीत बृहस्पतीसारख्या अहंकारी माणसाला काही स्थान नाही. त्याला बोलावून त्याचा चांगला पाणउतारा केल्यावाचून मला चैन पडणार नाही. यासाठी काय करावे."

मन्त्र्याने सुचवले–"अशा प्रकारे शिक्षण देणाऱ्या सर्व गुरुंच्यात आपण एक स्पर्धा ठेऊया. मूर्खांनाही विद्वान करून सोडणाऱ्या शिलासंस्कारीपुढे या बृहस्पतीचा काय पाड? आपोआपच अपमानित होईल तो! यापेक्षा दुसरी उचित शिक्षा ती कोणती?"

यशपालने ही सूचना स्वीकारली. पण स्पर्धेत बृहस्पतीच एकटा लायक ठरला!

राजाने आश्चर्याने त्याला विचारले– "महाशय, इतकं पांडित्य आपणाजवळ आहे, अहंकार त्याला बाधक नव्हे का?" मोठ्या नम्रतेने राजाला नमस्कार करून बृहस्पति म्हणाला–"अहंकार हा पंडिताचा सद्‌गुण नव्हेच! मी मुद्दामच आपणा समोर अहंकार दाखवला. मला वाटलंच होतं, की आपण अशा स्पर्धा ठेवाल! बरोबर तसंच घडलं! मी स्वतःला प्रथमच 'महान्' म्हणवून घेऊ शकलो असतो, पण आपण ठेवलेली स्पर्धा जिकूनच माझं समाधान होणार अन् लोकांच्यात माझी योग्यता सिद्ध होणार ना?"

त्याच्या या चतुराईने राजा प्रसन्न झाला. तो म्हणाला–"आपणात अहंकार नाही हे जाणून मला आनन्द वाटला! आता माझ्या दोन्ही मुलांना शिष्य बनवून घ्या ना."

"महाराज, परीक्षा घेण्याचा माझा आग्रह आपणाला पसंत नसेल तर आपण



आपल्या मुलांना शिलासंस्कारीकडे पाठवा." बृहस्पति उत्तरला.

आता यशपालला पुन्हा राग आला! अध्यापकांच्या स्पर्धेत तर शिलासंस्कारीला शेवटचे स्थान मिळाले होते. या गोष्टीची आठवण देऊन राजाने विचारले–" राजाच्या मुलांची चांगल्या गुरूकडून विद्याग्रहण करण्याची योग्यता नाही, असं म्हणायचं आहे काय तुम्हाला?"

यावर थोडे हसत बृहस्पति बोलला– "महाराज, एकाद्या गुरूचं सामर्थ्य आणि त्याचं स्वतःचं पांडित्य, यात काहीही संबंध नसतो. मी आतापर्यंत जितकं अध्ययन केलं, तितक्यापासून अजूनही माझी तृप्ति झालेली नाही. अजून शिकत रहावं अशी माझी इच्छा आहे. म्हणूनच मी केवळ समर्थ असे शिष्यच स्वीकारतो. मी जे काही शिकवतो, तेवढ्याने ते कधीच तृप्त होत नाहीत. आपल्या बुद्धीची चमक दाखवून ते मला नेहमीच नवनवे प्रश्न विचारतात. त्यांची उत्तरं देण्यासाठी मलाही माझ्या ज्ञानात भर घालावी लागते. सर्व मिळून चर्चा करण्याने नवनवीन ज्ञानाचा उदय होत रहातो. अशा तऱ्हेने माझ्या बुद्धीचा विकास होतो, ती अधिकाधिक तीक्ष्ण होत रहाते. म्हणजे एका अर्थी माझे शिष्य हेच माझे गुरु असतात. पण शिलासंस्कारीची गोष्ट अशी नाही. तो स्वतःची बुद्धि वाढवण्यासाठी नव्हे, तर शिष्यांची बुद्धि वाढवण्यासाठी शिकवत असतो. त्यामुळे पांडित्यात जरी तो कमी पडला, तरी एक गुरु म्हणून तो माझ्यापेक्षा श्रेष्ठ आहे."

'बुद्धिमान शिष्यामुळे गुरुचे ज्ञान वाढते. बुद्धिहीन शिष्यामुळे तसे घडत नाही. परंतु सहजपणे ज्ञानार्जन व्हावे म्हणून नवीन पद्धति शोधून काढण्यासाठी त्यांच्यामुळे प्रेरणा मिळते.' ही गोष्ट पटल्याने राजा यशपालने श्रीधरला बृहस्पतीकडे आणि जलंधरला शिलासंस्कारीकडे शिष्य म्हणून पाठवले. त्या त्या गुरुकुलात राहून राजकुमारांना चांगला फायदा मिळाला आणि लवकरच श्रेष्ठ विद्वान बनून दोघे ही राजाकडे परत आले.





# वीर हनुमान

नलाच्या सांगण्यानुसार रामाने जेव्हा आदेश दिला, तेव्हा वानरांच्या झुंडीच्या झुंडी जंगलाकडे निघाल्या. त्यांनी निरनिराळे वृक्ष समूळ उपटले आणि त्यांना समुद्रावर टाकायला सुरुवात केली. शक्तिशाली वानरांनी हत्तीच्या आकाराचे दगड आपल्या खांद्यांवर उचलून समुद्रात टाकले. यामुळे समुद्राच्या पाण्याची उंची वाढू लागली. समुद्राच्या पाण्यात कल्लोळ उठले.

हा बनत चाललेला सेतु वेडा-वाकडा होऊ नये म्हणून काही वानरांनी दोऱ्या बांधल्या. काही वानर मापदंड हाती घेऊन काम करू लागले. नल बनवीत असलेला हा सेतु दहा योजन रुंद व शंभर योजन लांब होता. रोज वीस योजन याप्रमाणे पाच दिवसात सेतु बांधण्याचे काम पूर्ण झाले. नलाच्या सामर्थ्यामुळेच हे काम पूर्ण होऊ शकले. वानर अतिशय आनंदित होऊन इकडे तिकडे उड्या मारू लागले.

सुंदर राजमार्गाप्रमाणे बनलेल्या या सेतूवरून वानर सैन्य समुद्र पार करून गेलं. शत्रू आला तर त्याला मारण्यासाठी विभीषण चार सहकाऱ्यांसह गदा पकडून अगोदरच समुद्र पार करून पलिकडे जाऊन उभा राहिला.

सेतूवरून सागर पार करताना राम हनुमानाच्या व लक्ष्मण अंगदाच्या खांद्यावर बसले. त्यांची सेतूवरून चालत जावे हे सुग्रीवाला मान्य नव्हते. हनुमान नि अंगदाने आकाश-मार्गानेच राम-लक्ष्मणांना समुद्रा



पलीकडे उतरवले. काही बलवान वानर उडत-उडतच समुद्राच्या दुसऱ्या बाजूला पोचले. वानरांची संख्या खूपच मोठी होती, धक्काबुक्कीत काही वानर समुद्रात पडले, समुद्रातून बाहेर येऊन मग सेतूवर चालायला लागले. वानरांच्या कोलाहलात समुद्राच्या लाटांचा आवाज बिलकुल ऐकू येत नव्हता.

समुद्राच्या पलीकडे फळांनी भरलेल्या वृक्षांची जंगले होती. वानर-सैन्याला हा प्रदेश फार उत्तम वाटला. पण रामाने लगेच लंका-नगरीकडे कूच करण्याचे ठरवले. राम पुढे चालू लागला व मागे सिंहनाद करीत वानर-सेना लंका-नगरीकडे निघाली. वानरांचा उत्साह पाहून रामाला खूप आनंद झाला.

वानर-सेना लंका-नगरीच्या बाहेर उभी राहिली. तेथील राक्षसांच्या हालचाली सुरू झाल्या व त्यांच्या विविध वाद्यांचे आवाज ऐकू येऊ लागले. वानरांना राग आला नि त्यांनी आणखी जोरात आरडा-ओरडा करायला सुरुवात केली. लंकेत ध्वज-स्तंभांवर फडफडणाऱ्या विविध पताका पाहून आणि सीतेचे स्मरण करून रामाच्या डोळ्यात अश्रु आले.

तो लक्ष्मणाला म्हणाला–"त्रिकूट पर्वतावरील ही गगनचुंबी लंकानगरी पहा! विश्वकर्म्याने ही निर्माण केलेली आहे."

यानंतर रामाने वानर-सैन्याला व्यूह-रचनेबाबत सूचना दिल्या. अंगद आणि नील यांचे सैन्य व्यूहाच्या मध्यभागी राहील. ऋषभ व त्याची सेना उजव्या बाजूस मागे राहील. गंधमादन आपल्या सैन्यासह डाव्या बाजूस मागे असेल. राम व लक्ष्मण व्यूहाच्या पुढे असतील. सुग्रीव आपल्या सेनेच्या मागील भागात राहील, साऱ्या वानर सेनेची रचना गरुड व्यूहात केली गेली. लंकेवर आक्रमण करून तिचा सर्वनाश करण्यासाठी वानर उतावळे झालेले दिसले.

राम सुग्रीवाला म्हणाला–"रावणाचा दूत शुक याला आता सोडून द्या."

वानरांनी केलेल्या अत्याचारांमुळे तळ-मळणाऱ्या शुकाला आतापर्यंत आपल्या प्राणांचं भय होतं. सुग्रीवाने त्याला मुक्त कर-



ताच तो ताबडतोब सटकला नि रावणापाशी जाऊन पोचला. रावणाने शुकाकडे पाहिलं नि हसत म्हणाला–"अरे, तुझे तर पंख तोडलेले दिसत आहेत. तू वानरांच्या तावडीत तर नाही ना सापडलास?" तेव्हा शुक रावणाला म्हणाला–"मी समुद्रा पलीकडे गेलो, आणि तुमचा संदेश जशाचा तसा सांगितला. यावर वानर रागावले आणि त्यांनी मला पकडून माझे हाल-हाल केले. ते माझं बोलणं ऐकूनच घ्यायला तयार नव्हते. मग ते उत्तर काय देणार? ते नुसते लहरी नि रागीट आहेत असं नव्हे, ते मूर्ख पण आहेत. समुद्रात सेतु बांधून आता राम वानरांसह लंका-द्वारी येऊन पोचलेला आहे. आता लंकेच्या प्रवेश द्वारी असंख्य वानर दिसत आहेत, जणू काही जमीन वानर-संततीला जन्म देऊ लागली आहे. वानर आणि राक्षस यांच्यात आता युद्ध अटळ आहे. वानर आता कोणत्याही क्षणी लंकेच्या तटांवर चढू शकतील. आता तुमच्यासाठी फक्त एकच मार्ग उरला आहे. बऱ्या बोलाने सीतेला परत करायचं अथवा मरायचं!" शुकाच्या या सर्व कथनामुळे रावणाचे डोळे रागाने लाल झाले.

तो म्हणाला–"सर्वांनी मिळून माझ्यावर एकदम आक्रमण केलं तरी मी सीतेला परत करणार नाही. बराच काळ गेला, मी युद्ध केलं नाही. आता मोठ्या उत्साहाने मी युद्धाच्या संधीची वाट पहात आहे. रामाला





बिचाऱ्याला माझं बळ नि पराक्रम याची कल्पना नाही, म्हणून माझ्यावर हल्ला करू पहातो आहे. माझ्या बाणांची शक्ति अजून त्याने पाहिली आहे कुठे?"

नंतर रावण आपला मंत्री शुक व सारण यांना म्हणाला—"समुद्रावर सेतु बांधणं हे काही सोपं काम नाही. वानरांनी सेतु बांधला आहे यावर माझा मुळिच विश्वास नाही. तुम्ही गुप्तपणे जाऊन पाहून या कि खरंच सेतु बांधला आहे की काय? आणि जर ही गोष्ट सत्य असेल तर तुम्ही जरा अंदाज घ्या की वानर सेना किती आहे, नि रामाच्या जवळ कोणकोणती शस्त्रास्त्रं आहेत?"

शुक आणि सारण यांनी वानरांचे रूप घेतले नि ते वानरसेनेत सामिल झाले. वानरांच्या संख्येची मोजदाद करणं त्यांना मुळिच शक्य नव्हतं. सर्वत्र वानरसेना पसरलेली होती आणि सेतूवरून अजून ही अनेक वानर येतच होते.

इतक्यात विभीषणाने त्या दोघांना ओळखून पकडलं नि रामाला सांगितलं— "हे शुक व सारण नावाचे दोन राक्षस आणि हे रावणाचे मंत्री आहेत. हे वानर रूप धारण करून आपल्या गुप्त गोष्टी जाणण्यासाठी इथं आले असावेत!"

तेव्हा शुक व सारण यांनी रामाला नमस्कार केला आणि हे कबूल केलं की विभीषण म्हणतोय ते खरं आहे आणि वानर-सेनेची संपूर्ण माहिती मिळविण्या-साठी ते इथे आलेले आहेत. राम हसून म्हणाला—"असं? माझं सैन्य पहायला आलात तर तुम्ही? नीट पाहून घ्या आणि परत जा रावणाकडे, अजून जर तुमचं निरीक्षण संपलं नसेल तर हा विभीषण तुम्हाला सगळी सेना दाखवील. तुम्ही आता नि:शस्त्र आहात म्हणून तुम्हाला ठार मारणं योग्य नाही." रामाने त्या दोघांना सोडून द्यायला विभीषणाला सांगितलं.

रामाने त्यांच्या हस्ते रावणाला एक संदेश ही पाठवला—"रावणा, उद्या सकाळी तू माझा राग पाहणार आहेस. मी आपले वज्रायुध तुझ्यावर फेकणार आहे."

शुक आणि सारण यांनी रामाचा जय-जयकार केला. आणि नंतर रावणाकडे जाऊन म्हणाले—"राजन्, वानरांच्या सैन्यात आम्ही प्रवेश तर केला, पण विभीषणाने आम्हाला ओळखले नि पकडून रामाच्या ताब्यात दिलें. रामाने आमच्यावर दया केली नि आम्हाला सोडून दिले. पण ही गोष्ट सोडून द्या. वानर सेने बरोबर राम, लक्ष्मण, विभीषण व सुग्रीव हे सर्वजण आहेत. रामाचे बाण पाहिले की असं वाटतं की त्याला अन्य कोणाची मदत आवश्यक नाही आणि वानर-सैन्याने आता समुद्र पार केलेला आहे, अन् त्यांची संख्या इतकी विशाल आहे की ते कुठे संपतात हेच कळत नाही. युद्धोत्साहाने वानर नाचत आहेत. युद्धाचा विचार सोडून तुम्ही सीतेला परत करावे हेच बरे!"

रावण सारणाला म्हणाला—"नाही, मी सीतेला मुळिच परत करणार नाही. तू फार सौम्य आहेस, पराक्रमी नाहीस! म्हणून तू वानर-सैन्य पाहून घाबरलास. युद्धात मला जिंकणारा अजून पैदा व्हायचाय!"

वानरांचं सैन्य पाहण्याची इच्छा रावणाच्या मनात निर्माण झाली. आपल्या महालाच्या गच्चीवर जाऊन त्याने पाहिले की लंका नगरीच्या चारी बाजूंना डोंगरांवर व जंगलांतून सर्वत्र वानरच वानर आहेत. जवळच उभ्या असलेल्या सारणाला तो म्हणाला—"खरंचच वानरांचे सैन्य खूपच विशाल आहे! त्यांच्यापैकी महान् बलवान,





पराक्रमी व चिकाटीने युद्धात भाग घेणारे कोण कोण आहेत? त्यांचा सेनापति कोण आहे? आणि त्या सुग्रीवाचे सल्लागार कोण आहेत?"

तेव्हा सारण म्हणाला–"वानर-सेनेचा प्रमुख आहे नील. आणि वानर-राज्याचा युवराज आहे अंगद. तो वालीचा मुलगा आहे, वालीसारखाच पराक्रमी आहे. हनुमानाला पाहिल्यापासून मी जाणतो. सेतु बांधणारा नल पण महा पराक्रमी आहे. ही वानर-सेना अजिंक्य आहे. त्या पांढऱ्या वानराचं नाव श्वेत आहे. युद्धात हा फार भयंकर होतो. ती लाल-पिवळया रंगाचे केस असलेली शेपटी दिसते आहे न, त्या वानराचे नाव आहे कुमुद. तो मोठा निर्दयी आहे आणि नेहमी युद्धासाठी उतावळा असतो."

रंभ, शरभ आणि मनस वगैरे महान वानरवीर व अन्य वानर सेनापतींची माहिती ही सारणाने रावणाला दिली. रामाच्या जवळच उभ्या असलेल्या आपल्या धाकट्या भाऊ विभीषणाला ही रावणाने पाहिले. नंतर त्याने भल्लूकांच्या प्रमुखां-बाबत ही माहिती दिली. प्रमुख भल्लूक जांबवत ही दाखवला.

सारणाच्या सांगण्यात ज्या गोष्टी राहून गेल्या, त्यांचे विवरण शुकाने पूर्ण केले, आणि हनुमानाच्या जवळ उभ्या असलेल्या राम व लक्ष्मणाकडे बोट दाखवून त्यांचे ही रावणाला दर्शन करवले. रावणाने रामाच्या जवळ असलेल्या आपल्या धाकट्या भावाला ही पाहिले. आता रावणाच्या मनात भय उत्पन्न झाले आणि त्याचे रूपांतर रागात झाले. शत्रूंच्या शक्तीचे गौरवाने वर्णन करणाऱ्या सारण व शुकावर रावण रागावला नि म्हणाला–"तुमच्या सारख्यांची मंत्री म्हणून नियुक्ति करण्या-पूर्वीच मला मरून जायला हवं होतं. धिक्कार करतो मी तुमचा! तुम्ही दोघांनी पूर्वी काही चांगली कामे केली आहेत म्हणून तुमचे प्राण घेत नाही. तुम्ही चाकरे व्हा कसे इथून!" रावणाचा







जयजयकार करीत ते दोघे तिथून रवाना झाले.

यानंतर रावणाने महोदराला सांगून काही गुप्तचरांना बोलावलं आणि आज्ञा केली–"या रामाबाबत पूर्ण माहिती काढून या!"

गुप्तचरांनी वेश बदलले आणि सुवेल पर्वतावर असलेल्या राम, लक्ष्मण, विभीषण व सुग्रीव यांचे नीट निरीक्षण केले. त्यांची चांगलीच घाबरगुंडी उडाली. विभीषणाने तावडतोब त्यांना ओळखले नि पकडून ठेवले. गुप्तचरांमध्ये शार्दूल मोठा दुष्ट होता. वानरांनी त्याला मारण्यापूर्वीच राम तेथे आला आणि त्याने शार्दूलासह सर्व राक्षस गुप्तचरांना मुक्त केलं. कसे-बसे आपले प्राण वाचवून त्यांनी लंकेकडे धूम ठोकली.

शार्दूलाकडे पाहून रावणाने जाणले की जरूर काही तरी बिघडले आहे. शार्दूलाने रावणाला सांगितले– "वानरांबाबत काही माहिती काढणं फार कठीण काम आहे. मला विभीषणाच्या सहकाऱ्यांनी पकडलं. नंतर वानरांनी माझा खूप छळ केला, शेवटी रामाने येऊन माझी सुटका केली. माझं भाग्य थोर, म्हणून माझे प्राण वाचले. लंकेवर हल्ला करण्यासाठी राम अगदी तयार आहे. सीतेला रामाकडे पाठवणं अथवा युद्धाला तयार होणं हे दोनच पर्याय आता आपल्यापुढे आहेत."

रावणाने पुन्हा सांगितलं की सीतेला रामाकडे पाठविणं शक्य नाही. नंतर त्याने शार्दूलाकडून वानरांच्या सेनापतींबाबत माहिती मिळवली.

यानंतर विद्युत्जिव्ह नावाच्या राक्षसाला बरोबर घेऊन रावण सीतेकडे गेला. विद्युत्जिव्हाला रावण म्हणाला–"तू आपल्या माया शक्तीने रामाचं एक शिर तयार कर, नंतर त्याच्या धनुष्यासारखं धनुष्य व बाण ही निर्माण कर. आपण सीतेला धोका देऊ या."

विद्युत्जिव्हाने ही निर्मिति करण्याचे कबूल केले. तेव्हा रावणाने आपला एक अलंकार काढून त्याला बक्षिस दिला.





# योग्य कोण?

कित्येक वर्षांपूर्वी चीनमधील एका गावात एक जमीनदार रहात असे. त्याला एकुलती एक मुलगी होती. ती दिसायला तर सुन्दर होतीच, परन्तु समर्थ अशा गुरुकडून तिने उत्तम अशी विद्याही प्राप्त करून घेतली होती. तिची बुद्धिमत्ता फार प्रखर होती. यामुळेच तिच्याशी विवाह करण्यास उत्सुक असे, श्रीमन्त घराण्यातले तीन युवक तिला मागणी घालण्यासाठी आले.

जमीनदाराने त्या तिघांना कित्येक प्रश्न विचारले, कित्ती परीक्षा घेतल्या, अन् शेवटी ओळखले की तिघेही अगदी एकसारखेच प्रतिभाशाली आहेत. कोणाची निवड करावी हे त्याला समजेना. त्यामुळे त्याने ठरवलें की आपला पति निवडण्याची जबाबदारी मुलीवरच सोपवावी. कारण तशी ती चांगलीच बुद्धिमान होती.

पित्याची इच्छा जमीनदाराच्या मुलीनें शिरसावन्द्य मानली. दिवस अन् महिने निघून गेले, तरी तिघांपैकी कोणाला निवडावे याबद्दल ती निर्णय करू शकली नाही. अशातच ती अचानक खूप आजारी पडली अन् अनेक वैद्यांकडून औषधोपचार करवूनही अखेर तिला देवाज्ञा झाली.

तिच्या मरणाने विवाहोत्सुक असे ते तीन तरूण अत्यंत दु:खी झाले. त्या तिघांनी तिच्या प्रेताचे एका सुन्दर बगीच्यात संगमरवरी समाधीत दफन केले. त्यांच्यापैकी एकजण रात्र-दिवस त्या समाधीशीच बसून राही, फुलांनी समाधि सजवी आणि अनन्त दु:खाच्या समुद्रात बुडून राही. त्याला तहान-भुकेचे ही भान राहिले नाही. मुलीच्या मरणामुळे दु:खविव्हल झालेल्या तिच्या पित्याची सेवा करत, दुसरा तरूण त्याच्याच घरी राहू लागला. पित्याला

चीनमधील लोककथा



मुलीच्या मरणाचे दुःख विसरता यावे यासाठी तो परोपरीने प्रयत्न करू लागला. आणि तिसरा युवक साऱ्या जगापासून विरक्त होऊन संन्याशी बनून, निरनिराळ्या महात्म्यां कडून ज्ञानोपदेश प्राप्त करत, सर्वत्र हिंडत राहिला.

एके दिवशी या संन्यासी युवकाला पत्ता लागला की, केवळ सर्वशास्त्र पारंगतच नव्हे, तर अनेक अद्‌भुत शक्ती प्राप्त करून घेतलेला कोणी एक महान पंडित, एका गावात रहात असतो. संन्यासी युवक लगेच त्याच्याकडे गेला.

पंडिताने संन्याशाच्या सर्व प्रश्नांची मोठ्या आदराने उत्तरे दिली आणि आपणा-बरोबर बसून भोजन करण्याचे आमन्त्रणही त्याला दिले.

दोघेही भोजन करू लागले. तेवढ्यात पंडिताचा दहा वर्षांचा पुत्र तेथे आला आणि 'मला हे हवं, ते हवं' म्हणत पित्याला सतावू लागला. थोडा वेळ हे सर्व सहन केल्यावर पंडित मुलावर फार फार रागावला आणि–"चल, हट्टी कुठला! जा मर तिकडे!" असे म्हणून त्याने मुलाला पकडून तेथे जळत असलेल्या मोठ्या चुलीत टाकून दिले!

हे पाहून तो युवक संन्यासी आश्चर्याने जमिनीलाच खिळला! 'आपण ज्याला महान पंडित मानले, तो माणूस अत्यंत निर्दय असा राक्षसच आहे' असे त्याला वाटले. तो पंडिताला म्हणाला–"महाराज, आपण महाविद्वान आहात, अद्‌भुत् शक्ति असणारे आहात, असं ऐकून, सर्व खरंच मानून आपणाकडे आलो. पण आत्ता आपण जे क्रूर कृत्य केलंत, ते पाहून मला वाटतंय, की आपणापुढे तर राक्षसही फिका पडेल, दुष्ट आहात फार आपण! आपलं खरं स्वरूप मला आताच अगदी आरशासारखं स्वच्छ दिसत आहे."

संन्याशाचे बोलणे ऐकून हलकेच हसत पंडित म्हणाला–"माणसाचा खरा स्वभाव, तो रागात असेल तेव्हांच. बरोबर कळून येतो, ही गोष्ट खरीच. पण माझ्या बाबतीत मात्र ही तुझी धारणा बरोबर नव्हे. अत्यंत अल्पशा घटनाही विचित्र व अमानुष वाटणं ही गोष्ट अज्ञानी माणसाच्या बाबतीत, अगदी सर्वसामान्य होय."

हे बोलणे ऐकून संन्यासी तरुण म्हणाला–"आपल्या मुलाला निर्दयपणे आगीत ढकलून मारणं, ही काय अल्प घटना आहे? तुम्ही नक्कीच नररूपी राक्षस आहात."

तरीही मुळीच न रागवता पंडिताने एक मन्त्र उच्चारून चुटकी वाजवली आणि दुसऱ्याच क्षणी त्याचा मुलगा आगीच्या ज्वाळेतून हसत बाहेर आला आणि लाडाने बापाला बिलगला!

हे पाहून संन्यासी एकदम हतप्रभ झाला! पंडिताच्या पायावर लोटांगण घालीत तो म्हणाला–"महात्मा, माझ्या गैर उच्चारांबद्दल मला क्षमा करा!" मी जे बोललो ते केवळ माझ्या अज्ञानाने!"

पंडिताने आपल्या मुलाला जिवन्त करण्यासाठी जो मन्त्र उच्चारला तो संन्याशाने नीट लक्षात ठेवला आणि जमीनदाराच्या कन्येच्या समाधीजवळ येऊन त्याने मन्त्राचा पुनरुच्चार केला. त्या बरोबर आश्चर्यजनक घटना घडली.

जमीनदाराची मुलगी ताबडतोब समाधीतून उठून उभी राहिली. तिचे सौन्दर्य पूर्ववत् झाले होते आणि आता ती पूर्ण निरोगीही दिसत होती.



तिच्या अनुपस्थितीत जे जे घडले ते सर्व जमीनदाराने तिला निवेदन केले. आणि तो म्हणाला–"बेटी, आता आपल्यासाठी योग्य पतीची निवड करण्यास उशीर करू नकोस. या तिघातून तू पसन्त करशील त्याच्याशीच मी तुझा विवाह करून देईन. तुझा निर्णय शेवटचा!"

यावर जमीनदाराची मुलगी काही बोलण्यापूर्वीच एक युवक म्हणाला–"तुझ्या साठी फक्त मीच योग्य आहे, कारण मीच फक्त ऊनपावसाची पर्वा न करता, रात्रंदिवस तुझ्या समाधीशी बसून होतो."

दुसरा युवक म्हणाला–"तुझ्या मृत्युनन्तर तुझ्या पित्याचा आधार बनून आजपर्यन्त मी त्यांची सेवा करत राहिलो, तेव्हा मला वाटतं की, तुझा पति बनायला मीच अधिक योग्य."

तिसरा युवक बोलला–"तुझ्यासाठी मी इतका वेडा झालोय की तुझ्या मृत्युनन्तर विरक्त होऊन, संन्यासी बनून मी गावोगाव भटकत राहिलो. एका महान पंडिताकडून अद्भुत् असा मन्त्र शिकून मीच तुला जिवन्त केलं. यामुळें तुझ्याशीं विवाह करायला मलाच अधिक हक्क पोचतो.

तिघांचं सर्व बोलणं ऐकून जमीनदाराची मुलगी मात्र हसू लागली. ती म्हणाली–"माझ्या मरणानन्तर माझ्या पित्याची सेवा करणारा तरुण हा त्यांचा पुत्र बनतो. नंतर मला अपूर्व मन्त्राने जो पुनर्जन्म देतो, तो मला पित्यासमान होतो. परन्तु जो माझ्या समाधीपाशीच रात्रंदिवस बसून असीम दुःखाने छायेसारखा पडून रहातो–तोच माझ्यासाठी योग्य पति बनतो. त्याचं माझ्यावर इतकं अलोट प्रेम आहे की, माझ्याशिवाय दुसरं काही त्याला सुचतच नाही. माझी समाधीच 'मी' समजून तेथेच तो पडून राहिला, म्हणून मी त्याच्याशीच विवाह करीन.

आणि जमीनदाराच्या मुलीने 'योग्य वर' म्हणून त्याची निवड केली. त्याच्याशीच तिचा विवाह थाटामाटाने पार पडला.





# गर्विष्ट

तापस नावाच्या एका कवीनें राजाकडे जाऊन त्याला आपली काव्यरचना ऐकवली. राजा त्याला म्हणाला–"पैलू न पाडला गेलेला असा एक हिरा आहेस तू. या नगरात चिदानन्द नावाचा एक महापण्डित रहातो. त्याच्याकडे जाऊन तुझं काव्य दुरुस्त करून घे, अन् ते माझ्याकडे आण."

या चिदानन्दजवळ वंशपरंपरेने मिळालेली भरपूर धनदौलत असल्याने तो फक्त स्वतःला पसन्त पडतील अशांनाच आपले शिष्य बनवून घेई.

तापसने चिदानन्दकडे जाऊन त्याला आपली हकिकत सांगितली. "तुझं काव्य नीट घासून-पुसून मी तुझ्याकडे पाठवून देईन." चिदानन्द त्याला म्हणाला.

दोनच दिवसात त्या काव्यात काही फेरफार करून चिदानन्दने ते आपल्या माणसाहाती तापसकडे पाठवले.

पण काव्यात चिदानन्दने केलेले फेरबदल तापसला आवडले नाहीत. तो सरळ चिदानन्दच्या घरी गेला आणि म्हणाला–"आवश्यक तिथे फेरबदल हे ठीक आहे, पण आपण जे बदल केलेत ते तर काव्याच्या मूळ भावावरच गदा घालत आहेत!"

यावर जरासे हसत चिदानन्द म्हणाला–"वत्सा! तुझ्यात प्रतिभा तर आहेच. तुझं वय अजून कच्चं आहे, त्यामुळे कोणत्या मूळ भावाला प्राधान्य द्यावं, हे तू निश्चित करू शकत नाहीयेस. मी ज्या मौलिक भावनेला प्राधान्य दिलं आहे, ती ही वास्तवतः तुझीच आहे नं? तेव्हा हे काव्य आत्ता सुद्धा तुझंच तर आहे! मला असं वाटलं की तुझ्या काव्यात काही परिवर्तन आवश्यक आहे, अन् तुझी इच्छा आहे की तुझ्या काव्याला राजाश्रय मिळावा, बरोबर नं?"



तरीही तापस नम्रतेने पुन्हा म्हणाला—"महाशय, माझं वय कच्चं आहे, त्यामुळे मी कबूल करतो कि माझा अनुभवही कच्चा आहे. तरीही मला इतका आत्मविश्वास नक्कीच आहे की माझ्या काव्यातली मौलिक भावना ओळखण्याइतकं वय आणि अनुभव मला आहे. तरीही तुम्ही असं म्हणताय की काव्य तुमच्या इच्छेप्रमाणं बदलणं योग्य आहे ?"

यावर चिदानन्दने काहीच उत्तर दिले नाही. मग तापस गर्वाने म्हणाला—"काय महाराज! माझ्या प्रश्नाला तुमच्याजवळ उत्तर नाही! म्हणूनच गप्प आहात नं?"

"वत्सा! मी तुझ्या पहिल्या प्रश्नाचं उत्तर दिलं होतं ना? त्यातच दुसऱ्या प्रश्नाचंही उत्तर आलं असं समज! तुझं तुलाच ते कळलं असतं तर बरं झालं असतं. पण कळत नसेल, तर पुन्हा सांगण्यात तरी काय प्रयोजन? एकच प्रश्न बदलून बदलून विचारायची कदाचित तुझी सवय असेल! पण तेच ते उत्तर पुनः पुन्हा द्यायची मला मात्र सवय नाही." चिदानन्द म्हणाला.

तापस लगेच म्हणाला—"कदाचित तुम्हाला माझा राग आला असेल. मला कबूल आहे की तुम्ही केलेला बदल फारच सुन्दर आहे, पण त्यात माझी मौलिक भावना बदलली गेल्याबद्दल मला चिंता आहे. ती कशी दूर करू, हेच मला कळत नाहीय."

"राजा तुझ्या काव्याची तारीफ करताना पहाशील तेव्हाच तुला पटेल—हे काव्य आपलंच आहे. मी स्वतःच तर सांगत आहे न, की या काव्यातला मूळ आशय हा हा तुझाच आहे? तरीही तुझी काळजी मिटत नसेल, तर मी तुला एक उपाय सांगतो. तुझ्यात आपलं वय व प्रतिभा यांच्या मानाने गर्वच अधिक आहे! जीवनात काही न काही साधण्यासाठी आत्मविश्वासाची आवश्यकता असते. आणि ही गोष्टही खरी की जीवनात उन्नति प्राप्त करून घ्यायची तर हा गर्व आड येतो. अगोदर जीवनात काही मिळव अन् मग गर्व कर! तेव्हा कदाचित तुझा गर्विष्ट-पणा अलंकारासारखा शोभूनही दिसेल. पण आत्ता तरी तात्पुरता तो सोडून दे. बास, तुला कसलीच चिंता वाटणार नाही." चिदानन्दने बरोबर उपदेश दिला.

"महाशय, असं तर नाही ना, की माझ्या आत्मविश्वासालाच 'गर्व' असं नाव देऊन मला तुम्ही कोड्यात टाकत आहात?" तापसने विचारले.

"बाळा, तुझ्यात आत्मविश्वास आहेच कुठे मुळी? तो असता, तर राजाचा सल्ला मानून तू माझ्याकडे आलाच नसतास ना? सरळ जाऊन दुसऱ्या एखाद्या राजाला ते दाखवायचा प्रयत्न केला असतास!" चिदानन्दने बरोबर नस पकडून म्हटले.

"आता मी तसंच करीन, मग तर तुम्ही मला प्रशंसा-योग्य मानाल?" तापसने विचारले.

"नाही! मला फक्त तुझ्याबद्दल वाईट वाटेल, की तू आपली प्रतिभा प्रकाशात येऊ देत नाहीयेस. स्वतःला 'महान' मानणं म्हणजे 'आत्मविश्वास' नव्हे. एखाद्या दिवशी आपण 'महान बनू शकू' यावर विश्वास ठेवणं म्हणजेच 'आत्मविश्वास'" चिदानन्दने समजावले.

आता मात्र मुकाट्याने आपले ते काव्य घेऊन जाऊन तापसने राजाला दाखवले. राजाने तापसची खूप स्तुति केली. तेव्हा तापस बोलला—"महाराज, त्या महापंडिताने माझ्या काव्यावर इतके संस्कार केले व ते घासूनपुसून इतके चमकदार केले, की ते आपल्या प्रशंसेला पात्र ठरले."

तापसच्या या नम्रतेबद्दल राजाने मौल्य-वान पुरस्कार देऊन तापसचा सन्मान केला.

अशा प्रकारे अहंकार सोडून तापस आपल्यातले न्यून ओळखण्यात सफल झाला, त्याची बुद्धि जास्त झळाळून उठली आणि लवकरच 'सर्व राज्यातला श्रेष्ठ कवि' म्हणून तो मान्यता पावला.





# कावळ्यांचा राजा

कित्येक हजार वर्षांपूर्वी अवंती राज्यावर राजा अनूपचे राज्य होते. त्या राज्यात एक मोठा ज्योतिषी रहात असे. तोच त्या राज्याचा दरबारी ज्योतिषी होता. दरबारातील सर्व मंडळी त्याचा नित्य आदर-सन्मान करीत.

तो ज्योतिषी रोज सूर्योदयसमयी नदीवर स्नानाला जात असे. तेथे बराच वेळ तो ध्यान-धारणेत घालवी. एके दिवशी असाच तो नदीवर स्नान करून, स्वच्छ होऊन परत येत होता. वाटेत एक आमराई होती. ज्योतिषी एका झाडाखालून येत असताना नेमका एक कावळा त्याच्या अंगावर शिटला.

ज्योतिषाला कावळ्याचा इतका राग आला की त्याने प्रतिज्ञा केली की—या कावळ्यांची सारी जातच मी नाहीशी करून टाकीन तेव्हांच मला शान्ति मिळेल. आणि तो आपल्या उद्योगाला लागला.

ज्योतिषाची ही प्रतिज्ञा पूर्ण व्हायला परिस्थितीही मोठी अनुकूल होती. कशी? ती अशी की—राजाच्या राजवाड्याजवळच एक झोपडी होती. त्यात एक म्हातारा रहात असे. एक दिवशी त्याने अंगणात धान्य वाळायला ठेवले आणि तो पेंगायला लागला.

इतक्यात जवळूनच कुठूनसे एक गाढव आले. संधीचा फायदा घेऊन गपागप धान्य खाऊ लागले. म्हाताऱ्याने त्याला पाहिले आणि दोन-तीनदा त्याला पळवून लावायचा त्याने प्रयत्न केला. पण काही फायदा होईना.

म्हाताऱ्याला गाढवाचा फारच राग आला आणि त्याने गाढवाला पकडले. एका वाळक्या नारळाच्या झावळीवर त्याने थोडेसे रॉकेल ओतले व ती पेटवून गाढवाच्या शेपटीला बांधून टाकली. एकाएकी आग पाहून घाबरलेले ते गाढव सैरावैरा पळत सुटले. त्या घबराटीत ते राजाच्या गजशाळेत घुसले, आणि पीलखान्याला आग लागली.

आगीत अडकलेले हत्ती चीत्कार करून इकडे-तिकडे मोकाट धावू लागले. त्यांच्या पायांखाली लोक चिरडू लागले अन् एकच गोंधळ माजला. शिपायांनी कसे तरी त्यांना पकडून बांधून टाकले आणि आगही विझवली.



गजशाळेला आग लागल्याने राजाला मोठी काळजी वाटली. जखमी झालेल्या हत्तींना गजवैद्य औषधोपचार करू लागले. कित्येक औषधे आणवली गेली आणि जखमांवर अनेक प्रकारची तेले, लेप वगैरे लावून पट्ट्या बांधल्या गेल्या. पण त्या लवकर भरून येईनात. राजाची काळजी आणखीच वाढली.

काही दिवसांनी राजाने ज्योतिषाजवळ या गोष्टीबद्दल चर्चा केली. राजा ज्योतिषाला म्हणाला—"काय करावं हे मला तर काही समजत नाही. सर्व वैद्यांनी हात टेकले. हत्तींची तब्येत काही सुधारत नाही. आपण यावर काही उपाय सुचवू शकता का?" बस, ज्योतिषी तर अशा संधीची वाटच पहात होता, तो थोडीच ती हातची सोडणार? कावळ्यांवर आता सूड उगवता येईल या विचाराने तो खूष झाला.

"राजा, त्या हत्तींच्या जखमा भरून यायला कावळ्यांची चरबी उपयुक्त होईल. 'महान् वैद्य' म्हणवणाऱ्या आपल्या राजवैद्यांच्या हे कसं डोक्यात आलं नाही. कावळ्यांची चरबी म्हणजे जनावरांच्या जखमांवर रामबाण उपाय!" याचंच मोठं आश्चर्य वाटतंय मला, ज्योतिषी म्हणाला.

राजाला ही औषधयोजना आवडली. अन् विशेष म्हणजे ती खर्चिकही नव्हती! राजाने लगेच ढोलकं वाजवायला लावून

कळवलं की—सापडतील तितके कावळे पकडावे. शेकडो, हजारोंच्या संख्येने कावळे मरू लागले.

अवंतीराजाकडून होणारा हा अन्याय त्यावेळच्या वायसराजाला काळजीत टाकू लागला. त्याने राजाला भेटायचा निश्चय केला.

वायसराजा उडत राजमहालात येऊन सरळ सिंहासना समोर थांबला. त्याला पाहून एक शिपाई ओरडला—"अरे, दरबारात कावळा! अन् तो त्याला पकडायला धावला. पण राजाने त्याला थांबवले.

इतक्यात वायसराजा मानवी आवाजात बोलू लागला—"महाराज, माझ्यावर न रागावता माझं बोलणं ऐकून घ्या. दुसऱ्याचं बोलणं ऐकून लागलीच काही करण्यापूर्वी त्याबाबत बरंवाईट राजाला अगोदर पहायला हवं. नपेक्षा त्यामुळे अनेकांना त्रास होण्याची शक्यता असते. आपल्या ज्योतिषाने आपणाला सांगितलं की कावळ्यांच्या चरबीने हत्तींच्या जखमा बऱ्या होतील, पण खरं पहाता कावळ्याच्या शरीरात तर चरबीच नसते! त्यामुळे साफ जाहीर होतं की, काही दुष्ट विचारानेच आपणाला हा सल्ला दिला गेलाय."

हे बोलणे ऐकून राजा आश्चर्यात पडला. त्याने वायसराजाला विचारले—"कावळ्याच्या शरीरात चरबी नसायचं कारण काय बरं?"

वायसराजा उत्तरला—"संपूर्ण मानवजातच कावळ्यांची शत्रु आहे. जिवाच्या भीतीनं तो बिचारा नेहमीच इकडून-तिकडे फिरत असतो. मग शरीरात चरबी येणारच कशी?"

आता राजाला सत्य घटना कळून चुकली आणि आपल्याकडून हे पापकृत्य घडवून आणणाऱ्या ज्योतिषाला त्याने पदच्युत केले. त्या दिवसापासून रोज पंचवीस पोती धान्य कावळ्यांना खायला घालायची आज्ञा राजाने कोठावळ्याला दिली.



## बहुरूपा वसुन्धरा :

### कांगारूची शेपूट

ऑस्ट्रेलियात सापडणारा कांगारू हा एक सस्तन प्राणी आहे. तो आपले पिल्लू पोटाजवळच्या एका नैसर्गिक पिशवीत ठेवून इकडे तिकडे वावरतो. खरे तर कांगारू हा प्राणी चालतही नाही अन् धावतही नाही. तो फक्त आपल्या शेपटीच्या सहाय्याने उसळ्या मारतो. सर्वात मोठा कांगारू एका उडीत ३० फूट पर्यंत अंतर कापू शकतो. जोपर्यंत त्याची शेपटी जमिनीला टेकलेली असेल, तोपर्यंत तो उसळ्या वा उड्या मारू शकतो. आणि त्याला या कामी त्याची ३.५ फूट लांबीची शेपूटच मदत करते.





### सांकेतिक भाषा

सर्वसामान्यपणे हत्ती नेहमी कळप करून रहातात. ठिकठिकाणी त्यांचे सुरक्षा-जवान तैनात केलेले असतात; म्हणजेच काही हत्ती धोक्याची सूचना देण्यासाठी ठिकठिकाणी पहारा देत उभे असतात. धोका दिसला की त्याची सूचना देण्यासाठी हे सुरक्षा-पहारेकरी हत्ती आपली सोंड उंच उचलतात. मग त्यांचा कळप अर्धा मैल दूर असला तरी त्याला हा संकेत मिळतो व ते हत्ती लगेच सावध होतात. खरे पहाता हा संदेश इतक्या लांब कसा पोचतो हे कोडे आजपर्यंत मानवाला सुटलेले नाही.

### साळूचे पंख

साळू किंवा साळिंदर या भुऱ्या रंगाच्या प्राण्याच्या शरीरावर काळ्या-पांढऱ्या रंगाची काट्यांसारखी पिसे असतात. साधारणतः या प्रत्येक प्राण्याच्या शरीरावर अशी ३०,००० च्या आसपास पिसे असतात. ही पिसे पोकळ असल्यामुळे पूर्वी यात शाई भरून त्यांचा लेखणीसारखा उपयोग केला जाई. ही पोकळ पिसे साळूला एखाद्या तरापवाच्या पिंपांसारखी उपयोगी पडतात. त्यांच्या साह्याने हे प्राणी पाण्यात न बुडता तरंगू शकतात व पोहूही शकतात.











# आणखी एक कॉमनवेल्थ

डिसेंबर महिन्यातील पहिल्या तीन आठवड्यात वृत्त-पत्रात मोठमोठ्या अक्षरात तुम्ही वाचले असेल–'यु. एस्. एस्. आर्. चे तुकडे-तुकडे झाले', 'सोविएट संघ संपला', 'कम्यूनिझमचा शेवट', 'यु. एस्. एस्. आर्. इतिहासजमा झाला' इत्यादि. त्या काळात फार झटपट गतीने सोविएट संघात अनेक बदल घडून आले नि परिणामत: 'सी. आय्. एस्.' म्हणजे 'कॉमनवेल्थ ऑफ इंडिपेंडंट स्टेट्स्' ची स्थापना झाली.

ब्रिटिश साम्राज्यावर सूर्य कधी मावळत नाही असा एक काळ होता. या साम्राज्यातील जे देश स्वतंत्र झाले, त्यांना 'कॉमनवेल्थ देश' म्हटले जाऊ लागले. आपला भारत सुद्धा एक 'कॉमन-वेल्थ देश'च होता. त्याचप्रमाणे पाकिस्तान, श्रीलंका, सिंगापूर, ऑस्ट्रेलिया, कॅनडा आणि असे चाळीसहून अधिक देश 'कामनवेल्थ देश' म्हणून ओळखळे जाऊ लागले. ब्रिटिश साम्राज्यातून स्वतंत्र झालेल्या देशांना आपण कॉमन-वेल्थ देश म्हणत असू.

आता मात्र गोष्ट वेगळी आहे. काल-परवा पर्यंत सोविएट संघात समाविष्ट असलेले बारा देश आता एकत्र

आलें व त्यांचे एक कॉमनवेल्थ बनले. सन १९१७ च्या ऑक्टोबर महिन्यात लेनिन व ट्रॉट्स्की यांच्या नेतृत्वाखाली बंडखोरांनी झारशाहीचा शेवट केला नि नंतर 'यु. एस्. एस्. आर्.' म्हणजे 'युनियन ऑफ सोविएट सोशॅलिस्ट रिपब्लिक्स'ची स्थापना झाली. यामुळे श्रमिक वर्गाला सर्व अधिकार मिळाले आणि कम्यूनिस्ट रशियाची सुरुवात झाली.

गेल्या वर्षी इस्टोनिया, लाटेविया व लिथुआनिया या तीन बाल्टिक राष्ट्रांनी जेव्हां सोविएट संघातून फुटून निघण्याचा निर्णय घेतला तेव्हां रशियात थोडी खळबळ माजली. बाकीची बारा राष्ट्रे मान्य करतील अशा विश्वासाने अध्यक्ष गोर्बाचेव्ह यांनी एक समता-प्रस्ताव मांडला. पण बरीच राष्ट्रे स्वतंत्र होऊ इच्छित होती, त्यामुळे हा प्रस्ताव कोणी मान्य केला नाही.

श्री. गोर्बाचेव्ह यांनी आपल्या अध्यक्ष-पदाचा राजिनामा दिला व 'रशियन फेडरेशन'चे अध्यक्ष बोरिस एल्स्टिन यांच्याकडे सर्व अधिकार-सूत्रे सोपवली. ७ डिसेंबर रोजी, गोर्बाचेव्ह यांनी सुचवलेल्या 'कॉन्फिडरेशन'च्या विरुद्ध, बोरिस एल्स्टिन यांनी 'संवर्धित युनियन ट्रीटी'च्या स्वरूपात 'कम्युनिटी'ची योजना मांडली. शेवटी, सर्व राष्ट्रांना स्वातंत्र्य देऊन नव्या 'कॉमनवेल्थ' बाबत निर्णय घेण्यात आला.

तरी पण ही नवी 'कॉमनवेल्थ' कितपत टिकून राहिल हे आज सांगता येणार नाही. कारण या बरोबरच काही अशा अडचणी आहेत, ज्यांचे निराकरण झाले पाहिजे उदाहरणार्थ– साधारण मुद्रापद्धति व सामूहिक अर्थ-विधान, एकीकृत संरक्षण-व्यवस्था व तीबाबत मतैक्य, सोविएट रशियाने निर्माण केलेल्या अण्वस्त्रांवर अधिकार इत्यादि. या सर्व समस्यांचे तातडतोब तोडगे शोधून काढणे आवश्यक आहे

सन १९१७ साली घडलेली रशियन राज्यक्रांति हा इतिहासातील एक मैलाचा दगड आहे. आज रशियात जे अनपेक्षित बदल घडत असलेले आपण पाहात आहोत, त्याचा भविष्य-कालावर काय परिणाम होईल याकडे सर्व जगाचे डोळे लागून राहिले आहेत

जगाच्या इतिहासातील हे एक नवे पृष्ठ आहे. एक नवीन जग घडविण्याचा हा एक महान प्रयोग आहे म्हणूनच जगातील सर्व राष्ट्रांचे इकडे लक्ष लागून राहिले आहे.



# खरी आई

रामपुर गावात रामदेव व जानकी नावाचे एक जोडपे रहात असे. त्यांना माधव नावाचा एक मुलगा होता. जानकीच्या बहिणीला एक मुलगी झाली व ती जन्मताच बहीण मात्र मरून गेली. जानकीने या मुलीला, तिच्या पित्याची परवानगी घेऊन आपल्या घरी आणून स्वतःच्या मुलीसारखे वाढवले होते. रामदेवही आपलीच मुलगी मानून तिचे खूप लाड करी. तिचा प्रत्येक हट्ट पुरवी.

मुलीचे नाव ठेवले होते मल्लिका. ही मल्लिका जसजशी मोठी होऊ लागली, तसतशी तिच्यावरून या जोडप्यात बारीक-सारीक भांडणे होऊ लागली. मल्लिकाला आई नसल्यामुळे रामदेव व जानकीने तिचे फार लाड केले. पण त्यामुळे मल्लिका फार हट्टी व घमेंडखोर बनली. जरा तिच्या मनासारखे झाले नाही की ती फुगून बसे. एवढ्या-तेवढ्या गोष्टीसाठी अडून बसे. आपला हट्ट पुरा झाला की तिची गाडी रुळावर येई. रामदेवला हे बिलकुल आवडत नसे, त्यामुळे तो आपल्या पत्नीला रागावून सांगे की–मुलीला जरा शिस्त लाव.

परन्तु, जानकी आपल्या नवऱ्याचे म्हणणे नीट न समजताच म्हणे–"हो! स्वतःची मुलगी असती, तर बोलला असतात का असं? तिला इथे आणून चूकच केली मी. एखाद्या जंगलात सोडून दिली असती तर किती बरं झालं असतं!"

असेच दिवस जात राहिले. मल्लिका मोठी झाली, वयात आली. आता रामदेव तिच्यासाठी वरसंशोधन करू लागला. परंतु मल्लिकेच्या घमेंडी स्वभावामुळे, अन मल्लिका–जानकी दोघींनाही कोणतेच स्थळ पसंत न पडल्यामुळे लग्नाचे कुठेच जमेना.

सौ. सुनंदा अभ्यंकर



अखेर त्याच गावात, चार मोहल्ले पलिकडे रहाणाऱ्या गिरिधारी नावाच्या मुलाशी मल्लिकेचा विवाह पक्का झाला. त्यावेळी मल्लिका कोणत्या मानसिक अवस्थेत होती, कोण जाणे–पण तिने मागणीच्या वेळी नम्रपणे उत्तरे दिली होती

लग्न पक्कं ठरल्याबरोबर जानकी रामदेवला म्हणाली–"पाहिलंत ना? आजपर्यंत सर्वजण मल्लिकेला हट्टी आणि घमेंडखोर म्हणत होता न? पण मागणीच्या वेळी ती किती नम्रपणे अन् शिस्तीत वागली हे पाहिलंत ना? जबाबदारीची चांगली जाणीव आहे न तिला"

बायकोच्या या बोलण्यावर रामदेव फक्त हसून गप्प राहिला. त्याने काही ही बोलण्याचे टाळले.

दोन दिवस गेले अन् रामदेव जानकीला म्हणाला–"मल्लिकाचं लग्न ठरलं ना आता? मग कामात काम झाल्यासारखं होऊन जाईल. आपण माधवचंही लग्न उरकून टाकलं तर कसं होईल? तेवढीच आपली एक जबाबदारी कमी होईल!"

"पण माधवच्या लग्नाची इतकी घाई कशाला? अजून दोन-चार वर्षं थांबायला काही हरकत नाही." जानकीने विचारले.

"तसं नव्हे ग! पण तुला ठाऊक नाही, नारायण आपली मुलगी कमला अन् माधवचं लग्न व्हावं म्हणून किती दिवस मागं लागलाय माझ्या." रामदेव म्हणाला.

नारायण व रामदेव चांगले मित्र होते. नारायणच्या कुटुम्बाबद्दल जानकीला चांगली माहिती होती. नारायणचा मुलगा वेणु व माधव हेही दोघं चांगले मित्र होते.

"ते कसं? त्या मुलीसाठी त्यांच्या नात्यातलाच एक मुलगा ठरला होता ना? त्याचं काय झालं?" जानकीने आश्चर्याने विचारले.

"ओह! ते लग्न तर केव्हाच मोडलं होतं, तुला माहीतच आहे ना ते? त्याबाबत पुन्हा काय विचारतेस?" रामदेवने जरा चिडूनच विचारले बायकोला.

"हो ऽ! त्या मुलीच्या कटु बोलण्यामुळेच लग्न मोडलं, हे चांगलं माहीत आहे मला!" जानकी टोमणा मारत बोलली.

जानकीचे हे बोलणे ऐकून रामदेवबरोबरच माधवही आश्चर्यचकित झाला. "आई, तिच्या बाबतीत तुझा काहीतरी गैरसमज झालाय. कमलला लहानपणापासूनच आपली सून करून घेऊ म्हणणाऱ्या त्या नातेवाईकाला, त्यांनी हुंड्यावरून बखेडा केल्याने कमलनेच नकार दिला. खरी गोष्ट अशी आहे, कळलं? यात तिची काही चूक आहे?"

"मोठ्या लोकांच्या गोष्टीत तोंड घालणारी ही मुलगी या घरातली सून बनून आली, तर आपल्या सासू-सासऱ्यांनाच घराबाहेर काढील. पण तुम्ही प्रथमच ठरवलं असेल, तर मला कशाला विचारताय?" असे म्हणून जानकी तेथून निघून गेली.

शेवटी माधवच्या इच्छेप्रमाणे, मल्लिका सासरी गेल्याबरोबर कमला त्याची बायको बनून घरात आली. परन्तु पहिल्यापासूनच जानकीचे मत कमलेच्या बाबत प्रतिकूल असल्यामुळे, ती एकसारखी कमलेला त्रास देई. पण जानकी जितकी कठोरपणे वागे तितकीच कमला मात्र नम्रतेने राही, शान्त राही. तिचा शान्त





स्वभाव पाहून खुद्द जानकीलाच आश्चर्य वाटे.

अशातच एकदा कमला व माधव मल्लिकेला भेटायला गेले व थोड्याच वेळात तेथून परतले. त्यांच्या बरोबर मल्लिका व गिरिधारी होते. कमलाच्या डोक्याला पट्टी बांधलेली होती.

ते सर्व पाहून रामदेवने घाबरून विचारले–"कमला! बाळ डोक्याला ही पट्टी कसली तुझ्या? काय झालं?"

उत्तरादाखल रामदेवचा जावई गिरिधारीच सांगू लागला–"बाबा, हा प्रश्न कमलेला नव्हे, आपल्या मुलीलाच विचारा न?" नंतर आपली सासू जानकी हिच्याकडे कटुतेने पहात तो पुढे म्हणाला–"तुमच्या लाडक्या मुलीचा प्रताप आहे हा. लग्न करून मल्लिका आमच्या घरात आल्यापासून आम्ही सर्वजण मोठ्या शांतपणे तिच्या चुका अन् कटुता सहन करत आहोत. पण आज तिने कसल्याशा रागाने एक पितळी भांडं फेकून मारलं आपल्या सासूला. पण नेमकी त्याच वेळी ही कमला मधे आल्यामुळे तिलाच जखम झाली."

जानकीने तावडतोब वळून मल्लिकेकडे पाहिले. तोपर्यंत घाबरून उभी असलेली मल्लिका तिला मिठी मारून एकदम मुसमुसून रडू लागली. पण जानकी आता नेहमीप्रमाणे तिचे सान्त्वन करू शकेना.

थोड्या वेळाने गिरिधारी मल्लिकेला म्हणाला–"चल!" अन् तिला घेऊन तो आपल्या घरी निघून गेला.

जावयाचे बोलणे ऐकल्यावर जानकीच्या मनात विचारमन्थन सुरू झाले. थोडा वेळ तिने इकडे-तिकडे केले व नन्तर ती आपल्या नवऱ्याबरोबर हरिकथा ऐकायला देवळात गेली.

कथा सांगणारा पंडित, वनवासाला निघालेल्या राम व सीतेसाठी कौसल्येला होणाऱ्या दुःखाबद्दल वर्णन करून सांगत होता.

"स्त्री ही जन्मतःच करुणामूर्ति असते. अशा स्त्रीत नेहमी दोन प्रकारचे वर्तन पहायला मिळते. आई म्हणून स्त्री नेहमी सहनशील प्रेममूर्ती असते, पण सासू म्हणून मात्र तिचा स्वभाव एकदम विरुद्ध दिसतो. आपल्या मुलीचे दोष विसरून तिला अनन्त प्रेम देणारी स्त्री, आपली सून कितीही चांगली असली तरी तिच्यात दोष शोधून तिला त्रास देत असते. खरं म्हणजे मुलगी व सून दोघींनाही सारखं वागवणारी स्त्री हीच 'खरी आई' म्हणायला हवी. पण असं न होता, मुलीशी एक प्रकारे अन् सुनेशी दुसऱ्या प्रकारे वागणारी बाई ही आई असूनही 'वांझ' म्हणावी." हरिकथा सांगता सांगता पुराणीकबुवा धडे शिकवू लागला.

ते एकून जानकीचे मन विचलित झाले. ती हाच विचार करू लागली.

हरिकथा संपल्यांवर दोघेही घरी आले. रस्त्यात राममेव जानकीला म्हणाला–"जानकी, पुराणिकबुवांच्या म्हणण्यानुसार तू 'आई' असूनही 'वांझ'च आहेस."

नवऱ्याचे बोलणे ऐकून जानकीच्या डोळ्यातून अश्रुप्रवाह सुरु झाला. डोळे पुसत ती म्हणाली–"होय आजपर्यंत मी 'वांझ'च राहिले हे कळलं मला. पण आता माझ्या डोळ्यावरची एकतर्फी प्रेमाची पट्टी दूर झाली आहे. कमलेसारखी सून मिळाली, हे माझं अहोभाग्य! मल्लिकेचे आईवेगळी म्हणून फाजील लाड केले, त्यामुळे बिघडून गेली ती. खरं तर प्रत्येक मुलगी जेव्हां लग्न करून सासरी जाते, तेव्हां ती आईवेगळ्या मुलीसारखीच असते. कमला आणि मल्लिका या दोघींना मी सारख्याच मानू शकले तरच मी खरी आई बनू शकेन."

बायकोत झालेले परिवर्तन पाहून रामदेवला संतोष वाटला. तो चेष्टेच्या सुरात म्हणाला–"हो, होऽ! बन की खरी आई. पण मल्लिकेप्रमाणे कमलाला बिघडवून मात्र ठेवू नकोस. समजलीस?" आणि तो जोरजोरात हसू लागला. जानकीलाही हसू आले.



# औषधोपचारात गडबडघाई

वैद्य रुद्राचारीकडे शरभाचारी नावाचा एक तरुण चिकित्साशास्त्र शिकायला आला होता.

रुद्राचारी निरनिराळ्या रोगांबाबत, त्यांच्या लक्षणांबाबत व त्यावर करायच्या औषधोपचारांबाबत सांगत जाई, आणि शरभाचारी ते भराभर एका वहीत टिपून ठेवी.

एकदा रुद्राचारी त्याला म्हणाला–"काही काही रोगांवर औषधच नसते. उदाहरण. म्हणजे–उचकीचा रोग. तो दूर करायचा म्हणजे एक गालफडातच मारायला हवी. कोणतंही औषध नाही त्यावर!"

इतक्यात एका बग्गीतून उतरून एक लठ्ठसा माणूस रुद्राचारीकडे आला आणि म्हणाला–"काल रात्रीपासून उचक्यांच्या त्रासामुळे...." आणि तो पुढे काही सांगणार, इतक्यात शिष्य शरभाचारी याने त्याच्या गालावर जोरात थप्पड मारून म्हटले–"हं, आता तुमच्या उचक्या एकदम थांबून जातील पहा." आणि हे सांगितल्यावर त्याचा चेहरा खूष दिसू लागला.

पण आपला गाल चोळत तो लठ्ठ माणूस म्हणाला–"अरे, उचक्या मला नाही, त्या बग्गीत बसलेल्या माझ्या मालकांना येत आहेत."

रुद्राचारी आता रागाने आपल्याकडे पहात असल्याचे जाणून शरभाचारी म्हणाला–"हो! चिकित्सेत गडबडघाई कामाची नव्हे!"






[ १३ ]

[मन्त्री व तान्त्रिक यांनी रुद्रपुरीच्या युवराणीच्या गळ्यातील चन्द्रकान्त मणी पळवण्याची योजना बनवली. युवराणीला जिवन्त आपल्या हाती सोपवण्याची आज्ञा म्हाताऱ्या जादुगारणीने तान्त्रिकाला दिली. दुर्गामन्दिरातील गुप्त भुयारी मार्गाने युवराणीचे अपहरण करायचे तान्त्रिकाने ठरवले होते. —आता पुढे वाचा.]

युवराणीच्या वाढदिवसाचा उत्सव जवळ येत होता. मंत्री व तान्त्रिकाचे कारस्थान समीरकरवी राजा विश्वकर्माच्या कानी घालायचे अपूर्वने ठरवले, व तो समीरकडे गेला. अपूर्वला पाहून समीरला फार आनन्द झाला. आणि अपूर्वकडून समजलेली सारी वार्ता राजाला कळवण्यासाठी तो ताबडतोब राजवाड्याकडे निघाला.

ती आणखी एक काळी रात्र होती. तान्त्रिक वीरविकटने गुप्तपणे जाऊन मन्त्र्याच्या भवनाचा दरवाजा खटखटवला. भवनातून बाहेर येऊन मन्त्र्याने त्याला विचारले–"अरे, असा अर्ध्या रात्री आला आहेस, काय भानगड आहे?"

"अर्ध्या रात्री नाहीतर काय, मी कधी दिवसा तुझ्याकडे आलो होतो आतापर्यंत? आपली कामं करायला अंधारी रात्रच



चांगली नाही का?" चेष्टेने हसत वीर. विकटने विचारले.

"असं नाही. पण मला विचारायचंय की काही गडबड तर नाही ना झाली? काही विशेष गोष्ट तर नाही घडली ना? आपली सर्व योजना निर्धास्तपणे पार पडणार ना? त्यात काही विघ्न येऊ नये म्हणजे झालं!" मन्त्र्याने विचारले.

"हं, विशेष गोष्टच समजायला हवी. कसं कुणास ठाऊक पण जादुगारणीला वाटतंय की आपलं कारस्थान आणखी कुणाला तरी नक्की कळलेलं आहे. मला असं वाटतंय की तिसरं कोणीतरी आपल्या हालचालींवर पाळत ठेवून असावं! जादूगारणीला जे वाटतंय त्यात तथ्य जरूर असलं पाहिजे." वीरविकट सवयीने भुवया उडवत बोलला.

"छट्! अगदी अशक्य गोष्ट आहे ही! इतक्या गुप्तपणे घडवलेले आपले कारस्थान दुसऱ्या कोणाला कळणे सुतरां शक्य नाही." मन्त्री दृढ स्वरात बोलला.

"पण जादुगारणीच्या मनात असा संशय यायलाच नको, अन् आला तर नक्कीच कुठं तरी पाणी मुरत असावं. तिचा संशय खोटा ठरत नाही. तू आपल्या बायकोजवळ, किंवा आणखी कुणाजवळ काही बोलला तर नाहीस?" मन्त्र्याकडे संशयी दृष्टीने पहात तान्त्रिकाने विचारले.

"नाही. आपल्या लहानपणापासूनच्या मैत्रीची शप्पथ घेऊन सांगतो मी. आपल्या योजनेबाबत मी कोणाशी ही एक शब्द बोललो नाही. जादूगारणीला असे का बरे वाटावे?" मन्त्र्याने दृढ स्वरात म्हटले.

"माझा तुझ्यावर संशय नाही. तरीही आपलं कारस्थान यशस्वी होण्यासाठी आपल्याला जागरूक रहायला हवं. आपल्या विश्वासू शिपायांना राजवाड्याजवळ पहाऱ्याला बसव. हा पहारा रात्रंदिवस हवा. कोणीही असला, तरी नवा माणूस राजाच्या भेटीला जाऊ शकणार नाही असं पहा. पण इतका कडक पहारा का—हे तुझ्या माणसांनाही माहीत असू नये, याबाबत सावध अस." अशा तऱ्हेची चेतावणी देऊन तांत्रिक तेथून निघून गेला.

सकाळ होताच तान्त्रिकाच्या सूचने-प्रमाणे मन्त्र्याने आपल्या विश्वासू पहारे-कऱ्यांची नेमणूक केली. त्यामुळे समीर राजाला भेटायला जाऊ शकला नाही.

दुसऱ्याच दिवशी राजकन्येच्या वाढ-दिवसाचा उत्सव होणार होता. सारी व्यवस्था मोठ्या धामधुमीने होत होती. आता या कारस्थानाबद्दल राजाला कसे कळवावे, याचा अपूर्व विचार करू लागला. राजभवनाच्या गच्चीवर उभे राहून रोज सूर्यास्त पहायची राजाची सवय होती. समीरने ही गोष्ट अपूर्वला सांगितली. तेव्हा एका गिधाडाला बोलवून अपूर्व त्याच्याशी काहीसे बोलला. नंतर त्याने एका ताडपत्रावर मंदिराचा पुजारी व राजकन्या यांच्या सुरक्षिततेबद्दल कडक व्यवस्था ठेवण्याबद्दल राजाला एक प्रार्थना-पत्र लिहिले. कोणत्याही परिस्थितीत राजकन्येला देवळातील मूर्तीच्या मागे जाऊ देऊ नये असेही लिहिले. ते ताडपत्र घेऊन गिधाड ताबडतोब राजवाड्याच्या दिशेने उडाले.

चोचीत काहीतरी घेऊन जाणारे गिधाड पाहून एका पहारेकऱ्याने त्याच्यावर तीर



सोडला. त्याचा नेम चुकला, पण गिधाडाने घाबरून ताडपत्र सोडून दिले व ते दुसऱ्याच दिशेला निघून गेले. ताडपत्र राजवाड्या-भोवतीच्या खंदकात पडून गेले. नि राजाला संदेश मिळण्याचे काम होऊं शकले नाही.

गिधाड असे वाटेतूनच परत गेले आहे याची अपूर्वला काहीच कल्पना आली नाही. राजाला पत्र मिळालेच असेल अशा अपेक्षेने आता तो राजकन्येच्या संरक्षणाची काय व्यवस्था करील याची वाट पाहू लागला.

दुसऱ्या दिवशी भल्या पहाटेच वाढदिवस उत्सवामुळे सर्वत्र गडबड व उत्साह पसरला होता. रुद्रपुरीच्या राज्यातली प्रमुख माणसे,



आसपासच्या राज्यांतून यासाठी आलेले प्रतिनिधी व राजपरिवातील नातलग, मित्रमंडळी वगैरे सर्व राजन्येचे अभीष्टचिन्तन करू लागले या सर्व लोकांच्यात मिसळून राहून समीर आपल्याला कळणाऱ्या वार्ता अपूर्वला कळवत राहिला. अपूर्वला मात्र आपला निरोप राजाला न कळल्याचे समजलेच नाही.

राजा व राजकन्या यांच्या चेहऱ्यावर कोणताही बदल झालेला न दिसल्याने अपूर्वला आश्चर्य वाटले. राजकन्येच्या रक्षणासाठी काही खास व्यवस्था न झालेली पाहून अपूर्व गोंधळात पडला. आता त्याला वाटले की आपले पत्रच कदाचित राजाला मिळाले नसावे. संध्याकाळ होऊ लागली आणि राजा व राजकन्या मिरवणुकीने दुर्गामन्दिराकडे निघून गेले.

देवळापाशी राजकन्येला पहाण्यासाठी हजारो लोक उभे होते. ती तेथे पोचताच पुजाऱ्याच्या वेषातला तान्त्रिक व त्याचे शिष्य पुढे झाले व तिला मन्दिरात घेऊन गेले. दुर्गेच्या मूर्तीसमोर उभे राहून राजकन्येने तिला भक्तिभावाने नमस्कार केला, पुजारी काही मन्त्र म्हणत होता. लगेच तो पुजारीवेषधारी तान्त्रिक तिला म्हणाला–"चल बेटी, दुष्टसंहारिणी माता दुर्गेला तीनदा प्रदक्षिणा घालणं, मोठं कल्याणकारी असतं, चल." आणि तो पुढे झाला.

राजकन्या पुजाऱ्याच्या मागोमाग चालू लागली. पुजारी मागे वळून म्हणाला–"राजकन्येच्या मागोमाग कोणी येऊ नका. तिच्याकडून काही खास पूजा करवून घ्यायची आहे." त्याबरोबर तिच्या सख्या तेथेच थांबल्या.

पुजाऱ्याचे दोन शिष्य जोरजोरात मन्त्र पठण करत होते. ताशेवाजन्त्री आणि घंटानादाने मन्दिर दुमदुमून गेले होते. सर्वत्र मोठ्या उत्साहाचे वातावरण पसरले होते.

राजकन्या मूर्तीच्या मागे पोचल्याबरोबर पुजाऱ्याने तिला भुयारात ढकलले अन् स्वतःही तिच्या पाठोपाठ आत उतरून त्याने दरवाजा आतून बन्द करून घेतला.

राजा आपल्या परिवारासह मन्दिराबाहेरच थांबला होता. भोवतालच्या लोकातून समीर ढकलाढकली करत बाहेर आला. आणि ओरडला–"महाराज, घात झाला. राजकन्येचं अपहरण झालंय."

राजा समीरकडे आश्चर्याने पाहू लागला. समीर म्हणाला–"मी समीर महाराज! माझ्यावर विश्वास ठेवा. तान्त्रिक युवराणीला पळवून घेऊन गेलाय."

"पण ती तर मन्दिरात दर्शनाला गेलीय ना?" राजाने विचारले.

"पण आता राजकन्या तेथे नाही." समीरने सांगितले.

"असं?" असे म्हणून राजा मन्दिरात जाऊ लागला. इतक्यात राजकन्येच्या दासी धावत बाहेर आल्या व घाबरत घाबरत 'राजकन्या अदृश्य झाल्याची' वार्ता त्यांनी सांगितली.

तेथून निसटून जाऊ पहाणाऱ्या तान्त्रिकाच्या दोन शिष्यांना पाहून समीर राजाला म्हणाला–"महाराज, हे दोघं त्या तान्त्रिकाचे शिष्य आहेत, त्यांना सोडू नका."



ताबडतोब शिपायांनी त्या शिष्यांना पकडले.

"आपल्याला ताबडतोब भुयारीमार्गाच्या तिकडच्या तोंडाशी पोचायला हवं महाराज!" समीरने सुचवले.

राजा, सेनापती व समीर यांच्यासह आणखी काही अंगरक्षक ताबडतोब घोड्यांवर स्वार होऊन निघाले व वायुगतीने भुयारी मार्गाच्या दुसऱ्या टोकाशी पोचले. तिथे वाट पहात बसलेली जादुगारीण त्यांना दिसली.

सेनापतीच्याच घोड्यावर पुढे बसलेला समीर उडी मारून खाली उतरून म्हणाला–"महाराज, त्या म्हातारीलाही ताबडतोब कैद करा."



"हं हं हं हं! आले मोठे मला कैद करणारे! मीच तुमचं आत्ता भस्म करून टाकते बघा." असे म्हणत जादूगारीण विकट हसू लागली. ती वडाच्या एका वाळलेल्या फान्दीवर बसलेली होती.

"आपल्या जागेवरून हलून तर बघ. स्वतःच भस्म होऊन जाशील. वेडा प्रयत्न करू नकोस." एक गंभीर आवाज सर्वांना ऐकू आला.

जेथून ही सूचना ऐकू आली, तिकडे सर्वजण पाहू लागले.

त्या जागी दिव्य प्रकाशात उभा असलेला एक मुनि दिसला. तो सदानन्द मुनि होता. त्याला पाहिल्याबरोबर त्याच्या पायांवर वाकून समीरने त्याला प्रणाम केला, अन् तो म्हणाला—"अपूर्वनेच मला सांगितलं होतं की कधी काही अडचण उपस्थित झाली तर मी तुमचं स्मरण करावं, म्हणजे तुम्ही ताबडतोब उपस्थित व्हाल."

सदानन्द मुनीने हसत म्हटले—"हो! तू बरोबर बोललास. मला अपूर्वची हाक ऐकू आली अन् मी निघून आलो. ही कोणी साधीसुधी जादुगारीण नव्हे. अनेक अद्भुत शक्ति मिळवून बसलेली मोठी दुष्ट म्हातारी आहे ती! अनैसर्गिकपणे दुसऱ्यांचं तारुण्य हरण करून अनेक शतकांपासून जगत आली ही. आता राजकन्येचं तारुण्य आकर्षून घ्यायचं कारस्थान रचलं होतं तिनं. पण मी तिच्या सगळ्या शक्ति नष्ट करून टाकल्यात, तिच्यापासून काही धोका नाही राहिला आता."

जादुगारीण किचकिचत म्हणाली—"तू काही माझ्या सर्व शक्ति नष्ट करू शकणार नाहीस. माझ्याकडे अजूनही एक शक्ति आहे." आणि ती अशी हसली की त्यामुळे सारे जंगल दुमदुमले. अन् क्षणभरातच जळून तिची राख झाली.

ते दृश्य पाहून क्षणभर हतप्रभ झालेला राजा सदानन्द मुनीला नमस्कार करून म्हणाला—"महात्मन्, माझी मुलगी सुरक्षित आहे नं?"

"अपूर्व कुठं दिसत नाही तो?" समीरने विचारले.

सदानन्द मुनीने सांगितले—"जादुगारणीला जेव्हां आपलं कारस्थान फसतंय असं वाटलं, तेव्हां तिने ती बातमी भुयारी मार्गातून येणाऱ्या तान्त्रिकाला कळवली अन् त्याने लगेच युवराणीचा ढालीसारखा उपयोग केला. चन्द्रकान्त मणी घेऊन पळून जायचा प्रयत्न केला. तेव्हां अपूर्व एका भोकातून भुयारात शिरला आणि तान्त्रिकाशी लढून त्याने त्याला कैद केले. तो आत्ता युवराणीला सहीसलामत घेऊन येईल."

इतक्यात वडाच्या झाडाजवळ जमिनीतून आवाज आला. थोडयाच वेळात भुयाराचे दार उघडून एकाद्या दिव्य पुरुषासारखा दिसणारा एक तरुण हात बांधलेल्या तान्त्रिकाला एक धक्का देऊन बाहेर घेऊन आला. त्यांच्या पाठोपाठच बाहेर आलेली युवराणी धावतच महाराजांजवळ आली. तिने राजाला मिठी मारली. तान्त्रिक जमिनीकडेच एकटक पहात उभा होता.

मुनीच्या पाया पडण्यासाठी तो तरुण खाली वाकू लागताच त्याला वरच्यावर थांबवत मुनि प्रेमाने म्हणाला—"बेटा अपूर्व, आता तुझी सामान्य आकार प्राप्त करायची वेळ आली आहे, अन् तो तुला मिळून चुकलाय. इथून पुढे तू असाच रहाशील."



अपूर्वकडे इशारा करत युवराणी राजाला म्हणाली–"बाबा, या युवकानेच मला त्या दुष्टापासून वाचवलंय."

"होय बाळ, मला ठाऊक आहे ते! त्याचे उपकार जन्मात विसरता येणार नाहीत.

"आता माझं काम संपलंय, निघतो मी." मुनि बोलला.

"मी पण येतो ना तुमच्याबरोबर." अपूर्व म्हणाला.

"तुला बरोबर घेऊन जाण्यासाठी काही मी तुला सामान्य मनुष्यरूप दिलं नाही. आजपर्यंत अदृश्य राहून तू इतरांना मदत करत आलास. आता प्रजानायक म्हणून विधिपूर्वक तुला दीक्षा द्यायची आहे." मुनि सदानन्द म्हणाला.

"हे कसं?" अपूर्वने आश्चर्याने विचारले.

"आजपासून माझं राज्य तुझ्या हाती. मुनींनी मान्य केलं तर माझ्या राज्याचा भावी पालक तूच असशील. तुझी अन् माझ्या मुलीची काही हरकत नसेल, तर युवराणीच्या मामाचं लावण्यपुरीचं राज्यही तुझंच होईल." राजा म्हणाला.

अपूर्वने युवराणीकडे पाहिले, अन् तिने लाजून मान खाली घातली. त्या दोघांना समोर बोलावून सदानन्द मुनीने त्यांना आशिर्वाद दिले. "मानवजातीला कल्याणप्रद अशी अनेक कामं करून तुमचं जोडपं भावी पिढ्यांना आदर्श बनून राहील." इतके बोलून मुनि अदृश्य झाला.

राजासह सर्वजण क्षणभर आश्चर्यात पडले अन् लगेच भानावर येऊन ते आनन्दित झाले! राजाज्ञेने तान्त्रिक व प्रधानमन्त्री तळघरात बन्दिस्त झाले.

युवराणी व अपूर्व यांचा विवाह थाटामाटात साजरा झाला. राजाने अपूर्वला 'रुद्रपुरीचा शासक' म्हणून राज्याभिषेक करवला. अपूर्वने समीरला आपला प्रधानमन्त्री म्हणून नेमून घेतले. 'प्रजारंजक पालनकर्ता' म्हणून त्याने आपले आयुष्य प्रजेच्या सेवेत घालवले.

(समाप्त)





# पापाचं ओझं

हट्टी विक्रमराजा पुन्हा झाडाकडे गेला, प्रेत उतरवून त्याने खांद्यावर टाकले आणि पूर्ववत् मौन स्वीकारून तो स्मशानाची वाट चालू लागला. तेव्हां त्या प्रेतातील वेताळ म्हणाला–"प्रत्येक वेळी आपले प्रयत्न असफल होत असलेले पाहूनही, तू कोणत्या पुण्याच्या आशेने या मध्यरात्री स्मशानात असले कष्ट उपसत आहेस, तेच मला समजत नाहीय. पण मला हेही माहीत आहे की, कधीकधी पुण्यकर्मं करूनही ते पापकर्म सिद्ध होतं. उदाहरण म्हणून आपण न केलेल्या अपराधासाठी स्वत:ला शिक्षा करून घेणाऱ्या चन्द्रसेन राजाची गोष्ट मी तुला सांगतो, ती ऐक- म्हणजे तुला आपले श्रम जाणवणार नाहीत." आणि वेताळ गोष्ट सांगू लागला :–

जुन्या काळी उज्जयिनी नगरात चन्द्रसेन नामक राजा राज्य करत असे. चन्द्रसेन

## वेताळाच्या गोष्टी



प्रजेचे पित्यासमान पालन करी. कवि-पंडितांबद्दल त्याच्या मनात विशेष आदर-भाव असे.

एक दिवशी काशीहून श्रीदत्त नावाचा एक पंडित त्याच्या राज्यात आला व त्याने राजाला भेटायची इच्छा प्रकट केली. राजाने मोठया आदराने त्याला दरबारात पाचारण केले. श्रीदत्तच्या अपार पांडित्याने दरबारात उपस्थित असलेले सर्व विद्वान हर्षित झाले. राजाने आपला रत्नहार श्रीदत्तला देऊन त्याचा सत्कार केला.

दरबारचा निरोप घेऊन श्रीदत्त काशीला जायला निघाला. वाटेतच रत्नहारासाठी एका चोराने त्याला मारून टाकले.

श्रीदत्तच्या या अकाली मृत्यूमुळे राजाच्या मनावर फारच मोठा आघात झाला. आपला राग न आवरता येऊन त्याने त्या चोराला मृत्युदंड देववला.

तरीही राजाच्या मनाची शान्ति एकदा नष्ट झाली, ती झालीच. त्याच्या मनात आले की अप्रत्यक्षपणे का होईना, पण पंडित श्रीदत्तच्या मृत्यूला आपणच जबाबदार आहोत!

नेहमी या विचारानेच त्याचे मन तड-फडून उठे की–"मी मोठया प्रेमाने जे बक्षिस दिले, तेच जणू काळसर्प बनून त्याने श्रीदत्तचा जीव घेतला. मीच मारेकरी आहे खरा त्याचा! माझ्या या पापाला काही उताराही नाही."

हळूहळू राज्यकारभारातूनही राजाचे मन उडाले. आत्मग्लानीमुळे त्याने अंथरूण धरले. राजवैद्य राजाचा रोग बरा करू शकेनात.

अशातच चतुर्वेदी नावाचा एक प्रसिद्ध संन्यासी राजभवनात आला. महाराणी व मन्त्री यांनी त्याला राजाच्या अवस्थेबद्दल सांगितले. आणि दोघांनीही ही अडचण सोडवायची त्याला विनन्ति केली.

चतुर्वेदी सरळ राजाच्या दालनात गेला. अस्थिपंजर होऊन पडून राहिलेल्या राजाला पाहून त्या संन्याशाचे मन द्रवले.



राजाजवळ बसून मोठया प्रेमाने त्याच्या मस्तकावरून हात फिरवत संन्यासी राजाला म्हणाला–"बेटा, तू तर एक क्षत्रिय आहेस. तुला असं दुर्बळ होऊन चालणार नाही. रणांगणावर तर तू हजारोंनी शत्रूच्या माणसांना मारून टाकलं असशील. त्यांच्या बद्दल तुला कधी दु:ख वाटलं? नाही वाटलं ना? मग एका डाकूने लोभीपणामुळे कुणाला मारून टाकलं असेल, तर त्याबद्दल तू का स्वत:ला नैतिकरूपानं दोषी ठरवत आहेस, हे मला कळत नाहीय. ठीक आहे; यानन्तर तर तू त्या चोराला मृत्युदण्ड दिलास ना? मग संपली की तुझी जबाब-दारी! आता अकारण दु:ख का करत आहेस?"

यावर राजा उत्तरला–"असं का घडलं, हे मलाच कळत नाहीये स्वामीजी! मी एक शापग्रस्त प्राणी आहे. कित्ती प्रयत्न केला तरी माझं मन काही शान्त होत नाही."

चतुर्वेदी जरा वेळ गप्प राहिला. नंतर म्हणाला–"मी जर आपल्या तप:सामर्थ्याने श्रीदत्तला जिवन्त केलं तर मिळेल तुझ्या मनाला शान्ति? जरा विचार करून सांग बरं!"

हे ऐकताच क्षणभर चन्द्रसेनचा चेहरा चमकून उठला. पण पुन्हा काही विचाराने ते तेज नाहीसे झाले. दोन्ही हात उचलून



संन्याशाला नमस्कार करत राजा म्हणाला–"महात्मन्! मग आपण त्या चोरालाही जिवन्त केलंत, तर मी आपला फार आभारी होईन बघा."

"दोन दोन माणसांना एकाच वेळी जिवन्त करण्याइतकी शक्ति नाही माझ्यात बेटा! आपलं सारं तपोबल खर्चून मी फक्त एकाच माणसाला उठवू शकेन." चतुर्वेदी म्हणाला.

"असं असेल तर मी उगीच कशाला माझ्यावरच्या पापाचं ओझं आणखी वाढवून घेऊ? श्रीदत्तला आपण जिवन्त करू नये. तेच ठीक होईल." असे म्हणून राजाने एक दीर्घ निश्वास सोडला.

अशी गोष्ट सांगून वेताळाने विक्रम-राजाला विचारले–" राजा! चन्द्रसेन राजाचं वागणं विचित्रच नाही वाटत का? चतुर्वेदी स्वतः होऊन श्रीदत्तला जिवन्त करायला तयार असतानाही, त्याला नकार देऊन आपल्या मूर्खपणाचंच प्रदर्शन केलं की नाही राजाने? आपली मन:शान्ति परत मिळवायची ही सुवर्णसंधी राजाने का सोडली? अन् चोरालाही जिवन्त करण्यासाठी विनवणं, हे कितपत योग्य झालं? फक्त श्रीदत्तलाच जिवन्त केलं, तर आपलं पाप अधिकच वाढेल असं कसं मानलं त्यानं? का हा त्याचा बावळटपणाच आहे? या प्रश्नांची उत्तरं माहीत असूनही तू न दिलीस, तर तुझं मस्तक फुटून जाईल."

यावर राजा विक्रमने उत्तर दिले– "राजा चन्द्रसेनला मूर्ख किंवा बावळट मानणं, म्हणजे वस्तुस्थितीवर पडदा घातल्यासारखं होईल. चन्द्रसेनची बुद्धि चांगलीच तर्कशुद्ध आहे. श्रीदत्तला जर चतुर्वेदीने जिवन्त केलं, तर चोराला दिलेली शिक्षा अन्याय्यच ठरेल. या पापाबरोबरच चतुर्वेदीचं सारं तपोबल हरण करण्याचं पापही आपल्याच माथी बसेल, हे राजाने ओळखले. इतकी धर्मसूक्ष्मता असल्यामुळेच त्याने डाकूलाही जिवन्त करायची विनन्ती चतुर्वेदीला केली. आपलं तपोबल चोराला जिवन्त करण्याइतकं पुरेसं नसल्याचं चतुर्वेदीने सांगितले, तेव्हा चन्द्रसेनने दोन गोष्टींचा विचार केला. एक म्हणजे श्रीदत्त व डाकू यांच्यापैकी एकालाच जिवन्त करणं अन्याय्य होईल, अन् दुसरं म्हणजे या अन्यायात भर घालण्यासाठी चतुर्वेदीने जन्मभर तप करून जमवलेलं त्याचं तपोबल नष्ट करायचं पापही डोक्यावर घ्यायचं! म्हणूनच एकट्या श्रीदत्तला जिवन्त न करण्याबद्दल त्याने संन्याशाला सांगितलं."

अशा तऱ्हेने उत्तर दिल्याने राजाचे मौन भंग झाले आणि वेताळ त्या प्रेतासह अदृश्य होऊन नाहीसा झाला, अन् पुन्हा झाडाच्या फान्दीला लटकू लागला. (कल्पित)





# मनाचे सौन्दर्य

धर्मपुर गावात केशव व राजीव नावाचे दोन मित्र रहात असत. उदरनिर्वाहासाठी ते दोघे निरनिराळ्या गावी जाऊन राहू लागले. परंतु त्यांची मैत्री मात्र अखंडच राहिली. दोघे नेहमी एकमेकांना भेटून आपली सुखदुःखे आणि इतर विशेष घटनाही एकमेकांना सांगत असत. आपापल्या व्यापारात दोघेही हळूहळू प्रगति करत राहिले.

व्यापार चांगला भरभराटीला येऊन दोघेही चांगले लखपती बनले. केशव व राजीव यांच्या मैत्रीचे नात्यात रूपान्तर होण्याचा योगही आला. केशवचा मुलगा विद्याधर अन् राजीवची मुलगी मन्दाकिनी दोघेही विवाहयोग्य वयाचे झाले. दोघाही मित्रांची इच्छा होती की लवकरच या दोघांचा विवाह करून टाकावा. एके दिवशी दोघांनीही आपापल्या मुलांना हा बेत सांगून टाकला. ते ऐकून मन्दाकिनीला मोठा आनन्द झाला, कारण विद्याधरची व तिची लहानपणापासून ओळखही होती व त्याच्याशी आपला विवाह व्हावा असे स्वप्नही ती फार दिवसांपासून पहात होती. परन्तु विद्याधरने मात्र या विवाहाला आपला नकार दर्शवला. त्याने कारण असे सांगितले की मंदाकिनी काही तितकीशी सुन्दर नाही.

केशवने आपल्या मुलाला खूप समजावले, पण तो मुळीच माघार घ्याला तयार नव्हता. 'सुन्दर मुलगी शोधण्यासाठी मी प्रवासाला निघणार आहे,' असेही त्याने जाहीर केले.

केशवला त्याचा हा बेत मुळीच आवडला नाही. "असं शोधून मुलगी पसंत करायला तू कोण मोठा राजपुत्र लागून गेला आहेस?" त्याने विचारले.

भारती शहा



"राजपुत्र असेन किंवा नसेन, पण आपल्या पसंतीची मुलगी शोधायचा मला पूर्ण हक्क आहे." असे म्हणून विद्याधर लगेच प्रवासाला निघाला.

जे काही घडले, त्यामुळे केशवबरोबरच राजीवलाही फार दुःख झाले. पण मन्दाकिनी मात्र जराही विचलित झाली नाही. ती म्हणाली–"इतर अनेक लोकांप्रमाणेच विद्याधरलाही स्वप्नांच्या जगात वावरायची सवय आहे. पण तो खूप चांगला आहे, तेव्हां त्याचं मन बदलवून त्याच्याच हातून मी आपल्या गळयात मंगळसूत्र बांधून घेईन. बस्, हे नक्की ठरलं. आता यासाठी योग्य पावलं टाकायला तुम्ही मला परवानगी द्या. असे आपल्या पित्याला म्हणून तिने पुरुषवेष धारण केला आणि ती विद्याधरच्या मागावर निघाली. अखेर एका गावात तिला तो सापडला.

पुरुषवेषातल्या मन्दाकिनीला विद्याधरने ओळखले नाही, त्यामुळे त्याने आपण कशासाठी प्रवास करत आहोत, ते तिला सांगितले. "मला सुन्दर तरुणी शोधण्यासाठी कितीही वर्षं फिरावं लागलं तरी चालेल. पण मी विश्वातली अत्यन्त सुन्दर अशी मुलगी पाहूनच लग्न करीन. अशीतशी सामान्य मुलगी मी कदापि पसन्त करणार नाही. अच्छा, ही झाली माझी गोष्ट. पण तुझी काय वार्ता आहे दोस्त?"

मन्दाकिनी सांगू लागली. "माझं संगीतावर प्रगाढ प्रेम आहे. मुलींच्या बाहेरील सौन्दर्याशी मला काही कर्तव्य नाही. काही वर्षांपूर्वी जराही सुन्दर नसलेल्या अशा एका मुलीच्या प्रेमात पडलो होतो मी! तिचा स्वर कोकिळेसारखा होता, फारच सुस्वर गायची ती. पण एका अपघाताने तिचा आवाजच पार बन्द करून टाकला. पूर्ण मुकी झाली ती बिचारी. त्यामुळे मला विरक्ति आली आहे जीवनाची. अन् आता असा भटकत फिरतोय मी."

"अरेरे! जीवनाचे रंग तरी किती विचित्र प्रकारचे असतात! मला मूर्ख समजू



नकोस. पण मी आपली होणारी बायको एखाद्या रंभा, ऊर्वशी सारखी दिसावी अशी इच्छा धरून आहे." विद्याधर म्हणाला.

"अच्छा? मग हे मला अगोदरच का सांगितलं नाहीस?" मग जरा दोन-तीन मिनिटं विचार करून मन्दाकिनी म्हणाली–"हां ऽ! आता आठवलं! एका वर्षापूर्वी मी माझ्या वडिलांबरोबर तीर्थयात्रेला गेलो होतो. आणि परत येताना इथल्याच एका विश्रामगृहात उतरलो होतो. ते विश्रामगृह चालवणारी बाई फार गरीब होती. तिची मुलगी मात्र अद्भुत सौन्दर्यवती होती. तिच्या सौंदर्याविषयी सर्व देशांत खूप चर्चा झालेली होती. तुझी इच्छा असेल, तर आपण तेथे जाऊ या त्या मुलीला पाहून घे तू."

"हो ऽ! जाऊ या की!" मोठ्या आनन्दाने विद्याधर म्हणाला.

नन्तर दोघेही शहरात पोचले. आणि त्या विश्रामगृहात गेले. भोजनही मिळे तेथे. गरीब बाईने त्या दोघांना हातपाय धुवायला पाणी दिले, अन् त्यांच्यासाठी जेवण वाढले.

जेवताना मन्दाकिनीने त्या गरीब स्त्रीला गप्पात गुंतवले. "एक वर्षापूर्वी मी इथे आलो होतो, तेव्हां तुझ्या त्या देवकन्येसारख्या मुलीला पाहिलं होतं मी. आता ती दिसत नाही कुठं? कुठे गेली ती?"



ती खानावळवाली दुःखी व उदास चेहऱ्याने सांगू लागली–"दोन वर्षांपूर्वी ऐवजी तुम्ही जर तिला एक वर्षापूर्वी पाहिलं, असं म्हणत असाल तर तुम्ही तिला नव्हे, तर तिचं चित्र पाहिलं असाल. देवकन्येसारखी सुन्दर!...अरेरे!" आणि तिने तिचे चित्र आणून त्यांना दाखवले.

त्या चित्रातील मुलीच्या सौन्दर्यावर विद्याधर अगदी फिदा झाला. त्याने विचारले–"तुमची ही मुलगी कुठे आहे? इथंच असेल तर एकदा बोलवा ना तिला."

खानावळवाली जरा संकोचतच आपल्या मुलीला घेऊ तेथे आली. मुलीला पाहून विद्याधर अत्यन्त आश्चर्यात पडला. त्या

मुलीच्या चेहऱ्यावर कसलेसे काळे काळे डाग पडले होते, अन् एका डोळ्याचे पार जाळे झालेले होते!

खानावळवाली आपले डोळे पुसत म्हणाली–"हे सारं हिचं दुर्भाग्यच आहे. तिचं लग्न करून द्यायचं मनात होतं माझ्या. पण त्याच वेळी या भयंकर रोगाने हल्ला केला तिच्यावर! माणसाचं काहीही शाश्वत नसतं. विशेषत: सौन्दर्य व तारुण्य!"

हे बोलणे ऐकून आपल्या पाठीवर कोणी चाबुक ओढल्यासारखे वाटले विद्याधरला. तो दुग्ध्यात पडला. 'देवकन्येसारख्या मुलीशी लग्न केलं, तरी तिचं सौन्दर्य आयुष्यभर कायम राहील याची काय खात्री? या खाणावळवालीची मुलगीच या गोष्टीचं उत्तम उदाहरण आहे. मन्दाकिनी दिसायला मोठी सुन्दर नसेलली. पण ती चारचौघींसारखी तर नक्कीच आहे. अन् विशेष म्हणजे तिचं मन फारच सुन्दर आहे. घरात चांगलं लोणी असताना तुपासाठी दुकानात चौकशी करण्यासारखंच नव्हे का? सुन्दर सुगन्ध असणाऱ्या एकाद्या फुलासारखी आहे मन्दाकिनी, अन् आपण सुगन्ध नसलेल्या फुलासाठी हिंडत राहिलं तर ते अयोग्य नव्हे का?"

विद्याधर पोटभर जेवूही शकला नाही नंतर! अर्धवट जेवण सोडून तो उठला अन् त्याने खाणावळवालीचे बिल चुकते केले. पुरुषवेषातल्या मन्दाकिनीला तो म्हणाला– "आपण दोघं कसे मित्र बनलो कळलंच नाही मला. काही दिवसच तर मिळून फिरलो आपण! मी आता आपल्या गावी परत जाऊन अशा एका मुलीशी लग्न करायचं ठरवलंय की जिचं मन फारच सुन्दर आहे. आता तू आपल्या मधुर स्वराचा शोध स्वत:च करत बस, निघतो मी." अन् तो चालूही लागला.

विद्याधर ज्या दिवशी आपल्या गावी पोचला, त्याच दिवशी मन्दाकिनीही आपल्या घरी पोचली अन् सारी घटना तिने आपल्या आईबापांना सांगितली. ती ऐकून ते दोघे फारच खूष झाले.



# चांदोबा पुरवणी–४१



भारतातील पक्षी व जनावरे :

## गरुड पक्षी

मोठ्या आकाराच्या पक्ष्यांत गरुडाचे स्थान महत्त्वाचे आहे. सहा फूट लांबीचे पंख असणारा आणि गव्हाळ रंगाचा हा पक्षी मांसाहारी आहे. याची नखे खूपच तीक्ष्ण व भक्कम असतात. त्याची नजरही तीक्ष्ण असते. सर्वसाधारण पक्षी उडू शकणार नाही इतक्या उंचीवर उडत रहाणारा हा पक्षी, जमिनीवर एकादी शिकार दिसली, तर झपकन येऊन त्यावर अचूक झडप घालून उचलून नेऊन खाण्यात मोठा कुशल असतो. उंच पहाडांच्या शिखरांवर आणि पहाडांवरील मोठमोठ्या खडकात घरटी बनवणाऱ्या या गरुड पक्ष्याला 'पक्ष्यांचा राजा' असे म्हटले जाते.

गरुड पक्ष्याला आपल्या पुराणात विशेष स्थान प्राप्त झालेले आहे. त्याला श्री महाविष्णूंचे वाहन मानले जाते. या विनतापुत्र गरुडाच्या नावे असलेले एक पुराण 'गरुडपुराण' खूप प्रसिद्ध आहे.

आपल्या मातेला गुलामीतून मुक्त करण्यासाठी हा गरुडश्रेष्ठ इन्द्राकडे अमृत मागायला गेला, पण इंद्राने त्याची मागणी धुडकावली. तेव्हां त्याने इन्द्राला युद्धात हरवून, अमृतकलश आणून आईला दास्यातून सोडवले. गरुडाचे धैर्य व पराक्रम याबद्दल चकित होऊन इन्द्रादि देवांनी जेव्हां महाविष्णूची प्रार्थना केली, तेव्हां विष्णूने गरुडाचा आपले 'वाहन' म्हणून स्वीकार केला.

पुराण-प्रसिद्ध गरुडांत जटायु, संपाती, सुपर्णा व अरुणा प्रसिद्ध आहेत.

# दोन वर्षांची छोटी अभिनेत्री



नुकतेच एका मल्याळी फिल्मचे–'फिलुकनूपेट्टी (खुळखुळा)'चे फिल्मांकन चालू होते. निर्देशकाने 'ॲक्शन' म्हटल्याबरोबर समोर उभ्या असलेल्या पाच वर्षाच्या मुलीच्या डोळ्यातून अश्रू वाहू लागले. अगदी ग्लिसरिन शिवाय! मोठमोठ्या नामांकित अभिनेत्रींनाही ग्लिसरिनची मदत घ्यावी लागते. त्या लहानशा मुलीचा अद्भुत अभिनय पहाणारे सारे जन आश्चर्याने स्तंभित झाले.

ही छबकडी म्हणजेच बेबी श्यामली. हिला आपल्या 'अंजली' या सिनेमासाठी गेल्या वर्षीचे 'सर्वश्रेष्ठ बालअभिनेत्री' हे ॲवॉर्ड मिळाले होते. या बालनटीला आजकाल एकेका फिल्मच्या अभिनयासाठी एक एक लाख रुपये वेतन दिले जाते. सध्या तरी आपल्या देशातली आयकर द्यावा लागणारी सर्वात लहान मुलगी बेबी श्यामलीच होय. सध्या मल्याळी, तेलगू व तमिळ या भाषांमध्ये मिळून जवळजवळ वीस फिल्ममध्ये ही मुलगी काम करीत आहे.

पाचच वर्षांची ही मुलगी एकाच वेळी इतक्या फिल्ममध्ये कशी काय कामं करू शकते? तिचे वडील ए. एस्. बाबू हे फिल्म निर्देशकाकडून श्यामलीच्या 'रोल' बद्दलची संपूर्ण माहिती व संवाद घेऊन ठेवतात, नंतर घरीच या 'रोल'चा अभिनय कसा करावा, संवाद कसे बोलावे याचे प्रशिक्षण देतात. यामुळेच, दुसऱ्या दिवशी कॅमेऱ्यासमोर येताच ही छोकरी कुठलीही अडचण न येता, सहजपणे अभिनय करू शकते.

फिल्मांकनाच्या वेळीही तिचे वडील तिच्याबरोबर असतात, आणि तिच्या गरजा भागवत रहातात. कधी रुसून तिने हट्ट केला तर तिला टॉफी अन् मिठाई देऊन खुलवतात.

महिनाभरात वीस-वीस दिवस शूटिंगमध्ये अडकून असलेली बेबी श्यामली बाकीचे दहा दिवसच शाळेत जाते. कधी कधी घरात रडारड करून ती सांगत असते, की 'आपल्याला रोजच्या रोज शाळेत जायचं आहे.' घरी आपला भाऊ रिचर्ड व मोठी बहीण शालिनी (ही सुद्धा आपल्या वयाच्या दहाव्या वर्षापर्यंत अभिनय करत असे) यांच्याशी खेळायला तिला आवडते. दोन वर्षांची असतानाच बेबी श्यामलीने फिल्ममध्ये काम करायला सुरुवात केली होती. वडलांच्या मनाप्रमाणे घडू शकले, तर ही बाल अभिनेत्री आणखी पाच वर्षे तरी फिल्ममध्ये कामे करत राहू शकेल.

# तुम्हाला माहीत आहे?

१. 'स्वर्गाचे मंदिर' कुठे आहे?
२. जगातील अतिप्राचीन प्राणिसंग्रहालय कुठे आहे?
३. सन् १४५२ मधे जन्मलेला इटलीचा एक रहिवासी चित्रकार, संगीतज्ञ, गणितज्ञ व संशोधक म्हणूनही प्रसिद्ध होता. तो कोण?
४. पहिले शब्द-कोडे केव्हां प्रकाशित झाले होते?
५. असे समजते की भूतपूर्व अमेरिकन अध्यक्ष अब्राहम लिंकन याने एका मुलीकडून आलेले पत्र वाचल्यावरच आपली दाढी वाढवायला सुरुवात केली होती. ही मुलगी कोण?
६. यापुढील ऑलिंपिक क्रीडास्पर्धा जुलै महिन्यात स्पेनमधे होणार आहेत. अगदी पहिल्या ऑलिंपियाड कुठे घेण्यात आल्या होत्या? आधुनिक प्रकारच्या ऑलिंपिक स्पर्धा प्रथम कोठे खेळल्या गेल्या?
७. 'कराटे' चा अर्थ काय?
८. ग्रीक यात्रेकरू मेगॅस्थिनिस याने कोणत्या राजाच्या दरबारचे वर्णन करून ठेवलेले आहे?
९. गांधीजींनी कोणाला आपले 'राजकीय गुरु' मानले होते?
१०. ज्यूलियस सीझरच्या नावाने 'जुलै' महिन्याचे नाव पडले. त्याच्या पुतण्याच्या नावाने कोणत्या महिन्याचे नाव पडले?
११. अकबराचा वित्तमन्त्री कोण होता?
१२. 'रघुवंश' ची रचना कोणी केली?
१३. उंदराला गणपतीचे वाहन समजतात. उंदरांना जिथे मोठ्या भक्तिभावाने खायला घातले जाते, असे एक मन्दिर आपल्या देशात आहे. हे मन्दिर कुठे आहे?
१४. नेपोलियनला निर्वासित करून प्रथम कोणत्या बेटावर पाठवले गेले?
१५. गरुड व साप यांची चित्रे असणारा झेंडा कोणत्या देशाचा?

## उत्तरावली

१. बीजिंग, चीन.
२. ऑस्ट्रियातील व्हिएन्ना येथील स्कॉनब्रुन. (१७५२ मधे स्थापना.)
३. लिओनार्दो द व्हिन्ची
४. २१ डिसें. १९१३च्या 'न्यूयॉर्क वर्ल्ड' मधे. आर्थर विनने हे बनवले होते.
५. ग्रेस बेडेल.
६. इ. स. पू. ७७६ मधे ग्रीसमधे ऑलिंपिया येथे. आधुनिक ऑलिंपिक स्पर्धा १८९६ मधे ग्रीसमधेच अथेन्स येथे सुरु झाल्या.
७. नुसत्या रिकाम्या हातांनी.
८. चन्द्रगुप्त मौर्य.
९. श्री गोपालकृष्ण गोखले.
१०. आगस्ट–ऑगस्टस सीझर.
११. तोडरमल.
१२. कालिदास.
१३. कर्णिमाता.
१४. एल्बा.
१५. मेक्सिको.



### दोन मैल लांबीचे पत्र

आपल्या बंधुबांधवांना लांबलचक पत्रें लिहिण्याची काही लोकांना सवय असते. परंतु, याबाबतीत नेपाळमधील वीस वर्षांच्या राजेन्द्रचन्द ठाकुरीला कोणी हरवू शकणार नाही. त्याने भारतातील आपल्या एका मित्राला खूपच लांब पत्र लिहिले, दचकू नका! पण हे पत्र १०,२१५ पानी आहे! वजन आहे ४२ किलो! नेपाळी युवकाने लिहिलेल्या या पत्राची पानं एकापुढे एक चिकटवत गेले, तर त्याची लांबी दोन मैल इतकी होईल! त्याचा भारतीय मित्र ते पत्र वाचत राहिला आणि फेब्रुवारी महिना सुरू झाला, तरी त्याचे पत्रवाचन संपू शकले नव्हते.

## चांदोबाच्या बातम्या

### जगण्यासाठी संघर्ष

ऑस्ट्रेलियाच्या वायव्येस असणाऱ्या एका एकाकी प्रांतात नदीकिनारी काही गुराख्यांनी अचानक १६ जानेवारीला पस्तीस चिनी माणसे पाहिली, तेव्हां ते मोठ्या आश्चर्यात पडले. हे प्रवासी एका नावेतून येत असताना ती नाव उलटली व मोठ्या संघर्षाने ते कसेतरी किनाऱ्यावर पोचले. तेथपासून त्यांचा जीवनसंघर्ष सुरूच राहिला. मनुष्यवस्तीविरहित जंगलांतून चालत २०० कि.मी. अंतर पार करून शेवटी ते या गुराख्यांच्या शिबिरापर्यंत येऊन पोचण्यात सफल झाले होते. प्रथम आपल्या या प्रवासात त्यांनी एक मगर मारून खाल्ली आणि थोडे मांस शिजवून त्यांनी प्रवासात बरोबर घेतले. फक्त पक्षी सोडून त्यांनी या संघर्षात साप, मासे व एक घोरपड ही मारून खाल्ली! अशा प्रकारे मोठ्या कष्टाने ते जिवन्तपणी तेथे पोचू शकले.





# ऐकण्याचा फायदा

विक्रमसेन राजाचा चतुर नावाचा महामन्त्री होता. राज्यकारभारात मन्त्र्याचा सल्ला घ्यायची राजाची पद्धत होती. चतुरने विचार-विनिमय करण्यासाठी दहा मन्त्री नेमले होते. राजाला कोणताही सल्ला देण्यापूर्वी चतुर या दहा मन्त्र्यांशी सल्ला-मसलत करत असे.

या दहा मन्त्र्यात शचीन्द्र नावाचा एक हट्टी असा मन्त्री होता. बाकी सारेजण 'हां' म्हणतील, अशा वेळी तो नेमका 'नाही' म्हणे. पण विचार-विमर्शासाठी अशी एकादी व्यक्ति जवळ असणे आवश्यकच आहे, असे समजून महामन्त्री चतुर शचीन्द्रच्या चुका पोटात घालत असे. परन्तु बाकी सर्व मन्त्र्यांना त्याची ही वागणूक असह्य वाटे. पण याहीपेक्षा जास्त असंतोष शचीन्द्र स्वतःच प्रकट करी. तो म्हणे–"तुम्ही सर्वजण एक आहात, म्हणून माझं ऐकणारा कोणी उरला नाही. परिणामतः आपल्या देशाचं भविष्य दिवसेंदिवस बिघडत चाललंय."

शचीन्द्रला दुसऱ्यांच्या चुगल्या करायलाही फार आवडे. तो नेहमी राजाला भेटून 'आपलं कोणीच काही ऐकत नाही.' अशी तक्रार करी.

परंतु राजा त्याला म्हणे–"अरे! आपल्या महामन्त्र्याच्या निर्णयावर माझा पूर्ण विश्वास आहे. तो नेहमी बहुसंख्य पक्षाच्या विचाराचा आदर करतो. तुझे विचार बहुसंख्यांकांच्या विचारांशी मिळते जुळते नसतात; याचाच अर्थ की त्यात काही अभाव असेल. तेव्हां नीट साकल्याने विचार करून तू आपलं मत सुधार."

नंतर एकदा राजा विक्रमसेनने सर्व मन्त्र्यांना बोलवून शचीन्द्रच्या तक्रारीबद्दल त्यांना सांगितले, व म्हटले–"तुमच्यातील

"वसुंधरा"



प्रत्येकाच्या मनात असे विचार येऊ शकतील. पण बहुसंख्य पक्षाच्या विचाराला प्राधान्य दिलं तरच तुमच्या विचारालाही प्राधान्य मिळाल्यासारखं होईल हे लक्षात घ्या."

राजा निघून गेल्यावर सर्वच मन्त्री शचीन्द्रची अवहेलना करत म्हणाले– "सर्वांशी जुळेल असा विचार करायला शिका म्हणजे तुमच्या विचारांचा गौरव होईल–हे खुद्द महाराजच म्हणत आहेत. लक्षात ठेव."

हे ऐकून शचीन्द्र रागावून म्हणाला– "पहाताच आहात. एक दिवस असा येईल की, माझं मत तुमच्या मताशी जुळत नसलं, तरी महाराज माझंच मत मानतील. मी तसं करून दाखवीन."

यानन्तर काही दिवसांनी राजा विक्रमसेन शिकारीला जाऊन आला. शचीन्द्र सर्व मन्त्र्यांना बोलवून घेऊन म्हणाला–" आपले महाराज शिकारीतील अद्भुत् कौशल्य व साहस दाखवून परत आले आहेत. तेव्हां, यासाठी आपण सर्वांनी मुद्दाम जाऊन त्यांचं अभिनन्दन करणं उचित होईल."

हा प्रस्ताव अन्य मन्त्र्यांना आवडला नाही. ते म्हणाले–" आपल्या महाराजांबाबत तर ही अगदी क्षुल्लक बाब आहे. कोणी एकाद महान काव्य रचलं, युद्धात अपूर्व विजय मिळवला, राक्षस-संहार केला किंवा एकाद्या महान् कार्यासाठी प्रस्थान ठेवलं, तरच अभिनन्दन करावे. इतक्या क्षुल्लक गोष्टीसाठी अभिनन्दन करायची जरूर नाही."

परन्तु चतुर म्हणाला–" शचीन्द्रचं म्हणणं बरोबर आहे. आपण योग्य तऱ्हेने अभिनन्दन करू राजाचं." अन् असा निर्णय घेऊन त्याची सारी जबाबदारीही शचीन्द्रवरच सोपवली.

हे ऐकून शचीन्द्रने अन्य मन्त्र्यांकडे एक तुच्छतापूर्ण दृष्टिक्षेप टाकला व गर्वाने तो तेथून निघून गेला.

यावर सर्व मन्त्री अपमानित झाल्यासारखे दिसले. तेव्हां चतुर त्यांना म्हणाला–" असं अभिनन्दन करणं, मुळात मलाही आवडलेलं नाही. पण शचीन्द्रला तक्रारी करायची वाईट खोड आहे. कारण काही का असेना, पण शचीन्द्रला अभिनंदन करायचं असताना, आपण नकार दिला हे कळलं तर कदाचित् महाराजही नाराज होतील. कोणताही राजा नाराज होईल अशा वेळी. यानंतर शचीन्द्रच्या असल्या हलक्या तक्रारींनाही महाराज महत्त्व देऊ लागतील. आपल्या राज्याला ते हानिकारक होईल. तुमच्यापैकी कोणी हे सुचवलं असतं, तर मी त्याचं खंडनच केलं असतं. शचीन्द्रच हे बोलला म्हणून मानावं लागलं. एकाद्या गोष्टीची उपयुक्तता काय आहे, यापेक्षा ती न करण्यानं काय होईल याचाही असा कधी-कधी विचार करावा लागतो. हे तुम्ही समजून घ्या."

तरीही अन्य मन्त्र्यांना हा खुलासा आवडला नाही. ते म्हणू लागले–" मग काय चुगल्या करणाऱ्याच्या भीतीने आपण अनुचित गोष्टीही करत रहायच्या? असा चुगलखोर तुम्ही आपल्या मन्त्रीमंडळात राहूच का दिला? त्याला काढून टाकू शकता न?"

चतुर एक-दोन मिनिटे गप्प राहिला. नंतर म्हणाला–" या जगात रिकामे वाद-विवाद करणारी कित्येक माणसं असतात. पण कधीकधी असलं काही ऐकणारांचा फायदाच होतो. शचीन्द्रचीच गोष्ट घ्या. तो बुद्धिमान आहे. आपलं चालावं म्हणून मोठ्या डोकेबाजपणे त्याने हा प्रस्ताव मांडला. त्याला माहीत आहे की मी तो नाकारू शकणार नाही. तेव्हां त्याच्यातल्या या हुशारीचा आपणही हुशारीनेच उपयोग करून घ्यायला हवा. अशा तऱ्हेचे कुतर्क करणारा एक तरी माणूस मंत्री-मंडळात असावा. त्याच्या बुद्धिमानीमुळे आपला लाभ होतो अन् त्याच्या मूर्खपणाच्या मतांना आपण संख्याबळाने हरवूही शकतो."

हे ऐकून सर्व मन्त्री खूष झाले. त्यांची मने हलकी झाली. अन् त्या सर्वांनी चतुरच्या बुद्धिमानीची प्रशंसा केली





# बडबड्या

एके दिवशी सूरसिंह नावाचा माणूस शेजारच्या गावच्या बाजारात गेला, तेव्हां तिथे त्याला छत्र्यांचे एक नवेच दुकान दिसले. त्याने दुकान कोणाचे असावे म्हणून न्याहाळून पाहिले, तर त्याला दुकानात वीरसिंह बसलेला दिसला. हा वीरसिंह सूरसिंहच्या गावचाच होता.

'कोणाला काही न सांगताच वीरसिंहने छत्र्यांचा व्यापार कधी सुरू केला?' असा विचार करीतच सूरसिंह दुरूनच त्याला पहात राहिला.

इतक्यात दुकानाजवळ एक काटकुळासा माणूस आला. त्याला एक छतरी काढून दाखवत वीरसिंह म्हणाला–"हे पहा, तू तर दिसायला अगदीच काटकुळा आहेस, तेव्हा तुला वजनाला हलकी असणारी छत्री बरी पडेल. ही बघ, ही अगदी हलकी आहे छत्री. ही घेऊन तू पाच-सहा कोसही अगदी सहजपणे उड्या मारत जाऊ शकशील. आपल्या हाती छत्री आहे–असं वाटणार सुद्धा नाही तुला!"

त्या माणसाने छत्री उघडून पाहिली व किंमत चुकवून तो ती घेऊन निघून गेला.

थोड्याच वेळात एक चांगलासा तगडा माणूस छत्री खरीदायला तेथे आला. वीरसिंहने त्यालाही एक छत्री दाखवत म्हटले–"तू बरा दणगा वाटतोस, तेव्हां उगीच हलकी, नाजुक छत्री काही तुझ्या कामाची नाही, लवकर मोडून जाईल ती. तुला ही मजबूत छत्री छान टिकेल. हीच घे."

तो माणूस छत्री उघडून पाहू लागला, तेव्हां वीरसिंह बोलत राहिला–"इतर वस्तूंचं काही असो. पण माणसाला छत्री मात्र त्याच्या शरीराला अनुरूप असावी. ही छत्री कशी भक्कम आहे, जोराचा पाऊस आला तरी मोडायची नाही ती!"

शिल्पा सोहोनी

यावर तो तगडा माणूस खूश झाला, अन् छत्री घेऊन तोही निघून गेला.

नंतर सूरसिंह दुकानाकडे गेला. त्याला पाहून मोठ्या प्रसन्नतेने वीरसिंहने खुर्ची पुढे करत त्याची खुशाली विचारली–"कसं काय वीरसिंह? सगळं ठीक तर आहे नं?"

खुर्चीवर बसताच हसत सूरसिंह म्हणाला–"हां, सगळं ठीक आहे. तू त्या बारीकशा अन् दुसऱ्या तगड्या गिऱ्हाइकाला ज्या कौशल्याने छत्र्या विकल्यास–ते सर्व मी दुरून पाहून घेतलं बरं का! मी तर बारीकही नाही, अन् लठ्ठही नाही. बोल, मला कसली छत्री देशील तू?"

वीरसिंह उत्तरला–"अरे, तुला छत्री विकणं फारच सोपं! पावसाळा जवळ आलाय, छत्री तर हवीच. नाहीतर उगीच भिजून आजाराला आमंत्रण होईल. अन् सगळीच कामं चौपट होऊन बसतील की मग! तेव्हां तू नक्कीच घेशील एकादी छत्री." असे म्हणत एक छत्री उचलून पुढे करत तो सूरसिंहला म्हणाला–"तुला ही ठीक होईल."

त्या छत्रीकडे नीट निरखून पहात सूरसिंह म्हणाला–"ही काही खास चांगली नाही दिसत!"

वीरसिंह म्हणाला–"नाही, नाही! असं नको म्हणूस. ही हातात घेऊन तू चालू लागलास, की तू आपल्या गावातला कोणी बडा माणूस असल्यासारखा दिसायला लागशील बघ. छत्री उघडलीस की तुझ्या



चेहऱ्यावर अगदी जमीनदारासारखा थाट दिसेल. अन् तसाच जर घोड्यावरून जाऊ लागलास नं, म्हणजे तर साक्षात एखादा महाराजाच दिसशील! पण तुला यातलं काय कळणार अगोदर!"

छत्री उघडून धरत सूरसिंह म्हणाला– "माझा तर तुझ्या म्हणण्यावर काही विश्वास नाही बसत बुवा!" दोन पावले मागे जाऊन डोके हलवत वीरसिंह म्हणाला– "अरे, मी जे सांगितलं ना, त्यात एक शब्दही खोटा नाही बघ. ही छत्री घेतलेले तुम्ही असे उभे आहात की तुमचं रूपच बदलून गेलंय पहा!"

या बोलण्यावर चकित होत सूरसिंहने विचारले–"अरे, आजपर्यंत तर मला 'अरे-अरे' म्हणणारा तू एकदम 'तुम्ही' म्हणून का बोलतो आहेस? हा आदर कुठून आला रे?"

"या छत्रीखाली उभे आहात नं, मग मी तुम्हाला 'तू' म्हणूच शकत नाही. इतकं धारिष्ट नाही बाबा आपल्यात! वीरसिंह म्हणाला.

त्याच्या हुशारीवर खूष होत सूरसिंह म्हणाला–"ठीक आहे, घेतो मी ही छत्री." अन् तिची किंमत देत तो हळूच फुसफुसत बोलला–"वीरभाई! आता केवळ आपल्या-तुपल्यातच हं! मी कुणाला काही सांगणार नाही, पण उंच. बुटका, बारिक-लठ्ठ वगैरेंसाठी खरोखरच निरनिराळ्या छत्र्या असतात तुझ्याकडे?"

यावर जोराने हसत वीरसिंह उत्तरला– "अरे नाही भाई सूर! माझ्या सगळ्या छत्र्या एकसारख्याच तर आहेत. पण गिऱ्हाइकाच्या रूपाप्रमाणे-स्वभावाप्रमाणे मी जरा अदलून- बदलून बोलत रहातो. काय करू, गिऱ्हाइकाला आवडतील अशा दोन-चार गोष्टी न बोलतो, तर माझ्या-कडून छत्र्या कोण घेईल?"

आत्ता कुठे सूरसिंहला कळून चुकले, की व्यापार करायचा असेल तर वीरसिंहला असा 'बडबड्या' असणेच आवश्यक आहे. आपली छत्री घेऊन हसत-हसत तो तेथून निघून गेला.





# जितू-मितूची गोष्ट

जितूचा देवावर मोठा भरंवसा, देवाची अगाढ भक्ति. रोज पूजा झाल्या-शिवाय तोंडात पाण्याचा थेंब घालायचा नाही. रात्री झोपण्यापूर्वी ही देवाची प्रार्थना झालीच पाहिजे.

एका रात्री स्वप्नात दर्शन देऊन देव त्याला म्हणाला–"जितू! मी तुझ्या भक्तीवर फार प्रसन्न आहे. बोल काय हवं तुला?"

जितू देवाला म्हणाला–"देवा! माझ्या घरासमोर रहाणारा मितू आहे ना, तो भारी नास्तिक आहे. त्याच्या मनात भक्ति निर्माण कर."

"चला ठीक आहे. त्याच्या मनात परिवर्तन करण्याकरता तूच उद्यापासून काही चमत्कार करू शकशील. मी तुला वाक्‌सिद्धि देत आहे. तूच मितूच्या मनात भक्ति जागव." देव म्हणाला.

सकाळी उठताच जितूला स्वप्न आठवले अन् तो फार खूष झाला. तो घराबाहेर आला. मितूला बोलावून तो त्याला म्हणाला–"अरे, देवाने दर्शन देऊन तुला देवभक्तीपर काही शिकवायला मला सांगितलंय. देवाची पूजाअर्चा तू न केलीस तर तुझ्या परसातलं नारळाचं झाड जळून खाक होईल."

"ठीक आहे, ते ही चालवून घेईन. पण देवाची पूजा मी नाहीच करणार!"

इतक्यात मितूची बायको परसातन पुढे येऊन ओरडली की–"आपलं नारळाचं झाड उभंच्या उभं जळून गेलंय!" ते ऐकून देवभक्त जितू जणू दोन मुठी मांस चढलं!

मितू तावडतोब गावच्या शेवटाला असलेल्या पिंपळाच्या झाडाजवळ गेला. तिथे पोचल्यावर तो ओरडून म्हणाला– "हे पिंपळावरच्या पिशाच्या! तू खूपदा

यशवंत पवार

मला मदत करू इच्छित होतास; पण मी कधीही काही मागितलं नाही. आता तुझी गरज आहे मला. ये बाहेर."

"पण मी फक्त अपकार करू शकतो, उपकार नाही, हे तुला माहीत आहे ना?" पिशाच्याने विचारले.

आपल्यावर काय संकट गुदरले, ते मितूने त्याला सांगितले. तेव्हां पिशाच्च म्हणाले—"ठीक आहे. आता तू जाऊन बघ. त्या जितूचं घर एका बाजूनं खचून, मोडून, पडलं असेल."

पिशाच्चाने म्हटले तसेच झाले. आता जितूला राग आला व त्याने आपल्या वाक्शक्तीने मितूचे घरही पाडून टाकले. त्याचा सूड म्हणून जितू-मितूने एकमेकांच्या घरांचा पार सत्यानाश करून टाकला; इतकेच नव्हे, तर एकमेकांच्या शेतातली पिकेही जाळून टाकली.

त्या संध्याकाळपर्यंत जितू-मितू दोघांचेही पार वाटोळे झाले होते, तेव्हां कुठे दोघांच्या ध्यानात आले की आपण रागारागाने जे काही केले, ते बरे नाही केले. शेवटी जितू मितूला म्हणाला—"माझ्यावर प्रहार करायला तू एका पिशाच्चाची मदत घेतलीस. थांब, मी हे सर्व गावकऱ्यांना सांगून तुला गावाबाहेर काढतो."

यावर मितू म्हणाला—"पण आपण दोघांनी ज्यांच्यावर विश्वास ठेवला, त्यांच्यात तरी काय फरक आहे? मला पिशाच्याबद्दल अगोदरच माहीत होतं, म्हणून मी त्याच्यापासून दूर राहिलो. पण देवाच्या नावाने तूच जेव्हां मला सतावायला लागलास तेव्हांच मी पिशाच्च्याचा आधार घेतला. बरोबर आहे न?"

"होय, बरोबर आहे तुझं म्हणणं! कुणाची हानि न करणारा तू, नास्तिक असलास म्हणून कुठे बिघडलं? पण तुला बदलायच्या फन्दात पडून मी मात्र संकट ओढवून घेतलं." जितू म्हणाला.

त्या रात्री देवाने, जितूचे जितके नुकसान झाले होते, ते भरून काढले. पिशाच्याला जरा फैलावर घेतल्यावर त्यानेही मितूचे नुकसान भरून दिले. आता जितूलाच नीट रहायचा इशारा देऊन देव अदृश्य झाला.






रावण अशोक-वनातील सीतेकडे गेला। तेव्हा सीता असंख्य भयानक राक्षसिणींच्या घोळक्यात बसून रडत होती. तिचे रामाविषयीच चिंतन चालू होते. तिला रामाबाबत सतत काळजी लागून राहिली होती.

सीतेला पाहताच जणू काही एकादी सुवार्ता आणल्याचा आव आणून उल्हासाने रावण सीतेला सांगू लागला—"बस, सगळा खेळ संपला. तुझा राम युद्धात मेला, आता माझी पत्नी व्हायला तुला काही अडचण नाही. माझ्या सर्व बायकात मी तुला सर्वोच्च स्थान देईन. राम कसा मेला, ते ही तुला सांगतो, ऐक. वानर-सेना बरोबर घेऊन राम समुद्र पार करून आला. रात्री थकले-भागलेले सर्व जण जेव्हां गाढ झोपी गेलेले होते, तेव्हा आपली प्रचंड राक्षस-सेना घेऊन प्रहस्त गेला व सर्व वानर-सेनेचा फडशा पाडला. राम जेव्हा गाढ झोपलेला होता, तेव्हां प्रहस्तानेच जाऊन त्याचा शिरच्छेद केला. बिभीषण पळून चालला होता, त्याला राक्षसांनी पकडले. लक्ष्मण व काही वानर पळून जाऊ लागले, सुग्रीव, हनुमान, जांबवान व अन्य वानर-वीरांची डोकी उडवली गेली, त्यांची धडे इतस्ततः विखरून पडलेली दिसली. युद्ध-भूमीवर सर्वत्र वानरांच्या प्रेतांचा सडा पडलेला आहे."

नंतर सीतेला ऐकू जाईल अशा रीतीने त्याने जोरात एका राक्षसिणीला आज्ञा

२२. लंका नगरीवर आक्रमण



दिली—"त्या रामाचं शिर घेऊन येणाऱ्या विद्युतजिव्हाला इथे बोलवून आण. हिला दाखवू एकदा रामाचं शिर!"

रामाचे शिर व धनुष्य घेऊन विद्युत्-जिव्ह आला व रावणाला नमस्कार करून बाजूला उभा राहिला. रावण त्याला म्हणाला—" रामाचं शिर या सीतेच्या समोर ठेव. आपल्या नवऱ्याचं काय झालं ते या दुर्भागी अबलेला चांगलं पाहून घेऊं दे. त्याशिवाय हिचं डोकं ताळयावर येणार नाही, हे मला चांगलं माहीत आहे."

विद्युत्जिव्हाने रामाचं डोकं सीतेसमोर ठेवलं, नि तो तेथून निघून गेला. त्याच्या हातातून धनुष्य घेत रावण सीतेला म्हणाला—

"झोपलेल्या रामाचं शिर कापून मग प्रहस्ताने हे त्याचं धनुष्य हस्तगत केले. आता तुझ्यासाठी फक्त मी आहे. माझ्या-शिवाय कोणी ही तुझं नाही. आता रामाला संपूर्ण विसरून जा."

सीतेने रामाचे शिर ध्यानपूर्वक पाहिले. डोळे, डोक्यावरील केस व मस्तकावरील चूडामणी ओळखून, ती कैकयीला दोष देऊ लागली व जोर-जोराने रडू लागली. मग सीता बेशुद्ध झाली. जी जेव्हां शुद्धीवर आली, तेव्हां तिने रामाचे शिर आपल्या हाती घेतले व आपल्या पतीच्या मृत्यूस्तव बराच वेळ रडत राहिली. तिच्या मनात विचार आला—कौसल्येला लक्ष्मणाकडून रामाच्या मृत्यूची वार्ता जेव्हा समजेल तेव्हां दुःखावेगाने ती मरून जाईल. हे सर्व माझ्यामुळे होईल, हे रामाला माहीत नव्हतं. म्हणूनच त्याने माझ्याशी लग्न केलं.

मग सीता रडत रडत रावणाला म्हणाली—"मला घेऊन जाऊन रामाच्या शवावर ठेव. पति-पत्नीच्या मिलनाचं पुण्य मिळव. मी आपल्या नवऱ्याबरोबर सहगमन करीन."

आणि ती रडतच राहिली. इतक्यात एक राक्षस तेथे आला. रावणाला नमस्कार करून त्याने सांगितले की प्रहस्त आला आहे आणि त्याच्या बरोबर सर्व मंत्री पण आलेले आहेत. ही वार्ता समजताच रावण त्यांच्या भेटीला निघाला. रावण अशोक-वनातून बाहेर पडताच रामाचं शिर व धनुष्य अदृश्य झाले.

एवढ्यात बिभीषणाची पत्नी सरमा तेथे आली. ती स्वभावाने फार चांगली होती. तिचे सीतेवर फार प्रेम होते. सीतेचे शांतवन करीत ती म्हणाली—"रावणाची भीती सोडून मी आडून तुम्हा दोघांमधील बोलणी ऐकली. तुला माहीत आहे, अशा रीतीने रावण येथून एकाएकी का निघून गेला? तुझ्या लक्षात आलं, बाहेर युद्धाच्या तयारीचे वातावरण पसरून राहिले आहे? सैन्य एकत्रित केले जात आहे. हत्ती व घोड्यांना युद्धास जाण्यासाठी तयार केले जात आहे. याचा अर्थ असा की रावण रामाशी युद्ध करायला तयार होत आहे. राम नि लक्ष्मण सर्व राक्षसांचा वध करतील, आणि मग तुझे सर्व दुःख दूर होईल."

सरमेच्या तोंडून या सर्व गोष्टी ऐकून सीतेचे दुःख कमी झाले. मग सरमा तिला म्हणाली—"आकाश मार्गाने रामापर्यंत जाऊन त्याला तुझे कुशल कळवावे अशी माझी इच्छा आहे. तुझा या गोष्टीवर विश्वास आहे की मी आकाशात गरूडाहून अधिक वेगाने जाऊ शकते?"



सीता तिला म्हणाली—"तू आकाशातून उडत जाऊ शकतेस, आणि पाताळात जाणे ही तुला शक्य आहे! माझा या गोष्टीवर विश्वास आहे. जर खरंच तू मला मदत करणार असशील तर हे जाणून घेऊन मला सांग की रावण आता काय करीत आहे. रावणाच्या बाबतीतच मला फार भय वाटते. रावणाचा काय बेत आहे ते तू जाणून मला सांग. मी तुझे मनापासून आभार मानीन."

सरमेने सीतेचे अश्रु पुसले नि तिचे सान्त्वन केले. आणि परत येऊन सीतेला सांगू लागली—"रावणाची आई व आविद्ध नांवाचे वृद्ध मंत्री यांनी रावणाला सल्ला



दिला की सीतेला परत पाठवून द्यावे. त्या दोघांनी रावणाला खूप समजाऊन सांगायचा प्रयत्न केला, पण रावणाने त्यांची एक गोष्ट मानली नाही. त्यांनी रावणाला सांगितले की सीतेला परत न पाठविण्यात फार मोठा धोका आहे. परंतु रावणाने त्याकडे मुळिच लक्ष दिले नाही. युद्धात मरेपर्यंत राम तुला सोडणार नाही. सर्व मंत्र्यांनी ही याच गोष्टीचे समर्थन केले."

सरमा हे सर्व सांगत होती, इतक्यात वानर-सैन्याचा सिंहनाद ऐकू येऊ लागला, जणू सर्व पृथ्वी थरथरून उठली! रामाने लंका-नगरीवर हल्ला चढवला.

वानर-सैन्याचा हा प्रचंड युद्ध-ध्वनि ऐकून रावण आपल्या मंत्र्यांना म्हणाला– "हनुमानाच्या समुद्र पार करून येण्याचे व रामाच्या सैन्याच्या विशालतेचे अतिरंजित वर्णन तुम्ही करीत होता, ते मी ऐकलेले आहे. आता रामाच्या पराक्रमाबाबत विचार करून तुम्ही एकमेकांकडे ज्या भयकातर दृष्टीने पहात आहात, ते ही मी पहात आहे."

रावणाने हे शब्द ऐकून माल्यवंत नावाच्या राक्षसाने सुचवले–"महाराज, रामाची विशाल सेना व तिची शक्ति पाहता आता आपण तहाच्या वाटाघाटी करणंच योग्य होईल असे वाटते. राम नि आपण यांच्या शत्रुतेचे मूळ कारण आहे सीता! तिला रामाकडे पाठवून दिलं की आपली शत्रुता संपलीच!"

माल्यवंत पुढे म्हणाला–"राजन्, वानर व अस्वलांकडून आपणास मृत्यु न यावा असं काही वरदान आपणास प्राप्त झालेले नाही ही गोष्ट ही खरी आहे!"

माल्यवंताचं हे बोलणं रावणाला मुळिच आवडलं नाही. रागा-रागाने माल्यवंताकडे पहात तो म्हणाला–"माझा हितैषि असल्याचे नाटक करून असल्या कपटाने भरलेल्या गोष्टी का बोलत आहेस? राम एक सामान्य माणूस आहे, आणि आहे तर



तो एकटाच! त्याला वडिलांनी सोडून दिले आहे आणि आता वानर-सेना घेऊन जंगलात भटकतो आहे. अशा माणसाला समर्थ म्हणणं ही घोडचूकच नाही का? मी सर्व राक्षसांचा प्रमुख आहे, आणि सर्व देवतांना घाबरवून सोडणारा अति पराक्रमी असा वीर आहे मी. मी कोणत्या बाबतीत त्याच्याहून कमी आहे सांग बरं. आपल्या जातीत माझ्यासारखा महान् वीर असताना कदाचित् द्वेषापोटी तू शत्रूचा पक्ष घेत आहेस, नाहीतर तुला असं बोलायचं साहस झालंच नसतं! मी सीतेला जंगलातून पळवून आणली ती काही परत पाठविण्यासाठी नाही. रामाशी युद्ध करण्यात मला कसलीच भीति नाही. राम जर खरोखर माझ्याहून अधिक पराक्रमी असेल तर त्याच्या हातून माझा शिरच्छेद होणं हे योग्यच होय. पण त्याच्या समोर आपली मान तुकवणं मला मुळिच मान्य नाही."

माल्यवंताने जाणलं की रावणाचा पारा चढलेला आहे, म्हणून तो गप्पच बसला. "रावणाचा विजय असो" असा आशीर्वाद देऊन तो तेथून निघून गेला. नंतर रावणाने संरक्षणाबाबत आपल्या मंत्र्यांशी बोलणी केली.

लंकेच्या पश्चिम द्वारावर इंद्रजितने उभे रहावे, उत्तरेच्या बाजूस शुक-सारण उभे



राहतील व मध्यभागी विरूपाक्ष आपल्या राक्षस सैन्यानिशी असेल असे ठरले. नंतर मंत्र्यांनी केलेला जयघोष ऐकून रावण आपल्या अंतःपुरात निघून गेला.

प्रमुख वानरांसह राम जेव्हा लंकानगरीत पोचला तेव्हा वानर आपापसात बोलू लागले–

"हीच आहे ती लंका-नगरी! देवता सुद्धा हिला जिंकू शकणार नाहीत. म्हणून आता आपण काय बरं करावं?"

तेव्हा विभीषण त्यांना म्हणाला–"माझे मंत्री पक्षांचे रूप धारण करून लंका-नगरीत जातील व तेथील सर्व व्यवस्था पाहून येतील. पूर्वेच्या द्वारी प्रहस्त पहारा देत



आहे व दक्षिण-द्वारी महोदर-महापार्श्व, इंद्रजित पश्चिमेकडील द्वारावर व मध्य-भागी विरूपाक्ष पहाऱ्यावर आहेत."

त्याचे मंत्री लंकेत जाऊन सर्व निरीक्षण करून आले व त्यांनी रामाला आपल्या डोळयांनी पाहिलेलं सर्व वृत्त कथन केलं.

नंतर रामाला सावधान करण्यासाठी बिभीषणाने सांगितलं की रावणा बरोबर त्याच्याच सारखे शूर पराक्रमी साठ लाख राक्षस आहेत. रामाने कोणी कोणाबरोबर युद्ध करायचं हे आपल्या सर्व सहकाऱ्यांना सांगितलं.

नल पूर्व-द्वारी असलेल्या प्रहस्ता बरोबर युद्ध करील, आणि अंगद दक्षिण द्वारावरील महोदर-महापार्श्वशी. पश्चिमे कडील द्वारी हनुमान लढेल आणि उत्तर-द्वारी स्वतः राम रावणाशी युद्ध करील व लक्ष्मण त्याला मदत करील. सुग्रीव, जांबवान व बिभीषण हे मध्य-भागातील सैन्याशी युद्ध करतील. युद्धाच्या वेळी वानरांनी मनुष्याचं रूप धारण करायचं नाही. असं केलं म्हणजे कोण आपला व कोण परका हे सहज कळून येईल. राम, लक्ष्मण, हनुमान, सुग्रीव, नील, अंगद व बिभीषण हे सर्व मानव-रूपांत लढतील.

असे ठरल्यानंतर लक्ष्मणासह राम अति-सुंदर सुवेल पर्वतावर चढला. त्याच्या बरोबर बिभीषण वगैरे अन्य प्रमुख मंडळी ही होती. ती रात्र तेथेच घालवावी असे त्यांना वाटू लागले. सुवेल पर्वताच्या शिखरावरून त्रिकूट पर्वतावरील लंका-नगरी छान दिसत होती. केवळ लंका-नगरीच नाही, तर तेथील राक्षसांना ही रामाने तेथून पाहिले. वानरांनी आनन्दाने रामाचा जयघोष केला.

एवढयात सूर्यास्त झाला. सर्वांनी सुवेल पर्वतावरच ती रात्र घालवली. दुसऱ्या दिवशी सकाळी त्यांना लंकेतील बाग-बगीचे फार सुंदर दिसू लागले. लंकेत सर्वात उंचीवर रावणाचा महाल होता. त्याच्या चारी बाजूला उंच भिंती होत्या.





इतक्यात सुग्रीवाला रावण दिसला. सुग्रीव त्याला म्हणाला–"रावणा, मी रामाचा मित्र आहे. मी त्याचा सेवक ही आहे. तुला मी जिवंत सोडणार नाही हे लक्षात ठेव."

"तू सुग्रीव. तुझ्या नावाचा अर्थ 'चांगली मान असलेला'! आता मी तुझं मानगूटच छाटून टाकतो बघ." असे म्हणत रावण सुग्रीवावर तुटून पडला. दोघांचं तुंबळ युद्ध सुरू झालं.

बराच वेळ दोघे जण एकमेकांवर कुरघोडी करीत राहिले. हळू हळू रावण थकत चालला. ते पाहून सुग्रीव तावडतोब आकाशात उडाला. तो परत येईल असं रावणाला वाटलं, पण सुग्रीव रामाजवळ जाऊन उभा राहिला.

सुग्रीवाला धमकावत राम म्हणाला–"मला न सांगता तू रावणाशी का भिडलास? राजा लोकांनी अशी साहसं करणं बरं नाही. तुझ्यावर आता काय प्रसंग ओढवेल याची आम्हाला काळजी लागून राहिली, तू संकटात सापडलास म्हणजे आमचं काय होणार? रावण व त्याच्या सर्व सहकाऱ्यांना ठार मारून, विभीषणाला राज्यावर बसवून अयोध्येला परत जाण्याचा संकल्प मी केलेला आहे."

सुग्रीव म्हणाला–"हे राम, कपटाने सीतेला पळवून नेणाऱ्या धोकेबाज रावणाला पाहिल्यावर मी कसा शांतपणे बसून राहू? त्याच्याशी युद्ध न करणं मला कसं शक्य आहे?"

सर्व जण पर्वतावरून खाली उतरले. रामाला लवकरच लंकेवर आक्रमण करायचं होतं. रामाच्या मागे विभीषण, सुग्रीव, हनुमान, जांबवान, नल, सुषेण, नील आणि लक्ष्मण चालू लागले. त्यांच्या मागे महासागरा सारखी वानर-सेना चालू लागली.

राम व लक्ष्मण यांनी लंकेच्या उत्तरद्वारावर आक्रमण केलं. ती आघाडी स्वत: रावणाने संभाळली होती. तेथे असंख्य राक्षस-सेने सह अपार शास्त्रांस्त्रांचा खजिना होता.







# घराची अखत्यारी

गोष्ट खूप जुनी आहे. एका गावात दण्डपाणी नावाचा गृहस्थ रहात असे. त्याच्या बायकोचं नाव होतं भद्रा. त्यांना चार मुलगे होते. चारांचीही लग्न होऊन, चार सुना घरात नान्दत होत्या.

घराची सारी व्यवस्था भद्रा खूप हुशारीने पाही. परंतु तिला एक काळजी पडली होती कि–'आपल्यामागे घराची अखत्यारी कोण करील? आपल्या चार सुनांच्यात ही जबाबदारी संभाळण्यालायक कोण असू शकेल?'

आपल्या बायकोची ही चिन्ता दण्डपाणीलाही कळली. यासाठी आपल्या सुनांची परीक्षा घ्यावी असं त्याला वाटलं. आपल्या चारी सुनांना बोलावून त्याने प्रत्येकीच्या हातावर धान्याच्या पाच-पाच बिया दिल्या. तो त्यांना म्हणाला–"मी मागेन तेव्हां मला या बिया परत द्यायच्या हं. संभाळून ठेवा तोपर्यंत."

मोठी सून उज्झिका हिने विचार केला–'घरात नेहमी धान्य तर असतंच की! सासरा मागेल तेव्हां कोठीतून पाच दाणे हवे तेव्हां काढून समोर करता येतील. मग एवढ्याशासाठी हे पाच दाणे राखून ठेवायची उठाठेव कशाला? रोज कुठे त्यांची राखण करीत बसायचं?' अन् तिने आपले पाच दाणे बाहेर फेकून दिले.

दुसरी सून भोगवती हिने असाच विचार केला, पण धान्य बाहेर फेकून देण्याऐवजी त्याची सालं काढून तिने ते तोंडात टाकलं. तिने विचार केला सासरा मागेल तेव्हां घरातील धान्यातून पाच दाणे काढून देता येतील.

तिसऱ्या रक्षिकेनं सासऱ्याच्या हातचे पाच दाणे घेऊन ते अगदी काळजीपूर्वक एका फडक्याच्या कोपऱ्यात बांधून ते

२५ वर्षांपूर्वीच्या चांदोबातील गोष्ट



आपल्या पेटीत नीटपणे ठेऊन दिले. पेटी माजघरात नेहमी सुरक्षित असायची.

चौथ्या रोहिणीने असा विचार केला– मामंजींनी दाणे तर दिलेत, पण केव्हां परत मागणार आहेत कुणास ठाऊक! धान्य सुरक्षित ठेवायचं तर त्याला दोन कारणं असतात. एक तर खाण्यासाठी अन् दुसरं म्हणजे पेरण्यासाठी. हे पाच दाणे कुणाला खायला तर पुरणार नाहीतच, तेव्हां हे पेरलेलेच बरे. असा विचार करून तिने ते दाणे आपल्या माहेरी पाठवून, ते पेरण्यासाठी निरोप दिला.

रोहिणीच्या माहेरवाल्यांनी ते पाच दाणे पेरले. त्यांची रोपे आली व नंतर आलेलं धान्य कापून काढून ठेवलं. त्या वर्षी ते धान्य घेऊन जाण्यासाठी कुणी आलं नाही, म्हणून त्यांनी ते सारं धान्य पुन्हा बियाणं म्हणून उपयोगात आणलं. दुसऱ्याही वर्षी तसंच घडलं. असं करत करत पाच वर्षं गेली. पाच वर्षांत घरात धान्याची पोतीच पोती झाली.

भद्रा एक दिवस नवऱ्याला म्हणाली– "मी आता म्हातारी झाले. सुनांपैकी घराची व्यवस्था कुणावर सोपवावी, याचा काही विचार करून ठेवलात का? पाच वर्षांपूर्वीच तर तुम्ही तो निर्णय द्यायचा वायदा केला होता ना? आता तरी सांगा ना. का सगळंच विसरून गेला आहात तुम्ही?"

दंडपाणीने होकारार्थी डोकं हलवलं अन् सुनांना सांगितलं की–'आपापल्या जवळचे ते पाच धान्याचे दाणे घेऊन या.'

मोठ्या अन् तिच्यापेक्षा धाकट्या दोघींनी कोठीतून धान्याचे पाच-पाच दाणे आणून सासऱ्यापुढे ठेवले.

ते पाहून दंडपाणीने आश्चर्याने म्हटलं– "काय ग! हे खरोखरच मी तुम्हाला दिलेले तेच दाणे आहेत?' ते नव्या वर्षाचे असल्यामुळे सोनेरी पिवळ्या रंगानं चमकत होते, अगदी ताजे असलेलं कळत होतें. दोन सुना माना खाली घालून उभ्या राहिलेल्या पाहून त्यांच्यावर जोरात ओरडून दंडपाणीने पुन्हा विचारलं, बोला, काय केलंत त्या धान्याच? ते दाणे कुठायत?"

नाइलाजाने उज्जिका आणि भोगवतीने आपण काय केलं ते सांगून टाकलं. तिसरी सून रक्षिका पेटीत ठेवलेले दाणे घेऊन आली. पाच वर्षं जुने झालेले ते दाणे पार काळे पडून गेले होते.

शेवटची सून रोहिणीला त्याने विचारलं– "तुला दिलेले दाणे कुठायत मुली?"

"मी ते आपल्या माहेरी पाठवले होते. परत आणायला दोन दिवस लागतील. तेवढा वेळ द्या मला. मी आणवते ते." रोहिणी म्हणाली. काही विचार करून सासऱ्याने तिला परवानगी दिली.

दोन दिवसांनी रोहिणीच्या माहेरून पन्नास गाड्या भरून धान्याची पोती आली, अन् ती घरात उतरवून ठेवली गेली. ती पाहून सर्वजण आश्चर्यचकित झाले. पाच वर्षांपूर्वीचे पाच दाणे नीट जतन केल्यामुळे त्याचं पन्नास गाड्या धान्य मिळालं.

"पाहिलंस ना? मग घराची अखत्यारी आपल्या धाकट्या सुनेला दे. कोणती वस्तु, कशी सुरक्षित ठेवायची हे तिला छान कळतं." दंडपाणी आपल्या बायकोला म्हणाला.

"अन् बाकीच्या तिघींचं काय? त्यांनाही काही न काही काम द्यायला हवं ना?" भद्राने विचारलं.

"हूं! उज्जिका अनावश्यक वस्तु फेकून देते, तिनं घर साफ करून बेकार वस्तु फेकून द्याव्यात, ते काम तिला बरंय. भोगवतीचा स्वभाव आहे–हाती आल्या वस्तूचा उपयोग करून घ्यायचा. तिला घरातलं काम द्यावं. रक्षिका प्रत्येक वस्तु छान संभाळू शकेल. तिला दुकानाचा अधिकार देणं उचित होईल. अशी निरनिराळी कामं त्यांना वाटून दिली तर घर छान चालेल." दंडपाणी म्हणाला.

भद्राला नवऱ्याचा विचार आवडला. अशा तऱ्हेने सर्व कामांची वाटणी करून निश्चिन्त झालेली भद्रा आपले दिवस ईश्वरसेवेत घालवू लागली.





# मित्रांचं झेंगट

रामपुरचे जमीनदार रघुवीर यांचे खूपसे मित्र होते. ते वेळी-अवेळी येऊन त्यांना इकडच्या-तिकडच्या गोष्टी सांगत बसून फार त्रास देत असत. पण रघुवीर मुळात भिडस्त स्वभावाचे असल्यामुळे 'तुम्ही उगीच फार वेळ इथे बसल्यामुळे मला त्रास होतो' असे त्यांना सांगूही शकत नसत.

पण जसजसे दिवस जाऊ लागले, तसतशी जमीनदारांची सहनशक्तीही कमी होऊ लागली. एके दिवशी आपल्या दिवाणजींना बोलावून त्यांनी आपली ही अडचण त्यांना सांगितली. दिवाणजी चांगलेच बुद्धिमान होते. त्यांनी ही अडचण दूर करायचे आश्वासन दिले, आणि लगेच त्यांनी एक योजना तयार केली.

दुसऱ्याच दिवशी, जमीनदार रघुवीर आपल्या मित्रमंडळीत बसलेले असताना, सफेत धोतर व सदरा घातलेला एक अपरिचित माणूस तेथे आला. त्याला दुरूनच येताना पाहून जमीनदार पटकन उठले व पुढे होऊन त्यांनी मोठ्या आदरपूर्वक घरात आणले. तो नवागत दोन शब्द त्यांच्याशी बोलला व लगेच उठून त्यांना म्हणाला—"मी तुमचा जास्त वेळ घेत नाही. निघतो मी आता. आपल्या मागे ही पुष्कळ कामे असतील."

आश्चर्य म्हणजे, जमीनदार रघुवीरही त्या गृहस्थाबरोबर उठले व स्वतः दरवाज्यापर्यंत जाऊन त्यांनी त्याला निरोप दिला.

हे सर्व लांबूनच पहात असलेल्या त्या मित्रांना या नवागताबद्दल असूया वाटली, व ते आपसात कुजबुजू लागले—"कोण आहे हा माणूस? जमीरदारांनी स्वतः उठून त्याचं स्वागत काय केलं, त्याला पोचवायला दारापर्यंतही काय गेले! आपल्यापैकी कुणाशीही ते कधी असे वागले नाहीत. कुणाचं इतकं आगतस्वागत केलं नाही त्यांनी! आपल्यापेक्षाही जवळचा कोणी खास मित्र असावा हा त्यांचा."

दिवाणजी जवळच त्यांचे हे बोलणे ऐकत होते. ते म्हणाले—"त्यांचं हे वागणं मलाही आज आश्चर्यात टाकतंय. तो माणूस बहुधा अमरेन्द्रच असावा. या नावाचा त्यांचा कोणी मित्र शहरात असल्याबद्दल ऐकलं होतं मी! त्याच्याबद्दल जमीनदार खूपदा बोलले आहेत माझ्या-जवळ."

हे एकून ते मित्र म्हणाले—''अमरेन्द्र? आम्ही तर कधीच हे नाव ऐकलं नाही त्यांच्या तोंडून! अच्छा, पण त्यांच्याबद्दल जमीनदार इतकं काय सांगतात तुम्हाला? आम्हाला पण सांगा की."

"कधी कोणी दुसऱ्याच्या घरी गेलं तर तेथे किती वेळ थांबलं तर चालू शकेल, हे माहीत करून घ्यावं अगोदर अन् किती मोठं काम असलं तरी त्या माणसाचा कमीत कमी वेळ घेऊन पटकन् त्या माणसाचा निरोप घ्यावा—ही गोष्ट शहरात रहाणारा अमरेन्द्र नावाचा माझा मित्र छान जाणतो. म्हणूनच माझ्या मनात त्याच्याबद्दल फार आदर आहे—नेहमीच अशी स्तुती करत असतात जमीनदार या अमरेन्द्रची!" दिवाणजी उत्तरले. दिवाणाचे हे बोलणे ऐकताच ते सारे



राजेश्वर मिथुन

मित्र काहीसे विचारात पडले. नवागताचा आपल्यासमोर कसा आदरसत्कार झाला, याचा विचार मनात येऊन त्यांना दिवाणजींचे बोलणे खरेच वाटले. अन् सगळेजण सरळ फाटकाकडे निघाले.

नवागताला सोडून परत फिरणारे जमीनदार, त्या साऱ्यांना एकदमच जायला निघालेले पाहून हसतच–"अरे, काय झालं मित्रांनो? एकदम सगळे कुठे निघालात अचानक?" असे विचारू लागले.

सर्वजण क्षणभर गप्प झाले अन् एकजण डोके वापरून चटकन म्हणाला–"खास काही नाही, पण आपले वर्माजी राजधानीला जाणार आहेत ना? तेव्हां आम्ही सर्वजण त्यांना भेटून त्यांच्याशी थोडया गप्पा करणार आहोत. आत्ता गेलो नाही, तर कदाचित उद्या त्यांना भेटणं जमणारही नाही. आता आजच्या पुरता निरोप द्या आम्हाला!"

जमीनदारांना नमस्कार करून ते सर्वजण तेथून सटकले अन् हळूच हसत जमीनदार त्यांच्या पाठमोऱ्या आकृत्यांकडे पहात राहिले. इतक्यात दिवाणजीही त्यांच्याजवळ आले.

"दिवाणजी, आपला मन्त्र बरोबर लागू पडला बरं का! अन् मला या कटकटया मित्रांपासून अशी सुटका मिळाली. मोठमोठे अधिकारी आणि श्रीमन्त माणसांमागे दोस्तीच्या नावाखाली नेहमीच असली माणसं फिरत रहातात, अन् उगीच त्यांचा वेळही खातात. असल्या माणसांचं झेंगट कमी नसतं. त्यांना तोंड द्यायला चांगल्या युक्तिबाज डोक्याची आवश्यकता असते. तुमच्या नाटकामुळे त्यांना आपली चूकही कळून आली अन् माझीही त्या मित्रांच्या झेंगटापासून सुटका झाली! तुमच्या मित्राने अमरेन्द्रच्या रूपात छान अभिनय केला. त्याला छानसं बक्षिस द्यायला हवं; बोलावून आणा बरं त्याला!" जमीनदार रघुबीर म्हणाले.

"आत्ता आणतो बोलावून सरकार!" दिवाणजी पाठ फिरवत म्हणाले.





# कडुनिंबाचे महात्म्य

एका काळी मल्याळी देशात जामोरिन राजाचे राज्य होते. धनाच्या आशेने त्याने राज्यभर चिंचेची झाडं लावायला आणि चिंचेचीच वनं पोसायचा विचार केला होता.

त्याच राज्यात नम्बियार नावाचा एक वैद्य होता. वनौषधिशास्त्रात संपूर्ण भारतात त्याचा हात धरेल असा वैद्य नव्हता. त्या काळात दिल्लीच्या बादशहाकडे असणारा हकीम आरोग्य-शास्त्रात अजोड मानला जाई.

नंबियारला जेव्हां कळले की जामोरिन राज्यभर चिंचेची झाडे लावत आहे, तेव्हां तो राजाकडे गेला व म्हणाला–"चिंचेची झाडं प्रकृति-स्वास्थ्याला चांगली नाहीत महाराज! त्याऐवजी कडुनिंबाची लागवड करावी. त्यामुळे जनता निरोगी राहील अन् त्यांची शरीरं सशक्त होतील."

परन्तु जामोरिनने त्याचे ऐकले नाही. तो म्हणाला–"अंहं! चिंचेमुळे खूप फायदे होतात. त्याची फळं म्हणजेच चिंचा खूप उपयुक्त असतात. त्याचं लाकूड जाळून जो कोळसा बनतो, तो चांगल्या प्रतीचा असतो. झाडाच्या काडयांचं चांगलं दातवण होतं. त्याची कोवळी पानं आणि फुलं खायला छान लागतात! कडुनिंबाचा असा एकही उपयोग नाही."

'राजाचे बोलणे चूक आहे' असे नम्बियार म्हणू शकला नाही, म्हणून तो मन्त्र्याला भेटायला गेला. मन्त्र्याने त्याचे अगत्यपूर्वक स्वागत केले, आणि त्याची खुशाली विचारली. काही विशेष दिसले, असा आव आणत नम्बियार मन्त्र्याच्या शरीराकडे निरखून पाहू लागला. नंतर त्याचे डोळे तपासून त्याची नाडीही पाहिली.

मन्त्री हसत हसत म्हणाला–"काय वैद्यराज! इतकं काय तपासत आहात?

मल्याळी लोककथा



"आपल्या कृपेनं माझी तब्येत तर उत्तम आहे ना?"

गंभीर चेहरा करत नम्बियार म्हणाला–"आता तर ठीकच आहात तुम्ही; पण सहाच महिन्यात एक भयानक रोग जडणार आहे तुम्हाला. योग्य वेळी त्याचा उपाय करावा, हेच बरं!"

मन्त्री घाबरून म्हणाला–"तसं असेल तर आत्तापासूनच उपचार सुरू करा न!"

"अंहं! हा रोग माझ्या आवाक्यातला नव्हे. तुम्ही लगेच इथून निघून दिल्लीच्या बादशहाच्या हकीमाला भेटावं हे उत्तम!" नंबियारने सुचवले.

"समजा मी कसंही करून इतक्या दूर त्या हकीमापर्यंत पोचलो; तरी तो मला नक्की योग्य औषधोपचार करीलच याची काय खात्री?" मन्त्र्याने शंका काढली.

"हकीम असा भेद करत नाही. अगदी गरीबातला गरीब रोगी त्याच्याकडे गेला तरी तो त्याची योग्य चिकित्सा करतो. तुम्ही लवकर निघावं हे बरं!" नम्बियार बोलला.

रोगाबद्दल नम्बियार काही बोलत असेल, तर त्यात संशयाला जागाच नसते; हे ठाऊक असल्याने मन्त्र्याने एक वर्षाची सुट्टी घेतली व तो दिल्लीकडे जायला निघाला. तेव्हां नम्बियारने त्याला सल्ला दिला–

"वाटेने जाताना प्रत्येक वेळी चिंचेखालीच विश्रान्ती घेत जा, अन् मुक्काम करायचा तोही चिंचेच्या बनातच करत जा. चिंचेच्या काड्यांनीच दात साफ करत जा. भोजन बनवायचं, त्यासाठी चिंचेचंच लाकूड वापरत रहा."

नम्बियारने दिलेला हा सल्ला पाळत-पाळत मन्त्री आपल्या परिवारासह दिल्लीला पोचला. पण त्यापूर्वी वाटेतच त्याची तब्येत बिघडू लागली. अशक्तपणा वाढू लागून त्याच्या शरीराचा रंगही बदलू लागला.



"वा! नम्बियार किती बुद्धिमान आहे! आज मला जो आजार झालाय त्याबद्दल त्याने खूप पूर्वीच अन्दाज केला होता." असा विचार करत, दुर्बळ अवस्थेत तो हकिमाला भेटायला गेला. हकिमाची भेट अगदी सहजपणे मिळाली. मन्त्र्याचे सारे बोलणे ऐकून, चिंचेपासून असणारा धोका अनुभवाने कळावा, यासाठीच नम्बियारने त्याला आपल्याकडे पाठवले–हे समजायला हकिमाला वेळ लागला नाही.

"तुमचा आजार लहानसहान नव्हे, पण त्याचा इलाज मात्र फार सोपा आहे." हकिमाने आश्वासन दिले.

"सांगा तो इलाज, जन्मभर कृतज्ञ राहीन मी तुमचा!" मन्त्री म्हणाला.

"तुम्ही ताबडतोब आपल्या देशी जायला निघा. जाताना कडुनिंबाच्या झाडाखाली विश्रान्ती घ्या, कडुनिंबाच्या बनातच मुक्काम करा. वारा घेण्यासाठी कडुनिंबाच्या डहाळ्यांचा चवरीसारखा उपयोग करा. बास, यापेक्षा जास्त कसलाही इलाज करायची जरूर नाही. नम्बियारला माझे हजार प्रणाम कळवा तुम्ही जाऊ शकता आता." हकिमाने सल्ला दिला.

हाच सल्ला आणखी कोणी दिला असता, तर मन्त्र्याने तो नक्कीच मानला नसता. पण दिल्ली-बादशहाच्या प्रसिद्ध हकिमाचा मामला आहे हा–म्हणून त्याचाच सल्ला मानून मन्त्री परत निघाला.



हकीमाने सांगितल्याप्रमाणे कडुनिंबाचा आश्रय घेत राहिला, अन् निंबाच्या हवेनेच आपले गेलेले शरीरस्वास्थ्य परत मिळवू लागला. तो जेव्हां परत आपल्या देशात पोचला, तोपर्यंत तो पूर्णपणे रोगमुक्त झालेला होता. इतकेच नव्हे, तर त्याच्यात पूर्वीपेक्षाही जास्त शक्ती संचारली होती.

परत पोचल्याबरोबर मन्त्री नम्बियारला भेटायला गेला, आणि त्याने आपला अनुभव त्याला कथन केला.

"आपण एकदा जामोरिनकडे जाऊ या. तुमचे त्यांनी स्वतः ऐकले, तर बरं होईल. आवश्यकच आहे ते सर्व!" नम्बियार म्हणाला.

दोघेही जामोरिनकडे गेले. मन्त्र्याचे बोलणे ऐकून जामोरिन आश्चर्यचकित झाला. तेव्हां नम्बियार म्हणाला—"या प्रकरणात माझी एक मोठी चूक झाली आहे, मोठा अपराध केलाय मी. तुमची दोघांचीही क्षमा मागतो मी! खरं म्हणजे मन्त्रीमहोदयांना कसलाच रोग नव्हता. चिंचेच्या झाडाचे दुष्परिणाम दाखवण्यासाठीच मी त्यांना दिल्लीला पाठवलं, अन् जास्तीत जास्त चिंचेच्याच सहवासात रहायचा सल्ला दिला. मी काहीही न कळवताच हकीमाने आपल्याला कडुनिंबाचं महात्म्य जाणून घ्यायची संधी दिली. तेव्हा महाराज, आता माझा असा सल्ला आहे आपणाला, की यापुढे चिंचेची लागवड करायची थांबवून कडुनिंब लावायला लागावे. जिथे जिथे शक्य असेल, तिथे निंब लावणं शरीरस्वास्थ्याला लाभदायक होईल."

जामोरिनने आता नम्बियारचा सल्ला धुडकावला नाही. त्याने लवकरच जाहीरनामा काढला की आता आपल्या राज्यात चिंचेची लागवड सोडून निंबाची लागवड करायला आरंभ करावा. अशा तऱ्हेने नम्बियारने आपल्या राज्याच्या स्वास्थ्याचे रक्षण केले.



### सारखेपण

तीन-चार महिन्यांपूर्वी कुंभकोणमजवळ वलंगाइमन नावाच्या जागी जेव्हा एक सहा फुटी कालनाग पकडला गेला, तेव्हां त्याला पाहून लोक आश्चर्यात पडले. कारण, त्याची फणा व मानवाचा चेहरा यात खूपच साम्य आढळले. विशेषतः, त्याच्या फणेवर डोळे, भुवया, नाक व तोंड यांची स्पष्ट चिन्हे दिसत होती. काहीही असो, हा नाग एक खास विचित्र जातीचा आहे, हे नक्कीच !





### पिग्मी हिप्पोपोटेमस

पिग्मी म्हणजेच वामनरूपी हिप्पोपोटेमसही अस्तित्वात आहेत. हे फारच लहान आकाराचे हिप्पो, नायजेरियाच्या खालच्या बाजूच्या आफ्रिकी जंगलात आढळतात. ते सध्या संकटग्रस्त प्राणी मानले जातात. त्यांची उंची जवळजवळ ७५ सें.मी. इतकीच म्हणजे सर्वसाधारण हिप्पोपोटेमस (१५० सें.मी.)च्या अर्धीच असते. आणि त्यांची लांबी मात्र २.५ मीटर असते. हे पिग्मी फक्त दलदलीतच आढळतात. सामान्य हिप्पोपोटेमस रात्री मैदानातल्या हिरवळीत फिरतात व दिवसा पाण्यात रहाणं जास्त पसंत करतात. पण हे पिग्मी याच्या बरोबर उलट सवयीचे आहेत. हे झाडांची मुळे, गवत, नवी रोपे व फळे खाऊन जगतात. योगायोगाने 'हिप्पोपोटेमस' या ग्रीक शब्दाचा अर्थ आहे 'जलहत्ती.'

### माळढोक

एके काळी नष्ट होत जाणारा म्हणून मानला गेलेला महान् भारतीय पक्षी माळढोक हा पुन्हा अनेक वर्षांनी आन्ध्र प्रदेशातील कर्नूल जिल्ह्याच्या जंगली भागात सापडला; ही खबर ऐकून पक्षीप्रेमी लोकांना आनन्द वाटेल. हा दुर्लभ पक्षी पूर्वी राजस्थान, गुजरात, महाराष्ट्र व मध्यप्रदेशात आढळत असे. जेव्हां त्यांच्या संरक्षणाची योजना आखली गेली तेव्हां ४० पक्षांना रायलसीमामध्ये आश्रय दिला गेला होता. माळढोकची उंची एक मीटर इतकी असते. हे पक्षी नाकतोडे, टोळ, पतंग, पाली, गोचिडी इत्यादि प्राणी खाऊन जगतात.



विश्व - वार्ता

# साल्वडॉर मध्ये शांति



गृह-युद्ध संपलं नि देशात शांति प्रस्थापित झाली म्हणजे अतिशय समाधान वाटते नाही? मध्य अमेरिकेतील प्रजासत्ताक राज्य एल् साल्वडॉर मध्ये सध्या अशी शांति स्थापित झाली आहे. गेली बारा वर्षे तेथील मिलिटरी शासन व डाव्या पक्षाचे गोरिला यांच्यात गृह-युद्ध चालू होतं. या युद्धात ७५,००० लोकांना आपल्या प्राणांना मुकावं लागलं.

सुमारे ४५० वर्षांपूर्वी स्पेनच्या रहिवाशांनी येथे येऊन स्थानीय अजटेक जनतेवर विजय मिळवला व तेथे स्पेनचे राज्य सुरु झाले. नंतर एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या दशकात स्पेनचे शासन कोलमडून पडले आणि अशा रीतीने सन १८२३ मध्ये 'सेंट्रल अमेरिकन फेडरेशन'चे राज्य सुरु झाले. या फेडरेशन मध्ये ग्वाटेमाला, होंडुरस, निकाराग्वा, कोस्टारिका ही राज्ये सामिल होती.

हे फेडरेशन फक्त १५ वर्षे टिकून राहिले. ते संपुष्टात आल्यानंतर तीन वर्षांनी म्हणजे १८३८ मध्ये एल् साल्वडॉर या स्वतंत्र गणराज्याचा उदय झाला. येथील लोकांचा शेतीवाडी हा मुख्य व्यवसाय आहे, पण सर्व शेते संपन्न जमीनदारांच्या ताब्यात असत. ते श्रमिक शेतकऱ्यांकडून अधिकाधिक रक्कम वसूल करीत. शंभर वर्षांहून अधिक एका स्वतंत्र राष्ट्रात राहिलेल्या जनतेत हळू हळू जागृति निर्माण झाली. साल्वडॉर मधील लोक मोठ्या संख्येने होंडुरस मध्ये प्रवासासाठी जाऊ लागले. यामुळे या दोन देशात तणाव वाढू लागला. सन १९७० मधे जागतिक फुटबॉल सामन्यात साल्वडॉरने होंडुरसला हरवले, तेव्हापासून या तणावाने युद्धाचे स्वरूप ग्रहण केले.

सन १९७२ मधे जनरल कार्लोस रोमेरो यांची अध्यक्षपदी निवड झाली. त्यांच्या कुटिल नीतीमुळे आंतरिक अशांति वाढली आणि गोरिला-गट निर्माण होऊ लागले. त्यांनी पळवा-पळवी व हत्याकांड सुरू केले. सन १९८० मधे सुप्रसिद्ध प्रमुख धर्माध्यक्षांची जेव्हा राजधानी सान् साल्वडॉर येथे हत्या झाली तेव्हा देशात गृह-युद्ध झाले.

याच वर्षी जोस डुआर्टे अध्यक्ष बनले. पण निवडणुकीच्या जाहिरनाम्यात दिलेली आश्वासने ते पूर्ण करु शकले नाहीत व नंतर ते आजारी ही पडले. यामुळे

हिंसाचाराला ऊत आला. शेवटी त्यांनी आपल्या अध्यक्ष-पदाचा राजीनामा दिला. नंतर सन १९८९ मधे आल्फ्रेडो क्रिस्टियानी यांची अध्यक्ष म्हणून निवड झाली. त्यांच्या प्रयत्नांमुळे संयुक्त राष्ट्र-संघाने शांततेच्या वाटाघाटी केल्या आणि दोन वर्षांनंतर त्याचे फळ प्रत्यक्ष दिसू लागले.

गेल्या १६ जानेवारीला साल्वडॉर सरकारने वामपक्षीय फराबुंडो मार्टी नॅशनल लिबरेशन फ्रंटच्या उग्रदलाशी एक तह घडवून आणला, त्यामुळे शांततेचे एक नवे पर्व सुरू झाले. या तहाची अंमलबजावणी १ फेब्रुवारीला सुरू झाली. तहावर सह्या करते वेळी संयुक्त राष्ट्रसंघाचे महासचिव डॉ. बुत्रोस घाली सहर्ष म्हणाले—"एल् साल्वडॉर मधील लांबलचक अंधारी रात्र आता संपुष्टात आली आहे."

गोरीला सेना मागे घेणे, सैन्यदलाची संख्या कमी करणे, जमिनीबाबत तडजोड करणे व न्याय नि निवडणुकांच्या पद्धतीत सुधारणा करणे—हे या तहातील काही मुख्य अंश आहेत. हे उग्रवादी मेक्सिकोहून जेव्हा आपल्या मायदेशी परत आले, तेव्हा त्यांचे प्रचंड स्वागत झाले. सरकारी नेत्यांनी 'आमचे देशवासी' असा त्यांच्याबद्दल उल्लेख केला.






# निर्वासची मोक्षप्राप्ति

खूप जुनी गोष्ट आहे. एका घनदाट अरण्यात निर्वास नावाचा एक रागीट मुनि रहात असे. थोडयाशा चुकीवरून कोणालाही तो मागचा-पुढचा विचार न करता कडक शाप देई. त्याचा शाप भवलेली अनेक माणसे हाल-हपेष्टा सोसत जीवन जगत.

एकदा असेच सुदीप नावाच्या राजावर रागावून निर्वासने त्याला 'तू राक्षस होशील' असा शाप दिला. सुदीप ताबडतोब राक्षस बनला आणि लोकांना त्रास देऊ लागला. आपल्या राज्यातील अनेकांना त्याने ठार मारले, अनेकांना खाऊन टाकले. राज्यातील कोवळया मुलांवर त्याचे फार प्रेम. अनेक गोजिरवाणी मुले त्याच्या भुकेला बळी पडली. राक्षसाच्या या अत्याचारांपासून प्रजेचे रक्षण करणारे कोणी नव्हते.

सुदीपच्या मन्त्र्याचे नाव होते सुकाम. त्याला जेव्हां सुदीपवर गुदरलेला प्रसंग कळला, तेव्हां तो स्वत: निर्वास मुनीकडे गेला आणि त्याने विनवले—"महात्मा, सुदीप एक फार चांगला राजा आहे. आपल्या शापामुळे तो राक्षस बनून जनतेला त्रास देऊ लागलाय. सुदीपच्या स्वत:च्या अपराधासाठी इतक्या साऱ्या लोकांना त्रास व्हावा हे कितपत उचित आहे महात्मा? या राक्षसाच्या अनन्वित कृत्यांनी सारी जनता त्रस्त होऊन गेली आहे. रात्रींच काय पण दिवसा-ढवळया सुद्धा हा सरळ कोवळया मुलांना पळवून त्यांचा फडशा पाडतो. असे किती दिवस चालू राहणार? आपण कृपया उ:शाप सांगून आम्हावर दया करावी. आपणा शिवाय आज प्रजेचा त्राता कोणी नाही. म्हणून मी मुद्दाम आपणास प्रार्थना करण्यासाठी

दीप्ति हर्षे



आलो आहे. आपण दया न केली तर बिचाऱ्या जनतेने कोठे जावे, काय करावे?"

मन्त्र्याकडे करुणापूर्ण दृष्टिक्षेप टाकत निर्वास म्हणाला–"एके काळी ब्रह्मदेवाकडून वर प्राप्त करून घेऊन नव्हते का बरेचसे राक्षस जनतेला उपद्रव देत? याचा अर्थ काय असा होतो का, कि ब्रह्मदेवाने त्या चुका केल्या? जनतेला जेव्हां जेव्हां आपल्या कर्माची फळं भोगायची वेळ आली, तेव्हां तेव्हां देवाने राक्षसांना असे वर दिले. त्याचप्रमाणे ऋषि-मुनि मानवांना शाप देतात. तेव्हां आता तुला कळेल की, मी या प्रकरणात केवळ निमित्तमात्र आहे. तुला, मला अन् सर्वांनाच चालवणारा तो तर वर बसलेला आहे."

"महात्मा, आपलं बोलणं अगदी शंभर टक्के खरं आहे. पण आता या देशातल्या जनतेचा कर्मफळ भोगण्याचा काळ संपत आला, अन् माझं आपणाकडे येणं हे त्यासाठीच असावं–असंही असू शकेल ना! आपण सर्वशक्तिमान् आहात, मला काही निवारण उपाय सांगा ना!" सुकामने मुनीला विनवले.

शेवटी निर्वास म्हणाला–"तुला पाहून आता मला तुझी दया येत आहे; म्हणून तुला एक रहस्य सांगतो मी. इथून एक योजन अंतरावर एक कालीमन्दिर आहे. त्या मन्दिरातली काली-मूर्ति महाभयानक आहे. तू तिच्यासमोर उभा राहून आपल्या शरीराचा तुला सर्वात आवडणारा भाग अर्पण केलास तर तुझी इच्छा नक्की पूर्ण होईल."

मुनीला धन्यवाद देऊन सुकाम कालीमन्दिराकडे निघाला. खूप कष्ट सहन करून तो तेथे पोचला. समोरची मूर्ति भलतीच उग्र होती. तरीही न भीता सुकाम बोलू लागला–"माते, माझ्यावर दया कर. या देशाच्या राजा सुदीपला मानवरूप परत कर! त्यासाठी मी आपल्या शरीराचं मला अत्यन्त प्रिय असणारं मस्तक तुला अर्पण करीत आहे. राज्यातील जनतेचे हाल आता माझ्याने पहावत नाहीत. या राक्षसाने राज्यभर उच्छाद मांडला आहे. मुनी निर्वासाने मला तुझ्याकडे पाठवले आहे." इतके बोलून त्याने आपले डोके उडवण्यासाठी तलवार उचलली.

इतक्यात तेथे एक अद्भुत प्रकाश दिसू लागला. ते तेज सहन न होऊन सुकामने डोळे मिटून घेतले. लगेच त्याला शब्द ऐकू आले–"हे मानवा! तुझी भक्ति आणि धाडस यामुळे मी प्रसन्न झाले आहे. तू तावडतोब राजधानीला परत जा अन् सर्वांना समजेल अशी एक हजार पानांची गोष्ट लिही. ती अशी असावी की एकदा वाचायला घेतली की मधे थांबूच नये असं वाटावं. नंतर ती तू राजा सुदीपला वाचून दाखव. त्याला नक्की पूर्वरूप व शक्ती परत मिळेल."

सुकाम घाबरून म्हणाला–"माते, मी राजनीतीबद्दलचे खूपसे ग्रन्थ वाचले आहेत. प्रजेच्या उपयोगासंबंधीच्या अनेक शास्त्रांचं अध्ययन केलं. वेळ आली तर उपयोगी पडावं म्हणून थोडंसं वैद्यकही शिकून घेतलं. पण साहित्याची मात्र मला आवड नाही. एकादं काव्यसुद्धा मी आतापर्यंत कधी वाचलं नाही. कधी कोणी ऐकवू म्हटलं, तरी ऐकण्याचा मला कंटाळा असे. असला प्राणी मी, गोष्ट कधी





लिहू शकेन?" तेव्हा जे मला जमणार नाही असे काम का करायला सांगतेस? मी करू शकेन असे काही काम मला सांग. मी ते मनोभावे करीन. माझे प्राण ही अर्पण करायची माझी तयारी आहे." डोळे मिटूनच सुकामने विचारले.

ऐकायला लागलं, तर ऐकतच रहावं असं बोलू तर शकतोस ना तू? मग तेच बोलणं जरा बऱ्या रूपात लिहून काढ. तुझी गोष्ट ऐकून सर्व वयाची माणसं खूष होतील. त्या कथे द्वाराच लोकांचा शाप मिटेल. हे माझं वरदानच मान अन् सांगितल्याप्रमाणे कर." सुकामला आज्ञा ऐकू आली.

मन्त्री राजधानीला परत आला. रात्रंदिवस कष्ट करून त्याने एक गोष्ट लिहिली. एका महिन्यात हजार पानांची गोष्ट तयार झाली. नंतर तो ग्रंथ घेऊन सुकाम सुदीप राजाच्या शोधार्थ निघाला.

राक्षस रूपातला सुदीप सुकामच्या दिशेने पुढे येऊ लागताच सुकामने ग्रन्थ उघडून वाचायला सुरुवात केली. सुदीप मूर्तिवत् उभा राहून ऐकू लागला. एकाच बैठकीत तो पूर्ण ग्रन्थ सुकामने वाचून काढला आणि सुदीपने ऐकला.

सुकामने शेवटचे पान वाचून पूर्ण केल्याबरोबर राक्षसाच्या जागी राजा सुदीप दिसू लागला. अद्भुत तेजाने झळकत तो स्मित करीत उभा होता.

नंतर मन्त्री व राजा राजवाड्यात गेले. सुदीप मन्त्र्याला म्हणाला—"तुझा ग्रन्थ खरोखरच मोठा अजब आहे! असेच ग्रन्थ लिहून तू आम्हाला रिझवत रहा यापुढे."

मन्त्री म्हणाला—"महाराज! ग्रन्थलेखन हे काही मला जमणारं काम नव्हे! आपणाला शापमुक्त करण्यापुरताच हा ग्रन्थ मी लिहिला. माझं यापुढचं आयुष्य आपला मंत्री म्हणूनच जावं अशी माझी इच्छा आहे. असे ग्रन्थ लिहायला आपण आणखी कोणाला तरी सांगावे महाराज!"

राज्यशासनाच्या कामातच मन्त्र्याच्या अधिक वेळाची गरज आहे, हे ओळखून राजाने ग्रन्थलेखनाचे काम दरबारी कवी-पण्डितांवर सोपवले.

मन्त्र्याचा ग्रन्थ वाचून दरबारी कवि-पंडित म्हणाले—"महाराज, आम्हीच काय, पण सरस्वतीचा कोणीही उपासक असला ग्रन्थ लिहायला तयार होणार नाही."

हे ऐकून सुदीप राजा रागावला. सुकामच्या ग्रन्थाच्या हजारो प्रति छापवून त्याने त्या प्रजेत वाटल्या. इतकेच नव्हे तर, असा ग्रन्थ लिहिणाराला त्याने दहा हजार सुवर्णमुद्रांचे पारितोषिक जाहीर केले.

कोणीही साहित्यप्रेमी त्या दहा हजार मुद्रांच्या लोभात पडला नाही. परन्तु, उगीच इकडच्या-तिकडच्या गप्पा करणारे पुढे सरसावले व हळू-हळू असे अनेक ग्रन्थ तयार झाले. लोक असले ग्रन्थ पसंत करू लागले, लिहिणारांना पैसा व वाचणारांना मनोरंजन प्राप्त होऊ लागले.

अशा तऱ्हेने काही दिवस गेले. त्या देशात खऱ्या विद्वान कवि-पंडितांना मान उरला नाही. ते सर्वजण एकत्रित होऊन बराच वेळ चर्चा करीत राहिले. या समस्येचे कारण व उत्तरही निर्वास मुनीच सांगू शकतील असा त्यांनी निर्णय घेतला.

सुकामचा ग्रन्थ घेऊन ते सर्वजण महामुनि निर्वासकडे गेले. त्यावेळी ध्यान-मग्न असलेल्या त्या मुनीचा तपोभंग



झाला, पण त्याला मुळीसुद्धा राग आला नाही. डोळे उघडून प्रसन्न चेहेऱ्याने त्यांची विचारपूस केली. नंतर सुकामचा ग्रन्थ हाती घेऊन आपल्या दिव्यदृष्टीने त्यात काय मजकूर असावा, ते त्यांनी जाणले. नंतर मुनि म्हणाले–"साहित्यवेत्त्यांनो, तुमच्या आगमनामुळे बरेच दिवस माझ्या मनात असलेली शंका दूर झाली. मी मोक्ष मिळवण्यासाठी कित्येक वर्षांपासून तप करत होतो, परन्तु मी क्रोधाचा त्याग करू शकलो नाही, अन् त्यामुळेच मला मोक्षही मिळत नव्हता. क्रोधामुळे मी काही लोकांना शाप देत असे आणि त्यामुळे त्यांना आपले कर्मफळ भोगायला लागत असे. पण काही काळापासून माझा क्रोध शान्त झाला आहे. असं का घडलं हे मात्र मला कळेना. आता मला कळलं की कारण आहे हा ग्रन्थ!"

"ते कसं काय महामुनि? कृपा करून सांगाल आम्हाला?" एका पण्डिताने आश्चर्याने विचारले.

गालात हसत मुनि म्हणाला–"तुम्ही पंडित आहात, जास्त काही तुम्हाला सांगायची गरज नाही. सुकामचा ग्रन्थ वाचणं म्हणजे राक्षसांच्याही लायकीचं काम नव्हे. त्यामुळेच हा बेकार ग्रन्थ वाचून सुदीप राजाचं राक्षसरूप समाप्त झालं. या देशातल्या लोकांना आपलं कर्मफळ भोगण्यासाठी आता माझ्या शापांची गरज राहिली नाही. त्यांनी हे ग्रन्थ वाचले की पुरे! यापुढे ऋषिमुनि व देवांचे शाप या जगात असणार नाहीत, त्या जागी हे ग्रन्थ पुरेसे आहेत."

त्याच क्षणी आकाशातून एक दिव्य विमान तेथे उतरले अन् त्यात बसलेल्या देवदूतांनी निर्वाण मुनीला हाताला धरून त्या विमानात बसवले. जाता जाता मुनि त्या कवि-पंडितांना म्हणाला–"या ग्रन्थामुळेच माझं कर्मफळ समाप्त झालं अन् मला मोक्ष मिळाला. रामराम!" अन् विमान तेथून निघाले.





# माया महाल

वीरगिरी राज्यात सर्वत्र आनन्दाचे वातावरण पसरलेले होते. राजकन्या विद्यावतीच्या येत्या वाढदिवसाच्या निमित्ताने होणाऱ्या उत्सवाबद्दलची बोलणी सर्वत्र ऐकू येत होती. वाढदिवसाला फक्त तीन आठवडे अवकाश होता, त्यामुळे आता-पासूनच जनता उत्सवाच्या तयारीला लागली होती. राजकन्या त्या दिवशी आपल्या परिवारासह देवळात कुलदेवीच्या पूजेसाठी जात असे व तेथून परत राज-वाड्याकडे मोठ्या समारंभाने मिरवत जात असे–हाच या उत्सवाचा प्रमुख भाग. यासाठी सकाळ–संध्याकाळ राजमार्गाची सफाई व सजावटीचे काम चालू होते. रांगोळ्या व तोरणांनी राजमार्ग चमकू लागले. सारी जनता राजकन्येचे दर्शन होणार म्हणून उतावीळ झाली होती.

परन्तु, जन्मदिनोत्सवापूर्वी तीनच दिवस अगोदर एक वाईट बातमी जनतेच्या कानी आली. राजसेवकांनी दवंडी पिटून घोषणा केली की–'या वर्षीचा जन्मोत्सव स्थगित करण्यात आला आहे.' याचे कारण होते–राजकन्येला अचानक झालेला आजार! ही खबर ऐकून जनतेचा उत्साह एकदम थंड झाला व सर्वत्र काळजीचे साम्राज्य पसरले. लोक एकमेकांना राजकुमारीच्या आजारा-बाबत विचारू लागले. पण कोणालाच काही माहिती नसल्यामुळे सर्वत्र अनिश्चित-तेचे वातावरण पसरले होते.



राजा वीरसेन व राणी वज्रेश्वरी दुःखात बुडून गेले. राजकन्येवर त्यांचे जिवापाड प्रेम होते, त्यामुळे तिच्या आजारामुळे त्यांच्या मनाला अत्यन्त वेदना होऊ लागल्या. विशेष म्हणजे यापूर्वी राजकन्येला कधी अगदी लहानसाही आजार झालेला नव्हता, त्यामुळे या अचानक आजाराने राजाराणी इतके अस्वस्थ होऊन गेले. त्याचे असे झाले–तीन दिवसांपूर्वी सकाळी राजकन्येला बिछान्यातून उठताच येईना. तिची खास दासी शालिनी हिने तिला उठून बसवायचा प्रयत्न केला. बऱ्याच प्रयत्नाने युवराणी विद्यावती उठून उभी तर राहिली, पण लगेच तिचे पाय डगमगले आणि ती धाडकन बिछान्यावर कोसळली. बास, त्या दिवसापासून ती अंथरुणालाच खिळली! बिछान्यावर उठून बसणे ही तिला कठिण वाटू लागले.

ही वार्ता कळताच राणी वज्रेश्वरीदेवी ताबडतोब युवराणीच्या शयनकक्षाकडे धावली व अश्रूभरल्या डोळ्यांनी ती आपल्या लाडक्या लेकीकडे पहात राहिली. युवराणी विद्यावतीचे सारे शरीर फिकट पडले होते, चेहऱ्यावर खूप अशक्तपणा दाटलेला दिसत होता. डोळे खूपच खोल गेलेले होते. तिला पाहून असे वाटत होते की, जणू काही ही मुलगी अनेक वर्षे आजारीच आहे! राजाही तेथे आला व लेकीची स्थिती पाहून आश्चर्याने खिळून उभा राहिला! त्याचा आपल्या डोळ्यांवर विश्वासच बसेना! राजाने ताबडतोब राजवैद्याला बोलविले.

राजवैद्याने येऊन युवराणीला नीट तपासले. कोणत्याही विशिष्ट अशा आजाराची लक्षणं तिच्यात न आढळल्याने राजवैद्यही बुचकळ्यात पडला. राजकन्या अजूनही बिछान्यातून उठू शकत नव्हती, अगदी शिथिल होऊन पडली होती ती. रोगनिदान करू न शकल्याने राजवैद्य राजाला म्हणाला–"महाराज, आताच मी राजकन्येला काही औषध देऊ शकत नाही. दोन-तीन दिवस नीट निरीक्षण करून रोगाचा पत्ता लागला की मी औषधपाणी सुरू करीन. तोपर्यंत राजकन्येला पूर्ण विश्रान्ती घेऊ देणंच योग्य!"

राजाने अबोलपणे मान हलवून वैद्याचे म्हणणे मान्य केले व वैद्य निघून गेला. त्या दिवशी महाराणी सारा दिवस कन्येच्या उशाशी बसून होती. विद्यावती मात्र शान्त निद्रेत मग्न होती. संध्याकाळी राजवैद्य आला तेव्हां ती हळूच डोळे उघडून म्हणाली–"मला भूकच नाही लागत वैद्यराज! अन् फार अशक्तपणा वाटतोय हो!"

वैद्याने युवराणीला केवळ फळांचे रस द्यायला सांगितले व तो निघून गेला. इकडे युवराणीही पुन्हा निद्रेत बुडून गेली.

दुसरा दिवसही आदल्या दिवसाप्रमाणेच निघून गेला.

त्या रात्री राणीला एक विचित्र अनुभव आला. ती डोळे मिटून झोपलेली होती, पण तिला अचानक असे भासले की आपल्या अंगाला कसल्याच्या थंड वस्तूचा स्पर्श झाला. तिने ताबडतोब डोळे उघडले, तेव्हां तिला पिशाच्यासारखी एक पांढरी आकृति आपल्या कक्षाबाहेर पडताना दिसली! परन्तु आकृतीचा चेहरा



मात्र तिला स्पष्टसा दिसला नाही. ती आकृति पुरुष की स्त्री, हेही तिला कळू शकले नाही. आपल्याला कदाचित हा भास झाला असावा असे वाटून तिने पुन्हा डोळे मिटले. थोडया वेळाने तिला पुन्हा तसाच स्पर्श जाणवल्याने दचकून तिने पुन्हा डोळे उघडले, पण यावेळी मात्र तिला पिशाच्च वगैरे काहीही दिसले नाही. शेजारी झोपलेल्या महाराजांना जागे करून तिने सारी हकीकत त्यांना सांगितली. सारे ऐकून राजा तिला म्हणाला–"देवी, आपल्या विद्यावतीबद्दल विचार करत झोपलीस ना, म्हणून तुला हे वाईट स्वप्न पडलं असावं. अशी



"चिन्ता नको करूस, आपल्या बाळीवर काही संकट येणार नाही. खात्री बाळग. झोप आता." राजाने तिचे सान्त्वन केले.

तिसऱ्या दिवशी राजवैद्य भल्या सकाळीच आला. त्याला युवराणीच्या बिघडलेल्या तब्येतीत काहीच फरक दिसून आला नाही. अन् अस्वास्थ्याचे कारण शोधून काढण्यातही त्याला सफलता मिळेना! शेवटी युवराणीला शक्तिवर्धक औषध देऊन तो तेथून निघून गेला.

युवराणीच्या प्रकृति-अस्वास्थ्याबद्दल राज्यात घोषणा झाल्यापासून जनतेतही निराशा पसरली होती. गेली सोळा वर्षे तिच्या वाढदिवसाचा उत्सव खूप थाटामाटाने साजरा होत आला होता आणि यंदा प्रथमच हा उत्सव स्थगित केला गेला होता. दरवर्षी देवीच्या पूजेसाठी जाताना व येताना या विशेष दिवशी लोक राजकन्येचे अभीष्टचिन्तन करीत असत. त्यामुळे बिचारे ते प्रजाजनही चिन्ताकुल होऊन राजवाड्याबाहेर जमू लागले, अन् राजकन्येच्या प्रकृतीबद्दल ज्याला त्याला विचारू लागले. राजभवनातून बाहेर येणारे राजसेवक आणि पहारेकरी त्यांना वार्ता देत राहिले.

राजकन्येच्या वाढदिवसाच्या आदल्याच दिवशी एक शिपाई राजवाड्याबाहेर येऊन म्हणाला–"राजकुमारी थोडी बरी आहे, हळूहळू उठून बसू शकते ती. उद्या तिच्या वाढदिवसाच्या निमित्ताने सर्व देवळांतून खास पूजा केल्या जाव्यात अशी राजाज्ञा झालेली आहे. महाराज आता सुप्रसिद्ध ज्योतिषाचार्य वाचस्पति यांच्याशी सल्लामसलत करायला जात आहेत."

ही बातमी ऐकून लोक खूपच शान्त झाले आणि सर्वजण आपापल्या घराकडे निघून गेले. दुसऱ्या दिवशी पहाटेच उठून लोक देवळादेवळात जाऊन युवराणीच्या तब्येतीसाठी प्रार्थना व पूजा करू लागले.

मुख्य ज्योतिषि वाचस्पतीने युवराणीची जन्मकुंडली बारकाईने तपासून पाहिली. ते





म्हणाले–"महाराज, युवराणीच्या जन्मसमयीच मी तिच्या कुंडलीचं अध्ययन करून सांगितलं होतं ना, की युवराणीला वयाच्या सोळाव्या वर्षी प्राणसंकट संभवतं! आपण विसरलात का ते?"

"होय आचार्य, सांगितलं होतंत खरं; पण आम्ही विसरूनच गेलो ते! विद्यावती लहानपणापासून कधी आजारी पडलीच नाही, त्यामुळे अचानक अशा काही संकटाला तोंड द्यावं लागेल, असं मनातही आलं नाही आमच्या. राजवैद्यांनीही तिला तपासून सांगितलं की तिच्यात कोणत्याच रोगाची लक्षणं दिसत नाहीत; मग माझ्या बाळीची अशी अवस्था का बरं झाली? मला तर काही सुचत नाहीसं झालं आहे." दु:खी स्वरात राजा बोलला.

जवळच असलेली वज्रेस्वरीदेवी म्हणाली–"आजच विद्यावतीचा वाढदिवस आहे. दरवर्षी तो मोठ्या थाटात साजरा करायची पद्धत आहे आमची. जनतेलाही तो मोठा पर्वकाळ वाटतो. माझी बाळी पूर्ण बरी होईलना आचार्य?"

वाचस्पती पुन्हा राजकन्येची जन्मकुंडली नीट तपासू लागला. मनातल्या मनात काही हिशोब जमवून जरा वेळ तो गप्प राहिला व नंतर डोके उचलून तो म्हणाला–"युवराणीच्या पत्रिकेनुसार, गेल्या वर्षापासूनच तिचं ग्रहमान ठीक नाहीये. सध्या काही ग्रहांची वक्रदृष्टि तिच्यावर पडलेली आहे; त्यामुळेच तिची ही अवस्था झालेली आहे. ती बदलायला अजून अकरा महिने लागतील, त्यानंतर ती सुधारेल व तिची तब्येत पूर्वीप्रमाणे छान होईल. तोपर्यंत तिचे योग्य रक्षण व्हायला हवे. सध्या तिला महालात न ठेवता अन्यत्र कुठे तरी ठेवणं अत्यावश्यक आहे."

"अशा अवस्थेत आमच्या बाळीला कसं कुठे हलवता येईल? अन् तिला सोडून आम्ही कसे राहू शकू आचार्य?" राणीने कळवळून विचारले.



ज्योतिषाचार्य काहीच बोलला नाही. काही वेळ सर्वजण गप्प राहिले. मग राजा म्हणाला–"आपल्या राजधानीला लागूनच असलेल्या सारस सरोवरातल्या बेटावर उन्हाळयात आराम करण्यासाठी आम्ही एक महाल बनवलेला आहे. युवराणीला तेथे पाठवणं ठीक होईल, असं वाटतंय मला. ती जागा तशी जवळ आहे; तेव्हां तिला भेटायला आम्हाला रोज जाता येईल."

"सारस सरोवर इथून आग्नेय दिशेला आहे ना?" मनाशी काही हिशोब करीत वाचस्पतीने विचारले.

राजाने मान हलवून होकार दाखवला. तेव्हां ज्योतिषी वाचस्पती म्हणाला–"मग युवराणीला तिकडे पाठवणं फारच छान होईल. एक गोष्ट मात्र लक्षपूर्वक ऐका. तिथे युवराणीने एकटेच रहायला हवे. तिच्यावर आईबापांची नजरही पडू नये. तिच्या जवळ एक परिचारिका असली की पुरे. खाणंपिणं राजवाड्यातून पाठवायची व्यवस्था करता येईल. तुम्ही आईबाप महिन्यातून एकदा जाऊन तिला भेटू शकाल. आपल्या लेकीच्या भल्याकरता हे एक कठीण व्रत म्हणून तुम्हाला पाळायला हवे. अन् हे सर्व केवळ थोड्या दिवसांसाठीच तर आहे! ग्रहांची वक्रदृष्टि संपल्याबरोबर युवराणी पूर्वीप्रमाणे हसूखेळू लागेल. त्यानन्तर लगेच तिला विवाहयोगही आहे. तेव्हां तुम्ही तिची कसलीही चिन्ता करू नका. देवाच्या कृपेने सर्व उत्तम होईल. मी आत्ता इथे येत असताना, वाटेत मला जगत्पती आचार्य दिसले होते. मी त्यांना भेटून शुभ वेळ निश्चित करीन म्हणजे तुम्ही त्यावेळी युवराणीला भेटू शकाल." इतके सांगून वाचस्पती निघून गेला.

यानंतरच्या घटना भराभर घडल्या. विश्रामभवनाची सफाई करण्यासाठी काही शिपाई निघाले. महाराणीची स्वतःची खास म्हातारी दासी कमलाबाई हिला युवराणीबरोबर पाठवण्याचे ठरवले गेले.



तिच्यावर राणीचा फारच विश्वास होता. युवराणी व दासीकरता भोजन व पाणी घेऊन जाण्यासाठी सहा नोकरांची व्यवस्था केली गेली. यांच्यातील दोघादोघांनी पाळीपाळीने दररोज हे काम करायचे ठरवून दिले गेले. फक्त कमलाबाई एकटीच युवराणीबरोबर रहाणार होती.

ज्योतिषाचार्यांच्या सल्ल्यानुसार बरोबर मध्यरात्री युवराणी पालखीत बसून राजमहालातून निघाली. राजा व राणी राजवाड्याच्या मुख्य द्वारापर्यंतच तिच्याबरोबर जाऊन थांबले. युवराणी व कमलाबाई यांच्याबरोबर आणखी दोन परिचारिकाही सारस सरोवरापर्यंत गेल्या व तेथे त्यांनी या दोघींचा निरोप घेतला. नावाड्याने युवराणी व वृद्ध कमला यांना आपल्या नावेत बसवून विश्रामभवनाच्या पायऱ्यांपर्यंत नेऊन सोडले आणि तोही परत फिरला. सरोवराकाठी अजूनपर्यंत उभ्या असलेल्या दोघींना त्याने युवराणी बेटावर सुखरूप पोचल्याबद्दल सांगितले.

आपल्या मुलीपासून विभक्त झाल्या-बद्दल राजाराणींना फार वाईट वाटले. एकमेकांचे सान्त्वन करीत, मुलीला भेटायचा कोणता शुभदिवस ज्योतिषाचार्य येऊन सांगतील, याची वाट पहात राहिले.

युवराणीबद्दलची परिस्थिति सर्वांना कळावी म्हणून राजाने आपल्या राज्यात चारही दिशांना दूत पाठवले; आणि घोषणा करवली की, पुढल्या वर्षीच्या वाढदिवसाचा उत्सव नक्की नेहमीप्रमाणे धुमधडाक्याने साजरा होईल. तोपर्यंत सर्वांनी निश्चिन्त मनाने आपापले उद्योग चालू ठेवावेत. ही घोषणा कळल्यावर देशातील परिस्थितीही सर्वसामान्य झाली.

परन्तु एक दिवस अचानक जनतेला खबर पोचली की, सारस सरोवरातील महालातून युवराणी अचानक अदृश्य झाली! ही बातमी मिळाल्याबरोबर सारी जनता हतप्रभ झाली! (क्रमशः)





# गुरुदक्षिणा की मातृदक्षिणा

दृढनिश्चयी विक्रम पुन्हा त्या झाडाजवळ गेला. प्रेत खाली उतरवून ते त्याने आपल्या खांद्यावर टाकले आणि नेहमी-प्रमाणे मौन स्वीकारून तो स्मशानाची वाट चालू लागला. तेव्हां प्रेतात असणारा वेताळ त्याला म्हणाला–"राजा, अर्ध्या रात्री, अशा भयानक जागी तू आपल्या दृढसंकल्पासाठी जे धैर्य व धाडस दाखवत आहेस, ते निःसंशय स्तुतिपात्रच आहे. पण या गुणांबरोबर माणूस ओळखण्याची कला, समयसूचकता व योग्य कामाची अभिलाषा या गुणांचीही प्रत्येकाला आवश्यकता असते. ते नसतील तर ते कार्य सिद्ध होऊ शकत नाही. पुरावा म्हणून मी तुला सुनन्दची गोष्ट सांगतो. ती लक्षपूर्वक ऐक, म्हणजे तुला थकवाही जाणवणार नाही." आणि वेताळ गोष्ट सांगू लागला–



त्या काळी विरूप देशावर शूरसेन राजाचं शासन होतं. त्याचा मन्त्री बृहस्पति-सारखा मोठा बुद्धिशाली होता. राजा प्रत्येक बाबतीत मन्त्र्याच्या सल्ल्यावर अवलंबून राही. त्याच्या कारकीर्दीत देशात सुखशान्ति नान्दत असे. पण अचानकच मन्त्री वारला. एक नवा मन्त्री त्याच्या जागी नेमून त्याच्या सल्ल्याने शूरसेन कारभार करू लागला.

राजाला कसं खूष ठेवावं हे हा नवा मन्त्री छान ओळखून होता, पण त्याला योग्य सल्ला कसा द्यावा, एवढं मात्र त्याला मुळीच माहीत नव्हतं. आपल्या मनात येईल ते तो ठोकून देत असे. पण त्यामुळं राज्यकारभार बिघडू लागला. काही लोकांनी याकडे राजाचं लक्ष वेधायचा प्रयत्न केला, पण ते न मानता राजा उलट म्हणाला—"मन्त्र्याच्या सल्ल्यानेच मी आजवर राज्यपालन करत आलो, जनताही सुखी झाली. मन्त्री कोणीही असला म्हणून काय झालं?"

शेवटी राजगुरुनेही मन्त्र्याच्या सल्ल्यां-बाबत राजाला सचेत केलं तेव्हां राजा हसून म्हणाला—"जुन्या मन्त्र्याच्या सल्ल्या-बद्दलही प्रथम लोकांनी चुकीचे अन्दाज केलेच होते. नव्या मन्त्र्याच्या सल्ल्यांचीही किंमत लोक हळूहळू समजू लागतील."

यावर राजगुरु काय बोलणार? तो भूतपूर्व मन्त्र्याच्या घरी गेला. मन्त्र्याच्या बायकोने त्याला आदरपूर्वक बसवून घेतलं. तिला आशिर्वाद देऊन राजगुरु म्हणाला—"आपले महाराज शूरसेनवर तुझ्या नवऱ्याचा चांगला प्रभाव होता. आणि त्याचा असा पक्का समज झालेला आहे की सर्वच मन्त्री मोठे प्रतिभावान असतात. पण खरी गोष्ट अशी की त्याच्या जागी आता एक असमर्थ मन्त्री बसलेला आहे आणि त्याच्या चुकीच्या सल्ल्यांमुळे देशाचं फार नुकसान होत आहे. मला वाटतंय की देशाच्या भल्यासाठी तू एक काम करावंस. तुझा मुलगा आता दहा वर्षांचा आहे नं? त्याला तू दंडकारण्यात रहाणाऱ्या गुरु वितंड याच्या गुरुकुलात पाठव. वितंड तुझ्या मुलाच्या बुद्धीला





धार देऊन त्याला एका प्रतिभावान मन्त्र्याच्या स्थानासाठी लायक बनवेल. तुझा मुलगा विद्यार्जन करून परत येईपर्यंत आपल्या देशाला तरणोपाय नाही."

जुन्या मन्त्र्याच्या बायकोने राजगुरूच्या आज्ञेचे पालन करून आपला मुलगा सुनन्द याला वयाच्या दहाव्या वर्षीच दंडकारण्यात गुरु वितंड याच्याकडे पाठवले.

सुनन्द भेटल्यावर गुरूने सर्व हकीकत जाणून घेतली व तो म्हणाला—"गुरुकुलात यायचं, तर ज्ञानार्जनासाठी यावं, मन्त्री-पदाच्या आशेने नव्हे! अन् एकाद्या पदासाठी आवश्यक असं वयही नाही अजून तुझं!"

तेव्हां सुनन्द हात जोडून गुरूला नमस्कार करून म्हणाला—"गुरुजी, माझ्या पित्याने उत्तम सल्ला देऊन देशावर उपकार केले, अन् राजाला मदत केली, ही गोष्ट खरी. पण त्यांच्यामुळे साऱ्या मंत्र्यांचे सर्व सल्ले देशाच्या उपयोगाचे असतात अशी राजाची पक्की धारणा होऊन बसली आहे. ही चुकीची धारणा राजाच्या मनातून नाहीशी व्हावी यासाठी काही करणं ही माझी जबाबदारी आहे असं मी मानतो. म्हणून मी आपला शिष्य बनू इच्छितो. कृपा करून माझा स्वीकार करा ना गुरुदेव!"

वितंडची मुद्रा आता प्रसन्न दिसू लागली. सुनन्दला आशिर्वाद देऊन तो म्हणाला—"बस्स, तुझ्यात अपूर्व असं तेज आहे. तुझ्या वयाच्या मानाने तुझी बुद्धि खूपच कुशाग्र वाटतेय. मला इतका आनन्द झालाय की असं वाटतं, तुला सकलशास्त्रपारंगत करून माझ्यानंतर तुलाच या गुरुकुलाचा प्रधानाचार्य बनवावं!"

काही न बोलता सुनन्द मान खाली घालून उभाच राहिला. त्याच दिवशी त्याचा विद्याभ्यास सुरू झाला. अन्य सर्व शास्त्रांबरोबरच वितंड त्याला राज्यकार-भार व मंत्र्यायोग्य गुणांच्या बाबत ही खास गोष्टीं शिकवत राहिला. तीन वर्षं निघून गेली आणि सुनन्द आपल्या पूर्वीही गुरुकुलात आलेल्या सर्व विद्यार्थ्यांना मागे सारून पुढे गेला आणि गुरुकुलातला सर्वात श्रेष्ठ विद्यार्थी गणला गेला.



एके दिवशी गुरुकुलातल्या सर्व विद्यार्थ्यांना एकत्र आणून वितंड म्हणाला–"तुम्हा सर्वांच्यात रमाकान्त अगदीच मागास आहे. इतकी वर्ष मी त्याला शिकवण्यासाठी घेतलेली मेहनत राखेत मिसळलेल्या गुलाबजलासारखी व्यर्थ गेली आहे. मला याबद्दल फार चिन्ता वाटते. तुमच्यातला एकजण जरी पुढे येऊन थोडंसं ज्ञान मिळवू शकला, तर मला फार आनन्द होईल. अशा विद्यार्थ्याला मी पुढे आपल्या गुरुकुलाचा प्रमुख आचार्य बनवीन."

हे ऐकून रमाकान्त उठून उभा राहिला व रागाने म्हणाला–"मी आपल्या सहाध्यायी विद्यार्थ्यांकडून शिकायला इथे आलो नाही. सर्वांसमोर गुरूच माझा असा अपमान करत असेल, तर आता इथे माझं काय काम?" इतकं बोलून तो गुरुकुल सोडून जायच्या तयारीला लागला.

त्याचं बोलणं ऐकून वितंड उसासा सोडून म्हणाला–"रमाकान्तला मन्त्री बनायची प्रबळ इच्छा आहे, म्हणून त्याला विद्यागंधाचा जरासाही स्पर्श झाला नाही."

आणखी दोन वर्षांनी सुनन्दचा गुरुकुलातला विद्याभ्यास पूर्ण झाला. वितंडला काही गुरुदक्षिणा द्यायची इच्छा त्याने प्रकट केली, तेव्हां तो गुरु त्याला म्हणाला–"तू माझं गुरुकुल चालवायची जबाबदारी घेत असशील, तर तीच माझी गुरुदक्षिणा होईल!"

सुनन्द उत्तरला–"गुरुजी, सारी शास्त्र सांगतात की, गुरूच्या तुलनेत मातेचं स्थान पहिलं असतं. मातृदक्षिणा ठोकरून अगोदर गुरुदक्षिणाच द्यायची आपण मला आज्ञा देत असाल, तर मी तसंच करीन."

थोडंसं हसत त्याला आशिर्वाद देऊन वितंड म्हणाला–"पंधरा वर्षांच्या वयातच तुझी इतकी प्रगति झाली आहे. तुझं इतकं समृद्ध ज्ञान केवळ एक राजवाडा व त्यातला राजा यांच्यातच अडकून राहू नये, म्हणून मी असं म्हणालो होतो. पण तुझ्या मनाला पसन्त असेल तेच तू कर हं पुत्रा! मी तीच आपली गुरुदक्षिणा मानेन. आता तू आपल्या कार्यासाठी मार्गस्थ हो बाळ!"

सुनन्द विरूप देशात आला अन् त्याच वेळी त्याला कळलं की सध्या राजा शूरसेनची तब्येत ठीक नाहीये व त्यामुळे राज्यकारभार त्याचा पुत्र युवराज वीरसेन पहात आहे.

वीरसेन हा अत्यन्त अहंकारी होता. त्याला असे वाटे की आपल्याला सर्व काही माहिती आहे. त्याची अशी धारणा होती की, मन्त्री हा आपल्याला सल्ला देण्यासाठी नसून, आपल्या स्वतःच्या 'हो'त 'हो' मिळवण्यासाठीच असतो. त्याचे वडील शूरसेन यांच्या मन्त्र्याला सर्वजण 'असमर्थ' म्हणत असल्यामुळे त्याच्या जागी नवा मन्त्री नेमावा असा वीरसेनचा विचार होता.

सुनन्द घरी पोचला, तेव्हां त्याच्या मातेने त्याला ही सर्व हकिकत सांगून म्हटले–"तू अगदी योग्य वेळी परत आला आहेस. असं कळलंय की उद्याच वीरसेन नवा मन्त्री निवडणार आहे. तूच त्याचा मन्त्री बनून, 'आपल्या पित्यापेक्षाही श्रेष्ठ मन्त्री' म्हणून नाव मिळव."

दुर्दैवाने त्याच रात्री सुनन्दला खूप ताप आला. त्या आजारातून बरं व्हायला त्याला एक आठवडा लागला. बरा झाला



तेव्हां राजगुरु तेथे आले व त्याला म्हणाले–"पुत्रा, नव्या मन्त्र्याची नियुक्ति तर झालीही. पण अजून आपली संधि गेलेली नाही. तू माझ्याबरोबर चल. मी तुझी राजाशी गाठ घालून देतो. मी सांगितलं तर वीरसेन दोन मन्त्री ठेवायलाही मागेपुढे पहाणार नाही. पण देशासाठी तुझी आज फार गरज आहे."

सुनन्द राजगुरूबरोबर जायला तयार झाला, पण तो असं म्हणाला की त्यापूर्वी त्या दुसऱ्या नव्या मन्त्र्याला भेटायची आपली इच्छा आहे. राजगुरु सुनन्दला नव्या मन्त्र्याकडे घेऊन गेला, तेव्हां त्याला असं आढळून आलं की, आपले गुरु वितंड यांनी ज्याला 'कुचकामाचा' समजून



झिडकारलं होतं, तो रमाकान्तच नवा मन्त्री झालेला आहे!

दोघांच्यात खुशालीच बोलणं झालं अन् राजगुरूने रमाकान्तला आपल्या मनातली गोष्ट सांगितली. यावर रमाकान्त आनन्दाने म्हणाला—"आम्ही दोघं एकाच राजाजवळ मन्त्री बनून राहिलो, तर ते मी आपलं अहोभाग्यच समजेन."

पण सुनन्द चटकन बोलला—"अरे, मी तर तुझं अभिनन्दन करायला इथे आलो होतो. गुरुजी मला म्हणाले होते की, मी जर गुरुकुलाची जबाबदारी घेतली, तर ती माझी त्यांना गुरुदक्षिणा ठरेल. मी त्यांचं म्हणणं टाळू शकत नाही. मी तर आता परत दंडकारण्यातच जाणार आहे."

सुनन्द तेथून घरी आला अन् आपल्या आईला बरोबर घेऊन तो दंडकारण्यातील आपल्या गुरुकुलाकडे निघाला.

इथेच गोष्ट संपवून वेताळ म्हणाला—"हे विक्रम राजा, सुनन्दचं असं म्हणणं होतं की गुरुदक्षिणेपेक्षा मातृदक्षिणाच जास्त श्रेष्ठ. अन् त्यानुसार मन्त्री बनण्यासाठीच तो गुरुकुलातून घरी परत आला. मग नंतर त्याने आपला विचार का बदलला? मन्त्र्याच्या निवडीच्या नेमक्या वेळी सुनन्द आजारी पडला;—त्यानं तो काय दैवसंकल्प मानून आपला विचार बदलला? की रमाकान्तसारख्या बेकार माणसाच्या बरोबरीने मन्त्री बनून रहाणं त्याला अपमानास्पद वाटलं? सर्वात विशेष म्हणजे अगदीच असमर्थ—रमाकान्तसारखा-माणूस मंत्री असताना, आपल्या सारख्याने त्याच्या जोडीच्या पदावर रहाणे किती अगत्याचं आहे, हे तो कसं विसरला? सुनन्दने वितंडसारख्या महान गुरूजवळून विद्या मिळवली होती. तरीही त्याच्यात माणसाला ओळखण्याची कला, समयसूचकता व योग्य कामाची अभिलाषा या आवश्यक गोष्टींचा अभाव कसा कसा काय आढळतो? या प्रश्नांची उत्तरं तुला माहीत असूनही दिली नाहीस तर तुझं मस्तक फुटून जाईल."

राजा विक्रम उत्तरला—"सुनन्दचे गुरु वितंड यांनी सांगितलं होतं की त्याने आपलं ज्ञान कोणत्याही एका राजासाठीच सीमित ठेवू नये. परन्तु मातेचं बोलणं मनात ठेवून तो घरी निघून गेला होता, मंत्री बनण्यासाठी. यावरून त्याच्या मनातला मातेबद्दलचा आदरभाव दिसून येतो. परन्तु नवीन राजाने मन्त्री म्हणून नेमलेला माणूस पाहून त्याला आश्चर्य तर वाटलंच, पण त्याबरोबरच या गोष्टीचा भरपूर विचार करायची संधीही मिळाली. नवीन राजा वीरसेन अहंकारी असेलही, पण तो बुद्धिमानही आहे. तो जर बुद्धिहीन असता, तर मन्त्री बुद्धिमान असूनही काही उपयोग झाला नसता. राजा बुद्धिहीन असता, तर सुनन्द बुद्धिमान असल्याने त्याने राजाला नक्कीच मदत केली असती. परन्तु, इथे बुद्धिमान राजा वीरसिंहने आपल्या साऱ्या बुद्धीचा उपयोग करून, रमाकान्तला मन्त्री म्हणून निवडलं होतं. याचा अर्थ काय होतो? अर्थ असा की—राजा वीरसिंहच्या मनात मंत्र्याचं पद म्हणजे केवळ अलंकारच होय. म्हणजे मन्त्रीपदाला काही किमतच नाही. अशा परिस्थितीत पुढे काय होणार हे तर बुद्धिमान सुनन्द तावडतोब समजून चुकला. आणि त्याने निर्णय घेऊन टाकला की मन्त्री बनून आपली विद्या व ज्ञान-संपदा वाया जाऊ द्यायची नाही. असं करणं मातृदक्षिणा होणार नाही, आपल्या मातेची अभिलाषा पूर्ण होणार नाही. यामुळेच त्याने तावडतोब निर्णय घेऊन गुरुदक्षिणा म्हणून गुरुकुल चालवून आपली विद्या व शास्त्रज्ञान सार्थकी लावायचे ठरवले. त्याचा अनेकांना उपयोग होणार होता. हा निर्णय घेण्याचा असा मतलब नव्हे की त्याच्यात स्वभावज्ञान, समयसूचकता व ध्येयशुद्धि या गुणांचा अभाव आहे."

अशा तऱ्हेने योग्य उत्तर दिले, तेव्हा विक्रमराजाचा मौनभंग झालाच. अन् त्यामुळे वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व पुन्हा त्याच झाडाच्या फान्दीला लटकू लागला.

(कल्पित)



# "खरी गोष्ट"

श्रीपुरच्या जमीनदाराची एक विशेष सवय होती. नोकरी मागायला त्याच्याकडे कोणी आले, की तो त्याला तीन प्रश्न विचारत असे. त्यांची बरोबर उत्तरे आली तरच त्या माणसाला नोकरी मिळे. कधी कधी त्याचे प्रश्न खूप सोपे असत, नोकरीसाठी आलेला उमेदवार झटपट उत्तरे देई. पण कधी ते भारी कठीणही असत. कोणालाच त्यांची उत्तरे मिळत नसत अन् उमेदवारांना हात चोळत परत जावे लागे.

रुद्र नावाचा एक बहिरंभट एकदा जमीनदाराकडे नोकरी मागायला आला. त्याच्याकडे पाहून जमीनदाराने विचारले–"बोल, एकदा हरवल्यावर परतही मिळू शकतं असं काय ?"

"पैसा !" रुद्र उत्तरला.

"एकदा गेली की कधीच परत मिळत नाही अशी वस्तु कोणती ?" दुसरा प्रश्न !

"रात्र आणि दिवस." रुद्रने पटकन उत्तर दिले.

"मदत घेणाऱ्याने, मदत करणाऱ्याबद्दल किती दिवसपर्यंत कृतज्ञ रहावे ?" जमीनदाराने शेवटचा प्रश्न विचारला.

"जन्मभर !" रुद्रने सहजपणे सांगितले.

जमीनदाराने खूष होऊन रुद्रला लगेच नोकरीला ठेवून घेतले. नंतर थोड्याच दिवसात त्याला कळले की रुद्र हा बहिरा आहे. तेव्हा आश्चर्य वाटून त्याने रुद्रला विचारले–"तू तर बहिरा आहेस; मग त्या दिवशी माझ्या प्रश्नांची योग्य उत्तर कशी दिलीस ?"

या वेळी जमीनदार मोठ्याने बोलत असल्याने रुद्रला ते बरोबर ऐकू आले.

रुद्र म्हणाला–"हुजूर, त्या दिवशीचे आपले प्रश्न अन् मी दिलेली उत्तरं मला छान आठवत आहेत. आपण प्रथम विचारलं की–तुला काय पाहिजे ? मी उत्तरलो–'पैसा !' नंतर आपण विचारलं–तू केव्हा केव्हा काम करशील ? मी उत्तरलो–'रात्रंदिवस'. आपण शेवटी विचारलं–तू कुठवर काम करू शकशील ? मी म्हणालो–'जन्मभर !'"

सारा घोटाळा जमीनदाराच्या लक्षात आला आणि खरं रहस्य जाणून हसतच जमीनदार म्हणाला–"वहा रे बहिरंभटा ! खरी गोष्ट तर मला आत्ताच कळली !"



## चांदोबा पुरवणी–४२



भारतातील पक्षी व जनावरे :

## सिंह

वन्य प्राणी सिंह हा प्राचीन काळापासून 'जंगलचा राजा' म्हणून प्रसिद्ध आहे. पंचतन्त्र किंवा इसापच्या गोष्टींत सिंहाला वनराज म्हणून विशिष्ट स्थान दिले गेले आहे. पूर्वी सिंहाला आपण आपला 'राष्ट्रीय प्राणी' मानत होतो. पण आता हळूहळू यांची संख्या घटत गेल्याने वाघाला 'राष्ट्रीय प्राणी' हे स्थान प्राप्त झाले आहे.

सिंह (नर) आपल्या आयाळीमुळे फारच गंभीर व भव्य वाटतो. हा ही वाघाप्रमाणेच मार्जारपरिवारातला प्राणी आहे. परंतु आयाळीमुळे तो अगदी मांजरासारखा दिसत नाही. पूर्ण वाढ झालेल्या सिंहाची नाकापासून शेपटापर्यंत लांबी २७५ सें. मी. इतकी असते आणि उंची ९० सें. मी. असते. भुरक्या व पिवळ्या रंगाचे मिश्रण असलेल्या या सिंहांची आयाळ तर अधिक गडद असते. हे प्राणी चार-पाच पासून वीसपर्यंतच्या संख्येने एकत्र कळप करून रहातात.

एके काळी भारतात सर्वत्र सिंह आढळत असत. परन्तु, असे म्हणतात की–सैबेरियातून आलेल्या व यांच्याहूनही क्रूर असणाऱ्या सिंहांनी यांना दक्षिणेकडील प्रान्तात पिटाळून लावले. सध्या गुजराथ राज्याच्या 'गीर नॅशनल पार्क' मध्ये ते पहायला मिळतात, म्हणजे केवळ हीच जागा आता त्यांचे आश्रयस्थान बनली आहे. या 'वन्यपशु सुरक्षा केन्द्रात' सध्या जवळ जवळ २३० सिंह अस्तित्वात आहेत.

# फिनलॅण्डची बातमीदार बालिका

मागच्या नोव्हेंबरमध्ये केरळची राजधानी तिरु-अनंतपुरम् (त्रिवेन्द्रम्) येथे आंतरदेशीय बाल चित्रपट महोत्सव साजरा झाला. त्यावेळी बातमीदारांमध्ये एक दहा वर्षांची मुलगी होती. सर्वांच्या नजरा तिच्यावर लागून राहिल्या होत्या. कोणा परदेशी बातमीदाराबरोबर ती आली असेल असे लोकांना वाटले. पण तिच्याजवळ स्वतन्त्र 'ओळखपत्र' पाहून ते चकित झाले.

तिचे नाम होते इनो हिक्किनेन. ती फिनिश टी. व्ही. ची प्रतिनिधि म्हणून त्या चित्रपट-महोत्सवात भाग घेण्यासाठी आली होती. येथील चित्रपट पाहून, चित्रपट प्रमुखांना भेटून, त्यांच्या मुलाखती घेऊन त्यांचे रिपोर्ट फिनलॅण्ड टी. व्ही. कडे पाठवण्यासाठी तेथून सहा जणांचा जो संघ आला होता त्यांतीलच एक ही मुलगी होती.

ती तिरुअनन्तपुरमला पोचताच तिला चित्रपट-महोत्सवाच्या जागी—कनककुन्नु भवनात—पोचवले गेले. त्या भवनाच्या आसपासची नैसर्गिक दृश्ये पाहून ती फार खूष झाली. त्यानंतर दोन आठवडे त्या महोत्सवात हिरिरीने भाग घेऊन तिने खूप उत्साह दाखवला. आपल्या बाल-कला-कारांची तिने फार स्तुति केली. चित्रपट महोत्सवाच्या व्यवस्थापकांनी दिलेले केरळी भोजन व पक्वान्ने तिने आवडीने खाल्ली. सर्वात खास केरळची 'नेन्द्रम्' (आपल्याकडील राजाळी केळ्यांसारखी) केळी तिला फारच आवडली. आपल्या देशी परत जाताना या केळ्यांच्या चिप्सची थोडी पाकिटे तिने बरोबर नेली.

चौथ्या इयत्तेतली विद्यार्थिनी इनो ही तेथे खूप चित्रपट पहात राहिली आणि विविध देशांतून आलेल्या मुलांशी तिने खूपशा गप्पाही मारल्या. त्यांच्याकरता नियोजित केलेले खेळही ती खेळली.

"हा चित्रपट महोत्सव म्हणजे खरोखर एक मेजवानीच आहे." इनो म्हणाली. वास्तविक फिनलॅण्डमध्ये बाल-चित्रपटांची निर्मिति खूपच कमी केली जाते. आतापर्यंत इनोने तेथे टी. व्ही. वर व थिएटर्समध्ये मिळून जितके चित्रपट पाहिले त्याच्या दुप्पट बाल-चित्रपट तिने या महोत्सवात केवळ दोन आठवड्यात पाहिले. त्यापैकी कित्येक तिला फार आवडले. ती म्हणाली की तिला विशेषत: मल्याळम् फिल्म 'अभयं' फार आवडली. नेहमी अभ्यास करण्यासाठी मागे लागणाऱ्या दहा वर्षांच्या मुलाला शेवटी आपल्या आजोबांजवळ 'अभय' मिळते—अशी या चित्रपटाची गोष्ट आहे. अभ्यासात हुशार असणारी इनो, पियानोही सुन्दर वाजवते. ड्रॉइंग काढणे तिला आवडते व टेनिस खेळायला तर फारच आवडते. स्टेफी ग्राफ ही तिला खास आवडणारी टेनिसपटू.



# तुम्हाला माहीत आहे ?

१. हुकराच्या जातीतला सर्वात मोठा प्राणी कोणता ?
२. जिप्सी (वंजारा) लोक कोणती भाषा बोलतात ?
३. एक असा देश आहे, की जो एकाच शहराने व्यापलेला आहे. तो देश कोणता ? व ते नगर कोणते ?
४. फाउंटन पेनचा शोध कोणी लावला ?
५. अटलांटिक महासागरावरून एका महिला पायलटने उड्डाण केले होते. ती महिला कोण ?
६. एकच अंक सोडून बाकी सर्व अंक रोमन पद्धतीने लिहिता येतात. तो अंक कोणता ?
७. कोणता ग्रह रंगाने लाल आहे ?
८. संपूर्ण जगात पोस्टाच्या पेटीचा रंग लाल निश्चित झाला आहे. मग त्यापूर्वी तो रंग कोणता असे ?
९. कळसूत्री बाहुल्या बनवायची सुरुवात कोठे झाली ?
१०. 'बाटिक' पद्धतीचे पेंटिंग प्रथम कोणत्या देशात सुरू झाले ?
११. खेकडा कसा चालतो ?
१२. सर रोगर बॅनिस्टर कशासाठी प्रसिद्ध आहे ?
१३. पांढऱ्या हत्तींचा देश कोणता ?
१४. डॉ० क्रिस्तियन बर्नार्डने सन १९६७ मध्ये एक प्रकारची राज्यचिकित्सा पद्धत सुरू केली. ती पद्धति कोणती ?
१५. सन १९९० मध्ये एक पत्रकार प्रथमच अंतरिक्षात गेला. तो कोण होता ?

## उत्तरावली

१. पाणघोडा.
२. रोमनी.
३. वेटिकन, रोम.
४. लुई वॉटरमन.
५. अमीलिया एर्हार्ट (ई. स. १९२८)
६. शून्य.
७. मंगळ.
८. हिरवा.
९. भारत, मिश्र.
१०. इण्डोनेशिया.
११. तिरका चालतो.
१२. सर्वात प्रथम हा चार मिनिटात १ मैल पळाला होता.
१३. सयाम—आजचा थायलंड.
१४. हृदय-परिवर्तन.
१५. टोयोहिरो अकियामा.

# चांदोबाच्या बातम्या

## वानर 'अभिनेता' अमेरिकेत प्रदर्शनासाठी

१९९२ हे वर्ष जपानमधे 'वानर वर्ष' म्हणून मानले जात आहे. यावरून असे लक्षात येते की तेथे आता वानरांना महत्व दिले जात आहे. भारतातल्या गल्ल्यांमधून माकडांचे जे खेळ दाखवले जात असत, ते आता जपानच्या रंगमंचांवर पोचले आहेत. त्यांना तेथे 'सरूमावाशी' नावाने ओळखले जाते. हजार वर्षांपूर्वी जेव्हा चीनमधून माकडे जपानमधे गेली, तेव्हा जपान्यांनी माकडांचे खेळ व कौशल्य पाहिले होते. ती एक कला मानली जात असे. परन्तु इ. स. १८६० च्या आसपास पाश्चात्य प्रभावामुळे यात मधेच खंड पडला होता. आता शंभर वर्षांनंतर या कलेला पुनर्जीवन मिळाले आहे. व संध्या प्रसिद्ध टी. व्ही. स्टार वानर अभिनेता 'जिरो' याला मास्टर तरो मुरासाकी अमेरिकेतील रंगमंचावर 'हॅम्लेट' च्या प्रदर्शनासाठी शिक्षण देत आहे.





## अति वजनदार शरीर

अमेरिकेतील न्यूयॉर्कच्या नासावमधील वॉल्टर हडसन हा गेल्या १८ वर्षांत आपल्या घराच्या बाहेर पडलेला नव्हता. याचे कारण आहे त्याचे वजनदार शरीर! एके काळी त्याचे वजन ५४४ कि. ग्रॅ. होते, पण ते २३६ कि. ग्रॅ. पर्यंत घटवण्यात त्याने यश मिळवले. तो थोडा थोडा इकडे तिकडे फिरू लागला होता. तीन महिन्यांपूर्वी त्याच्या मृत्युसमयी त्याचे वय होते ४६ वर्षे. त्यावेळी त्याच्या शरीराचे वजन २७२ कि. ग्रॅ. होते. त्याचा मृतदेह दरवाज्याबाहेर आणणे फार कठीण झाल्यामुळे त्याच्या अन्त्यविधीस बराच उशीर झाला.



# ड. ड. नीमन

बीदार गावात नीमन नावाचा एक रिकामटेकडा माणूस रहात असे. तो नाकात बोलायचा आणि मधेच तपकीर ओढून जोरात शिंकायचा. लोकांना त्याची मोठी मजा वाटे अन् यामुळेच लोक त्याला 'ड ड नीमन' म्हणत.

ड-ड नीमनला काम करायला आवडत नसे, त्यामुळे आज कोणाकडे जाऊन फुकटचं हादडावं, किंवा कुणाला फसवून पैसे लाटावे—यासाठी रोज तो संधी शोधत असे. कोणाकडे लग्न असो, बारसं असो, की बारावं असो; ड ड नीमन त्या घरी जाऊन घरातल्यांशी गप्पा मारत बसून, तिथून जेवण उपटून मगच जात असे.

जेवायला बसताना तो म्हणे—"मला फार संकोच वाटतो बुवा! पण्पा तुम्ही आग्रह केलात, म्हणून बसतो जेवायला. आणखी एक—मी कमी खाल्लं तर तुम्हाला वाईट वाटेल!" अन् असे बोलून तो दोन-तीन माणसांचे अन्न खाऊन टाकत असे.

हळूहळू त्याची ही सवय गावातल्या लोकांच्या लक्षात येऊन चुकली. यानंतर त्याने जेवण्यासाठी गावकऱ्यांवर अवलंबून रहायचे सोडून दिले. नोकरी शोधायला गावात येणारी नवी-नवी माणसं तो शोधू लागला.

एक दिवस 'ड ड' ची नजर कचेरी-तल्या बदरीनाथवर पडली. तो गावात नवा आला होता, अन् त्यावेळी तो केळीची पाने अन् तोरण बांधण्यासाठी आंब्याच्या डहाळ्या घेऊन घरी निघाला होता. काही मिनिटातच 'ड ड' ने त्याच्याशी दोस्ती जमवली. त्याला कळले की त्या दिवशी बदरीनाथच्या घरी त्रिनाथ व्रत होणार होते.

ड ड नीमन बदरीला म्हणाला—"अरे! हे तुम्ही इतक्या उशिराने का सांगितलं मला? घरात व्रत किंवा उत्सव असला,

'जमना शिंदे



तर अशा पुण्यकार्याच्या वेळी मित्रमंडळी अन् नातेवाईकांसह भोजन करायचं असतं! तेव्हां आज मी तुमच्याकडेच येईन हं! हंऽ, अन् चांगला लवकरच येईन बरंका! अच्छा, त्या अमरनाथच्या घरातच आहे ना बिऱ्हाड तुमचं?" असे म्हणून तपकीर ओढून तो जोरात शिंकला.

एका अगदीच अपरिचित माणसाला आपल्याशी इतक्या सलगीने बोलताना पाहून बदरीनाथला आश्चर्यच वाटले. पण 'एक जण जेवायला येतो' म्हणत असताना, त्याला 'नको' कसे म्हणायचे—असे वाटून तो नीमनला म्हणाला—"हो हो, लवकर या हं!"

पण त्या दिवशी ढ ढ नीमन बदरीच्या घरी जेवायला गेलाच नाही. त्याच दिवशी त्याला नंतर कळले की गावचा पुरोहित कुठल्याशा पुण्यक्षेत्री दर्शनाला चालला आहे. अन् नीमन मग त्याच्या घरी जाऊन पुरोहिताला म्हणाला—"अरे, तुमच्या-सारख्या पुण्यवान माणसाबरोबर राहून तुमची सारी सेवा करावीशी वाटते मला." अशा प्रकारे आपणच सर्व काही बोलत राहून त्याने पुरोहिताला अडचणीत टाकले अन् शेवटी तो पुरोहिताबरोबरच पुण्यक्षेत्री रवाना झाला!

त्या दिवशी बदरीनाथने बिचाऱ्याने संध्याकाळपर्यंत नीमनची वाट पाहिली अन् खूप उशीरा संध्याकाळी जेवण केले.

एक आठवड्याने नीमन यात्रेहून परत आला अन् बदरीनाथ त्याला वाटेत भेटला. त्याला पहाताच बदरीनाथला खूप राग आला. तो काही बोलू लागताच नीमन न डगमगता म्हणाला—"अरे, रागावू नका असे. प्रेमाने अन् त्यापेक्षाही मोठ्या आदराने तुम्ही त्या दिवशी जेवायला बोलाबलं होतं मला! अशा वेळी माणूस आला नाही तर किती राग येईल एकाद्याला, हे चांगलं कळतं मला! पण आता त्याच्या बदली मी तुमच्या घरी दोन्ही वेळचं जेवायला येतो, तिथेच आंघोळही करीन



मी. चला, चला." असे म्हणून बदरी-नाथच्या खांद्यावर हात ठेवून तो त्याच्या-बरोबरच त्याच्या घरी गेला.

बदरीनाथच्या घरात त्याची एक म्हातारी आत्या होती. ती प्रत्येकाशी 'अरे-तुरे' करूनच बोले. नीमनला ते जरा विचित्रच वाटले.

नीमनने तपकीर ओढून शिंकताच म्हातारी जरा चिडल्यासारखा चेहरा आक्रसून म्हणाली—"अरे ढ ढ! तुझ्या बाबतीत ऐकलय मी सारं! आता तपकीर ओढायचं सोडून दे! तपकीर ओढून ओढून तुझ्या नाकाची अगदी तपकिरीची डबीच होऊन गेलीय की! स्वयंपाक तयार होत आलाय, अन् तू तर अजून आंघोळही केली नाहीस? जा, विहीरीवर जाऊन चांगली आंघोळ कर. अन् चार-पाच घागरी पाणीही आणून टाक. स्वयंपाक घरातलं पाणी अगदी संपून गेलंय बघ!" म्हातारी हे सर्व अशा काही आवाजात बोलली की, जणू काही ती नीमनला हुकुमच सोडते आहे!

ढ ढ बिचारा आता लाचार होता, विहीरीवरून तो पाणी आणून आणून स्वयंपाकघरातली भांडी भरू लागला. विहीर चांगली खोल होती, पाणी काढायला चांगलाच त्रास होत होता! तो मनात विचार करू लागला—"हूं:! या घरी जेवायला येऊन मोठीच चूक केली मी!"

चार घागरी पाणी आणल्यावर तो जेव्हां दमून श्वास टाकू लागला, तेव्हां



म्हातारी कडक आवाजात त्याची निर्भत्सना करत म्हणाली–"अरे? चार घागरी पाणी आणून इतका दमतोस? फुकटचं खायला लागलं की असंच होणार. चल रे ढ ढ! आता बस जेवायला!"

म्हातारीने पत्रावळीवर वाढायला सुरुवात करताच नीमन वसावसा खाऊ लागला. ते पाहून म्हातारी म्हणाली–"मी ऐकलं की रात्रीही इथेच जेवणार आहेस तू! त्यामुळे मी स्वयंपाक जास्त करून ठेवलाय. पण सगळं एकाच वेळी खाऊन टाकलंस तर कसं जमेल रे? माणूस म्हणून जन्माला येणारानं जरा लाजलज्जाही संभाळायला हवी नं? पहिल्याच दिवशी अशी वसवस केलीस, तर दुसऱ्यांदा कोण बोलावणार रे तुला?"

आजपर्यंत ढ ढ नीमनने असले काही बोलणे ऐकले नव्हते. तो सर्वांना म्हणे की–तुम्ही आग्रह केलात म्हणूनच आलो मी तुमच्याकडे जेवायला! पण हे अगदीच निराळे घडत होते! म्हातारीच्या बोलण्याने त्याच्या डोळ्यात पाणीच आले.

जेवण उरकून तो जायला लागला, तर त्याला थांबवत म्हातारी म्हणाली–"अरे, फुकटचं खाऊन तसाच निघालास? तुझी उष्टी पत्रावळ कोण उचलणार रे? बेकार अन् रिकामटेकडा तू, दोन चार इकडल्या तिकडल्या गप्पा मारून फुकटात जेवणारा तू, जेवण पत्रावळ तशीच टाकून ये ती अन् जेवल्या जागेवर हळदीचं पाणी शिंपड! मी रीति-रिवाज, आचार-धर्म पाळणारी बाई आहे."

ढ ढ नीमनला आता तोंड उघडता उघडवेना! म्हातारी सांगेल ततसं मुकाट्याने करत गेला तो, अन् शेवटी तेथून निघून गेला. रात्री जेवायला जायची हिंमतच नव्हती त्याची!

दुसऱ्यांकडे फुकट जेवायला जायची सवय नीमनने दुसऱ्याच दिवसापासून सोडून दिली. दया येऊन कोणी त्याला बोलावले तरी तो पटकन जायला तयार नसे!





# सल्लागाराची निवड

खूप जुनी गोष्ट. अवन्ती देशावर राजा वीरवर्माचे राज्य होते. त्याचा खाजगी सल्लागार म्हणून काम करणारा जयानन्द आता खूप म्हातारा झाला होता व अलिकडे तो अधून मधून आजारीही असे. राजाला वाटले की आता त्या जागी कुणा नवीन व्यक्तीची नेमणूक करणे आवश्यक आहे. पण हे काम मोठे कठीण होते. जयानन्द आतापर्यंत ज्या सूक्ष्म बुद्धीने कठिणात कठीण अशी अडचण सहज सोडवत असे, त्या तऱ्हेची कुवत असणारा माणूस शोधणे सोपे नव्हते. अशी माणसे जगात क्वचितच सांपडतात.

एके दिवशी राजाने आपला मन्त्री सुबुद्धि याच्याशी या विषयावर चर्चा केली. मन्त्री म्हणाला–"महाराज, आपण प्रथम आपल्या देशातल्या राजनीति, अर्थशास्त्र आणि न्यायशास्त्र जाणणाऱ्या लोकांना बोलावून घेऊ. नन्तर त्यांची परीक्षा करून सर्वात लायक माणसाची नेमणूक करू. यासाठी आपण जयानन्दांचीच मदत घेऊ. योग्य माणसाची पारख करण्यात ते चांगलेच तरबेज आहेत."

राजाने ही गोष्ट मान्य केली. मन्त्र्याने विशेष अशा प्रतिभावान लोकांना पाचारण केले. चारही दिशांकडून अनेक युवक यासाठी राजधानीत आले. त्यांची परीक्षा घेतली गेली व जय आणि विजय हे दोन तरूण परीक्षेत पहिले आहे. कोणाला योग्य ठरवावं असा मोठा प्रश्न पडला. दोघांनाही अगदी सारखेच गुण मिळाले होते. त्यामुळे यासंबंधी जयानन्दचे मत विचारले गेले.

सर्व हकीकत ऐकून जयानन्द म्हणाला–"खाजगी सल्लागादाला फक्त शास्त्रीय ज्ञान असणं पुरेसं नाही. क्लिष्ट समस्या सोड-

मयूरेश मिथन



वण्यासाठी अगदी सूक्ष्म बुद्धि असणं जास्त आवश्यक असतं. शास्त्रज्ञान सारखंच असणाऱ्या त्या दोघात योग्य कोण आहे हे ही परीक्षाच सांगेल. यासाठी आपल्याला एक स्वतंत्र परिक्षाच योजायला हवी."

दुसऱ्या दिवशी जय व विजयला बोलावून घेऊन मन्त्री म्हणाला–"माझा एक आवडता मित्र विचित्र परिस्थितीत देवाघरी गेला. ती घटना मी तुम्हा दोघांनाही सांगतो. नीट लक्षपूर्वक ऐका अन् मग तुमच्यापैकी एकाची निवड होईल." अन् त्याने दोघांना सांगितले–

"मन्म्याचा दयावान् नावाचा मित्र म्हातारा झाला होता. त्याला हृदयविकारही जडला होता. एका रात्री दयावानला एक भयानक स्वप्न पडले. त्या स्वप्नात तो स्वतः एका जंगलात रस्ता चुकला होता. रस्ता शोधत तो जंगलातल्या झाडांमधून पुढेपुढे जाऊ लागला. शेवटी तो एका मैदानात पोचला. रात्र झाली होती, वर आकाशात तारे टिमटिमत होते. त्या अंधूक प्रकाशात त्याला चार रस्त्यांचा एक चौक दिसला. एका वाटेने तो पुढे निघाला. पण थोडं पुढे गेल्यावर तो रस्ताच बन्द झाला! समोर झाडोरा आणि काटेरी झुडुपं दिसत होती. तिथे काही सिंह फिरत होते. एका सिंहाने दयावानला पाहिलं अन् जोराने गर्जत तो त्याच्याकडे येऊ लागला. दुसऱ्या बाजूने आणखी ही दोन सिंह त्याच्याकडे धावले.

दयानन्द घाबरला अन् जीव वाचवण्यासाठी तो धुम् पळत सुटला. पळता पळता तो परत त्या चौकात येऊन पोचला. सिंहाचा आता कुठे पत्ताचा नव्हता. म्हणून तो जरा वेळ आराम करून त्या चारांपैकी दुसऱ्या रस्त्याने निघाला. थोडं पुढे गेल्यावर त्याला एका ठिकाणी स्वच्छ प्रकाश दिसला. झाडीमागे जाऊन दयावान त्या प्रकाशाकडे पाहू लागला. त्या जागी अनेक वारुळे होती, अन् त्यांच्यावर मोठ-मोठे साप फणा उभडून नाचत होते.





त्यांच्या फणांवरील नागमण्यांचाच तो प्रकाश होता. दयावान न घाबरता ते सर्प-नृत्य पाहू लागला.

हे सर्व आश्चर्याने पहात असलेल्या दयावानला त्या सापांपैकी पाच फणा असलेल्या एका महासर्पाने पाहिले अन् जोराने फुत्कारत तो दयावानकडे येऊ लागला. आता पुन्हा दयावान मागे वळून पळत सुटला. पडत-धडपडत तो पुन्हा त्या चौकात पोचला. तिथे बसून त्याने काही वेळ विश्रांति घेतली.

आता दयावान तिसऱ्या रस्त्यावरून थोडा पुढे गेला. तो रस्ता डोंगरातल्या एका गुहेपुढे जाऊन थांबला. तेथे त्याला काही मानवी हाडांचे सापळे दिसले. धोक्याचा तो इशारा पाहून दयावान तसाच मागे फिरणार, इतक्यात गुहेतून एक राक्षस नाकाने वास घेतघेत बाहेर आला. त्याला पहाताच दयावानला धक्काच बसला अन् मागे वळून तो पुन्हा चौकाकडे पळू लागला. जास्तीत जास्त जोराने पळण्याचा त्याने प्रयत्न केला.

पण आता राक्षसाला आपल्या मागे येताना पाहून तो चौथ्या रस्त्याने पळत सुटला. राक्षस पाठलाग करतच होता. तो रस्ता एका डोंगराच्या माथ्यावर जाऊन अचानक थांबला होता. दयावानने तेथून खाली पाहिले तर त्याला एक खोल वरचा तळही दिसेना. पुढे जावं तर रसातळ अन् मागे तर राक्षस! तो बिचारा



भीतीने आपादमस्तक कापू लागला. इतक्यात त्याच्या पायाखालचा दगड निसटला! जोराने किंचाळत तो खाली कोसळला!"

इतकं सांगून उदास चेहऱ्याने मन्त्र्याने जय-विजयकडे पाहून म्हटलं–"ऐकलंत ना किती भयानक आहे हे स्वप्न? माझा मित्र दयावान बिचारा अगोदरच हृद्रोगी, अन् स्वप्नातल्या धक्क्याने त्याची झोप उडाली, भीतीने त्याच्या हृदयात कळ उठली आणि तो मरून गेला! थोड्या वेळात सर्व अंक संपला."

हे ऐकून वाईट वाटून जय म्हणाला– "मनोवैज्ञानिकही असंच सांगतात की स्वप्नातल्या अनुभवांचा परिणाम मानवी शरीरावर नक्कीच होतो. तुमच्या मित्रावर तर चार वेळा प्राणसंकट गुदरलं स्वप्नात! हृद्रोगी असल्याने त्याला ही भीती सहन न होऊनच हृदयविकाराच्या झटक्याने त्याचा मृत्यु ओढवला असावा. तुमच्या मित्राच्या मृत्युबद्दल मीही तुमच्या दुःखात सहभागी आहे. त्याच्या मागे त्याचे कोण कोण नातेवाईक आहेत?"

डोके हलवून मन्त्र्याने आता विजयकडे पाहिले. हलूच हसत विजय म्हणाला– "क्षमा असावी महामन्त्रीजी, आपण आत्ता जे काही सांगितलंत ते म्हणजे केवळ कल्पित कहाणी आहे. यात सत्य तिळभरही नाही."

रागावून मन्त्र्याने विचारले–"कल्पित कहाणी? आपलं म्हणणं सिद्ध कसं करून दाखवशील?"

नम्र आवाजात विजय उत्तरला– "आपण म्हणालात की, आपला मित्र जागा झाला अन् त्याच्या छातीत कळ येऊन तो मरून गेला. अशा स्थितीत त्याचं हे लांबलचक स्वप्न आपणाला कळलंच कसं? हेच माझ्या विधानाचं प्रमाण."

मन्त्री सुबुद्धीने विजयच्या सूक्ष्मबुद्धीबद्दल त्याचे अभिनन्दन केले आणि ताबडतोब राजाला सांगून त्याची 'खाजगी सल्लागार' म्हणून नेमणूक करवून टाकली.






**त्या**चप्रमाणे अन्य प्रवेशद्वारांवर ठरलेल्या योजनेनुसार हल्ले झाले. आणि आवश्यकतेनुसार मदत करण्यासाठी सुग्रीव आपल्या विशाल वानर-सैन्यासह उत्तर व पश्चिमेकडील द्वारांवर सज्ज राहिला. युद्धासाठी वानरांनी मोठमोठे वृक्ष व दगड तयार ठेवले. वानर-सैन्याने संपूर्ण लंकेला वेढलं. त्यांच्यामुळे त्रिकूट पर्वत जणू अदृश्य झाला. वानर-सेनेच्या आरोळ्या सर्वत्र निनादत होत्या. वानर युद्धासाठी उतावळे झाले होते नि क्षणोक्षणी रामाचा जयघोष करी होते.

रामाने विभीषणाकरवी अंगदाला बोलवून घेतलं आणि त्याला दूत म्हणून रावणाकडे पाठविण्याचा आपला विचार सांगितला. आपला परिचय देऊन अंगदाने खालील निरोप रावणाला सांगावा अशी रामाने आज्ञा केली.

"हे रावणा, ब्रह्मदेवाने दिलेल्या वरदानाच्या शक्तीमुळे गर्विष्ट होऊन तू अनेक पापे केलीस. आता तुझ्या गर्वाचं घर खाली होणार! तू माझ्या पत्नीचं अपहरण केलंस, म्हणून मी आता यमराजासारखा क्रोधाची आग पाखडत तुझ्यावर आक्रमण करणार आहे. तुझा वध करण्यासाठी मी लंकेच्या प्रवेशद्वारी सज्ज आहे. कुठल्या पराक्रमाच्या गर्वाने तू सीतेला पळवून आणलीस हे मला माहीत नाही. पण आता त्या पराक्रमाचे प्रदर्शन कर. सीतेला आणून माझ्या स्वाधीन कर आणि माझ्या

२३. वानर व राक्षसांचे द्वंद्व-युद्ध



पायांवर लोटांगण घालून मला शरण ये. नाहीतर माझे कठोर बाण या पृथ्वीवरून राक्षसांचं संपूर्ण निर्मूलन करतील. मला शरण आलेला धर्मनिष्ठ विभीषण आता या लंका-नगरीचा राजा बनेल. धैर्याने तू मला सामोरा ये आणि माझ्याशी युद्ध कर. असं न करता तू पक्ष्यासारखा उडून जाऊ लागलास तरी माझ्या बाणांच्या तावडीतून सुटणार नाहीस. माझ्या बाणांचं सामर्थ्य अजून तू पाहिलेलं नाहीस हे लक्षात ठेव. मी तुला आणखी एक छान सल्ला देतो. यापुढे तुला पुन्हा लंका दिसणार नाही, म्हणून आताच तू प्रेमाने आपली लंका डोळे भरून पाहून घे. तू आताच आपल्या अन्त्य क्रियेचे स्वप्न पहायला लाग, कारण तुझे प्राण आता माझ्या मुठीत आहेत. आता माझ्या तावडीतून तुझी सुटका कोणी ही करू शकणार नाही. अनेक भल्यांचे सल्ले तू धुडकावून लावले आहेस. त्याच्या परिणामांना आता तयार रहा."

रामाचा संदेश घेऊन तारा-पुत्र अंगद आकाश मार्गाने लगबगीने रावणाच्या महालात पोचला. आपल्या मंत्र्यांशी विचार-विनिमय करीत बसलेल्या रावणाला पाहताच अंगदाने आपला थोडक्यात परिचय देऊन ताबडतोब रामाचा संदेश ऐकविला.

आपला अपमान करणारा हा संदेश ऐकून रावणाचा क्रोध अनावर झाला व त्याने मोठ्याने ओरडून आज्ञा दिली—"या दुष्टाला पकडून ठार करा, पहिलं काम हे करा. माझा पराक्रम याला एकदा चांगला पाहू द्या."

चार राक्षसांनी पुढे येऊन अंगदाला पकडले, पकडले कसले अंगद स्वतःच त्यांच्या पकडीत गेला. राक्षसांनी त्याला पकडताच अंगदाने सर्वांना आपल्या बाहुपाशात दाबले आणि तो वर उडाला. महालाच्या वर जाऊन त्याने राक्षसांना खाली फेकून दिले. महालाचा शीर्ष-भाग ही त्याने उध्वस्त केला. रावण हे सर्व पहात होता. काय करावे हे त्याला समजेनासे झाले. अंगदाने तेथून जोरात आरोळी ठोकली नि रामापाशी परत आला.

अंगदाचा हा प्रवेश रामाला अपशकुनासारखा वाटला. घाबरून तो चारी बाजूंना पाहू लागला आणि उसासे सोडू लागला. त्याला वाटले आता या युद्धात आपली काही धडगत दिसत नाही.

वानर आता युद्धासाठी अगदी उतावळे झाले होते नि राक्षसांची वाट पहात होते. सुग्रीवाच्या आज्ञेवरून पराक्रमी सुषेण आपल्या काही वानर-वीरांसह लंकेच्या प्रवेश-द्वारांवर हिंडू लागला. नगराच्या अंतर्भागातील राक्षस ही आपल्या अस्त्रांसह प्रमुखाच्या आज्ञेची वाट पहात होते. पण आता आज्ञा देणार कोण? स्वतः रावण घाबरून गेलेला होता.

काही राक्षस रावणाकडे गेले आणि वानरांनी लंकेला वेढल्याची वार्ता त्याला सांगितली. रावण ताबडतोब आपल्या सिंहासनावरून उठला व आपल्या महालाच्या गच्चीवर गेला. इतस्ततः वानरसेनेने वेढलेली लंका त्याने पाहिली. या विशाल सेनेला कसे ठार मारावे हे काही रावणाला समजेना. या वानरसेनेपुढे आपल्या सैन्याचा टिकाव लागणे कठिण आहे हे रावण समजून चुकला.



राक्षस किती दक्षतापूर्वक लंकेचे संरक्षण करीत आहेत हे रामाने प्रत्यक्ष लंका-नगरीच्या परिसरात जाऊन पाहून घेतले. आणि दुसऱ्याच क्षणी त्याच्या मनात विचार आला की याच नगरीत आपली सीता बंदिस्त आहे. त्याला अत्यंत दुःख झालं नि राग ही आला. तो वानरांना म्हणाला—"आता ताबडतोब शत्रु-संहार करायला लागा."

वानरवीर वृक्ष व दगड घेऊन तयारच होते. रामाचा आदेश मिळताच त्यांनी इतस्ततः शस्त्रांसह संचार सुरू केला. सर्व प्रवेश-द्वारांवर वानरांनी हल्ला चढवला. विभीषणाने आपले चिलखत चढविले व



आपल्या सेवकांसह तो रामाजवळ तयार राहिला. गज, गवय, गवाक्ष, गंधमादन आणि शरभ इकडे-तिकडे हिंडत वानर-सेनेला सूचना देऊ लागले. युद्धाला उतावळे झालेले वानर उत्साहाने सर्व बाजूंनी लंकेवर तुटून पडले.

याच वेळी रावणाने आपल्या राक्षस-सैन्याला युद्ध सुरू करण्याचा आदेश दिला. राक्षसांनी ताबडतोब सिंहनाद केला व शंख फुंकले. युद्धाच्या उन्मादाने लंकेच्या आतील बाजूला राक्षस व बाहेर वानर यांच्या आरोळ्यांनी चारी दिशा दुमदुमल्या.

दोन पक्षात युद्ध सुरू झाले. राक्षसांनी गदा, त्रिशूल व परशु या शस्त्रांनी वानरांवर प्रहार करायला सुरुवात केली. मोठमोठे वृक्ष व दगड राक्षसांवर फेकत व आपल्या नखां व दाढांनी राक्षसांना घायाळ करीत वानरांनी युद्ध सुरू केले.

काही राक्षस इमारतींवरून वानरांवर आपली अस्त्रे फेकू लागले.

अति उत्साहाने काही वानर तटावर चढले व तेथून राक्षसांना खाली ढकलून देऊ लागले. राक्षस व वानर यांच्यात घनघोर युद्ध सुरू झाले. सैन्याच्या अफाट गर्दीत अनेक ठिकाणी द्वंद्व-युद्धे ही झाली.

इंद्रजित व अंगद यांच्यात, विभीषणाचा एक मंत्री संपाती आणि प्रघस नावाचा राक्षस यांच्यात, आणि हनुमान व जंबुमाली यांच्यात द्वंद्व-युद्ध झाले. गज तपन नावाच्या राक्षसाशी व नील निकुंभ नावाच्या राक्ष-साशी द्वंद्व-युद्ध करू लागला. सुग्रीव व प्रघस नावाचा राक्षस आणि लक्ष्मण व विरूपाक्ष यांच्यात युद्ध सुरू झाले. अशा रीतीने अनेक राक्षस आणि रामाचे अनेक वानर सहकारी भयानक युद्ध करू लागले.

या द्वंद्व-युद्धात अंगदाने इंद्रजितचा रथ व त्याचा सारथी यांना नष्ट करून टाकले, संपातीने प्रघसाला मारले, हनुमानाने जंबुमालीला चांगलाच हात दाखवला व



नलाने प्रतपन नामक राक्षसाचे डोळेच ओरबाडून काढले. सुग्रीवाने प्रघसाला ठार मारले.

चार राक्षसांनी रामावर बाण सोडले. रामाने आपल्या बाणांनी त्या चार राक्ष-सांची डोकीच उडवली. मैंदाने वज्रमुष्टि नावाच्या राक्षसाला आपल्या मुष्टिप्रहारांनी घायाळ केले. सुषेणाने विद्युन्मालीला ठार केले.

अशा रीतीने द्वंद्व-युद्धात अनेक राक्षस मारले गेले. एवढ्यात सूर्यास्त झाला नि युद्ध थांबले. युद्ध-भूमीवर राक्षस वानरांना खाऊ लागले, स्वर्णभूषण व चमकणारे पांढरे शुभ्र दात यांवरून राक्षसांना ओळखून वानरांनी त्यांची चिरफाड केली. त्या अंधारात ही राम व लक्ष्मण यांनी आपल्या बाणांनी अनेक राक्षसांना ठार मारले.

अंगदाने जेव्हां इंद्रजितचा रथ व सारथी यांना नष्ट केले, तेव्हा इंद्रजित अदृश्य होऊन राम-लक्ष्मणांपाशी आला आणि त्यांच्यावर नागास्त्र टाकून त्यांना बंदी बनविले. मग तो राम-लक्ष्मणाला म्हणाला—"मी जेव्हा असा अदृश्य राहून युद्ध करतो तेव्हा इंद्राचं ही माझ्यापुढे काही चालत नाही. तुम्ही तर क्षुद्र मानव! माझं काय करणार तुम्ही? मी आता तुमचे प्राण घेतो."



नागास्त्राने राम व लक्ष्मण यांची शरीरे बांधली गेली होती. त्यांना काही दिसत नव्हते. इंद्रजितच्या बाणांनी घायाळ होऊन ते जमिनीवर पडले होते. त्यांच्या शरीरातून रक्त वहात होते. रामाची दशा पाहून तर लक्ष्मणाने जिवंत राहण्याची आशाच सोडली.

हनुमान व अन्य वानर-प्रमुख राम व लक्ष्मण यांच्या भोवती जमा झाले आणि अतिशय दुःखी-कष्टी झाले. वानरांनी चारी बाजूंना इंद्रजितचा शोध घेण्याचा प्रयत्न केला. पण तो कोठेच दिसेना. फक्त विभीषण आपल्या मायाशक्तीमुळें इंद्रजितला पाहू शकत होता.



दरम्यान इंद्रजित राक्षसांना सांगू लागला—"पाहिलंत ना, माझ्यामुळे राम-लक्ष्मणाचा पराक्रम कसा फिका पडला आहे तो? मी आपल्या नागास्त्राने त्यांना बंदी बनवलं आहे, आणि यातून कोणी ही त्यांची सुटका करू शकणार नाही. माझ्या हातून हे दोघे मेलेच समजा!"

असं म्हणून इंद्रजित आपल्या बाणांनी वानर-वीरांना घायाळ करू लागला. राक्षसांनी इंद्रजितची तोंड भरून तारीफ करायला सुरुवात केली. निस्तब्ध राम व लक्ष्मण यांना पाहून इंद्रजितला वाटलं की ते मरून गेले आहेत. आणि मग तो लंका-नगरीत परत आला.

राम व लक्ष्मण यांच्या शरीरावरील बाण पाहून सुग्रीव सुद्धा घाबरला. तो रडू लागला, तेव्हा विभीषण त्याच्या जवळ जाऊन म्हणाला—"सुग्रीवा, घाबरू नकोस. असा अधीर होऊ नकोस. युद्ध हे असंच असतं! नेहमीच एकाच पक्षाचा जय कधी होत नाही. राम व लक्ष्मण हे बेशुद्ध आहेत एवढंच! थोड्या वेळाने ते शुद्धीवर येतील." आणि त्याने सुग्रीवाचे अश्रु पुसले.

इंद्रजित लंकेत परत येऊन आपल्या वडिलांना सांगू लागला—"बस, मी राम व लक्ष्मण दोघांना ही मारून टाकलं!"

अत्यंत आनंदाने रावण आपल्या सिंहासनावरून उठला व त्याने प्रेमभरे आपल्या पुत्राला आलिंगन देऊन विचारले—"हे कसं शक्य झालं ते तरी सांग!" तो सर्व कथा ऐकवू लागला व रावण ती ऐकू लागला. नंतर इंद्रजित परत आपल्या महालात गेला आणि रावणाने सीतेवर पहारा देणाऱ्या राक्षसिणींना आपल्याकडे बोलवले. त्रिजटा वगैरे राक्षस-स्त्रिया तेथे आल्या तेव्हा रावणाने त्यांना सांगितले—"इंद्रजितने राम व लक्ष्मणाला ठार केलं आहे, असं तुम्ही जाऊन सीतेला सांगा. तिला पुष्पक विमानातून घेऊन राम-लक्ष्मणाची प्रेते दाखवा. आता रामाची आशा सोडून शृंगार करून सीतेने माझ्याकडे यावे."



राक्षसिणींनी पुष्पक विमान आणलं नि त्या अशोक-वनात आल्या. विमानात सीता व त्रिजटा यांना बसवून राम-लक्ष्मणाची प्रेतं दाखवायला त्या निघाल्या.

रावणाने आपल्या नगरीवर विजय-ध्वज फडकवला आणि नगरीला सुशोभित करायची आज्ञा दिली. इंद्रजितने घोषणा केली की त्याने राम व लक्ष्मण यांना ठार मारले आहे.

सीतेने पाहिलं की राक्षसांना मोठा आनंद झालेला आहे. वानरांना दुःख झालेलं ही तिने पाहिलं. बाणांनी आच्छादिलेले राम व लक्ष्मण तिने पाहिले. आता तिला अनावर दुःख झालं.

खरोखर राम व लक्ष्मण मेलेले आहेत असे समजून सीता रडू लागली. ज्योतिषांनी तिला सांगितलं होतं – तिला मुलगा होईल, तिला वैधव्य येणार नाही, तिचा पति अश्वमेध यज्ञ करील आणि ती सम्राज्ञी बनून सिंहासनावर आरूढ होईल; कारण तिच्या पायांच्या तळव्यांवर पद्मरेखा अंकित आहेत. ती विचार करूं लागली की ज्योतिषांनी सांगितलेल्या या सर्व गोष्टी खोट्याच का?

त्रिजटेने दुःखी सीतेला सांगितले की रामलक्ष्मण मेलेले नाहीत, ते मूर्च्छित अवस्थेत आहेत. राक्षसिणींनी पुन्हा जाऊन सीतेला अशोक-वनात सोडलं.

नंतर राम व लक्ष्मण यांच्यातून राम प्रथम शुद्धीवर आला. अजून ही तो बाणांनी बांधला गेला होता. लक्ष्मणाला मेल्यासारखा पाहून त्याला अत्यंत दुःख झालं. तो म्हणाला–"जर लक्ष्मण जिवंत नसेल, तर मी स्वतः जिवंत राहून काय करूं? मला एकाच गोष्टीचं दुःख आहे की मी विभीषणाला राक्षसांचा राजा बनवण्याचं जे वचन दिलं होतं ते पूर्ण करायचं मला जमलं नाही. आता सुग्रीव व त्याची वानर-सेना यांना परत घेऊन जाणेच योग्य!" त्याला फार वाईट वाटलं नि त्या बरोबरच सर्व वानर शोक-सागरात बुडाले.





# न्याय

खूप जुनी गोष्ट आहे. त्या काळात एक सुलतान 'बुद्धिमान शासक' म्हणून प्रसिद्ध होता. त्याच्या राज्यात अगदी गरीबातल्या गरीब माणसावर अन्याय झाला तरी त्याचा योग्य तो निवाडा करीपर्यंत सुलतानाला चैन पडत नसे.

एक दिवस सुलतान दरबारात बसलेला असतानाच एक माणूस तेथे आला. त्या माणसाच्या हातात एक बटवा होता व त्याचा चेहरा दुःखाने पांढरा पडलेला होता.

"खाविन्द, मी एक छोटासा व्यापारी आहे, अन् आपलं शासन असताना मला फसवलं गेलंय!" तो माणूस म्हणाला.

"काय झालं सांग? मी चौकशी करून तुला नक्कीच न्याय मिळवून देईन." सुलतानाने आश्वासन दिले.

त्या व्यापाऱ्याला बाहेरगावी जायचे होते म्हणून त्याने आपल्या दोन हजार मोहोरा एका बटव्यात बन्द केल्या, आणि कोणी चोरून नेऊ नये म्हणून तो बटवा त्याने शहराच्या काजीकडेच संभाळायला दिला. बटवा त्यानं मोहोरबन्द केला होता. गावाहून परत आल्यावर त्याने बटवा परत आपल्या ताब्यात घेतला. पण उघडून पहातो, तो त्यात मोहोरांऐवजी तांब्याच्या पत्र्याचे तुकडे होते!

"बटवा ताब्यात घेताना तू नीट पाहिलास का?" सुलतानाने विचारले.

व्यापारी उत्तरला–"खाविन्द, बटवा मी जसा दिला, तसाच दिसला मला."

"बटव्याला कुठे भोक किंवा फाडल्यासारखं वगैरे तर नव्हतं?" सुलतानाने पुन्हा विचारले. "असं काहीही नाहीय हुजूर! मोहोरसुद्धा अगदी जशीच्या तशी होती. त्यामुळेच तर मोहोरांच्या जागी तांब्याचे तुकडे आलेले कळलं नाही मला!"

कांचन भागवत

सुलतानाने काही वेळ खोलवर विचार करून म्हटले–"ठीक आहे, हा बटवा इथेच ठेऊन जा. तू सांगितलेलं सारं खरं असेल तर तुला न्याय नक्कीच मिळेल."

दरबार संपला आणि महालात बसून सुलतान व्यापाऱ्याच्या फिर्यादीबद्दल विचार करत बसून राहिला–मोहोर जशीच्या तशीच, अन् आतली वस्तु मात्र गायब! कसं घडलं असेल?

अचानक सुलतानाच्या मनात एक विचार आला अन् तो ताबडतोब दरबाराच्या दालनात परत गेला. त्याने आपल्या सिंहासनावरचा गालीचा एका जागी थोडासा फाडून ठेवला.

दुसऱ्या दिवशी आपल्या घोड्यावर स्वार होऊन सुलतान शिकारीला निघून गेला. दरबारची स्वच्छता करणारा चपराशी स्वच्छता करता करता सिंहासनाशी आला. तो मूल्यवान गालीचा फाटलेला पाहून तो घाबरून गेला. तो ताबडतोब राजवाड्याच्या व्यवस्थापकाकडे गेला अन् त्याने त्याला तो फाटका गालीचा दाखवला.

अधिकारी चपराशाला म्हणाला–"मुळीच घाबरू नकोस. आपण नीट करू शकू तो. शहरात मोहम्मद नावाचा एक हुशार शिपी आहे. त्याला बोलावून आण. तो या गालीच्याला असं झकास रफू करून देईल की तो कुठं फाटला होता ते कळायचंही नाही."

चपराशी ताबडतोब शिप्याकडे गेला. त्याला सर्व काही नीट समजावून देऊन म्हणाला–"सुलतानाला हा सिंहासनावरचा गालीचा फाटलेला कळला, तर तो डोकंच उडवील माझं!"

"तुझं डोकं मी वाचवू शकेन, भिऊ नकोस. मला फक्त दोन मोहोरा दे. मग मी त्या गालीच्याला छान रफू करीन."

चपराशाने चटकन दोन नाणी मोहम्मदच्या हातावर ठेवली अन् त्याला बरोबर घेऊनच तो दरबारात आला. मोहम्मदने काम तर खरंच अगदी सफाईने केलं. काम पूर्ण झाले, तेव्हा गालीचा अगदी पहिल्यासारखाच दिसत होता. आता कुठे चपराश्याचा जीव भांड्यात पडला.

सूर्यास्ताच्या वेळी सुलतान शिकारीहून परत आला अन् घोड्यावरून उतरून थेट तो दरबाराच्या दालनात पोचला. सिंहासनावरील गालीचा पाहून तो सर्दच झाला! आपल्या डोळ्यांवर विश्वासच बसेना त्याचा! त्याला जी शंका आली होती ती बरोबर ठरली!

सुलतानाने ताबडतोब तेथे स्वच्छता करणाऱ्या चपराश्याला बोलावून घेतले–"सिंहासनावरचा गालीचा फाटलेला होता सकाळी. बरोबर आहे नं?" त्याने विचारले.

घाबरून चपराशी म्हणाला–"न...न... नाही हुजूर! ठीकच होता की तो!"

"अरे गाढवा, माझ्यासमोर खोटं बोलायची हिम्मत करतोस तू? मीच





तर काल रात्री तो फाडून ठेवला होता. आता खरं सांग याला रफू कोणी करून घेतलं?" रागाने सुलतान ओरडला.

आता मात्र थरथर कापत चपराश्याने खरी गोष्ट सांगून टाकली.

सुलतानाने मोहम्मदला बोलावून घेऊन व्यापाऱ्याचा बटवा त्याला दाखवला व विचारले—"काय रे, हा बटवा पाहिला होतास तू कधी?"

बटवा जरा उलट सुलट बाजूने पाहून मोहम्मद म्हणाला, "होय हुजूर! पाहिला होता. आपल्या शहराच्या काजीने माझ्याकडून याला रफू करून घेतलं होतं."

शिप्याला परत पाठवून सुलतानाने आता काजीला बोलावून घेतले. तो काजीला म्हणाला—"असं निलाजरं काम करायला कसा धजलास तू? स्वतःच्या अपमानाबरोबरच तू माझा अन् आपल्या राज्याचाही अपमान केला आहेस. पार धुळीला मिळवलंस तू आमचं नाव!"

"खाविन्द! मी तर असं काहीच केलेलं नाही. एकाद्या बदमाशाने माझ्याबद्दल काही खोटंनाटंच सांगितलं असावं आपणाजवळ!" काजी बेधडक बोलला.

"जीभ कापून हातावर ठेवीन हरामजाद्या! हे काय आहे?" असे म्हणत सुलतानाने व्यापाऱ्याचा तो बटवा काजीच्या तोंडावरच मारला.

आता आपण व्यापाऱ्याला फसवल्याची बरोबर आठवण झाली काजीला व तो माफी मागू लागला.

पण सुलतानाने त्याला मुळीच माफी दिली नाही. ताबडतोब त्याला कैद करून तळघरात डांबले. व्यापाऱ्याला बोलावून, त्याच्या दोन हजारात आपल्या आणखी तीन हजार मोहोरा घालून त्याला देत सुलतान म्हणाला—"मोठ्या पदावर काम करणाऱ्या हरामजाद्याला पकडून देऊन तू देशाची अमोल सेवा केली आहेस, म्हणून आम्ही तुला हा नजराणा देत आहोत."





# ताटारवालचं मांजर

चित्रदुर्ग गावात श्यामा नावाची एक बाई रहात असे. भारी भांडकुदळ होती ती. तिच्या घराजवळच तिच्या नणंदेचं घर होतं. नणंदेचं नाव होतं सुनीता. श्यामा नेहमीच लहानसहान कारणावरून सुनीताशी भांडण उकरून काढी. श्यामाचा नवरा शीतलदेव हे सर्व पाहूनही डोळेझाक करी तिकडे, कधी तोंडही उघडत नसे बिचारा तिच्यासमोर.

एकदा सुनीताची पाळीव मांजरी श्यामाच्या घरात घुसली अन् भांड्यात ठेवलेलं सारं दूध तिने फस्त करून टाकलं. श्यामाला भांडायला चांगलं निमित्तच मिळालं. मांजराबरोबरच सुनीतालाही शिव्या शाप देत ती ओरडू लागली.

सुनीतालाही आता राग आला. ती म्हणाली—"वहिनी, माझ्या मांजरानं एक भांडं दूध प्यायलं असेल तर मी तुला दोन भांडी दूध देते. शिव्या देणं बन्द कर."

श्यामा यावर म्हणू लागली—"मला काही नको दूध-बीध! ते मांजरच गावाबाहेर जंगलात सोडून दे आधी. मुळीच गप्प बसणार नाही मी."

सुनीताही बेपर्वाईने म्हणाली—"ते नाही होणार!"

अशा तऱ्हेने भांडण वाढतच गेलं अन् त्या दोघी एकमेकींबद्दल काहीच्या काही वाकडंतिकडं बोलत हमरीतुमरीवर आल्या.

शीतलदेव त्यावेळी शेतावर जाण्याच्या तयारीत होता. त्याने आपल्या बहिणीला सुनीतालाच रागं भरायचा प्रयत्न केला—"सकाळ झाली नाही, तोच आपलं भांडण सुरू! गप्प बसतेस की नाही?"

आता सुनीताला आपल्या भावाचाही राग आला. ती म्हणाली—"मोठा आलाय

विभास बिनिवाले



मला रागवायला. बायकोच्या 'ताटाखालचं मांजर' कुठला! आपल्या बायकोचं तोंड बन्द कर आधी! नाहीतर रोजच्यासारखा मूग गिळून गप्प बस!"

शीतलदेव पुढे एक शब्दही न बोलता मुकाट्याने शेताकडे चालता झाला.

पण श्यामाला मात्र आगीत तेल पडल्यासारखं झालं. ती भडकून म्हणाली—"अरे वा! आपल्या भावाला 'ताटाखालचं मांजर' म्हणण्याइतकी माजलीस होय तू? आता गावच्या मोठ्या माणसांसमोर तुला माझे पाय धरायला न लावलं तर माझं नाव बदलून ठेवीन." तिने शपथच घेतली.

"मी नवं काय बोलले, की मला गावच्या वडीलधाऱ्यांसमोर मान वाकवायला लागेल? खरं तेच बोलले की मी!" सुनीताही हट्टाने म्हणाली.

श्यामा तेथून सरळ गावपाटलाकडे गेली. सारं भांडण सांगून 'सुनीताला दटावून आपली माफी मागायला लावण्याबद्दल' तिने त्याच्याजवळ आग्रह धरला.

गावपाटील श्यामा-सुनीताला लहानपणापासून चांगलं ओळखत होता. त्याने श्यामाला विचारलं—"हे सारं भांडण चालू असताना तिथे आणखी कोणी होतं का? डोळ्यांनी सारं प्रत्यक्ष पाहिलेला साक्षीदार हवा यासाठी."

"हो ऽ माझा धाकटा भाऊ रामराज अन् माझा दीर राजशेखर हे दोघंही होते नं तिथे!" श्यामाने सांगितलं.

पाटलानं त्या दोघांना बोलावून आणायला सांगितलं श्यामाला.

"सुनीतानं तुझ्या मेहुण्याला 'ताटाखालचं मांजर' म्हटलं तेंव्हा, तू ते ऐकलंस?" दोघं आल्यावर पाटलानं रामराजला विचारलं. एवढ्यात पाटलाचा नोकर सुनीतालाही बोलावून घेऊन आला होता.

"हो ऽ! मी एकदाच नव्हे, तर तीनदा ऐकलं ते! माझे दाजी मजबूत माणूस आहेत. काही दिवसांपूर्वी एक चोर जेव्हां आमच्या घराच्या भितीवरून उडी मारून आत आला, तेव्हां दाजींनी त्याला आपल्या दोन्ही हातांनी पकडून भितीपलीकडे लोटून दिलं होतं! अन् कर्ज वसूलण्याच्या कामात तर ते कडकपणे वागून पैसे कसे वसूल करतात हे तर गावच्या लोकांना माहीतच आहे! ही सर्व काय 'बायकोच्या ताटाखालचं मांजर' असण्याची लक्षणं आहेत होय?" रामराजनं उलटं पाटलालाच विचारलं.

गालात हसत आता पाटलानं राजशेखरला त्याचं मत विचारलं.

"माझा दादा शेतात नोकरांसमोर नुसता उभा असला, तरी ते घाबरून आपली कामं नीटपणे करतात. ते पाहिलं की त्याला कोणी 'ताटाखालचं मांजर' बिजर म्हणू धजणार नाही." राजशेखरने आपलं मत जाहीर केलं.

हे सारं ऐकून पाटील सुनीताला म्हणाला—"ऐकलंस ना सगळं? तुझ्या अशा गुणी भावाचा तू असा अपमान का म्हणून केलास?"

सुनीता जराही न डगमगता ताडकन म्हणाली—"हो मला मान्य आहे, की माझा भाऊ मजबूत आहे, कर्ज वसुलण्यात अन् नोकरांकडून काम करून घेण्यातही पक्का आहे. पण हे सारं माझी वहिनी समोर नसेल तेव्हांच चालतं बरं!"

तिथे उभे असलेले पाटलाचे दोन्ही नोकर हसू लागले, अन् पाटलालाही हसू दाबता येईना तो म्हणाला—" 'ताटाखालचं मांजर'चा इतका अर्थ होतो हे मला आत्ताच कळालं."

नंतर त्याने श्यामा अन् सुनीताला स्वतन्त्रपणे बोलावून सांगितलं—"तुमच्या दोघींचं भांडण ऐकायला गावकरी जमले नाहीत. हे बरं झालं! लोकं तुम्हाला हसू लागतील, यापेक्षा तुम्ही दोघी अगोदरच आपली चूक समजून घ्या, हेच बरं. पुन्हा कधी अशी भांडणं करू नका." इतका हितोपदेश देऊन पाटलानं दोघींना परत पाठवलं.





# पसंतीचा नोकर

एका गावात राम व श्याम नावाचे दोन मित्र रहात असत. दोघेही अगदी गरीब होते, त्यामुळे इकडे-तिकडे मोल-मजुरी करून ते आपला उदरनिर्वाह करीत असत. अशा अनिश्चित आयुष्यामुळे आयुष्यात सगळा आनन्दच होता त्यांच्या. एकादी पक्की नोकरी मिळवावी यासाठी त्यांचे प्रयत्न चालू होते.

जवळच्या गावच्या जमीनदाराकडे नोकरी मिळायची शक्यता आहे, अशी खबर त्यांना एकदा मिळाली.

तेव्हां दुसऱ्या दिवशी भल्या पहाटेच उठून राम-श्यामची जोडगोळी जमीनदाराच्या घरी पोचली. तेथल्या नोकराने 'दोन माणसं काम मागायला आल्याची' खबर जमीनदाराला पोचवली. जमीनदाराने त्या दोघांना नुसते पाहूनही घेतले नाही, की आपल्याजवळ बोलावूनही घेतले नाही. दोघांना इतकाच निरोप पाठवला की 'त्यांनी सोमवारी सकाळी परत यावे.'

दोघेही बिचारे निराशेने, जसे आले तसेच परत गेले. श्याम काहीसा चिडून म्हणाला–"जे काय बोलायचं, ते आताच बोलता नसतं का आलं?"

सोमवारी पहाटेच उठून राम आपला मित्र श्याम याच्याकडे आला. रामने त्याला विचारले–"जमीनदाराकडे निघू या ना?" तेव्हां श्याम डोळे किलकिले करत म्हणाला–"अरे घाई काय आहे? थोड्या वेळाने जाता येईल की!"

"मी तर चाललो बाबा, तुला वाटलं तर ये मागनं!" असे म्हणून राम तेथून निघाला. त्याचे मत होते की जमीनदाराने सकाळी बोलावलं आहे, तर आपण सकाळीच जावं, हे बरं. उशीरा जाणं ठीक नव्हे.

राम गेल्यावर चांगला तासाभराने श्याम उठला अन् सावकाश जमीनदाराकडे जायला निघाला. त्याला खात्री होती की आपण पोचल्याबरोबर काही जमीनदाराची भेट होणार नाही. राम पोचल्याबरोबर जमीनदाराच्या नोकराने त्याला खबर दिली.

"त्याच्याबरोबरचा तो दुसरा माणूस का आला नाही हे विचारून ये त्याला." जमीनदाराने आपल्या नोकराला सांगितले.

"थोड्या वेळाने येईन–असं सांगितंलय त्यानं." रामने नोकराला बातमी दिली.

"मग थांबायला सांग त्याला." जमीनदाराने पुन्हा नोकराकरवी रामला सांगितले.

थोड्या वेळाने श्यामही तेथे येऊन पोचला. आल्याबरोबर तो रामला म्हणाला–"बघ, मी म्हटलं नव्हतं! इतक्या लवकर येऊन तुला काय मिळालं? अन् उशीरा येण्यानं माझं काय गेलं?"

थोड्या वेळाने जमीनदार स्वत: तेथे येऊन त्यांना म्हणाला–"कामासाठी आलेले तुम्हीच दोघं ना? ठीक आहे. आता तुम्ही जा, अन् बुधवारी सकाळी या पुन्हा."

पुन्हा दोघं गावचा रस्ता चालू लागले. श्याम वाटेत पुन्हा म्हणाला–"हा जमीनदार आपल्याला उगीचच त्रास देतो आहे. बुधवारी आलो, तरी पुन्हा कदाचित म्हणेल की आणखी एकाद्या दिवशी या." आता इथे पुन्हा येण्यात काही हशील नाही.



"आपल्याला काम हवंय, अन् आपण आहोत बेकार. कितीही वेळा यावं लागलं, तरी आपलं काय बिघडणार आहे?" राम म्हणाला. बुधवारच्या सकाळीही राम अेकटाच जमीनदाराकडे सकाळी गेला अन् श्याम मात्र दुपारी तिकडे जायला निघाला.

सकाळी आलेल्या रामला जमीनदार दुपारी भेटला. त्याने रामला जेवण देऊन 'उद्या संध्याकाळी ये' असे सांगितले.

राम घरी जाऊ लागला तेव्हां वाटेत त्याला श्याम भेटला. रामने त्याला त्या दिवशीचा वृत्तान्त सांगितला.

"मला पहिल्यापासूनच हे सर्व कळलंय. भिकाऱ्याला द्यावं, तसं तुला जेवण देऊन पाठवून दिलंय. इतक्याशा गोष्टी साठी

तुला उद्या पुन्हा तियं जावं लागणार?" टिंगलीच्या सुरात श्याम रामला म्हणाला.

"गेलो तर आपलं काय जाणार आहे? तुलाही यायला सांगितलं होतं. आपल्याला बोलावतील तेव्हां जायला हवं. काय?" राम म्हणाला.

"ठीक आहे, उद्या मी शेवटचा येईन. त्यानन्तर पुन्हा नाही येणार." श्याम म्हणाला.

दुसऱ्या दिवशी ते दोघे जेव्हां जमीनदाराकडे पोचले, तेव्हां जमीनदाराचा नोकर आत जाऊन आला आणि म्हणाला–"मालक म्हणाले, की उद्या सकाळी बोलू आपण. आज रात्री तुम्हां दोघांना इथेच रहायला सांगण्याबद्दल सांगितलंय मला त्यांनी."

श्यामला आता राग आला. तो नोकराला म्हणाला–"काम द्यायचं नसेल, तर प्रथमच सांगायला हवं होतं ना?" अन् रामकडे वळून तो म्हणाला–"चल राम, घरी जाऊ परत आपण." अन् तो चालू लागला.

जमीनदाराचा नोकर आत जाऊन परत बाहेर आला, तर तिथे त्याला एकटा रामच दिसला. त्याला पाच रुपये देऊन नोकर म्हणाला–"मालकांनी यातून बिछाना आणि चादर खरेदी करून आणायला सांगितलं आहे तुला. तू तर आता एकटाच राहिला आहेस नं?"

राम त्या दोन्ही वस्तु घेऊन आला. आल्यावर त्याला कळलं की जमीनदाराने त्या त्याच्याचसाठी मागवल्या होत्या.

दुसऱ्या दिवशी सकाळी जमीनदार त्याला म्हणाला–"मला तू पसन्त पडला आहेस. तू मागच्या सोमवारपासूनच नोकरीला लागला आहेस असं समज. तुला जेवण खाण, कपडालत्ता अन् शिवाय महिना तीस रुपये पगार मिळेल. आसपासच्या गावातल्या शेतकऱ्यांकडून वसुलीचं काम करावं लागेल तुला. यासाठी चांगली सहनशक्ति असायला हवी. आपलं काम नीटपणे केलंस, तर तुझा पगारही वाढत जाईल."

रामला नोकरी मिळाली हे कळल्यावर, आपल्या उतावळेपणाबद्दल श्यामला फार वाईट वाटले.





### नकली रंग

राजहंस (फ्लेमिंगो) आपल्या गुलाबी रंगामुळे मोठे देखणे दिसतात. तुम्हाला जर वाटत असेल की हा त्यांचा स्वतःचाच रंग आहे, तर ते मात्र साफ चूक! त्यांचा खास खुराक म्हणजे पानवनस्पती. त्यांचा रंग असतो हिरवट-निळसर. पण पचन होताना त्यांचा रंग गुलाबी होतो. अशा तऱ्हेने आपल्या विशिष्ट आहारामुळे राजहंसांना गुलाबी रंग प्राप्त होतो. आता तुम्हाला असं वाटतंय का, की टोमॅटो खाण्यामुळे तुमचा रंगही......? प्रयत्न काही वाईट नाही!

## बहुरूपा वसुन्धरा :

### जिराफाकडून शिका

उंदीर ४-५ इंचच लांब असतो. पण त्याच्या माणक्याची हाडे संख्येने ७ असतात. मग ७ फूट लांब मानेच्या जिराफाच्या मणक्यांची हाडे काय याहून जास्त असतात? तसे मानणे चूक होईल. जिराफाची जीभच १८ फूट लांब नसते. आपली जीभ काही ३ इंचापेक्षा जास्त लांब नसते. जिराफ हा घोड्यापेक्षाही जलद गतीने पळू शकतो. पण हां! पळतो तेव्हां तो मुळीसुद्धा आवाज करत नाही.





### दीर्घायुषी वृक्ष

तुम्ही 'कॉन्स्टेबल ट्री' नावाच्या वृक्षाबद्दल ऐकले आहे? पंधराव्या शताब्दीच्या पहिल्या दशकात हा नारिंगाचा वृक्ष फ्रान्समध्ये आणला गेला. हा वृक्ष ४७० वर्षांपेक्षाही जास्त काळ जिवन्त राहिलेला असून, अजूनही त्याला फळे लागतात. सर्वसाधारणतः नारिंगाचा वृक्ष शंभर वर्षांपेक्षा अधिक जगत नाही.




## विश्व - वार्ता

# मॉरिशस मध्ये नवे युग

आता इंग्लंडची राणी मॉरिशस बेटाची प्रमुख राहिली नाही. गेल्या १२ मार्च रोजी मॉरिशसने ब्रिटिश शासनापासून मुक्त होऊन



आपल्या स्वतंत्र गणतंत्र-राज्याची स्थापना केली. आता मॉरिशस बेट भारता सारखा ब्रिटिश कॉमनवेल्थचा एक घटक देश राहील.

बरोबर २४ वर्षांपूर्वी म्हणजे १२ मार्च १९६८ रोजी मॉरिशसने ब्रिटिश शासनातून आपणास मुक्त केले आणि तेव्हांपासून इंग्लंड तर्फे एक प्रतिनिधि इथे गवर्नर जनरल म्हणून रहात असे. लोकनायक शीवू सागर रामगुलाम मॉरिशसचे पहिले प्रधान-मंत्री बनले. त्यांच्यानंतर सन् १९८२ मध्ये अनिरुद्ध जगन्नाथ दुसरे प्रधान-मंत्री झाले व त्यांनी मॉरिशसला कॉमनवेल्थ घटक-सदस्याचा दर्जा प्राप्त करुन देण्याची शपथ घेतली.

सन् १९८३ मध्ये पहिल्या प्रथम गैरब्रिटिश गव्हर्नर जनरल मॉरिशसला लाभले आणि ते होते शीवू सागर. सन् १९८५ मध्ये जेव्हा त्यांचे



निधन झाले तेव्हां त्यांच्या जागी सर वीरासामी रिंगडू गव्हर्नर जनरल झाले. सन् १९८७ मध्ये निवडणुका होऊन श्री जगन्नाथ यांचे संयुक्त मंत्री-मंडळ अस्तित्वात आले. श्री जगन्नाथ प्रधान मंत्री झाले व सर वीरासामी यांनी अध्यक्ष-पद ग्रहण केले. येथील गणराज्याची घटना भारताच्या धर्तीवर तयार केली जाईल. तथापि येथील संसदेत एकच सदन राहील.

१८६५ चौरस कि. मी. क्षेत्रफळाचे हे विशाल मॉरिशस बेट आफ्रिकेच्या पूर्वेला असलेल्या माडागास्कर (५८७०० चौ. कि.मी.) या विशाल बेटाच्या पूर्वेला आहे. दहाव्या शतकाच्या मुमारास




काही अरब नाविकांनी मॉरिशसचा प्रथम शोध लावला असे म्हणतात. यानंतर ६ शतकांनी इथे प्रथम पोर्तुगीज व सोळाव्या शतकात डच लोक आले. डचांनी येथे शेतीवाडी केली आणि आपल्या व्यापारासाठी या बेटांचा उपयोग केला. नंतर शंभर वर्षांनी त्यांनी हे बेट सोडले. नंतर हे बेट फ्रान्सच्या ताब्यात आले. सन् १८१० मध्ये ब्रिटिशांनी आपली सत्ता येथे स्थापन केली. मॉरिशसला स्वतंत्रता प्राप्त करून देऊन ब्रिटिशांनी मॉरिशसचा निरोप घेतला.

या बेटाची लोकसंख्या सुमारे ११ लाख आहे आणि त्यातील ६७ टक्के लोक भारतीय आहेत. इंग्रजी व फ्रेंच येथील राज्यभाषा आहेत आणि याशिवाय तमिळ, हिंदी, गुजराती, मराठी, उर्दू आणि भोजपुरी आदि भाषा बोलणारे लोक ही आहेत! मॉरिशस बेटाच्या चारी बाजूंना अनेक छोटी छोटी बेटे आहेत. प्रत्येक बेटावर शिव, गणपति व सुब्रह्मण्येश्वर यांची मंदिरे आहेत. दर वर्षी "तैपूसंकावडी" आणि "चित्तिरै कावडी" नावाचे उत्सव मंगलवाद्यांच्या निनादात मोठ्या वैभवाने साजरे केले जातात. महाशिवरात्रि, होळी, दिवाळी आदि सण ही येथे साजरे केले जातात.

पर्यटक या बेटांना 'हिन्दी महासागरातील मोत्यांची माळा' संबोधून त्याची प्रशंसा करतात. हिरवेगार वृक्ष व रंगी-बेरंगी फुलझाडे यांच्यामुळे हे बेट स्वर्गासारखे वाटते. सुप्रसिद्ध अमेरिकी लेखक मार्क ट्वेनने कदाचित् म्हणूनच येथील अद्भुत निसर्ग-सौंदर्याने आकर्षित होऊन उद्‌गार काढले—"परमेश्वराने मॉरिशस पाहूनच स्वर्गाची जडण-घडण केली असावी!"



# सासवासुना

सीतापुरमधे श्रीकण्ठ नावाचा एक प्रसिद्ध व्यापारी होता. त्याला एक मुलगा अन् एक मुलगी होती. मुलाचे नाव होते श्रीनाथ आणि मुलीचे श्रीवल्ली. श्रीनाथ मोठा झाला आणि आपल्या पित्याच्या व्यापारात त्याचा उत्तम उजवा हात बनला. तो सर्व दृष्टींनी योग्य असल्यामुळे त्याला अनेक मुली सांगून येऊ लागल्या.

एके दिवशी श्रीकंठची बायको भानु नवऱ्याला म्हणाली—"श्रीनाथचं लग्न लवकर करून दिलं तर बरं होईल ना! रामपुरवाल्यांनी निरोप पाठवलाय की ते एक लाख हुंडा द्यायला तयार आहेत."

यावर हसून श्रीकंठ म्हणाला—"आँ? पोराला दुसरी मुलगी का पहायची? सुदर्शनची मुलगी सुलोचना आता अठरा वर्षांची झाली असेल ना?"

हे ऐकताच भानूच्या चेहऱ्यावर नाराजी दिसू लागली. पंधरा वर्षांपूर्वी सुदर्शनकडूनच भांडवल घेऊन श्रीकंठने आपला व्यापार सुरू केला होता. घसरत्या परिस्थितीत श्रीकंठच्या कुटुंबाला सुदर्शननेच अशा रीतीने मदतीचा हात दिला होता. इतकेच नव्हे, तर रक्कम देताना सुदर्शनने त्याला बजावले होते की ही रक्कम म्हणजे कर्ज नव्हे.

तेव्हां श्रीकंठ त्याला म्हणाला होता—"तर मग माझंही म्हणणं ऐक. पैसे परत घेणार नसशील तर ऐकून ठेव. तुझी मुलगी वयात आली की मी तिला आपली सून करून घेईन. अर्थात् ते तुला तेव्हां मान्य असेल तरच हं!"

पण आता काळ पालटला होता. सुदर्शन बिचारा एक अगदीच सामान्य माणूस बनून राहिला, जवळजवळ निर्धनच! अन् इकडे भानु म्हणत होती की, एक लाख रुपये हातचे जाऊ देऊ नयेत. ती नवऱ्याला म्हणाली—"लग्नासारख्या

दीपा जकली



महत्त्वाच्या बाबतीत, एकाद्या विशिष्ट मुलीशी लग्न करण्याबाबत मुलावर दबाव आणणं योग्य होईल का, याचा काही विचार?"

"असं मुळीच नाही. श्रीनाथला सुलोचना पसंत पडली नाही, तर मी तिचं लग्न दुसरीकडे जमवीन अन् चांगला भरपूर हुंडा देऊन थाटामाटात लग्न करून देईन." श्रीकंठने आपल्या मनातले सांगून टाकले.

दुसऱ्याच दिवशी ते सुलोचनाला पहायला गेले. तिला पाहिल्याबरोबर श्रीनाथने आपली पसन्ती व्यक्त केली. सुलोचनाला विचारीला कळलेच नाही की, आपण आपल्या नणंदेला व सासूला पसंत नाही आहोत. अन् अशा परिस्थितीतच ती सून बनून त्या घरी आली.

सहा महिने सुलोचनाला आपल्याच भाग्याचा हेवा वाटत राहिला. परंतु अचानक तिचा सासरा श्रीकंठ स्वर्गवासी झाला अन् तेव्हांपासूनच तिच्या हालांनाही सुरुवात झाली. पित्याच्या मृत्यूमुळे श्रीनाथची जबाबदारी दुप्पट वाढली. तो फारसा घरी राहीनासा झाला. आणि इकडे नणंद व सासूकडून सुलोचनाला छळायला सुरुवात झाली.

सासू सुनेला टोचून बोले, टोमणे मारी— "हो, लाखाचा हुंडा आणणारी मुलगी सोडून या अष्टदरिद्री मुलीला आणलं घरात!"

"अन् घरात पाऊल ठेवल्याबरोबर सहा महिन्यात घराचं स्मशान केलं या शनीनं!" नणंद श्रीवल्ली वर चिमटे काढी.

आता स्वयंपाकाचे सारेच काम सुलोचनावर येऊन पडले. भानु घरातलं ढीगभर काम तिच्याकडून करून घेऊन आपल्या मनाची ठसठस शान्त करू पाही, तिचा सूड घेऊ पाही. श्रीवल्ली वहिनीला थोडीसुद्धा मदत करीत नसे, उलट आपल्याला जे हवे असेल ते सुलोचनाला आपल्या खोलीत आणून द्यायला लावी. पण आपणावर होणाऱ्या अत्याचारांबद्दल सुलोचना श्रीनाथजवळ ब्र ही काढत नसे.

एकदा सुलोचनाला खूप ताप आला. थंडीने कापत त्या दुःखद, असह्य अवस्थेतही घरातलं सारं काम तिने एकटीनेच उरकले.

अशातच सासू व नणंदेने गावापासून दहा मैल दूर असणाऱ्या देवीच्या दर्शनाला जायचे ठरवले.

भानूने रात्रीच सुलोचनाला सांगितले— "सकाळच्या गाडीने निघालो की यायला रात्रच होईल. देऊळ तर डोंगरावर आहे. तिथे खायला काहीच मिळत नाही. पहाटेच उठून आमच्यासाठी गोड खिचडी बनवून बांधून दे."

दुसऱ्या दिवशी पहाटेच खिचडीच्या आठवणीने सुलोचना चटकन अंथरुणातून उठली. पण चार पावले चालताच चक्कर येऊन जवळच्या टेबलावरच ती कोसळली. त्या आवाजाने श्रीनाथ जागा झाला. सुलोचनाला नीट अंथरुणावर बसवून त्याने प्रेमाने विचारले—"आत्ताच का उठलीस ग?"

सुलोचनाने त्याला खिचडीबद्दल सांगितले, तेव्हां तो म्हणाला—"तू फार कमजोर झालेली दिसतेस, झोप तू. खिचडी मी बनवतो." आणि जबरदस्तीने तिला झोपवून श्रीनाथ स्वयंपाकघरात गेला. खिचडी बनवण्याची तयारी केली. थोड्याच वेळात गरम गरम गोडी





खिचडी एका भांड्यातून आणून ते बायकोच्या हवाली करत श्रीनाथ तिला म्हणाला–"जा, खिचडी आपल्या सासूला नेऊन दे. मी बनवलीय म्हणून सांगू नकोस हां!"

नवऱ्याने सांगितल्याप्रमाणेच केले सुलोचनाने. नंतर सासू व नणंद भाड्याच्या गाडीतून देवीला जाण्यासाठी निघून गेल्या. नंतर श्रीनाथही खाऊन पिऊन बाहेर गेला. सुलोचना बिचारी काही न खाता पिता दरवाजा बन्द करून पडून राहिली.

रात्र होता होता दरवाजा खटखटला. दरवाजापर्यन्त कसे तरी जाऊन सुलोचनाने तो उघडला. समोर दोघींची जोडगोळी उभी होती!

"आम्हाला भुकेनं मारायचा विचार होता तुझा! नाहीतर असली खिचडी केली नसतीस तू!" असे म्हणून रागातच श्रीवल्ली भरकन घरात घुसली.

"दुपारी चांगली भूक लागली, तेव्हां छान दूध, चांगला तांदूळ, काजू-बेदाणा अन् वेलदोड्याच्या वासानंच तोंडाला पाणी सुटलं. पण कसचं काय! खिचडी तोंडात घातली, अन् तशीच थुंकावी लागली! त्यात तू साखरच नव्हती घातलीस. मुद्दामच केलंस तू असं!" सुलोचनाचा दंड पकडून तिला गदगदा हलवत सासूने कडक आवाजात म्हटले. श्रीनाथ त्यावेळी घरी आला होता. हसतच त्याने विचारले–"काय झालं आई? आपल्या आजारी सुनेवर राग काढते आहे असं दिसतंय?"

मुलाचे हसणे अन् बोलणे ऐकून भानु म्हणाली–"या घरात हिला काय कमी आहे? इतक्या उंची साड्या अन् दागिने जन्मात तरी पाहिलेत का तिनं? कसला त्रास आहे तिला इथं? उगीचच मला अन् आपल्या नणंदेला सतावतेय ती?"

"आई, कोण कुणाला सतावतंय हे काही मला कळत नाही, असं नाहीय! चांगलं दूध अन् काजू वगैरेचं तू म्हणालीस ते ऐकलं मीही. हे सारं असूनही, साखर नसली तर खिचडी खाववत नाही. तसंच सगळं काही असून, जीवनात केवळ प्रेम नसेल, तर असलं आयुष्य कोणालाही आवडणार नाही. ती खिचडी मीच बनवली होती; अन् हे सांगण्यासाठी जाणून बुजूनच त्यात साखर घातली नाही मी आई!"

"म्हणजे तुला म्हणायचंय की आमचं सुलोचनावर प्रेमच नाही?" आवेशाने भानूने विचारले.

"मला सांगायचं होतं, ते लवकरच ओळखलंस तू! सुनेला ताप असून नणंद अन् सासूनं देवाला जायचं ठरवावं, अन् वर खूप तापलेल्या सुनेलाच पहाटे उठून गोड खिचडी करून द्यायला सांगायचं–याला काय प्रेम म्हणतात? तुम्हा दोघींना चांगल्या वाईटातला फरक दाखवण्यासाठीच मी बिनसाखरेची खिचडी बनवली. तुम्हाला नीट मिळून मिसळून रहाता येत नसेल, तर मला सांग. म्हणजे आम्ही दोघं नवरा-बायको निराळं बिऱ्हाड करू." श्रीनाथने रागाने कडक आवाजात सांगून टाकले.

हे बोलणे ऐकताच भानु व श्रीवल्ली यांना अंगावर वीज कोसळल्यासारखे झाले. पण सुलोचनाच मधे पडून नवऱ्याला म्हणाली–"हे काय बोलताय तुम्ही? मी जिवन्त असेपर्यंत निराळ्या बिऱ्हाडाचा कधी विचारही नाही करणार! अन् घरातल्या गोष्टी आमच्या आम्ही पाहून घेऊ. तुम्ही आपला स्वत:चा उद्योग व्यवसाय संभाळलात की पुरे!"

आपली सून स्वभावाने किती चांगली आहे, हे आत्ता कुठे भानूच्या लक्षात आले! तिने हेही ओळखले की धनदौलतीपेक्षा माणसात आपलेपणा अन् प्रेम हेच जास्त महत्त्वाचे आहे. ती म्हणाली–"श्रीनाथ, तू बनवलेल्या खिचडीमुळे आमचे डोळे उघडले. पुन्हा कधी या घरात असलं भांडण होणार नाही." अन् तिने सुलोचनाला प्रेमाने जवळ घेतले.



# जमीनदाराचा नावाडी

चन्द्रगिरीच्या जमीनदाराला एका नावाड्याची गरज होती. तो रोज संध्याकाळी नावेत बसून नदीतून फेरफटका मारत असे. अन् ती नदी डोंगराळ भागातून खूप वेगाने वहात असल्यामुळे नावाडी चांगला अनुभवी व आपल्या कामात वाकबगार असला पाहिजे —अशी त्याची अट होती.

दिवाणाने अनेक नावाड्यांमधून प्रसाद व परमेश नावाचे दोन नावाडी निवडले आणि त्यांना घेऊन तो जमीनदाराकडे गेला. "हुजूर, हा प्रसाद नाव चालवण्यात चांगला कुशल असून तो उत्तम पोहोणाराही आहे. आणि हा परमेशही कुशल नावाडी आहे ; पण याला पोहोता मात्र येत नाही." दिवाणाने आपल्या मालकाला त्या दोघांबद्दल माहिती पुरवली.

जमीनदाराने त्यांना दुसऱ्या दिवशी परत यायला सांगितले. ते दोघे निघून गेल्यावर जमीनदार दिवाणाला म्हणाला—"उद्या आले की सांगा—मी परमेशची निवड केली आहे."

आश्चर्याने दिवाणाने विचारले—"आपण परमेशला नोकरीवर ठेवणार ?"

"हो, मला माहीत आहे ते. म्हणूनच मी त्याला नोकरीला ठेवणार आहे. दोघंही नाव चालवण्यात वाकबगार आहेत खरे ; पण जो पोहू शकतो, तो नाव तितकी काळजीपूर्वक हाकणार नाही. वेळ आली, तर आपण पोहून जाऊन आपला जीव वाचवू शकू—हे त्याला पक्कं ठाऊक असणार. पण परमेशचं तसं नाही; त्याला पोहोताच येत नसल्याने साहजीकच तो नाव खूप सावधगिरीने चालवील. त्यानं तसं न केलं तर त्याचाच जीव धोक्यात येईल. त्याला स्वतःच्या जिवाची काळजी असल्याने, त्याच्या हाती माझा जीवही सुरक्षित राहील ना ? काय दिवाणजी, तुम्हाला काय वाटतं" जमीनदाराने हसत हसत विचारले.

"ओहो ! या गोष्टीचा मी विचारच नव्हता केला ! क्षमा करा हं हुजूर मला !" दिवाण शरमेने मान खाली घालत म्हणाला.





# माया महाल

[ २ ]

[वीरगिरीची राजकन्या विद्यावती हिच्या जन्मोत्सवाला आता तीनच दिवस उरले होते, अन् ती मात्र अचानक खूप अशक्त होऊन आजारी पडली. ज्योतिष्याच्या सल्ल्यावरून तिला सरोवरातील बेटावरील विश्रामगृहात रहायला पाठवले. परन्तु दोन महिन्यांनी ती अचानक तेथून नाहीशी झाली. ती अशी अदृश्य होण्यापूर्वी···]

युवराणीला सारस सरोवरापर्यंत सोडून आलेल्या दासी शालिनी व मालिनी दुसऱ्या दिवशी तिच्यासाठी आवश्यक ते खाण्यापिण्याचे पदार्थ घेऊन विश्रामगृहाकडे गेल्या. नावाड्याने त्यांना विश्रामगृहाच्या पायऱ्यांपर्यंत सोडले. राजकन्येला गेल्या रात्री छान शान्त झोप मिळाल्यामुळे ती खूपच ताजीतवानी वाटत होती. तिला अशी थोडी सुधारलेली पाहून त्या सेविकांना फार आनन्द झाला. नंतर तिचे स्नान वगैरे उरकून त्यांनी तिला जेवाय-खायला घातले आणि परत येऊन सर्व हकिकत राणी वज्रेश्वरीदेवीच्या कानावर घातली. युवराणी ताजीतवानी झाल्याबद्दल राणीने राजाला कळवले. राजदंपतीला वाटले की ज्योतिष्याने युवराणीच्या रहाण्याच्या स्थानात जो बदल केला, त्यामुळेच ती सुधारू लागली.



या सुखद समाचारामुळे दोघेही फार खूश झाले. दुसऱ्या दिवशी नंदिनी व देवयानी नावाच्या सेविका युवराणीला भोजन घेऊन गेल्या. तिसऱ्या दिवशी शांता-शारदा या दासींच्या तोंडून राजदम्पतीला बातम्या मिळत गेल्या की युवराणीची तब्येत दिवसें-दिवस सुधारत चालली आहे. त्यामुळे आपल्या लाडकीला भेटण्याच्या शुभदिनाची ते मोठ्या आतुरतेने वाट पाहू लागले. अशा तऱ्हेने पाहता-पाहता वीस दिवस निघून गेले.

त्या दिवशी प्रधान ज्योतिषाचार्य वाचस्पती राजदर्शनासाठी आले तेव्हां स्वतः राजा त्यांना सामोरा जाऊन मोठ्या आदराने महालात घेऊन गेला व त्याने त्यांना बसायला आसन दिले. उदास चेहऱ्याच्या राजा-राणीकडे पाहून स्मित करत ज्योतिषाचार्य म्हणाला–"महाराज, आपण दोघंही जा, पण सूर्यास्तापूर्वी आपणाला परत मात्र यायला हवे."

"विद्यावतीच्या विरहाला तीन आठवडे झाले. तिच्या विना रहाणं आम्हाला फार कष्टप्रद वाटत आहे." राणी दुःखी स्वरात म्हणाली.

"आपण तर उद्याच जाणार आहोत न देवी!" राणीचे सान्त्वन करत राजा म्हणाला. नंतर वाचस्पतीकडे वळून राजाने विचारले–"आचार्य, विद्यावतीचे ग्रहमान आता काही बदलल आहे का? या बाबतीत आपण आपले मित्र जगत्पती यांच्याशी काही बोलणे केले काय?"

"होय महाराज! त्यांनीही माझ्या विचारांना दुजोराच दिला. त्यांचाही असाच विचार आहे की, युवराणीची स्थिति चाळीस दिवसपर्यंत अशीच राहील. अन् त्यानंतरच ती पहिल्याप्रमाणे निरोगी होईल. तेव्हां आपल्याला घाबरायचं काहीच कारण नाही. उद्या आपण दोघं युवराणीला पाहून याल तेव्हां आपलीही यांबद्दल खात्री पटेल." असे म्हणून वाचस्पति तेथून निघून गेला.



आता राजा-राणीला कळून चुकले की युवराणीला भेटण्यासाठी योग्य दिवस म्हणून एकविसावा दिवसच मुकर केला गेला होता. त्यादिवशी दुपारचे भोजन उरकून युवराणी जेव्हां विश्राम करुन शांत झालेली असेल, त्याच वेळी तिला भेटणे ठीक होईल.

लोकांना जेव्हां कळले की राजा-राणी आज राजकन्येला भेटायला जात आहेत, तेव्हां ते राजरस्त्यांच्या दुतर्फा उभे राहून तिच्या स्वास्थ्याबद्दल राजाराणींना प्रश्न विचारू लागले. राजाही प्रसन्नपणे स्मित करीत 'राजकन्या सुधारत आहे' असे त्यांना सांगत राहिला. ही बातमी एकून प्रजाही खूष झाली.

सारस सरोवराजवळ वाट पहात बसलेल्या नावाड्याने राजदंपति समोर दिसताच त्यांना प्रणाम केला. केवळ राजा व राणीच नावेवर चढले, त्यांचे अंगरक्षकही सरोवरकिनारीच थांबले. नाव आता बेटाकडे निघाली.

बेटावरील विश्रामगृहाच्या पायऱ्यांवर उभ्या असलेल्या वृद्ध कमला दासीने राज-दम्पतिला लवून नमस्कार केला, आणि ती त्यांना घेऊन, ज्या विशाल अशा दालनात राजकन्या होती, त्या दिशेने चालू लागली. त्याच वेळी झोपेतून नुकतीच जागी झालेल्या राजकन्या विद्यावतीने आपल्या माता-पित्यांना पाहिले व ती तावडतोब उठून हसतच त्यांच्याकडे आली. राणीने





प्रेमाने तिला गळामिठी घालत तिचे कुशलक्षेम विचारले–"कशी आहेस बाळ आता?" कन्येच्या चेहऱ्यावरील हास्य पाहून दोघांनाही फार समाधान वाटले.

थोड्या वेळाने कन्येचा हात पकडून महाराणी तिला घेऊन उद्यानवनाकडे चालू लागली. राजाही त्यांच्या मागोमाग चालत होता. तिथे बसून तिघेही बराच वेळपर्यंत बोलत बसले. सूर्यास्ताची वेळ जवळ येऊ लागताच राजदंपति परत जायला निघाली. दासी कमला त्यांच्याबरोबर नौकेपर्यंत गेली. ते नावेत बसताच त्यांचा निरोप घेत कमलाने त्यांना नमस्कार केला.

नौका चालू लागली व ती राजकन्येकडे परत फिरली.

नंतर असेच आणखी तीन आठवडे पार पडले. ज्योतिषाचार्यांच्या सल्ल्याने राजाराणी पुन्हा एकदा राजकन्येला भेटायला जायला निघाले. यावेळी युवराणी स्वतःच नौकेपर्यंत त्यांना भेटायला आली. मातापित्यांना नमस्कार करुन मोठ्या प्रेमाने तिने त्यांना विश्रामगृहात बोलावून नेले. यावेळी विद्यावती जवळजवळ पूर्ण बरी झाल्यासारखीच दिसत होती, त्यामुळे राजाराणी तब्येतीबद्दल, तिच्याशी काहीच बोलले नाहीत. खूप वेळ ते तिच्याशी इतर काही बोलत राहिले. सूर्यास्तसमयी नावेत बसून, कन्येचा निरोप घेऊन ते परत आले.

एकीकडे युवराणी पूर्ण बरी झाल्याचा राजदाम्पत्याला आनन्द वाटत होता, तर दुसरीकडे त्यांना दुःख वाटत होते की यांना जवळजवळ दहा महिने विरह घडणार होता. याच दुःखी विचारात ते दोघे राजवाड्यात परत आले.

यानंतरचे तीन आठवडे कष्टानेच गेले, परंतु तरीही यावेळी राजज्योतिष्याकडून काहीच बातमी आली नाही. राजा-राणी विचारात पडले, की याचे काय कारण असावे? एके दिवशी महाराणी राजाला म्हणाली–"प्रभु, आपणच ज्योतिषाचार्यांना आमन्त्रण देऊन बोलवून घेतलं तर?"

"नाही देवी, हे सारं काम पूर्णपणे ज्योतिषाचार्यांच्या निर्णयानुसारच चालणार आहे. आपण त्यात दखल देणं बरं नव्हे. आपल्या बाळीच्या कल्याणासाठीच आपण हे व्रत घेतलेलं आहे, ही गोष्ट तू विसरलीस काय? अन् दासींकडून आपल्याला वारंवार वार्ताही मिळतच आहे ना, कि ती अगदी सहीसलामत आहे? आपण दोन दिवस आणखी थांबू या." राणीचे सान्त्वन करत राजा म्हणाला.

त्याच दिवशी संध्याकाळी ज्योतिषाचार्य वाचस्पति, आपला मित्र आचार्य जगत्पतीला बरोबर घेऊन राजभवनात आला. त्यांना पहाताच राजाच्या चेहरा आनंदाने फुलून आला. त्यांना सादर उचित आसने देऊन राजा समोर उभा राहिला. आचार्य वाचस्पती म्हणाला–"महाराज, उद्या पहाटेच उठून आपण जाऊन कन्येचा समाचार घेऊन या. हे नक्की व्हायला हवं."

या गडबडीचे काय कारण असावे, याबद्दल राजा विचारात पडला. इतक्यात आचार्य जगत्पती म्हणाला–"उद्या सकाळी सूर्योदया पूर्वीच आपण आपल्या कन्येला भेटून येणं आवश्यक आहे. यानंतर नव्वद दिवसपर्यंत एकही शुभमुहूर्त नाही. इतकंच नव्हे, तर पुढले तीन महिने युवराणीलाही फार कठीण परिस्थितीला तोंड द्यावे





लागणार आहे. या काळात तिच्या तब्येतीला कोणत्याही प्रकारचा धोका नाही. पण..." बोलता बोलता आचार्य मधेच थांबला.

आचार्यांचे हे अर्धवट बोलणे, उद्या सकाळीच राजकन्येला भेटून यायचे या विचारात रंगलेल्या राजाच्या ध्यानात आलेच नाही, अन् आचार्यांनीही आपले बोलणे तसेच सोडले.

"पहाटेच का? सूर्योदयानंतर गेलं तर नाही का चालायचं?" पट्टराणीने विचारले.

"नाही, कारण पुढले दोन-तीन महिने राजकन्या एका क्लिष्ट अशा ग्रहदशेच्या फेऱ्यात सापडणार आहे. म्हणूनच उद्या पहाटेच, किंवा तीन महिन्यानंतर– याशिवाय अन्य शुभमुहूर्त नाही, म्हणूनच ही घाई. इतर ज्योतिषाचार्यांनीही आम्हाला हीच सूचना दिली आहे." राजाने तिची समजूत घातली.

"क्लिष्ट ग्रहदशेबाबत जास्त काही त्यांनी सांगितलं का?" राणीने काळजी व्यक्त केली.

"नाही. आता अगोदर आपण उद्या पहाटे जाऊन आपल्या बाळीला पाहून येऊ. त्यानन्तर आपण ज्योतिषाचार्यांना बोलवून घेऊ आणि त्या ग्रहदशेबाबत अधिक विचारून घेऊ देवी!" राजा समजूत घालत म्हणाला.

दुसऱ्या दिवशी पहाटेच, कसलीही पूर्वसूचना न देताच आलेल्या राजदंपतीला पाहून नाविक आश्चर्यचकित झाला. ते दोघे नौकेत बसून बेटाच्या विश्रामगृहाशी पोचले, तोवर पूर्वेला मंदसा प्रकाश होऊ लागला होता. राजदंपतीचे स्वागत करायला ना कमला पुढे आली, ना स्वतः राजकन्या विद्यावती. आपल्या आगमनाची बातमी न मिळाल्यामुळे कोणी पुढे आले नसेल, असा विचार करत राजदाम्पत्याने पायऱ्या चढून विश्रामगृहात पाऊल ठेवले.

इतक्यात म्लान चेहऱ्याने त्यांच्या समोर येणाऱ्या कमलाने आश्चर्याने



विचारले–"प्रभु, ती बातमी आपल्याला इतक्या लवकर कळली?"

"कसली बातमी? काय झालं? विद्यावती कुठंय्?" अज्ञात शंकेच्या आशंकेनं राजा-राणींनी बरोबरच प्रश्नांची सरबत्ती केली.

कमलाचा स्वर अडखळत होता. अन् तिच्या चेहऱ्यावर भीती स्पष्ट दृग्गोचर होत होती. "महाराणी......युवराणी...... युवराणी, कुठे दिसत नाहीय." कापऱ्या आवाजात कमला बोलली.

"काय म्हणतेस? कुठे जाईल ती? तू सारं भवन नीट धुंडून पाहिलंस?" राजाने आश्चर्य व भीतीवर ताबा ठेवत विचारले.

महाराणी चकित झाली. तिने तोंडच उघडले नाही!

"प्रभु! माझ्या जीवनात यापूर्वी असलं काही घडलं नाही. मला वाटतं रात्रभर मी बेशुद्धावस्थेत होते. मी जागी झाले तेव्हा माझं डोकं जड झालेलं होतं अन् मला विचित्रसी नशा आल्यासारखं वाटत होतं. युवराणीला उठवायला मी तिच्या शयनकक्षात गेले, तेव्हा ती तिथं दिसली नाही. मला वाटतं की लवकर उठून आज युवराणी इकडे तिकडे कुठे फिरत असेल. म्हणून मी प्रथम सर्व खोल्या धुंडाळल्या. उद्यानातही पाहिले. आसपासच्या सर्व जागा शोधून आले, पण युवराणीचा काहीच पत्ता लागत नाही." बिचारी म्हातारी दासी डोळ्यात पाणी आणून बोलत होती.

"कुठे गेली असेल?" असे विचारत महाराणी तेथून विद्यावतीच्या शयनकक्षात जाऊन पुन्हा परत आली.

या अवधीत राजाही विश्रामगृहाच्या अन्य खोल्या तपासून आला. "विद्यावती! विद्यावती!" म्हणून पुकारत राणीने सारे उद्यानवन धुंडाळले. आसपासच्या सर्व जागा पुन्हा-पुन्हा पाहिल्या. पण त्यांना राजकन्या कुठेच आढळली नाही.

तेव्हा राजाने नावाड्याला सेनानायकाला तावडतोब बोलावून आणायची आज्ञा दिली.

(क्रमशः)





# देवीची चूक

हट्टी विक्रमराजा पुन्हा झाडाकडे धावला. फान्दीला लटकणारे प्रेत काढून, ते खांद्यावर टाकून, नेहमीप्रमाणे तो स्मशानाची वाट चालू लागला. तेव्हां प्रेतात वास करणारा तो वेताळ बोलू लागला– "राजा, या भयानक मध्यरात्रीच्या वेळी तू जी दृढता व उत्तम दीक्षेची चुणूक दाखवत आहेस, ती पाहून माझ्या मनात एक शंका उत्पन्न झालीय–तू पंडित आहेस, ज्ञानी आहेस, की पामर? पंडित नक्की ज्ञानी असतो, किंवा ज्ञानी हा नक्की पंडित असतोच, हे खरे नव्हे. ही गोष्ट तर तुलाही ठाऊकच असेल. कारण जी गोष्ट एकाचाला खरी वाटते, ती दुसऱ्याला खोटी वाटण्याचीही शक्यता असते. अशा तऱ्हेची धर्मसूक्ष्मता किंवा अडचण उपस्थित होते, तेव्हां केवळ मानवच नव्हे, तर कधी कधी खुद्द देवदेवताही चूक करून बसतात. या

## वेताळाच्या गोष्टी



गोष्टीचं प्रमाण म्हणून मी एक पंडित अन् एक पामर यांची गोष्ट सांगतो. ती नीट लक्षपूर्वक ऐक. तुझा वेळही जाईल अन् जरा करमणूकही होईल." वेताळ गोष्ट सांगू लागला–

एके काळी सुवर्णदीप नगरात तारकेश्वर नावाचा एक धनवान माणूस रहात असे. आपल्या जवळच्या संपत्तीमुळे त्याला फार गर्व होई. त्याचा व्यापार दिवसेंदिवस वाढू लागला, आणि त्याची मित्र मंडळी त्याचा द्वेष करू लागली. आपल्या मित्राची प्रगति त्यांना साहवेनाशी झाली. त्याचे भाईबंद नेहमी त्याच्याकडे पैशांची मदत मागून त्याला सतावू लागले. त्याची बायको एकसारखे नवनवे दागिने घडवून घेऊ लागली. नवऱ्याचे मन समजून घेण्याचा ती कधी प्रयत्नच करीत नसे. त्याचा मुलगा पाण्यासारखा पैसा खर्च करी. मुलाचे सारे दुष्ट व धोकेबाज मित्र मैत्रीच्या नावाखाली त्याला लुबाडत, त्याच्या भोवती-भोवती फिरत. अनेक प्रयत्न करूनही मुलाला सुधारणे तारकेश्वरला शक्य होईनासे झाले. आपण कष्टाने मिळवलेले पैसे मुलाने व बायकोने असे बेपर्वाईने खर्च करावेत हे तारकेश्वर पाहू शकेना. त्याने दोघांना ही समजून सांगण्याचा परोपरीने प्रयत्न केला. पण व्यर्थ! सर्व पालथ्या घड्यावर पाणी!

या साऱ्या त्रासामुळे तारकेश्वरचे मन उद्विग्न राहू लागले. अशा परिस्थितीतच त्याला एकदा शिवानन्द नावाच्या योग्याला भेटायची संधि मिळाली. त्याला तारकेश्वरने आपल्या मनाच्या अशान्तिबद्दल सांगितले आणि शान्ति मिळवण्यासाठी उपाय विचारला.

योगी म्हणाला–"वत्सा, इथून शंभर कोस अंतरावरील विंध्य पर्वताजवळ देवनन्दन नावाचं सरोवर आहे. त्याच्याच किनाऱ्यावर देवनन्दिनी देवीचं देऊळ आहे. त्या देवीचं दर्शन घे, म्हणजे तुझ्या मनाला शान्ति आणि समाधान नक्की मिळेल. पण





एक गोष्ट लक्षात ठेव. केवळ ज्ञानी माणसालाच या देवीचं दर्शन मिळू शकतं. अज्ञानी माणूस देवीच्या देवळात गेला तर त्याला देवीचे दर्शन होणार नाही. मग तो प्रार्थना काय करणार नि मागणी काय करणार ?"

योग्याला साष्टांग नमस्कार करून तारकेश्वराने आपली कृतज्ञता व्यक्त केली आणि एका शुभ मुहूर्तावर त्याने देवी-दर्शनासाठी प्रस्थान ठेवले. काही दिवस प्रवास केल्यावर रस्त्यात त्याला तीर्थंकर नावाचा एक प्रवासी भेटला. त्याच्याशी बोलता बोलता तीर्थंकर हा एक महापंडित असल्याचे तारकेश्वरने ओळखले.

तीर्थंकर विंध्य पर्वताकडेच निघाला असल्याचे कळल्यावर तारकेश्वर फारच आनन्दला. अशा पंडिताबरोबर रहाण्याने आपल्यात ज्ञानात चांगली भर पडेल असे त्याला वाटले. त्याने आपल्या मनातल्या भौतिक आणि आधिभौतिक शंका तीर्थंकरला विचारून घेतल्या आणि तीर्थंकरनेही त्या शंकांचे उचित पद्धतीने निरसन केले.

काही दिवसांच्या प्रवासानंतर तीर्थंकरने तारकेश्वरला सरळ विचारले–"तू म्हणतोयस की तुला विंध्य पर्वताकडेच जायचंय. पण तिथे कोणत्या जागी जाणार आहेस, हे नाही सांगितलेस? बरोबर कुठे जायचंय तुला?"

आता तारकेश्वरने आपली संपत्ति, अडचणी व मानसिक अशांति वगैरेंबाबत सांगून तीर्थंकरला म्हटले–"मी मनःशांति मिळवण्यासाठी देवनन्दिनी देवीच्या दर्शनाला जात आहे."

"असं? मीही त्याच देवीच्या दर्शनाला निघालोय." तीर्थंकर म्हणाला.

हे ऐकून आश्चर्याने तारकेश्वरने विचारले–"आपण तर महान पंडित आहात. आपलीही काही अडचण वगैरे आहे की काय?"

यावर तीर्थंकर चिंतेने उदास झालेल्या आवाजात म्हणाला–"माझे वडील एक



महान पंडित आहेत, अन् मीही अनेक शास्त्रांचं अध्ययन केलं आहे. तेवढ्या आधाराने मी रोज आपलं पोट भरू शकतो, पण माझ्या साऱ्या इच्छा काही पूर्ण होऊ शकत नाहीत. रहाण्यासाठी एकादा आरामशीर महाल, बायको व मुलीसाठी दागदागिने, उंची कपडे वगैरे मी मिळवू शकत नाही. माझं मन यामुळे अशान्त आहे. देवी देवनन्दिनीच्या दर्शनाने सारी संपदा मिळते असं मी ऐकलंय. तेव्हां या उपायाने मीही मनःशान्ति मिळवायच्या विचारात आहे. देवी प्रसन्न झाली तर मला संपत्तीचा लाभ होऊं शकेल असे वाटते."

हे ऐकल्याबरोबर तारकेश्वरच्या चेहरा उत्साहाने फुलला. तो तीर्थंकरला म्हणाला– "मित्रा, आता मला देवी-दर्शनाची गरज राहिली नाही. मी आपला परत आपल्या घरी जायला निघतो."

परंतु तारकेश्वरला अडवत तीर्थंकर म्हणाला–"मित्रा, इतक्या दूरवर आल्यानन्तर देवी-दर्शनावाचूनच परत फिरणं बरं नव्हे. तुला परत जावंसं का वाटतंय हे मला जाणायचं नाहीय, पण मला इतकंच सांगायचंय की माझ्यासाठी का होईना, पण तू बरोबर चलच. दर्शनानन्तर आपण दोघं बरोबरच परत फिरू."

तारकेश्वर त्याची बिनंती अमान्य करू शकला नाही. थोड्याच दिवसात ते दोघे देवनन्दन सरोवराशी पोचले. काठावरचे देवनन्दिनीचे देऊळ पडीक अवस्थेत होते. 'फक्त ज्ञानी लोकांनाच देवीचे दर्शन घडते, इतरांना नाही.' असा मजकूर लिहिलेला एक शिलालेख तेथे होता.

तो लेख वाचून तीर्थंकरने सरोवरात स्नान केले आणि तो मंदिरात गेला. त्याला देवळात कुठेही देवींची मूर्ति दिसेना. त्याला वाटले की मूर्ति मातीत मिसळून गेली असावी किंवा कोणी चोरूनबिरूनही नेली असावी. तो इकडे-तिकडे पाहू लागला.

इतक्यात जंगली फुलांची एक माळ हातात घेऊन तारकेश्वर तेथे पोचला. त्याला पाहून हसतहसत तीर्थंकर म्हणाला– "इतक्या कष्टांनी तू फुलांची माळ गुंफलीस खरी, पण इथे तर देवीची मूर्तीच नाहीय."

तेव्हां तारकेश्वर त्या पंडिताला म्हणाला- "तुझ्यासारख्या ज्ञानशून्य माणसाला देवीचं दर्शन कसं होणार?" आणि आपले डोळे मिटून तो हात जोडून देवीचे ध्यान करू लागला.

ते पाहून तीर्थंकर त्याची टिंगल करायच्या सुरात म्हणाला–"तारकेश्वर, स्वतःला ज्ञानी म्हणवण्यासाठीच तू हे ढोंग चालवलं आहेस. नाहीतर जी मूर्ति मला दिसत नाहीये, ती तुला कशी दिसेल?"

तारकेश्वरने या प्रश्नाला काहीच उत्तर दिले नाही. आपल्या हातातली फुलांची माळ त्याने देवीच्या गळ्यात घातली, तीर्थंकरला देवीची मूर्ति तर कुठे दिसली नाही, पण तीं माळ मात्र गळ्यात घातल्यासारखी अधांतरी उभी असलेली दिसली. जर मूर्तिच नसेल, माळ कशी अशी दिसेल? या विचाराने तीर्थंकर समजून चुकला की तारकेश्वरला देवीचे दर्शन नक्कीच झाले असले पाहिजे, आपल्या मात्र ते भाग्य नशिबी नाही.



नंतर तारकेश्वर आणि तीर्थंकर नगराकडे परत जायला निघाले. तेथे पोचल्यावर तारकेश्वरने तीर्थंकरला आपल्या घरी घेऊन जाऊन म्हटले–"मी तुझ्या विद्वत्तेवर खूश होऊन हे तुला देत आहे. अव्हेर नको करू." असे म्हणत त्याला तारकेश्वरने अमूल्य हिरे-जवाहीर आणि सोन्याचे दागिने व एक लाख सुवर्णमुद्रा बक्षिस दिल्या.

इतकी गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा, मनःशान्ति मिळवण्यासाठी तारकेश्वर देवीच्या दर्शनाला निघाला होता. मग मधेच वाटेत त्याचा विचार का बदलला? त्याला परत जावंसं का वाटू

लागलं ? यात्रेच्या काळात पंडित तीर्थंकरने तारकेश्वरच्या अनेक शंकांचं निरसन केलं होतं. अशा पंडिताला तारकेश्वरने 'ज्ञानशून्य' म्हटलं, हे विचित्र नाही वाटत ? नंतर देवीनेही ज्ञानी तीर्थंकरला दर्शन न देता, अगदी पामर अशा तारकेश्वरला मात्र दिलं. यावरून असं नाही वाटत की देवीने या बाबतीत काही चूक केली असावी ? या प्रश्नांची उत्तरं जाणूनही ती द्यायची तू टाळलंस, तर तुझं मस्तक फुटून जाईल."

राजा विक्रम उत्तरला–"तारकेश्वरचा गैरसमज झाला होता की त्याच्या अशान्तिचं कारण त्याची दौलतच आहे. परन्तु तीर्थंकर दौलत मिळवण्यासाठीच देवीच्या दर्शनाला निघाला आहे, हे जेव्हां त्याला कळले, तेव्हां त्याचा तो गैरसमज दूर झाला, अन् त्याने परत फिरायचा विचार केला. आपलं धन चार लोकांना वाटून जगण्यातच आपल्या मनाला शान्ति मिळेल असे त्याने ओळखले. महापंडित असूनही धन-संपदेच्या मागे लागणाऱ्या तीर्थंकरला यासाठीच त्याने ज्ञानशून्य म्हटले. ही धर्मसूक्ष्मता एका सामान्य व्यक्तीने–तारकेश्वरने ओळखली, तर एक देवी ते ओळखल्यावाचून कशी राहील ? तिच्या हातून चूक कशी होईल ? आणि म्हणूनच तारकेश्वरला देवीचं दर्शन मिळणं आणि तीर्थंकरला ते न मिळणं यात आश्चर्य करण्यासारखं काहीच नाही. आणखी एक विशेष लक्ष देण्याजोगी बाब आहे. ती म्हणजे–तारकेश्वर भले मोठा पंडित नसेलही, परन्तु तो एक ज्ञानी आणि उदारबुद्धीचा पुरुष नक्कीच आहे. त्यामुळेच तर तीर्थंकरला मन:शान्ति मिळवून देण्यासाठी त्याने त्याला धनदौलत व दागिने वगैरे दिले."

अशा प्रकारे उत्तर मिळताच, राजाचे मौनभंग झाल्यामुळे वेताळ पुन्हा अदृश्य होऊन प्रेतासकट अदृश्य झाला आणि त्याच झाडावर जाऊन फान्दीला लटकू लागला.

(कल्पित)





# खोटे बोलण्याची चढाओढ

**जो** कोणी सर्वात छान खोटं बोलेल, त्याचा सत्कार करावा असं एकदा विशालपुरचा राजा गरूडसेन याच्या मनात आलं. त्याने लगेच आपल्या दरबारी खुषमस्कऱ्याला बोलावून घेऊन त्याला आपला हा विचार सांगितला.

पळभर विचार करून विदुषक म्हणाला–"महाराज, आपण पुढल्या महिन्यात यासाठी एक चढाओढ ठेऊ या. आपल्या देशातल्या चहूकडील खोटं बोलण्यात हुशार अशा लोकांना आपण आमंत्रणं देऊ या. कसा वाटतो हा विचार आपल्याला ?"

लगेच स्वीकृति देत राजा म्हणाला–"वा, वा ! तुझा विचार तर कमालीचा छान आहे ! आता ताबडतोब चढाओढीच्या व्यवस्थेमागे लाग."

विदुषक जरा चाचरत म्हणाला–"महाराज, आपल्या राजवाड्याचं सभागृह यासाठी पुरेसं होणार नाही, तेव्हां आपल्या राजोद्यानाच्या पूर्वेकडील क्रीडाभवनात यासाठी सर्व व्यवस्था करायला दोनेक हजार अशर्फींची आवश्यकता पडेल."

ते मान्य करून कोषाध्यक्षाला सांगून राजानें खुषमस्कऱ्याला दोन हजार अशर्फी देववल्या.

"महाराज, मी उद्याच देशभर दवंडी पिटवून लोकांना आमंत्रित करायची तजवीज करतो." विदुषक उत्साहाचं प्रदर्शन करत म्हणाला.

शेवटी खोटं बोलणारांच्या चढाओढीचा दिवस येऊन ठेपला. विदुषकाने राजाला सांगितलं की स्पर्धेची सुरुवात स्वत: राजे-साहेबांनीच सकाळी आठ वाजता क्रीडा-मंडपात येऊन करावी. त्यामुळे राजा गरूडसेन अगदी वेळेवर स्पर्धेच्या ठिकाणी पोचला.

संगीता मांद्रेकर

परंतु तेथे चढाओढीबद्दलची काहीच नव्हे, तर राजाला बसण्यासाठी एकादं खास आसनही तिथे मांडलेलं नव्हतं!

तिथल्या पहारेकऱ्याला बोलावून राजाने विचारले–"अरे, आज इथे खोटं बोलणारांची चढाओढ होणार आहे, पण इथं तर त्यासाठी काही व्यवस्था केलेली दिसत नाही? काय भानगड आहे?"

हे ऐकताच तो पहारेकरी बिचारा भीतीने थरथर कापू लागला. तो म्हणाला–"क्षमा असावी महाराज! मला आपलं बोलणं काहीच समजत नाहीये! त्या कसल्या चढाओढीबद्दल तर मला काहीच माहिती नाहीये!"

इतक्यात स्वत: विदुषकच तिथे आला. त्याच्याकडे रागानं पहात गरुडसेन म्हणाला–"खोटं बोलण्याच्या चढाओढीची तू दवंडी पिटवली होतीस की नाही? इथं तर कोणीच कसं दिसत नाही? मला वाटतं, तू त्याची काही तयारीच केलेली नाहीस? बोल, मांड आपली बाजू!"

मोठ्या नम्रपणे हात जोडून विदुषक म्हणाला–"क्षमा असावी महाराज! पण आपण काय म्हणत आहात, तेच मला कळत नाहीये! कसल्याशा व्यवस्थेबद्दल आपण बोलत आहात, पण मला तर त्याची काहीच माहिती नाही? आपण काही आज्ञा दिली असली, तर तिची अवहेलना मी कसा करू धजेन? खरी गोष्ट काय आहे? सांगा ना महाराज?"

विदुषक हे सर्व बोलला, तेव्हां राजाला सर्व काहीं कळून चुकलं! मोठ्याने हसत तो म्हणाला–"वा रे व्वा! म्हणजे याचा अर्थ असा की खोटं बोलणारांची चढाओढ आता संपली आहे! शेवटी तू शाबित केलंस की अशा चढाओढीत तुझ्याहून वरचा क्रमांक कोणाला मिळणारच नाही! तू सुरुवातीला ज्या दोन हजार अशर्फी घेतल्यास त्या परत करायची काही गरज नाही. उलट बक्षिस म्हणून तुला आणखी दोन हजार अशर्फी मिळतील!" अन् असं बोलून त्याने विदुषकाची खूप तारीफ केली.



# चांदोबा पुरवणी–४३



**भारतातील पक्षी न जनावरे :**

## कोकिळा

सर्व पक्ष्यांत गोड गळ्याचा पक्षी म्हणजे कोकिळेच्या मधुरगायनाचा उल्लेख आढळतोच. श्रेष्ठ कवि व गायक–गायिकांचा 'कविकोकिळा' अशा पदव्या देऊन सत्कार करण्याचा आपल्या देशात रिवाज आहे. वसंतऋतु सुरू झाला की आंब्याच्या राईतून कोकिळांचे सुमधुर, श्राव्य असे गायन ऐकू येऊ लागते. आणि जसा हिवाळा सुरू होतो, तशी कोकिळा आपले तोंड बन्द करून गरम ठिकाणाचा शोध घेत निघून जाते.

कोकिळ हा अधिक काळा असतो. त्याची चोच हिरवी–पिवळी असते आणि डोळ्याभोवती लाल रेषेचे वर्तुळ असते. त्याच्या अंगावर पांढऱ्या रेषा व लहान लहान डाग असतात. कोकिळेला घरटे बनवायला आवडत नाही. त्यामुळे मादी कोकिळा कावळ्याच्या घरट्यात आपली अंडी घालते. कोकिळांची अंडीही कावळ्याच्या अंड्यांसारखीच भुऱ्या रंगाची असतात. त्यामुळे आपली अंडी कोणती, व कोकिळेची कोणती हे कावळा ओळखू शकत नाही आणि स्वत:च्या अंड्यांबरोबरच कोकिळेची अंडी उबवून तिच्या पिल्लांही कावळे खायलाही घालतात.

सामान्यत: कोकिळा मोठ-मोठ्या झाडांच्या दाट पानांच्या झाडोऱ्यात रहातात. फळे व किडे हे त्यांचे अन्न होय.

बातम्यांतील बालक

# वर्धमान कवि

पुस्तकप्रेमी माणसे जेव्हां पुस्तके विकत घेतात, तेव्हां ते त्या पुस्तकाच्या लेखकाची सही त्यावर मिळवण्यासाठी खूप धावपळ करतात. हे दृश्य मुख्यतः पाश्चात्य देशात पहावयास मिळते. तिकडच्या लेखकांची नावे व कीर्तीच अशी आहे. परंतु आपल्या देशात अशा घटना क्वचितच घडतात. नव्याने उदयाला येणाऱ्या आकरा वर्षाच्या आदित्य नारायण कविच्या बाबतीत असेच घडले.

नवी दिल्ली येथे गेल्या फेब्रुवारी महिन्यात विश्व पुस्तक प्रदर्शन भरले होते. तेथे एका प्रख्यात प्रकाशन संस्थेच्या पुस्तकालयात बसून हसत आदित्य आपल्या कविता-संग्रहाच्या पुस्तकावर सह्या करीत असलेला दिसून येत होता. हे पाहून तेथे आलेले अनेक पुस्तकप्रेमी लोक मोठे चकित झाले. आदित्यने 'व्हायब्रेशन्स' नावाचा इंग्रजी कविता-संग्रह लिहिला होता आणि या 'व्हायब्रेशन्स' (स्पंदने) नामक कविता-संग्रहाबाबत निरनिराळ्या पत्र पत्रिकांमधे टीकाही प्रकाशित झाली होती. आणि या टीका वाचून काही पुस्तकप्रेमी या बालकवीची सही आपापल्या प्रतिवर करून घेण्यासाठी ओळीत उभे होते.



आदित्यने यापूर्वी आठ वर्षांचा असताना एक काव्य लिहिले होते. तो कधीकधी कविता वाचत असे. आदित्यचे वडील बंगाल व आसाममधे उच्चपदस्थ अधिकारी होते. तेथे संध्याकाळ फार लवकर होत असल्याने आदित्य वडलांच्या खोलीत जाऊन त्यांची पुस्तके वाचत बसे. प्रथम त्याला कविताच खूप आवडल्या. त्या कवितांमधल्या भावना त्याला समजल्या नसतील, त्यांचा छन्द वृत्त वगैरेही त्याला कळले नसेल, परन्तु त्यातली यमके पाहून तो फार मोहित होई. नंतर त्या कवितांचा अर्थ तो आपल्या आईवडलांकडून समजून घेई.

निसर्गसौन्दर्याने नटलेले पूर्वेकडील प्रान्त सोडून आदित्यने नंतर कलकत्ता व दिल्लीसारखी महानगरे पाहिली. तेथील वातावरण, पर्यावरण वगैरेतील दोष पाहून त्याचे मन फार विचलित होई. नंतर आपल्या मनातील भावना तो शब्दात प्रकट करू लागला. पुढे हेच शब्द कवितेत परिवर्तित होऊ लागले. आदित्य शाळेतून परत आल्याबरोबर आपला गृहपाठ करून टाकतो. नंतर तो इतर मुलांबरोबर खेळायला बाहेर पडतो. फुटबॉल हा त्याचा आवडता खेळ आहे. रात्री जेवणानन्तर तो स्वतःच्या कॉम्प्युटरवर कवितेचे आडवे-उभे धागे विणू लागतो.

कॉम्प्युटर-इंजिनियर बनण्याची आदित्याची महत्वाकांक्षा आहे. त्यासाठी आणखी १०-१५ वर्षे सहज लागतील. त्यामुळे या मधल्या अवधीत तो एक नवोदित म्हणजेच 'वर्धमान बालकवि' म्हणून नक्कीच ओळखला जाईल. अन् त्याच्या लेखणीतून आणखी काही कविता-संग्रह प्रकाशात येतील अशी आशा करायला काहीच हरकत नाही.

# तुम्हाला माहीत आहे?

१. सोने व हिरे वगैरेंचे वजन करण्याचे परिमाण काय असते?
२. सर्वात जास्त प्रकाशमान असे नक्षत्र कोणते?
३. जगात प्रथम 'पेपरबॅक' पुस्तकाचे प्रकाशन कोणी केले?
४. या वर्षाचे 'ऑस्कर अॅवॉर्ड' सत्यजित रे यांना मिळाले. या अॅवॉर्डचे नाव 'ऑस्कर' असे कसे पडले?
५. २५ वर्षातून एकदा साजऱ्या केल्या जाणाऱ्या रजतोत्सवाला इंग्रजीत 'सिल्व्हर ज्युबिली' असे म्हणतात. मग 'पेपर अॅनिव्हर्सरी' कशाला म्हणतात?
६. शक संवताप्रमाणे वर्षाचा पहिला महिना कोणता?
७. सन १९२१ पूर्वी 'टेबल-टेनिस' चे नाव दुसरेच होते. ते काय?
८. 'जन्माच्या दिवशीच तो हसला होता' असे एका पारशी पैगंबरच्या बाबतीत म्हटले जाते. तो कोण होता?
९. रक्ताचे चार गट असतात. ए, बी व ओ हे तीन गट आहेत. चौथा कोणता?
१०. एकाच वेळी तीन देशांच्या अध्यक्षपदी एकच व्यक्ती होती. ती कोण? कधी?
११. झेब्राचे विशेष लक्षण कोणते?
१२. शनीला किती चन्द्र आहेत?
१३. अंतरिक्षातून पाहिले असता, आकाश कोणत्या रंगाचे दिसते?
१४. आग्र्याची स्थापना कोणी केली? कोणत्या साली?
१५. विंचवाला कान व डोळे असतात काय?

## उत्तरावली

१. कॅरट.
२. ज्येष्ठा.
३. यान्टन् फिलिप रेक्लम, १८६७ मधे.
४. सन १९२९ मधे जेव्हां या अवॉर्डस्ची घोषणा झाली, तेव्हां देण्यासाठी मानवी आकाराच्या छोट्या मूर्ति स्मृति-चिन्ह म्हणून बनवण्यात आल्या होत्या. अमेरिकन अॅकॅडमी ऑफ मोशन पिक्चर्सच्या एका अधिकाऱ्याने त्या मूर्ति पाहून असे म्हटले की त्या अगदी हुबेहूब त्याचे मामा ऑस्करसारख्या आहेत. तेव्हांपासून या अॅवार्डस्चे हे नाव पडले.
५. पहिल्या वार्षिकोत्सवाला.
६. चैत्र महिना.
७. पिंगपाँग.
८. जोराष्टर.
९. एबी.
१०. साइमन बोलीवियर सन १९२८ मध्ये ते बोलिविया, पेरू आणि कोलंबियाचे अध्यक्ष होते.
११. कोणत्या ही दोन झेब्रांवरील पट्टे एकसारखे नसतात.
१२. दहा.
१३. काळा.
१४. सिकंदर लोदी, सन १५०६ मध्ये.
१५. नसतात.

# चांदोबाच्या बातम्या

### अति उंच पूल

वाहनांच्या जाण्या-येण्यासाठी जगात अत्यधिक उंच पूल कोठे आहे? या प्रश्नाचं उत्तर आहे– जम्मू आणि काश्मीर मधील लडाख भागात असलेला खरडुंला पूल (समुद्र सपाटीपासून उंची १८,५०३ फुट). भारताच्या सीमा मार्ग संघटनाने 'हिमांक प्रॉजेक्ट ऑफ बीकन्स' च्या अंतर्गत हा बांधला. या प्रकल्पाचे प्रमुख इंजिनियर ब्रिगेडियर वोम्बाट यांचा सत्कार करण्यात आला. त्याचे नाव गिनीज बुक ऑफ रेकॉर्ड्स मध्ये प्रकाशित झाले आहे.





### पाच लाख डॉलर

मेक्सिकोच्या ओक्साका राज्यात सुरुच्या जातीचे एक मोठे झाड आहे. त्याचं नाव आहे अहयुहूयूटे. हा दर वर्षी आपणाकडे लाखों प्रवाशांना आकर्षित करतो. हा २००० वर्षे वयाचा आहे असे म्हणतात. याचं नीट संरक्षण करण्यासाठी सरकारने ५,००,००० डॉलर खर्च करण्याचा निर्णय घेतला आहे.

### चांगल्या दृष्टीसाठी

अलिकडे असा शोध लागला आहे की फिकट पिवळ्या रंगाच्या काचा असलेला चष्मा वापरला तर मंद दृष्टि असणाऱ्या मुलांना अधिक चांगले दिसू लागते. ऑक्सफोर्ड युनिव्हर्सिटीच्या न्यूरोफिजियालजी विभागाचे डॉ. जॉन स्टीन यांनी साधारण चष्मे वापरणाऱ्या २० विद्यार्थ्यांवर प्रयोग केले. या प्रयोगात असे आढळून आले की हिरव्या रंगाच्या काचा असलेला चष्मा वापरल्यामुळे मुलांची दृष्टि अधिक चांगली झाली.





# ज्योतिष-पंडित

रामशास्त्री आपल्या पित्याजवळ सर्व विद्या शिकला होता. तो काव्य-रचनासुद्धा करू शकत असे. परंतु ज्योतिष शास्त्राकडे त्याचा विशेष ओढा होता. लहानपणी आपल्या कच्च्या ज्ञानाच्या आधाराने त्याने काही लोकांना भविष्य सांगितले आणि ते अगदी खरे निघाले. त्यामुळे झालेल्या आनन्दाच्या भरात त्याने ठरवून टाकले की पुढे आपण ज्योतिषविद्या हाच आपला पेशा बनवायचा.

ते ऐकून रामशास्त्रीला सावधानतेचा इशारा देत त्याचा पिता म्हणाला–"बाळा, ज्योतिषशास्त्र हे पूर्णतः विश्वासावरच आधारित असतं. अन् अगदी तंतोतंत बरोबर भविष्य वर्तवणं ब्रह्मदेवालाही शक्य नसतं. काव्यरचना आणि आपलं पांडित्य यांद्वारे तू नाव कमव, अन् सुखाने जीवन चालव."

रामशास्त्रीला पित्याचे सांगणे पटले नाही. त्याने पित्यासमोर शपथ घेतली की– 'जे ब्रह्मदेवाला जमलं नाही, ते मी करून दाखवीन.'

त्या गावातल्या चार लोकांना त्याने भविष्य सांगितले होते की त्यांच्या आपापल्या घरामागे खोदल्यास त्यांना सोन्याच्या मोहोरांचे कलश मिळतील. रामशास्त्रीच्या कथनावर विश्वासून केलेल्या खोदकामात खरोखरच त्या चारी जणांना सुवर्णमुद्रा मिळाल्या!

एके दिवशी सुभाष व अविनाश नावाच्या दोन व्यक्ति रामशास्त्रीकडे भविष्य विचारायला आल्या. सुभाष एक बडा जमीनदार होता आणि अविनाश होता एक खुनी!

रामशास्त्रीला आत बोलावून त्याच्या वडिलांनी म्हटले–"या दोघांना मी चांगला ओळखतो रे! फार निर्दय अन् बदमाष

"वसुंधरा"

आहेत दोघंही! त्यांना भविष्य मागितलंस तर तुझ्याच जिवावर बेतायची शक्यता आहे.

पित्याचे बोलणे रामशास्त्रीला मुळीच रुचले नाही. त्या दोघांच्या जन्मकुंडल्या तपासून तो म्हणाला--"तुमच्या घराच्या मागे वारूळ असून त्यात नागही आहेत. वारूळ खोदून नागांना घालवून दिलत तर तुमचं भलं होईल."

या घटनेनंतर एक आठवड्याने रामशास्त्रीचा पिता जवळच्या शहरी जाऊन आला. तेथे त्याला सुभाष व अविनाश दिसले होते. त्यांच्यापैकी एकाला वारूळ खोदल्यावर दहा लाख अशर्फी असलेले घडे मिळाले; त्यातील दहा हजार रामशास्त्रीला देऊन त्याचा सत्कार करायचा त्याचा विचार होता. पण दुसऱ्याच्या घरामागील वारूळ खोदल्यावर घरमालक सोडून बाकी साऱ्यांना वारूळातून निघालेल्या चार नागांनी डसून मारून टाकले, त्यामुळे हा दुसरा मात्र रामशास्त्रीला जिवे मारण्याच्या विचारात होता.

या गोष्टी रामशास्त्रीला सांगून त्याचा पिता म्हणाला—"मी ज्या गोष्टीला भीत होतो आधीपासून, तेच नेमकं आता घडलं आहे! आता इथे रहाणं धोक्याचं आहे आपल्याला. चल, आपण काही दिवस अन्यत्र कोठे रहायला जाऊ या."

या सूचनेला रामशास्त्री नकार देऊ शकत नव्हता. पण त्याची इच्छा होती की, असे निघून जाण्यापूर्वी ज्याचे भविष्य खरे



ठरले होते, त्याला भेटून त्याच्याकडून आपल्या दहा हजार अशर्फी वसूल कराव्या. पित्याने याकरता त्याला संमति दिली.

"कोणाबद्दलचं भविष्य खरं ठरलं बाबा? सुभाषचं की अविनाशच?" उत्सुकतेने रामशास्त्रीने पित्याला विचारले.

रामशास्त्रीचे वडील जरा वेळ विचारात पडले. नंतर ते म्हणाले की, त्या दोघांपैकी कोणाचे कल्याण झाले हे आपल्याला आठवत नाही.

"बाबा जरा आणखी डोक्याला ताण देऊन पहा! हा तर माझ्या जीवनमरणाचा प्रश्न आहे." रामशास्त्रीने पुन्हा विचारले.

पुन्हा थोडा विचार करून ते म्हणाले—"नाही रे पोरा, माझं आता वय होत चाललंय, अन् त्या बरोबर स्मरणशक्तीही कमी होत चाललीय. खूप आठवून पाहूनही तुझा सत्कार करू इच्छिणारा कोण अन् जिवावर उठणारा कोण हे काही आठवत नाही मला! तू स्वतःच आपल्या ज्योतिष पांडित्याचा उपयोग करून ठरव, सुभाषच्या गावाला जावं कि अविनाशच्या? तुझं ज्योतिष कधी चुकत नाही. तेव्हा तू बरोबर जागीच पोचशील, गणित नीट मांड, नाहीतर तुझा मृत्यूच ओढवेल."

रामशास्त्रीने बराच वेळ गणित मांडून पाहिलं, पण तो नीट ठरवू शकेना. आता तो पित्याला म्हणाला—"बाबा, मी मोठ्या विचित्र परिस्थितीत सापडलोय. हा गाव सोडायची तर इच्छा नाही माझी. वाटलं



तर ज्योतिषशास्त्राचा त्याग करीन मी, पण गाव नाही सोडणार! मला आता सत्काराची इच्छा उरली नाही. केवळ याच गावात रहाण्याचा मार्ग हवा मला.''

तेव्हां हसून रामशास्त्रीचे वडील म्हणाले–''ज्योतिष शास्त्र सोडणं ठीकच होईल. कारण लोकांना भविष्य कथन करताना तू किती चुका केल्यास हे तुझ्या ध्यानात रहाणार नाही. जे तू सांगितलंस तेच आठवणीत ठेवून फुकटचा गर्व करीत रहाशील. सुभाष व अविनाश यांच्यापैकी एकाबद्दलचं तुझं भविष्य चुकल्याचं मी सांगितलं, तेव्हां तू आश्चर्य व्यक्त केलं नाहीस. याचा अर्थच असा की ते तुझ्या आवाक्यातलं काम नव्हे. तुझे प्राण धोक्यात असताना आपल्या ज्योतिषावर तू विश्वास ठेवला नाहीस. बक्षिस वसूलण्यासाठी त्याच्यापैकी एकाकडेही जाण्याची तुझी हिंमत झाली नाही. यावरूनच तुझा स्वतःचा ज्योतिषावर किती विश्वास आहे, ते कळून चुकलं! आता खर सांगतो–मी त्या दोघांना शहरात पाहिलच नव्हतं मुळी! ते सर्व खोटं सांगितल मी तुला! पण आता तू ज्योतिषशास्त्रावर विसंबणं सोडून दे. कविता–पांडित्यावर विसंबून राहून जगायचा प्रयत्न कर. तुझे डोळे उघडावे म्हणून सुभाष-अविनाश यांच्याबद्दल खोटी गोष्ट सांगितली मी तुला!''

आपल्या ज्योतिषविद्येच्या पेशात कधी-कधी कसा धोका उद्भवू शकतो, हे आता कुठे रामशास्त्रीला उमगले. आपला पिता हा पेशा सोडून देण्याबद्दल वारंवार का सांगत असतो ते कळून चुकले. आता त्याने आपल्या पित्याजवळ क्षमा मागितली आणि त्याच दिवसापासून त्याने आपला ज्योतिषशास्त्राचा पेशा सोडून दिला. कविता–काव्यशास्त्र–साहित्य लिहून एक कवि-पंडित म्हणून पुढे त्याने चांगले नाव कमावले. त्याला ज्योतिषशास्त्रही येत असल्याने लोक त्याला जास्त मान देत. अशा तऱ्हेने त्याला मोठी कीर्ति प्राप्त झाली.





# ज्ञानांचा शोध

प्राचीन काळी उज्जयिनी नगरात शांतभूषण नावाचा एक पंडित रहात असे. शांतभूषण शिकला नाही असं कोणतं ही शास्त्र नाही, नि त्याला माहीत नाही अशी कोणती ही गोष्ट नाही असं लोक म्हणत.

शांतभूषणचे शिष्य शांडिल्य आणि च्यवन यांच्या मनात एक शंका सतत डोकावत असे की आपल्या गुरूला हे अगाध पांडित्य कसं प्राप्त झालं? वेळ मिळाला की शांडिल्य याच गोष्टीची चर्चा करीत असे. एक दिवशी तो च्यवनला म्हणाला–''आपले गुरुजी ब्रह्मभट्टारकचे शिष्य आहेत आणि मी असं ऐकलं आहे की ब्रह्मभट्टारकाचा शिष्य होणं हे तपश्चर्या करून परमेश्वराचं दर्शन करण्याहून कठिण काम आहे! तुला ही गोष्ट माहीत नाही?''

''माहीत का नाही? मी ही ऐकल आहे ते. पण मला वाटत गुरु किती ही महान् पुरुष असला तरी तो पायाचा दगड असतो. त्याचं महत्त्व मी जाणतो. सर्व लोक हे जाणतात की आपल्या गुरुजींनी एक लाख ताडपत्री ग्रंथांचं अध्ययन केलेलं आहे. म्हणून मला असं वाटतं की गुरुजींनी लहानपणापासून जे ग्रंथाध्ययन केलं आणि आज ही करीत आहेत, तेच त्यांच्या पांडित्याचं मूळ कारण आहे!'' च्यवनने आपला विचार सांगितला.

आपली शंका दूर करण्यासाठी स्वतः गुरूंकडे जाऊनच त्यांना विचारावं असा शेवटी दोघांनी निर्णय केला.

दोन्ही शिष्यांचे विचार शांतपणे ऐकून गुरु शांतभूषण म्हणाले–''खरोखर मी मोठा भाग्यवान आहे की तुमच्या मनात

दिलीप पंडित



अशी शंका यावी. बरेच दिवस झाले, माझ्या मनात वेदान्तासंबंधी काही शंका आहेत, पण कोणी ही त्यांचं समाधान करू शकलेलं नाही. माझ्या शंकांचं निरसन केवळ गुरु ब्रह्मभट्टारकच करू शकतील. ते आता वृद्ध झालेले आहेत आणि त्यांची प्रकृति ही बरी नसते. तुम्ही दोघं काशीला जाऊन त्यांना भेटा आणि माझ्या प्रश्नांची उत्तरं जाणून या. त्यानंतर मी तुमच्या शंकांचं समाधान करीन." असं म्हणून त्यांनी आपले संदेह एका ताडपत्रावर लिहून दिले.

गुरुच्या आज्ञेनुसार दोन्ही शिष्य काशीला गेले आणि ब्रह्मभट्टारकांना भेटले. त्यांनी शांतभूषणचे प्रश्न वाचले आणि मंदस्मित करीत म्हणाले–"शांतभूषण सारखा प्रकांड पंडित माझा शिष्य आहे याचा मला मोठा गर्व आहे. असल्या शंका तोच विचारू शकतो."

"मी आता म्हातारा झालो, म्हणून या शंकांचं समाधान करणं मला आता शक्य नाही. तरी पण ज्ञान-वर्धनाच्या कामी मी काही योगदान अवश्य देईन. दोन दिवसांनी तुम्ही पुन्हा एकदा माझ्याकडे या. मी प्रयत्न करीन." एवढं सांगून गुरूनं आपले प्रशिष्य शांडिल्य व च्यवन यांना रवाना केले.

दोन दिवसांनी हे दोघे पुन्हा ब्रह्मभट्टारकाकडे आले तेव्हा त्यांनी दोघांच्या हाती ताडपत्रे व लेखण्या दिल्या आणि शांतभूषणच्या प्रश्नांची उत्तरे त्यांना ऐकवली.

गुरूनं सांगितलेली सर्व उत्तरे लिहून घेऊन शांतभूषणचे शिष्य आता परत जायला निघाले. तेव्हा ब्रह्मभट्टारक म्हणाले–"मुलांनो, शांतभूषण सारख्या महापंडिताचे तुम्ही शिष्य आहात. म्हणून तुम्हाला अधिक काही समजून सांगण्याची आवश्यकता नाही. तुमच्या लक्षात आलं ना की तुमच्या गुरूच्या प्रश्नांची उत्तरं मानवधर्मशास्त्रात आहेत. पण हे सगळ सांगताना मला काही नव्या शंका येत आहेत. त्यांची उत्तरं रसायन-शास्त्राशी संबंधित आहेत. अवंतीनगरीत राहणारा कुंभार पुरकायस्थ या शंकांचं समाधान करू शकेल. तुम्ही त्याला भेटून जर योग्य ते समाधान मिळवलं नाही तर तुमचा हा सारा खटाटोप अर्धवटच राहील आणि तुमचे गुरु शांतभूषण यांना संपूर्ण उत्तर दिल्याचे समाधान तुम्हाला मिळणार नाही."

दोन्ही शिष्य अवंतीनगरीला गेले, पुरकायस्थला भेटले आणि आपल्या येण्याचा उद्देश सांगितला. पुरकायस्थाला फार आनंद झाला. कुशल-क्षेम विचारून तो सांगू लागला–"गल्लीतील चबुतऱ्यावर बसून आचार्यश्री जेव्हा शिष्यांना शिकवीत असत, तेव्हा ते सर्व मी दुरून ऐकत असे. मी विचार करीत असे की ते जे काही शिकवतात त्यांतलं थोडं जरी मला समजलं तरी माझ्या जन्माचं सार्थक होईल."

एक दिवशी त्यांनी मला आपल्या जवळ बोलवलं नि म्हणाले–"पुरकायस्थ, ज्ञानाची तुझी लालसा मी पहातच आहे. अन्य धंदेवाईक तुझ्या व्यावसायिक कौशल्याची किती प्रशंसा करतात ते ही मी जाणतो. ज्ञानाच्या या महासागराचं मंथन करीत



असताना केव्हां तरी एक असा दिवस येईल जेव्हा मला तुझी गरज लागेल!" आणि आचार्यांनी पुरकायस्थाला आशीर्वाद दिला.

"यानंतर मला राजाश्रय मिळाला आणि मी काशी सोडून अवंतीनगरीला आलो." अशा रीतीनं आपला परिचय देऊन झाल्यावर त्याने ब्रह्मभट्टारकांच्या शंकांचं समाधान केलं.

पुरकायस्थाची परवानगी घेऊन दोन्ही शिष्य जेव्हा उज्जयिनीला यायला निघाले तेव्हा त्याने पुढे सांगितले–"हे पहा, मी जी काही विद्या प्राप्त केली आहे, त्यातील सर्व अनुभव लक्षात घेऊन मी आचार्य-

धींच्या प्रश्नांची उत्तरं दिलेली आहेत. ती शास्त्राच्या कसोटीवर कितपत योग्य ठरतील हे मला माहीत नाही. खरं म्हणजे रसायन-शास्त्राचं सखोल अध्ययन केलेला पंडितच या प्रश्नांची अधिक योग्य उत्तरे देऊ शकेल. माझा बालपणचा मित्र व आचार्यांचा प्रिय शिष्य शांतभूषण या शास्त्राचा महापंडित आहे हे सर्वांनाच ठाऊक आहे. तो सध्या उज्जयिनीत राहतो. मला असं वाटतं तुम्ही त्याच्याकडे जाऊन माझा निरोप सांगावा म्हणजे तुमची यथायोग्य जिज्ञासा-पूर्ति होईल."

हे सर्व ऐकून शांडिल्य व च्यवन आश्चर्यचकित झाले आणि पुरकायस्थाला म्हणाले–"आम्ही दोघे शांतभूषणचेच शिष्य आहोत, आणि त्यांच्याच कामगिरीवर इथं आलो आहोत." नंतर ते दोघे उज्जयिनीस परतले आणि ब्रह्मभट्टारक व पुरकायस्थ यांच्याशी झालेली सर्व चर्चा गुरूला निवेदन केली.

स्मित हास्य करीत शांतभूषण म्हणाला–"लोक मला महापंडित म्हणतात, तरी ही अनेक गोष्टी मला माहीत नाहीत – हे तुम्हाला समजलं ना? माझ्या प्रश्नांची उत्तरे मिळविण्यासाठी तुम्हाला किती परिश्रम करावे लागले हे ही तुम्ही पाहिलंच!"

नंतर गुरु दोन्ही शिष्यांना म्हणाले–"खरं म्हणजे गुरु नि ग्रंथ ज्ञानाचा शोध घेण्याच्या कामी उपयोगी पडतात याबाबत वाद नाही. तरी पण पुष्कळ गोष्टीत अज्ञान राहून जाते. म्हणून खऱ्या पंडिताला अज्ञात विषय जाणण्यासाठी नित्य प्रयत्न करीत राहिले पाहिजे. अशा रीतीने निरंतर ज्ञानाच्या मागे लागलेला माणूसच खरा महापंडित होय!"

शांतभूषणाच्या कथनांतील सत्य शांडिल्य व च्यवन यांनी जाणले आणि नित्य ज्ञान-साधनेच्या मार्गावर वाटचाल करून श्रेष्ठ पंडित बनण्याचा प्रयत्न करू लागले.





# वीर हनुमान

एवढ्यात विभीषण तेथे आला. तो इंद्रजित असावा असे चुकीने समजून वानर सैरावैरा पळू लागले. सुग्रीवाच्या सूचनेनुसार जांबवान वानरांना सांगू लागला–"हा जो आला आहे तो विभीषण आहे, इंद्रजित नव्हे!"

राम व लक्ष्मण यांची अवस्था पाहून विभीषणाला फार दुःख झाले. लंकेचा राजा होण्याचे त्याचे स्वप्न साकार होण्याची आशा लुप्त होऊ लागली.

सुग्रीवाने विभीषणाला आलिंगन देऊन म्हटले–"विभीषणा, रावण नि इंद्रजित यांचा विजय झाला असे समजू नकोस. तू नक्कीच लंकेचा राजा होणार! राम व लक्ष्मण यांच्या प्राणाला धोका मुळीच नाही. ते दोघे मूर्च्छित अवस्थेत आहेत, त्यातून बाहेर आले की काही वानरवीरांसह तू त्यांना किष्किंधेला घेऊन जा. मी रावण व त्याचा परिवार यांचा शेवट करून सीतेला आपल्या बरोबर घेऊन येईन. माझ्याबद्दल, काळजी करण्याचे कारण नाही. मी आपली कामगिरी चोखपणे बजावून परत येईन!"

सुषेण सुग्रीवाला म्हणाला–"देव-दानवांच्या युद्धात राक्षसांच्या माया-प्रहारांनी अनेक देव ठार झाले. काही देव मूर्च्छित झाले, तर काही मरून गेले. तेव्हा देवांचा गुरु बृहस्पति याने आपल्या मृत-संजीवनी विद्येने काही मुळांचा उपयोग करून त्यांच्यावर उपचार केले होते.

२४. गरुत्मानाचे साह्य



क्षीरसागराजवळील डोंगरात संजीवकरणी व विशल्यकरणी नावाच्या वनस्पति उगवतात. जुन्या काळी जिथे समुद्रमंथन झाले, तिथे चंद्र-पर्वत व द्रोण-पर्वत आहेत. या पर्वतांवरच या औषधि वनस्पति मिळतात. हनुमानाला ताबडतोब तिथे पाठवावे."

एवढ्यात प्रलय झाल्याप्रमाणे जोराचे वारे वाहू लागले. गरुत्मान येत आहे असं वानरांनी पाहिलं. गरुत्मानाला येताना पाहताच राम व लक्ष्मण यांना बाणांच्या रूपाने बांधून ठेवलेले साप घाबरून पळून जाऊ लागले.

गरुत्मान थेट राम-लक्ष्मणाजवळ उतरला व त्याने त्यांचे चेहरे व शरीर कुरवाळले. त्यासरशी त्यांच्या दोघांच्या सर्व जखमा भरून आल्या, व ते धडधाकट होऊन उभे राहिले.

राम गरुत्मानाला म्हणाला–"आपल्या कृपेने आम्ही पूर्ववत् स्वस्थ झालो आहोत. आपणास पाहून आम्हाला इतका आनंद झाला, जणू आम्ही आमचे पिता दशरथ व प्रपिता अज यांना पहात आहोत. आपली दिव्य वस्त्रे व दागिने पाहून आम्हाला आश्चर्य वाटते. खरोखर आपण कोण आहात?"

आनंदाश्रू ढाळीत गरुत्मान म्हणाला– "रामा, मी तुझा मित्र आहे, तुझा प्रियवर आहे. मी तुझ्या प्रणांसमान आहे. माझं नाव आहे गरुत्मान. तुम्हा उभयतांना मदत देण्यासाठी मी इथे आलो. तुमच्या शरीरात शिरलेले बाण हे वस्तुतः सर्प आहेत. यांना पळवून लावणे येरा-गव्हाराचे काम नाही. म्हणून तुमची शोचनीय स्थिति पाहून मी तुमच्याकडे आलो व तुमची सुटका केली. या युद्धात थोडं सुद्धा बेफिकीर राहणं बरं नाही. राक्षसांवर विश्वास ठेवणं योग्य नाही हे आता तुला समजलं ना? येथून पुढे तुला चांगलंच सावध राहिलं पाहिजे. थोडी ही चूक होऊं देऊं नकोस!"

परत जाण्याची परवानगी मागत गरुत्मान पुन्हा म्हणाला–"रामा, आता तू मला असं विचारू नकोस की मी तुझा मित्र कसा? या युद्धात विजयी झाल्यावर ते तुला आपोआप समजेल. युद्धानंतर लंकेत मुले व म्हातारी माणसंच शिल्लक राहतील. रावणाचा अंत होईल नि सीता तुला परत मिळेल!" इतकं सांगून गरुत्मान आकाश मार्गाने उडत उडत अदृश्य झाला.

राम-लक्ष्मण जेव्हा पहिल्या सारखे धडधाकट झाले, तेव्हा वानर आनंदाने जयघोष करू लागले. वाद्यांचा गजर ऐकू येऊ लागला. वानरांनी मोठमोठे वृक्ष समूळ उपटले व त्यांच्या सह त्यांनी लंकेची द्वारे घेरली. त्या वेळी अर्धी रात्र उलटली होती.

रात्रीच्या वेळी रावण व राक्षसांनी वानरांचा जयघोष ऐकला. तेव्हा रावण आपल्या मंत्र्यांना म्हणाला–"आज वानर फार खुश दिसत आहेत. राम-लक्ष्मण यांच्या मृत्युनंतर रडण्याऐवजी हे असे आनंदित का झाले आहेत हे कळत नाही. याचं कारण शोधून या बरं." असं म्हणून वस्तुस्थिति समजून घेण्यासाठी रावणाने काही राक्षसांना पाठविले.

नगरीच्या तटांवर चढून राक्षसांनी पाहिले की राम-लक्ष्मण जिवंत आहेत आणि सर्व वानर प्रसन्न अंतःकरणाने



नाचत-बागडत आहेत. जे काही पाहिलं ते सर्व त्यांनी रावणाला जाऊन सांगितलं.

इन्द्रजितच्या बाणांच्या पाशातून राम व लक्ष्मण मुक्त झाल्याचे वृत्त ऐकून रावणाचा चेहरा पडला, कारण वासुकी सारखे बाण ही कुचकामी सिद्ध झाले होते. रावणाने धूम्राक्ष नावाच्या राक्षसाला बोलवून आज्ञा दिली–"विशाल सेना बरोबर घेऊन तू नीघ, नि अगोदर हा राम आणि वानर यांना मारून टाक."

धूम्राक्ष ताबडतोब तेथून निघाला आणि सेनापतीला जाऊन सांगितलं–"मी युद्धाला निघालो, माझ्यासाठी प्रचंड सेनेची व्यवस्था करावी." धूम्राक्षाबरोबर जाण्यासाठी सैन्य



तयार झालं. सैनिकांपाशी विविध प्रकारची शस्त्रास्त्रे होती. सुसज्ज सैन्यासह सर्वोत्तम रथावर आरूढ होऊन धूम्राक्ष पश्चिम-द्वारी उपस्थित झाला.

धूम्राक्षाला आलेला पाहून वानरांनी पुन्हा एकदा रामाचा जयघोष केला. दोन पक्षात युद्ध सुरू झालं. राक्षसांची शस्त्रास्त्रे वानरांवर येत होती. व वानरांनी फेकलेले दगड व वृक्ष राक्षसांवर प्रहार करीत होते. या युद्धात राक्षसांचंच अधिक नुकसान झालं, म्हणून ते हळू हळू पळ काढू लागले. धूम्राक्षाने वानरांवर अधिक जोरदार हल्ला चढवला. वानर ही अधिक संख्येने मरू लागले.

अशा रीतीने धूम्राक्ष वानरांचा नाश करीत आहे हे पाहून हनुमानाला अनावर क्रोध आला, त्याने एक भला मोठा दगड उचलला नि धूम्राक्षाच्या रथाच्या रोखाने फेकला. रथाचे तुकडे तुकडे झाले. आपल्या रथाच्या दिशेने येणारा दगड पाहून धूम्राक्षाने रथातून खाली उडी मारली.

विशाल वृक्ष व त्यांच्या मोठमोठ्या शाखा हनुमानाने राक्षसांवर फेकायला सुरुवात करताच राक्षस सैरावैरा पळू लागले. नंतर हनुमानाने थेट धूम्राक्षावर हल्ला चढवला.

धूम्राक्षाने आपली गदा हनुमानाच्या डोक्यावर जोराने मारली, पण या प्रहाराने हनुमान जरा ही विचलित झाला नाही. त्याने धूम्राक्षावर एक प्रचंड गंडशिला उचलून फेकली. तिच्या प्रहाराने धूम्राक्ष रक्त ओकू लागला व थोड्या वेळात त्याने प्राण सोडले. हे पाहून वानरांनी दुप्पट उत्साहाने राक्षसांशी युद्ध सुरू केले. आणि राक्षस भिऊन लंकेत पळून गेले.

धूम्राक्षाच्या मृत्यूची वार्ता ऐकून रावणाला खूपच राग आला. त्याने राक्षस वज्रदंष्ट्राकडे पाहिले आणि ओरडून आज्ञा केली–"तू ताबडतोब प्रस्थान कर. राम, सुग्रीव व वानर यांना जिवानिशी ठार मारूनच परत ये."





वज्रदंष्ट्र हा मायावी राक्षस होता. शस्त्रास्त्रे व त्यांनी सज्ज निवडक राक्षस-वीरांना घेऊन तो सैन्यासह युद्ध-भूमीकडे निघाला.

वज्रदंष्ट्राची सेना लंका-नगरीच्या दक्षिण द्वाराने बाहेर पडली. त्या दारी अंगद आपल्या वानर-सैन्यानिशी तयार होता. वानर व राक्षस यांच्यात तुंबळ युद्ध झाले. या युद्धात राक्षस जेव्हा अनेक वानर-वीरांना ठार करू लागले, तेव्हा अंगदाचा क्रोध उफाळून आला. तो अत्यंत क्रूरपणे राक्षसांचा वध करू लागला. त्याच्या प्रहारांनी राक्षस एकामागून एक धारातीर्थी पडू लागले. त्याचा केवळ एक प्रहार एकेका राक्षसाला पुरेसा होता. अनेक राक्षसांच्या डोक्यातील मेंदू बाहेर आले.

अंगदाच्या तडाख्यांनी अशा रीतीने जेव्हा राक्षस मरू लागले, तेव्हा वज्र-दंष्ट्राच्या रागाची सीमा राहिली नाही. तो वानर सैन्यावर बाणांचा वर्षाव करू लागला. शेवटी अंगद व वज्रदंष्ट्र दोघे एकमेकांसमोर आले. या द्वंद्व-युद्धात अंगदाने वज्रदंष्ट्राचा रथ आपल्या गंडशिलेच्या प्रहाराने मोडून टाकला. वज्रदंष्ट्राने ऐन वेळी आपली गदा हाती घेऊन रथातून खाली उडी मारली आणि थोडा वेळ तो बेशुद्ध झाला. मूर्च्छेतून बाहेर येता क्षणीच त्याने अंगदावर आपली गदा फेकली. अंगद सावध होता, त्यामुळे गदा-प्रहारा-पासून त्याने आपल्याला वाचविले. मग वज्रदंष्ट्र आणि अंगद यांच्यात मुष्टियुद्ध सुरू झाले. दोघे बराच वेळ लढत राहिले आणि शेवटी थकून गेले. मग दोघे जण आपल्या गुडघ्यांवर बसले. तेव्हा अंगद विजेसारखा चमकून उठला आणि त्याने आपल्या तलवारीने वज्रदंष्ट्राचे शिर उडवले. वानरांना फारच आनंद झाला. वज्रदंष्ट्राच्या मृत्यूची बातमी ऐकून आता रावणाने अकंपन याला आपल्या सैन्यानिशी युद्धासाठी पाठवलं. आपल्या उत्कृष्ठ रथावर स्वार होऊन सैन्यासह



अकंपन युद्ध-भूमीवर येऊन दाखल झाला. मग राक्षस नि वानर यांच्यात निकराची लढाई झाली. दोन्ही पक्षांचे अनेक वीर मृत्यु-मुखी पडले. कुमुद, नल, मंद आणि द्विविद या वानरांनी साहसपूर्वक राक्षस-वीरांना तोंड दिले आणि ते त्यांचा वध करू लागले.

अकंपनने त्या वानर-वीरांना ओळखले आणि आपला रथ त्यांच्या रोखाने हाकला. अकंपन पुढे वानर-वीरांचा टिकाव लागत नव्हता. हे सर्व पाहून स्वतः हनुमान पुढे आला. अकंपनने हनुमानावर बाणांचा वर्षाव केला. पण हनुमानाने त्या बाणांची जरा ही पर्वा केली नाही. हनुमानाने हुंकार भरून धरतीला आपल्या पायाने एक जोरदार रेटा दिला. जमीन कंपित झाली. एक विशाल शिला उचलून हनुमान अकंपनच्या रोखाने निघाला.

पण अकंपनने आपल्या बाणांनी हनुमानाच्या हातातील शिलेचे तुकडे-तुकडे करून टाकले. यावर हनुमानाने एक सालवृक्ष मुळासकट उपटला नि अकंपनच्या डोक्यावर जोरदार प्रहार केला. आता अकंपन आपला बचाव करू शकला नाही. तो अचेतन झाला, नि त्याने प्राण सोडले.

आता राक्षस चांगलेच भ्यायले आणि शस्त्रे तेथेच टाकून पळून जाऊ लागले. ज्या वानरांनी साहसपूर्वक राक्षसांना ठार मारले होते, त्यांचे हनुमानाने अभिनंदन केले. अकंपनचा वध करणाऱ्या हनुमानाची सर्व वानरांनी तारीफ केली. नंतर सर्व वानरांनी असा जोरदार जयघोष केला की तो ऐकून राक्षसांची घाबरगुंडी उडाली.

अकंपनच्या मृत्यूचे वृत्त ऐकून रावणाला थोडा वेळ वाईट वाटले. नंतर त्याने आपल्या मंत्र्यांशी विचार-विनिमय केला व आपल्या सैन्याची ताकत आजमावण्यासाठी तो लंकेत सर्वत्र फिरू लागला. जरी साऱ्या लंकेत राक्षसांचे ध्वज फडकत होते, तरी नगरीच्या चौफेर वानरांनी चांगलाच वेढा घातला होता.





रावण आपल्या महालात परत आला नि प्रहस्ताकडे पाहून म्हणाला–"शत्रु-सैन्याने आपल्या नगरीला वेढलेले आहे आणि शत्रूशी लढायला आता पर्यंत जे गेले, त्यांना अपयश मिळाले आहे. शत्रूपुढे कोणाचे ही काही चालले नाही. मी, कुंभकर्ण, तू, इंद्रजित नि निकुंभ एवढेच शत्रूशी सामना करायला समर्थ आहोत! तू आवश्यक सैन्यासह युद्ध-भूमीवर जा आणि वानर-सैन्याशी लढाई कर."

यावर प्रहस्त म्हणाला :

"या विषयावर आपण खूप चर्चा केलेली आहे! त्याबाबत अनेक मते आहेत. मला वाटतं सीतेला रामाकडे परत पाठविण्यातच आपलं कल्याण आहे. मला हे ही माहीत होतं की आपण सीतेला परत न पाठवलं तर युद्ध नक्कीच होणार! तुमची इच्छा मला आज्ञेसारखी आहे. म्हणून तुमच्या आज्ञेचं पालन मी नक्की करीनच. तुमच्यासाठी मी युद्धात आपल्या प्राणांची ही पर्वा करणार नाही. हा चाललो मी युद्धाला! विजय मिळविण्यासाठी मी प्रयत्नांची शर्थ करीन."

इतकं सांगून सेनापति प्रहस्ताने विशाल सैन्याची व्यवस्था केली. विजय मिळविण्याच्या इच्छेनं राक्षस-वीरांनी होम-अर्चना सुरू केली. आणि त्यांनी युद्ध-भूमीकडे प्रयाण केले. प्रहस्ताने रावणाचा जयघोष केला, नि उत्तम जातीचे घोडे जुंपलेल्या रथावर आरूढ होऊन तो युद्धासाठी निघाला. त्याच्याबरोबर त्याचे चार मंत्री होते–नरांतक, कुंभहन, महानाद आणि समुन्नत.

प्रहस्ताला येताना पाहून रामाने विभीषणाला विचारले–"हा येणारा वीर मोठा पराक्रमी दिसतो आहे! तो कोण बरं?"

विभीषणाने रामाला सांगितलं–"हा रावणाचा सेनापति आहे. याचं नाव प्रहस्त. रावणाच्या सेनेच्या तिसऱ्या भागाचं नेतृत्व हा करतो. सर्व शस्त्रास्त्रांचं उत्तम ज्ञान याला आहे. महान् पराक्रमी म्हणून प्रहस्त सुप्रसिद्ध आहे."





# आभाळाचे खांब

एका गावात भीम नावाचा एक भोळा माणूस रहात असे. मजुरी करून तो आपलं पोट भरी. गावचे लोक त्याला अगदीच भोळा सांब मानत.

एका रात्री जेवण उरकून भीम चांदण्यात बाजेवर पडून आकाशाकडे पहात होता. अचानक एक भीतिदायक विचार त्याच्या मनात उमटला–

'लोक म्हणतात, कि आभाळ म्हणजे तर देवानं घातलेला खूप मोठा मांडव आहे. मांडव ज्या आकाराचा असेल, त्या मानाने त्याला चारी बाजूंनी खांब असतात. पण मग, इतक्या मोठ्या आभाळाचे खांब कुठायत? दिसत तर नाहीत कुठे? अन् मग जर आभाळ खाली पडलं तर केवढा अनर्थ गुजरेल?'

या विचारबरोबर भीम भीतीने घाबरा झाला, आणि उठून बसला. त्याला वाटलं की, हे आभाळ जर खाली पडल, तर आपला जीवच जाईल की!

सकाळ झाली, तेव्हां परत गावात येऊन प्रत्येकाला थांबवून थांबवून विचारू लागला–"छोटयाशा एकाद्या मांडवालासुद्धा चार खांब असतात. मग इतक्या मोठ्या आभाळाला तर कित्तीतरी खांब असायला हवेत, पण इथे तर एकही खांब दिसत नाही! आणि आता जर हे आकाश तुटून खाली पडलं, तर आपण सगळे मरणार नाही का? आपण सगळे आता अशा जागी जाऊ या, की जिथे आकाशच नसेल!"

यावर सर्वजण हसू लागले आणि आपसात म्हणू लागले की भीमला बहुधा भूतबाधा झाली असावी. अगोदरच सर्वजण त्याला वेडा मानत असत. त्यामुळे त्याच्याकडे कोणीच लक्ष देईना.

२५ वर्षांपूर्वीच्या चांदोबातील गोष्ट



आता भीमला वाटू लागलं की आपल्याकडे लक्ष न देणारे हे लोकच सारे वेडे आहेत, अन् त्यानं ठरवलं की आपणच गाव सोडून जाऊन जिथे आकाशच नसेल अशा ठिकाणी निश्चिन्तपणे रहायला लागावे. या विचाराने तो गाव सोडून पुढे निघाला.

गावातून बाहेर पडून तो जंगलात पोचला. तेथे त्याला एकटा-दुकटा एखादा माणूस दिसू लागला. त्यांच्यापैकी एकाजवळ भीमने आपली भीती बोलून दाखवली. तो माणूस भीमकडे नीट निरखून पाहून म्हणाला—"काय बडबडत आहेस? आकाशाला कसले आलेत खांब?" अन् तो मुकाटचाने पुढे निघून गेला.

इतकी छोटीशी गोष्टही या माणसाला कळत नाही—या विचाराने चिडून भीमही पुढे चालू लागला. खूप चालल्यावरही जंगल काही संपेना, अन् एकादं नवं गावही लागेना. एका ठिकाणी जरासं थांबून डोकं उचलून त्यानं वर पाहिलं, तर झाडांच्या पुढे वर त्याला पुन्हा आकाशच दिसलं. त्याला वाटलं की आकाश नसलेल्या जागी पोचायला आपल्याला बहुधा अजून खूप दूर जावं लागेल.

रात्र होईपर्यंत तो चालतच राहिला. नंतर तो एका झाडाखाली रात्र घालवण्यासाठी थांबला. झाड खूप मोठं असल्याने त्याच्या फांद्या आपल्याला वाचवू शकतील असा विचार त्याच्या मनात होता.

त्या झाडाखाली एक साधू डोळे मिटून बसलेला होता. भीमच्या चाहुलीमुळे त्याने डोळे उघडले.

त्याला पाहून भीमने विचारले—"वा, वा! तुम्ही पण आभाळ पडलं तर स्वत:ला वाचवण्यासाठी इथे येऊन बसला आहात न?"

साधूनं ओळखलं की हा एक भोळा-भाबडा प्राणी असावा. त्यानं हसतच भीमला विचारलं—"आभाळ पडणं म्हणजे काय?"

"लहानशा मांडवालाही चार खांब असतात की नाही! पण इतक्या मोठ्या आभाळाला तर एकही खांब नाहीये. मग ते पडल्याशिवाय कसं राहील?" भोळ्या भीमाने शंका विचारली.

"हं! आत्ता तुझी शंका मला बरोबर कळली बेटा! आभाळाला खांब कसे नसतील? आभाळाला खांब नक्की असतात. त्याबद्दल मी तुला सकाळी सांगेन. आता झोप तू." साधू म्हणाला.

सकाळ झाली अन् भीम जागा झाल्यावर साधू म्हणाला—"बेटा, तुझी हीच शंका आहे नं, की आकाशाला खांब का नाहीत? आपली शंका निवारण्याचा मार्ग सांगतो बघ तुला. या बाजूने गेलास की एक गाव लागेल. तिथे जाऊन प्रत्येक घराजवळ त्या घरच्या लोकांना शिव्या देत उभा रहा अन् भीक घेऊन ये."

भीम गावात पोचला. प्रत्येक घरासमोर उभा राहून त्या घरच्या लोकांना शिव्या देत तो भीक मागू लागला. सर्वच जण त्याला मारायला धावले, पण भीक कुणीच दिली नाही. शेवटी भीम एका घरासमोर गेला. भीक मागितली पण कोणीच बाहेर आले नाही. मग तो शिव्या देऊ लागला.

यावर घरातून भरकन एक बाई बाहेर आली अन् त्याला भिक्षा घालत म्हणाली—"यायला उशीर झाला मला. मग शिव्या दिल्यावाचून कसा राहशील तू? मला कळलं, कळलं हं!" आणि मग ती घरात निघून गेली.

भीम जंगलात परत आला अन् साधूला त्याने ही हकिकत सांगितली.

साधू हसत म्हणाला—"तू शिव्या दिल्यास, तरीही त्या बाईने तुला भीक दिली. रागावली नाही ती? अशी माणसं हजारो लाखोत एक असली तरी पुरे, हीच माणसं आभाळाचे खांब आहेत. मांडवाला फक्त चारच खांब असतात. त्यामुळेच तो कधी तुटून पडत नाही. घाबरू नकोस आता."

साधूचे बोलणे भीमला बरोबर समजले. साधूला साष्टांग नमस्कार करून त्या दिवसापासून तो त्या साधूची सेवा करत त्याच्याच जवळ राहू लागला.





# चिरंजीव माणूस

**गो**ष्ट खूप जुनी आहे. त्या काळात इटलीत बेप्पोपिपेट्टा नावाचा एक तरूण अन् धाडसी असा शिपाई होता. एक दिवस एका निर्मनुष्य अशा जंगलातून जात असताना, दोन चोर एका व्यापाऱ्याला चांगला ठोकून काढत असलेले त्याने पाहिले. बेप्पो एकदम वाघासारखा त्या चोरांवर तुटून पडला. ते बेप्पोसमोर मुळीच टिकाव धरू शकले नाहीत, अन्......पाय लावून पळून गेले ते! व्यापारी हातीपायी धड आहे असे पाहून त्याच्याशी अवाक्षरही न बोलता बेप्पो तिथून चालू लागला.

बेप्पोने दाखवलेले हे साहस त्याच्या पथ्यावरच पडले. कारण तो व्यापारी दुसरातिसरा कोणी नसून, वेष पालटून फिरणारा, त्या देशचा खुद्द राजाच होता! बेप्पोच्या ऐन वेळच्या मदतीबद्दल तो कृतज्ञ राहिला अन् त्याच्या धाडसीपणावर फार खूषही झाला. नंतर बेप्पोला बोलावून घेऊन राजा त्याला म्हणाला–"आजपासून मी तुला नोकरीतून मुक्त करून स्वातन्त्र्य देत आहे. तुला हवं तेव्हां सैनिक म्हणून तू युद्धात भाग ही घेऊ शकतोस, पण तशी तुझ्यावर सक्ती नाही. तुला पाहिजे तेव्हां तू सुट्टी घेऊ शकतोस, हवं तिथे भटकू शकतोस. आजीवन तुझ्या उदरभरणाची जबाबदारी मी घेत आहे. तुझा सारा खर्च मी चालवीन."

बेप्पोला तरी यापेक्षा अधिक काय पाहिजे होते? आजपर्यंत शिपाई म्हणून तो जी विशिष्ट थैली वाळगत असे, ती वापरायचे आता त्याने बन्द केले, अन् एकदम निष्काळजी, मनपसन्त असे जीवन तो जगू लागला. एकदा एका वृद्ध सैनिकाने त्याला पाहिले अन् विचारले–"कारे बाबा! स्वतःला सैनिक म्हणवतोस तर थैली कुठाय तुझी?"

सचित आंबेकर

"शिपायाचं काम न करताही राजा माझं पालनपोषण करतो आहे." बेप्पो उत्तरला.

"भाग्यवान् आहेस खरा! ही घे माझी थैली आहे ही. हिचं तोंड उघडून कुणालाही 'मार उडी' म्हणालास, तर ताबडतोब तो या थैलीत उडी मारेल. जोपर्यंत थैलीच तोंड उघडून तू त्याला मुक्त करणार नाहीस, तोपर्यंत तो तसाच अडकून राहील कित्येक वर्षं मी या थैलीशी असा खेळत आलोय. आता मात्र कंटाळलोय. तू अजून तरुण आहेस, म्हणून आता काही काळ तूही घे खेळून हिच्याशी!" असे म्हणून त्या वृद्धाने आपली थैली बेप्पोला दिली.

बेप्पोने थैलीच्या खरेपणाबद्दल पारखून पाहिले. त्याच्याशी लढणाऱ्या दोन व्यक्तींना थैली दाखवून तो म्हणाला–"हं मारा उडी हिच्यात." त्याबरोबर त्या दोघांनी खरोखरच थैलीत उड्या मारल्या. अन् बेप्पोने त्यांना सोडून देईपर्यंत ते स्वतः बाहेर येऊ शकले नाहीत.

दोन वर्षं आपल्या गावात राहिल्यावर बेप्पो कंटाळला आणि राजधानीला परत गेला सारे शहर त्याला उदासवाणे दिसले प्रत्येक घराबाहेर काळा कपडा टांगलेला दिसत होता. हकीकत काय आहे, याची चौकशी केल्यावर बेप्पोला लोकांनी विचारले–"म्हणजे? तुला अजून माहीतच



नाही? आज मध्यरात्री सैतान येऊन राजकन्येला उचलून नेणार आहे. काही वर्षांपूर्वी त्याने या अटीवर राजाकडून सही करून घेतली होती. कागदावर काय लिहिलंय, हे राजाला माहीत नसल्याने त्याने सही केली होती. पण आता त्याला कळून आलंय की अटीप्रमाणे मुलगी सैतानाहाती सोपवायला हवी."

बेप्पो ताबडतोब राजाकडे गेला व व म्हणाला–"आपण माझ्यावर जीवन-भराचा जो उपकार केलाय, त्याच्या बदली मी आता राजकन्येला सैतानाच्या कचाट्यातून सोडवायचा प्रयत्न करीन."

"तुझा धाडसीपणा मला ठाऊक आहे, पण यावेळी तू किंवा मी या परिस्थितीत



काहीच करू शकणार नाही. फसून का होईना, पण मी त्या कागदावर सही करून बसलोय ना!" राजा हताश स्वरात म्हणाला.

"इतकीशी फसवणूक तर आपणही करू शकू ना महाराज! राजकन्या ज्या कक्षात आहे, त्याच्या शेजारच्या कक्षात माझी रहाण्याची सोय करून द्या हुजूर! म्हणजे कसं? सैतानाला त्या माझ्या कक्षातूनच राजकन्येकडे जावं लागलं पाहिजे. मला एक टेबल, कागद, शाई अन् लेखणी हवी, त्याचबरोबर एक सोटाही असावा. बाकी सगळं मी संभाळून घेईन." बेप्पो म्हणाला.

बेप्पो हे संकट टाळू शकेल, अशी राजाला मुळीच आशा नव्हती. तरीही त्याने बेप्पोला सारी व्यवस्था करून दिली. राजकन्येच्या कक्षा शेजारच्या खोलीच्या दरवाज्याशी टेबलावर आपली थैली ठेवून बेप्पो जवळच उभा राहिला.

ठीक मध्यरात्री एकाएकी जमीन थरथरू लागली. चोहीकडे विजा पडल्या, कडकडाट ऐकू आला अन् गंधकाच्या वासाने आसमन्त भरून गेला. तुटलेल्या ताऱ्याच्या वेगाने सैतान राजवाड्याकडे येऊ लागला. तो पुढे दिसताच थैलीचे तोंड उघडून बेप्पो म्हणाला—"मार उडी!" सैतान तावडतोब थैलीत बन्द झाला!

थैलीत अडकून जरा वेळ सैतानाचा आरडाओरडा ऐकल्यावर अन् तो थोडा गप्प झाल्यावर बेप्पोने त्याला विचारले—"इकडे का यावं लागलं तुला?"

"ही तुला सांगायची गोष्ट नव्हे!" सैतान थैलीतूनच गुरगुरला.

"मला नाही, तर आणखी कुणाला सांगणार? तू राजकन्येला घेऊन जायला आलायस, अन् तुझा बेत हाणून पाडायलाच मी इथे येऊन बसलोय; समजलास? राजकन्येला सोडून देऊन तू आल्या वाटेने परत फिरायचं वचन दे; नाहीतर मी तुला या थैलीतून सोडणारच नाही बघ!" बेप्पोने धमकी देत म्हटले.

"हे मुळीच होणं नाही! आज मध्यरात्रीपासून राजकन्या माझी झाली आहे. राजाने तसं एका कागदावर लिहून, सही करून, कागद माझ्या हाती दिलेला आहे." सैतान गुर्मीतच बोलला.

"ते तर मलाही माहीत आहे रे! बोल, तू तो कागद आता फाडून टाकायला तयार आहेस की नाही? शेवटचं विचारतोय मी तुला." बेप्पोने विचारले.

"माझ्या भानगडीत दखल देऊ नकोस तू. मुकाट्यानं थैलीबाहेर काढ मला!" सैतान अजूनही आपल्याच मस्तीत होता.

"ठीक आहे. मग आता मी आपलं काम सुरू करतो." असे म्हणून बेप्पो सोट्याने त्या थैलीवर तडाखे मारू लागला.

सैतान तर नरकाचा प्रमुख! त्याने नरकातही कधी असे शारीरिक कष्ट भोगले नव्हते! मानवलोकात येण्यासाठी त्याला साधे मानव-शरीर धारण करावे लागले होते. या शरीरामुळे सोट्याचा मार त्याला सहन होईना! वेदनेने कुंथत तो किंचाळू, आरडू-ओरडू लागला. शेवटी तो बेप्पोचे म्हणणे मानायला तयार झाला. तो म्हणाला की आपल्याला बेप्पो थैली-बाहेर काढील, तर आपण राजकन्येचा नाद सोडून द्यायला तयार आहोत.

"अरे, तू तर कागदावर सही करून घेणारा प्राणी आहेस. मी तुझ्या बोलण्या-वर विश्वास ठेवायला मुळीच तयार नाही. मी एक पत्र लिहून तयार करतो, तू फक्त आपला हात बाहेर काढून आपली सही कर त्यावर. नंतरच तुझी सुटका शक्य आहे." बेप्पो पुन्हा धमकावत म्हणाला.





जिवावरच बेतलं, म्हणजे काय करणार? सैतानाने बेप्पोच्या सर्व अटी मान्य केल्या. बेप्पोने पत्र तयार करून, सही करायला सांगितल्याबरोबर त्याने थैलीतून हात बाहेर काढून सही करून टाकली. नंतर बेप्पोने सैतानाला थैलीबाहेर सोडले. पुन्हा एकदा गंधकाचा वास पसरून वीज चमकली. अन् सैतानाने सूंबाल्या केला!

नंतर राजा, राजकन्या अन् बाकी दरबारी लोकांनी जेव्हा बेप्पोवर स्तुतिसुमने उधळली, तेव्हा तो अगदी लाजून गेला. त्याच्या सन्मानार्थ राजाने जंगी मेजवानी दिली व नंतर बेप्पो तेथून निघून गेला.

पुढे फिरत रहाण्याचा बेप्पोला कंटाळा आला आणि त्याला वाटू लागले की एकादी मनपसन्त जागा पाहून तेथेच कायमचे वास्तव्य करावे. अशा जागेच्या शोधात असतानाच त्याला एका नदीकिनारी एक सुंदरशी झोपडी दिसली. झोपडीच्या चारी बाजूंना छानशी फळाफुलांची झाडे होती व सारे दृश्यच मोठे मनोवेधक होते. आता देशाटन सोडून मरेपर्यन्त इथेच रहावे असे त्याने ठरवले.

काही वर्षे तो तेथे मोठ्या सुखाने राहिला. एक दिवस त्याच्याकडे एक नवीनच माणूस आला. हा माणूस काळा व शांत होता. पण तो मोठा उदास दिसत होता.

"आपण कोण?" बेप्पोने त्याला विचारले.

"मृत्यु!" तो माणूस उत्तरला.

"ओहो! मग मार उडी!" थैलीचे तोंड उघडत बेप्पो म्हणाला. मृत्यु त्या थैलीत तसाच दीड वर्षपर्यन्त अडकून राहिला.

बेप्पोने त्याला या काळात कसलाही त्रास दिला नाही. उलट तो मृत्यूशी मोठ्या प्रेमाने गप्पा करी. मृत्युनेच त्याला भय दाखवून, धमक्या देऊन किंवा कधी कधी वादविवाद, अनुनय वगैरे करून थैलीबाहेर येण्याचा प्रयत्न केला. परन्तु बेप्पोने त्याला मुळीच दाद दिली नाही.

या दीड वर्षात कुणाचाच मृत्यु ओढवला नाही. जी माणसे आज-उद्याच मरण्यासारखी होती तशीच राहिली. कित्येक अपघात व लढाया झाल्या, परंतु कोणीच मेले नाही.

मृत्यूने बेप्पोला तऱ्हेतऱ्हेने समजावायचा प्रयत्न केला—मृत्युशिवाय जीवनाचा मार्ग सुगम होत नाही. अतिवृद्ध व दीर्घरोगी माणसे असतात किंवा अत्यंत वाईट प्रकारे जीवन घालवणारी माणसे असतात. अशांना केवळ 'मृत्यु' हीच सुटका असते. मृत्यु न होता केवळ जन्मच होत राहिले तर लोकांना जगात रहायला जागाच उरायची नाही! शेवटी यात काही तथ्य आहे, हे बेप्पोला मानावेच लागले. नंतर त्याने मृत्युकडून एक वचन घेतले की जो पर्यंत आपण स्वतः बोलावणार नाही, तोपर्यंत मृत्युने त्याच्याकडे ढुंकूनही पाहू नये, अन् मगच त्याने मृत्युला थैलीतून सोडून दिले.

थैलीतून बाहेर निघाल्याबरोबर मृत्यु भराभरा आपली तुंबलेली कामे उरकण्याच्या मागे लागला. जगात युद्ध व विषारी रोग येऊन लाखो लोक मरू लागले.

यानन्तर बेप्पो खूप वर्षे जगला. शेवटी त्यालाच आयुष्याचा कंटाळा येऊ लागला.



त्याचे सारे दोस्त व स्वतःची मुलेबाळेही मरून गेली. त्याची नातवंडेही मेली! तो राजा व राजकन्याही मरून गेले. आता मात्र बेप्पोने आपल्या नोकराकरवी 'मृत्युने येऊन आपल्याला घेऊन जावे' असा निरोप त्याच्याकडे पाठवला.

"नाही रे बाबा! तो माणूस जिथे रहात असेल, त्याच्या आसपासही मी फटकणार नाही!" मृत्यु म्हणाला.

"मृत्यु किती कृतघ्न आहे! मी त्याला थैलीतून सोडलं ही चूकच केली. म्हणजे तरी त्याचं डोकं ठिकाणावर राहिलं असतं!" बेप्पो स्वतःशीच म्हणाला.

मृत्युने बेप्पोचे शरीर त्याच्या आत्म्यापासून निराळं करायला नकार दिला होता.

त्यामुळे 'आपणाला आता स्वर्गात किंवा नरकात सशरीरच जायला हवं' असा विचार बेप्पोने केला. त्याला वाटले की, आपल्याला स्वर्गात नक्कीच जागा मिळणार नाही. त्यामुळे त्याने नरकात जायचे ठरवले. त्याने सरळ नरकात जाऊन तेथला दरवाजा ठोठावला.

मृत्युला याबद्दल जेव्हा कळले, तेव्हा त्याने आपल्या नोकरांना सांगून ठेवले– "त्याला मुळीच आत येऊ देऊ नका. खूप चांगलं धोपटून काढून त्याला बाहेर ढकलून द्या." आणि त्या अनुचरांनी तसेच केले.

आता तो स्वर्गात पोचला अन् द्वारपालाला म्हणाला की–"मला आत येऊ दे." द्वारपाल म्हणाला–"मी ईश्वराला विचारून येतो." अन् तो आत गेला. तेव्हां बेप्पोने आपली टोपी तटाच्या भिंतीवरून स्वर्गोद्यानात फेकून दिली.

द्वारपालाने येऊन सांगितले की–"तुला आत यायला परवानगी मिळाली नाही. तू सैतानाला पिटून काढण्याचं एक चांगलं काम केलं होतंस. पण इतक्या लहान गोष्टीसाठी तुला स्वर्गात प्रवेश मिळणार नाही. तुझी स्थिति शोचनीय आहे. पण मी कायद्याचं उल्लंघन करू शकत नाही."

"तुझं म्हणणं बरोबर आहे. पण माझी टोपी आत पडलीय. ती घेऊ दे मला." बेप्पो म्हणाला.

"ठीक आहे. घेऊन जा."

बेप्पो आत गेला व आपल्या टोपीवर बसूनच राहिला. द्वारपालाला तो म्हणाला– "मी आपल्या इस्टेटीवर कब्जा करून बसलोय. इस्टेटीशिवाय पवित्र असं काय-द्यात काय असू शकतं? तू मला इथून उठवू शकत नाहीस."

गोष्ट ईश्वराच्या कानी गेली. तेव्हां तो म्हणाला–"स्वर्गात कुणाला इंचभर जरी जागा मिळाली, तरी पुरा स्वर्ग मिळाल्यासारखंच असतं. राहू दे त्याला इथेच."



## बहुरूपा वसुन्धरा :

### वेगाने वाढणारे बांबू

थायलंड, मलेशिया, इण्डोनेशिया आदि आग्नेय आशियातील देशांमधे विपुल आढळणारी बांबूची वने खूप भराभर वाढतात. ईशान्य भारतात बांबू एक मीटर वाढण्यासाठी ६ ते ८ आठवडे लागतात. पण वर उल्लेखलेल्या देशांत तोच एक मीटर बांबू २४ तासात वाढतो.





### भविष्याची सूचना

नैसर्गिक उत्पातांच्या बाबत अगोदरच जागरूक राहून, लोकांना सूचना देण्याबद्दल काही जनावरे व प्राणी सक्षम असतात असे मानले जाते. भूकंप, वादळ व ज्वालामुखीचे स्फोट यांची माहिती काही जनावरांना अगोदरच कळते. त्याचप्रमाणे काही माशांमधेही ही अद्भुत शक्ती आढळते. जेली-फिश हा समुद्री प्राणी १५ तासांपूर्वीच वादळाची चाहूल घेतो आणि किनाऱ्याकडून तो खोल पाण्याकडे जातो. खोल पाण्यातले मासे व अन्य प्राणी ही सूचना ओळखून लगेच पाण्याच्या पृष्ठाकडे येतात. जपानमधे मत्स्यालयात पाळलेले मासे भूकंपाच्या काही तास अगोदरच एकमेकांना टकरा देत धावपळ करू लागतात.

### उंच उंच वारुळे

काही वाळवींनी बनवलेली वारुळे जमिनीवर लहान लहान टेकड्यांसारखी दिसतात. काही वारुळे २१ फूट उंचीचीही असतात. ही वारुळे म्हणजे लहान वारुळांच्या मानाने हिमालयच!





# राज्य नवे, नाव जुने!

गेल्या २७ एप्रिल रोजी भारत नि जगातील सुमारे पन्नास देशांच्या प्रतिनिधीं समक्ष युगोस्लाविया फेडरल पार्लमेंट अस्तित्वात आले आणि नवी घटना घोषित करण्यात आली.

आजच्या फेडरल रिपब्लिक ऑफ युगोस्लाविया मध्ये मागील सहा गणतंत्र राज्यांपैकी फक्त दोनच देश सामिल झालेले आहेत, सेर्बिया आणि माटेनीग्रो. बाकीचे चार गणतंत्र देश एक वर्षापूर्वीच स्वतंत्र झालेले होते. सहा महिने आंतरजातीय वेवनावाच्या परिस्थितीत अनेकांना आपले प्राण गमवावे लागले. अनेकांनी आपलं घर-दार सोडलं आणि खूप अधिक लोक शेजारच्या राज्यात पळून गेले.

युरोपियन कम्यूनिटीने हस्तक्षेप करून कमीत कमी पंधरा वेळा शांतता-करारांवर स्वाक्षऱ्या करवल्या; पण अल्प काळातच ते सर्व करार मोडले गेले. शेवटीं संयुक्त राष्ट्रसंघाने आपली शांति-सेना या अशांति-ग्रस्त भागात पाठविण्याला संमति दिली. मार्चच्या प्रथमार्धात जवळ जवळ १७ देशांतून आलेल्या १४,००० सैनिकांच्या संयुक्त राष्ट्रसंघाच्या शांति-संरक्षण दलाने भारताच्या लेफ्टेनंट जनरल श्री. सतीश नंबियार यांच्या नेतृत्वाखाली युगोस्लावियात प्रवेश केला.

मध्यंतरी मुसलमानांची अधिक संख्या असलेल्या बोस्निया-हेर्जेगोविना मध्ये एक सार्वमत घेतले गेले. यात अधिक संख्यक लोकांनी बोस्निया स्वतंत्र रहावा असे आपले मत प्रकट केले. याच्याच बरोबर एका बाजूला मुसलमान आणि क्रोट्स् यांच्यात व दुसऱ्या बाजूला सेर्बो लोकात नेहमी दंगे होवू लागले. सध्या बोस्निया मध्ये शांति-सेना पाठविता येणार नाही असे संयुक्त राष्ट्रसंघाने जाहिर केले.

मसेडोनिया या सहाव्या गणतंत्र राज्याने आपला निर्णय जाहिर केला की त्याला क्रोनिया, स्लावेनिया नि बोस्निया-हेर्जेगोविना यांच्यापासून अलग व्हायचे आहे. याला यूरोपियन कम्यूनिटीची स्वीकृति मिळणे आवश्यक होते.

आजचे दोन राज्यांचे हे फेडरल रिपब्लिक विसाव्या शतकातील तिसरे गणतंत्र आहे. पहिल्या जागतिक युद्धाच्या (१९१४-१८)

कालात सन १९१७ मध्ये झालेल्या कोर्फु तहानुसार-युध्दानंतर सेर्ब, क्रोट व स्लावेनी या सर्वांनी एक राज्य बनून एकत्र रहायचं होतं. आणि सन १९१८ मध्ये १ डिसेंबर रोजीं या तहाची अंमलबजावणी सुरू झाली. सन १९२१ मध्ये या राज्याचं नाव युगोस्लाविया ठेवण्यात आलं. दुसरे जागतिक युध्द सुरू झाल्या बरोबर हिटलरच्या नेतृत्वाखाली जर्मनीने युगोस्लाविया वर आक्रमण केले. मार्शल टिटोने जर्मनीच्या सैन्याला तेथून पळवून लावले नि तेथे कंम्यूनिस्ट फेडरल रिपब्लिकची स्थापना करून तो स्वतः प्रधान मंत्री बनला. यानंतर सन १९५३ मध्ये तो अध्यक्ष झाला. सन १९७४ मध्ये सहा गणतंत्र देशांच्या सोशलिस्ट फेडरेशनच्या स्वरुपात नवीन युगोस्लावियाची घटना लिहिली गेली.

पण १९८० मध्ये टिटो मरण पावल्यावर देशात आर्थिक संकट, प्रांतीय कलह आणि जाती-जातीतील बखेडे यांमुळे सार्वत्रिक अशांततेचे वातावरण पसरले. यावर सेनेने आपली दमन-नीति सुरु केली, जाति-कलह वाढला नि गृह-युद्ध सुरू झाले.

सेर्बिया व मांटेनीग्रो यांच्या सह स्थापित झालेल्या युगोस्लावियाची लोक-संख्या पूर्वीच्या फेडरेशनच्या शे. ४४ टक्के आहे, आणि त्यावेळच्या नैसर्गिक संपत्तीचा ५५ टक्के हिस्साच आता नव्या युगोस्लावियात राहिला आहे. सर्व जगाला अशी आशा आहे की भविष्य काळात युगोस्लावियात स्थायी शांतता निर्माण व्हावी.






# वर-परीक्षा

विशाल व मालती या दंपतीची मैथिली ही एकुलती एक मुलगी होती. मैथिली चांगली चलाख व बुद्धिमान होती. विशालच्या इस्टेटीची ती एकटीच वारस असल्याने तिला आपल्या घरची सून करून घेण्याचे स्वप्न अनेकजण पहात होते. परन्तु कोणीही आपल्या मनातली गोष्ट अशाकरता प्रकट केली नाही की विशाल आपला जावई बनवू शकेल अशी तीन मुले त्याच्या नात्यातच होती.

ते तीन मुलगे म्हणजे जानकीराम, सूर्यदेव आणि चन्द्रकान्त. त्या तिघांच्याही आया मैथिलीला आपली सून करून घ्यायला तयार होत्या. जानकीरामच्या तुलनेत सूर्यदेव व चन्द्रकान्त चांगले पैसेवाले होते. त्या दोघांच्यातही पाहिले, तर सूर्यदेवपेक्षा चन्द्रकान्त दिसायला खूपच चांगला होता. त्यामुळे मैथिलीच्या आईची, मालतीची इच्छा अशी होती की, आपल्या लेकीचा विवाह चन्द्रकान्तशीच व्हावा.

एके दिवशी विशालने आपल्या लेकीला-मैथिलीला बोलावून म्हटले, ''बाळा, तुझ्याशी लग्न करायला जानकीराम, सूर्यदेव आणि चन्द्रकान्त तिघेही तयार आहेत, अन् त्यांच्या आयाही तुला सून करून घ्यायला आसुसल्या आहेत, हे तुला ठाऊकच आहे. तुझ्या आईची इच्छा आहे की, चन्द्रकान्तशी तुझं लग्न व्हावं. माझ्या दृष्टीनं तर तिघंही सारखेच आहेत. मला कुणाच्यात खास अशी रुचि नाही. तू स्वतः चांगली बुद्धिमान अन् गुणी आहेस, हीच मोठी आनन्दाची बाब आहे. तेव्हा नीट विचार करून तूच स्वतः निर्णय घे. त्याप्रमाणेच मी तुझा विवाह करून देईन.''

पित्याच्या या सांगण्यावर लाजत लाजत मैथिली म्हणाली, ''निर्णय घ्यायचा



तर मी आत्तापर्यंत त्यांचं चरित्र किंवा त्यांच्या खोडींवर तितकंसं लक्षही नाही दिलं बाबा!"

यावर जरासा विचार करून विशाल म्हणाला, "दहाच दिवसात युगादीचा सण येत आहे. त्यासाठी मी या तिघांना इथे बोलावून घेईन. मग तू सावकाशीने परीक्षा घेऊ शकशील त्यांची."

नंतर विशालने त्या अुत्सवासाठी तिन्ही कुटुंबे बोलावून घेतली. विवाहाची गोष्ट निघताच तिघांच्याही आयांना विशालने स्पष्ट सांगून टाकले की त्याबद्दलचा निर्णय आपण आपल्या मुलीवरच सोपवला आहे. त्यामुळे त्या यावद्दल जास्त काही बोलू शकल्या नाहीत.

युगादीच्या अुत्सवासाठी ते तिघेही वर विशालच्या घरी आले. सणाच्या दिवशी लवकर अुठून स्नान वगैरे अुरकून तिघांनीही विशालने त्यांना दिलेली वस्त्रे नेसली. इतक्यात चमेली विकणाऱ्या एका मुलीचा आवाज ऐकू आला. मैथिलीने फाटकाशी येअून त्या फूलवालीला हाक मारली.

त्यावेळी तिथेच असलेल्या तीनही वरांपैकी सूर्यदेव म्हणाला, "अरे, घराभोवती तर किती फुलझाडं आहेत. घरातच फुलं असताना बाहेरची विकत घ्यायची काय गरज?"

या प्रश्नाचे मैथिली काही अुत्तर देणार, इतक्यात जानकीराम हसत म्हणाला, "इथे फुलं आहेत अनेक प्रकारची, पण चमेली मात्र कुठेच दिसत नाहीये. घेअू देत!" अन् त्याने खिशातून पैसे बाहेर काढले.

फूलवाली फूले तोलणार, इतक्यात चन्द्रकान्त त्या मुलीला म्हणाला, "नाही ग, दोन छटाक आणखी घाल." अन् जानकीरामकडे पहात थट्टेच्या सुरात म्हणाला, "सणादिवशी फुलं घेअून द्यायला निघालास हे ठीक झालं, पण इतका कंजूसपणा कशाला? जरा अुदारपणे घ्यायची नाहीत?" अन् त्याने आपल्या खिशातून पैसे काढून फूलवालीला दिले सुध्दा!

चन्द्रकान्तच्या बोलण्यावर जानकीराम मुळीच खट्टू झाला नाही. तो म्हणाला.



"घरात फुलं घालणाऱ्या बायका तर दोनच. मग दोन छटाक नसती का पुरली? अुगीच जास्त खर्च कशाला करायचा?"

"माणसं मोजून फुलं घ्यावी असं म्हणतोस? वा, वा!" चन्द्रकान्त हसू लागला.

सूर्यदेवनेही आपले हसे त्यात मिळवले. जानकीराम गप्प राहिला.

तिघांचे बोलणे ऐकून मैथिली थोडकेसे हसली, अन् फुले घेअून घरात गेली.

आणखी थोड्या वेळाने विशालकडे नेहमी साड्या विकणारा व्यापारी साड्यांचे गाठोडे घेअून आला. त्याला पाहून आश्चर्याने विशाल म्हणाला, "अरे सणासाठी साड्या तर काही दिवसांपूर्वीच देअून गेलास ना? मग आज परत कसा आलास?"

"नवीन तऱ्हेच्या साड्या आहेत दादासाहेब! वाटलं की आपल्या मैथिलीला छान शोभतील, म्हणून आलो दादासोहब!" व्यापारी म्हणाला.

यावर विशाल काही बोलणार, इतक्यात चंद्रकान्त म्हणाला. "कसल्या साड्या आहेत! दाखव तर खरं!"

बाहेरचे बोलणे ऐकून मैथिलीही एवढ्यात बाहेर आली होती. चन्द्रकान्त तिला म्हणाला. "हा म्हणतोय की काही नव्याच साड्या आल्यायत, पहा तुला कोणती आवडते?"

"नुकत्याच तर बाबांनी सणासाठी दोन साड्या घेअून दिल्यात. आता पुन्हा नव्या



साडीची काय गरज?" मैथिली नकार देत म्हणाली.

पण चन्द्रकान्त हसत म्हणाला, "ही सणाची माझी भेट म्हणून घे न!"

पण जानकीराम मधेच म्हणाला, "अरे पण, सणासाठी नव्या घेतलेल्या साड्या मैथिलीजवळ आहेत म्हणते आहे न ती? मग अुगीच साडीत पैसे वाया घालवण्यात काय अर्थ चंद्रकान्त? त्या पैशातून दुसरं काही घेअून दे न!"

"आणखी घ्यायचं मागनं पाहू. आधी मला एक साडी घेअू दे." असे म्हणून चन्द्रकान्तने त्यातली सर्वात भारी साडी निवडली.

मैथिलीने साडी 'आवडली' म्हटले, अन् चन्द्रकान्तने व्यापाऱ्याला पैसे देत



जानकीरामकडे गर्वाने पाहिले.

त्या दिवशी संध्याकाळी जानकीराम, सूर्यदेव व चन्द्रकान्त असे तिघेही बाजारात जाऊन आले. आल्याबरोबर जानकीरामने आपल्या हातातला पद्य-ग्रन्थ मैथिलीला दिला.

ते पुस्तक पहाताच चमकून मैथिलीने विचारले, "अरे तुम्हाला कसं माहीत, की या कवीची पुस्तकं मला फार प्रिय आहेत?"

"सकाळी तू शेजारच्या मुलीला म्हणत होतीस न, की हे पुस्तक खूप प्रयत्न करूनही मिळालं नव्हतं तुला. अन् या कवीचं एकूणच सारं काव्य तुला खूप आवडतं! आज बाजारातून फिरताना हे पुस्तक दिसलं. अन् मला तुझं बोलणं आठवलं, म्हटलं घेऊन टाकू या. घे न माझ्याकडून ही भेट!" जानकीराम आर्जवाने म्हणाला.

त्या रात्री घराच्या परसातून काही बोलणं ऐकू आलं, म्हणून मैथिली कानोसा घेऊ लागली.

"जानकीराम, तुजजवळ पैसे नाहीत हे खरं नाही वाटत मला!" चन्द्रकान्त टोमणा देत बोलल्यासारखा म्हणाला.

"खरंच नाहीत रे चन्दकान्त! संध्याकाळी दादांनी माझ्याकडे असलेले सारे दोनशेचे दोनशे रुपये काही अचानक खर्चासाठी माझ्याकडून मागून घेतले. या सूर्यदेवला विचार!" जानकीराम चन्द्रकान्तला म्हणाला.

"सूर्यदेव? धत्! तो तर मुलुखाचा कंजूष आहे! पैसा म्हणजे तर त्याचा जीव की प्राण!" चिडचिडत चन्द्रकान्त म्हणाला.

त्यांचे हे बोलणे ऐकून मैथिली चुपचाप घरात गेली. दुसऱ्या दिवशी कुतुहलाने तिने एकान्तात विशालला विचारले, "बाबा, तुम्ही जानकीरामकडून काही पैसे उसने घेतलेत का?"

विशालने आश्चर्याने विचारले, "तुला कसं कळलं हे?"

मैथिलीने आदल्या रात्रीचे बोलणे त्यांच्या कानावर घातले. तेंव्हा विशाल डोके हलवत म्हणाला. "ओहो! असं आहे होय? खरं म्हणजे मी जानकीरामकडून एक पैही उसनी घेतली नाही. पण, त्याने मला सांगितलं की-सूर्यदेव किंवा चन्द्रकान्तने जर मला विचारलं की, मी त्याच्याकडून दोनशे रुपये घेतले का, तर मी 'हो' म्हणावं. मला तेंव्हा वाटलं की यात असेल काही रहस्य! मी डोकं हलवून होकार दिला. अन् खरंच नंतर चन्द्रकान्तनं जेंव्हा मला तसं विचारलं, तेंव्हा मीही 'हो' म्हटलं. तर अशी आहे काय हकिकत?"

हे सर्व ऐकून मैथिलीला खूप आनन्द वाटला. नंतर तिने वडलांना सांगितले की त्यांनी खरोखरच जानकीरामकडे दोनशे रुपये मागावेत.

विशालने दचकून विचारले, "मी उसने मागू? नाही बाबा; आपल्याला काय त्याची गरज?"

"नाही बाबा, माझा आग्रह म्हणून मागा न! अन् त्यानं दिले, तर घेऊन ठेवा." असे म्हणून ती निघून गेली.

दुसऱ्याच दिवशी जानकीराम, सूर्यदेव आणि चन्दकान्त आपापल्या घरी निघून गेले.

ते गेल्यानन्तर दोनशे रुपये मुलीच्या हातावर ठेवत विशाल म्हणाला, "हे घे बाळ, विचारल्याबरोबर जानकीरामने दोनशे रुपये देऊन वर म्हटले की-परत करण्याची घाई नको करायला!" अन् आपल्या मुलीच्या चेहऱ्यावरचा आनन्द पाहून पुढे त्याने कुतुहलाने विचारले, "तुझी वर-परीक्षा संपलेली दिसतेय! तुला पसंत पडलेला नवरा जानकीराम तर नव्हे?"

मैथिलीने होकारात्मक डोके हलवून



लाजेने मान खाली घातली. थोड्या अंतरावर उभी राहून बापलेकीचा संवाद ऐकत असलेल्या मालतीने पुढे येऊन विचारले, "ठीक आहे मैथिली, पण जानकीराम मधेच असं विशेष काय आहे? चन्द्रकान्त मधे तुला कोणता दोष आढळला?"

एक वार आपल्या बायकोकडे नजर टाकून विशाल मैथिलीला म्हणाला, "बोल न! सांग आपल्या आईला, कोणत्या आधारावर तू जानकीरामला पसन्त केलंस?"

थोडके हसून मैथिली आपल्या आईला सांगू लागली, "आई! या प्रश्नाचं साग्रसंगीत उत्तर फार लांबलचक होईल. मी जरा थोडक्यात सांगते. केवळ पैसे कमावणंच नव्हे; तर तो खर्च करण्याच्या

पध्दतीवरून माणसाच्या बुध्दिमत्तेची परीक्षा होऊ शकते. चन्द्रकान्त आगाऊ, जास्त खर्चिक आहे. सूर्यदेव त्याच्या अगदी विरुध्द, महाकंजूस आहे. जानकीरामच यात सुवर्णमध्य आहे. पैसा योग्य रीतीने कसा खर्चावा हे त्यालाच जास्त कळतं. उगीच नाहक खर्च करणारा नव्हे तो! चन्द्रकान्तने आपला मोठेपणा दाखवण्यासाठी आपल्याजवळचे सारे पैसे माझ्यासाठी साडी खरीदण्यात घालवले, अन् मग गेला जानकीरामकडे उसने मागायला. असल्या माणसाकडून पैसे परत मिळणार नाहीत, हे ओळखून चातुर्याने अगोदरच स्वतःला सोडवून घ्यायची योजना बनवून ठेवली होती. चन्द्रकान्तला त्याने पैसे दिले नाहीत. पण तीच रक्कम बाबांना देताना त्याने कांकू केलं नाही. इतकंच नव्हे, तर दुरूनच माझं मन जाणून माझ्या पसन्तीचं पुस्तक त्यानं मला आणून दिलं. असा शहाणा असणारा जानकीराम माझा नवरा झाला, तर तो माझं मन ओळखून वागेल. मी मागेन ते योग्य असेल, तरच तो देईल, अन्यथा 'नाही' म्हणेल. माझ्या अनुचित मागण्यांना लगाम घालून तो मर्यादित ठेवील. आता सांग आई, चन्द्रकान्त पेक्षा जानकीरामच योग्य की नाही?'' इतके बोलून शेवटच्या प्रश्नानेच तिने आपले उत्तर पूर्ण केले.

मालती ताबडतोब तिच्या प्रश्नाचे उत्तर देऊ शकली नाही. तेव्हा मोठ्या गर्वाने आपल्या मुलीकडे पाहून विशाल म्हणाला, ''काय बोलणार ग तुझी आई! इतका दूरवर विचार करायची सवयच कुठंय तिला?''

यावर आपला राग लपवत जरासं हसून मालती नवऱ्याला म्हणाली, ''हो, हो; मोठे आलेत माझी टीका करणारे! ही मैथिली तरी कोण आहे? या मालतीचीच मुलगी आहे म्हटलं! हिच्या बुध्दिमत्तेचं श्रेय माझंच नाही का?'' अन् मोठ्या प्रसन्नतेने ती स्वयंपाकघरात निघून गेली.

इकडे बाप-लेक दोघंही हसत राहिले.





# माया महाल

## ३

(वीरगिरीची राजकन्या अचानक आजारी पडल्यावर तिला राजधानीजवळील सरोवरातल्या विश्रान्ति गृहात राहायला पाठवण्यात आले राजज्योतिषाचार्यांच्या सल्ल्याने दोन वेळा राजा व राणी राजकन्या विद्यावतीला भेटायलाही जाऊन आले. पण तिसऱ्या वेळी ते जेंव्हा तिला भेटायला गेले तेंव्हा मात्र त्यांना राजकुमारी भेटू शकली नाही. ती अदृश्य होण्यापूर्वी...)

मध्यरात्री युवरानी एकदम दचकून जागी झाली आणि बिछान्यावर उठून बसून ती आश्चर्याने समोर पाहू लागली.

''युवराणी उठा! आपल्याला आत्ता ताबडतोब राजवाड्यात पोचायला हवं.'' वृध्द सेविका तिला झोपेतून उठवून म्हणत होती.

''आत्ता मध्यरात्री? का? काय झालंय?'' राजकन्येने तिला विचारले.

''अशी बातमी आलीय की महाराज अचानक आजारी झालेयत आणि त्यांना ताबडतोब तुम्हाला भेटायचंय. आपल्याला घेऊन जाण्यासाठी नावाडी तयार होऊन बसला आहे.'' त्या वृध्द सेविका कमलाने खबर दिली. ती जरा घाबऱ्या स्वरातच बोलत होती.

कमलाचे केस विसकटलेले असल्यामुळे युवराणीला तिचा चेहराही नीटसा



दिसला नाही.

''पण ज्योतिषाचार्यांनी संगितलं होतं ना, की हे विश्रामगृह सोडून बाहेर कुठे जायचं नाही म्हणून?'' विद्यावतीने आश्चर्याने विचारले.

''हो, सांगितलं होतं खरं. महाराज अन् महाराणीच इकडे येणार होते. पण महाराजांची तब्येत एकाएकी बिघडली, म्हणून त्यांनी आज्ञा दिली की तुम्हाला ताबडतोब तिकडे पोचवून दिलं जावं. त्यांच्या आज्ञेवरूनच आता आपण तिकडे जाणार आहोत. उद्या परत येऊ आपण.'' कमलाने समजावले.

विद्यावती तिच्याबरोबर भवनाबाहेर आली अन् दोघीही नावेजवळ पोचल्या. आकाश भरून आलेले होते म्हणून चंद्र-प्रकाशही अगदीच अंधुक होता. भवनाबाहेर पडल्यावर सेविके बरोबर राजकन्या दुसऱ्याच एका मार्गाने चालली होती. पण प्रकाश पुरेसा नसल्याने ही गोष्ट तिच्या ध्यानात आलीच नाही. कमला भरभर पुढे होऊन अगोदर नावेत चढली अन् नंतर हाताचा आधार देऊन तिने युवराणीला नावेत घेतले. ती बसल्याबरोबर नाव तेथून निघाली.

अर्धवट झोपेत राजकन्या नावेत एका बाजूला चुपचाप बसली होती. जवळच बसलेली कमलाही नंतर तिच्याशी एक अक्षरही बोलली नाही. एकाएकी काय झाले अमाव आपल्या, बाबांना आता ते कसे असतील इत्यादि विचारात राजकन्येच्या हेही लक्षात आले नाही की किनाऱ्यावर पोचायला आज काहीसा जास्तच वेळ लागत आहे.

किनाऱ्यावर पालखी आणि कहार तयारच होते. युवराणी बसल्याबरोबर चार कहार पालखी उचलून चालू लागले. कमला दासी पालखी-पाठोपाठच येत असावी असे राजकन्येला वाटले. पालखीत बसल्यावर पुन्हा ती झोपेत गुंगली.

चालताचालता पालखी अचानक एका बाजूला झुकली. पूर्वी असे कधीच झाले नव्हते. त्यामुळे विद्यावती जागी झाली आणि शंकेने पडदा बाजूला करून बाहेर पाहू लागली. राजवाड्याकडे जाण्याचा रस्ता मुळीसुध्दा ओबडधोबड नव्हता. तिची शंका बरोबर ठरली. पालखी का जंगलातल्या रस्त्याने डोंगरावर नेली जात होती? पालखीमागे कमलाही कोठे दिसत नव्हती. तिला पहाण्यासाठी राजकन्येने मागे-पुढे इकडेतिकडे वाकून पाहिले, तरीही दासी तिला कोठेच आढळली नाही. 'मग आपल्याला नेतायत तरी कुठे?' अर्ध्या रात्रीची वेळ अन् जंगलातली वाट होती म्हणून तिने कहारांना काहीच विचारले नाही. शेवटी थोड्या वेळाने कहार थांबले व त्यांनी पालखी खाली उतरवली. ''युवराणी आता आपण बाहेर येऊ शकता.'' एका स्त्रीचा आवाज ऐकू आला.

विद्यावती पालखीबाहेर आली. तिने चोहीकडे निरखून पाहिले. सर्वत्र जंगलच होते, अन् समोर एक विशाल महाल दिसत होता. अगदी आपली सेविका कमलासारखीच हुबेहूब दिसणारी स्त्री युवराणीला दिसली. दिसायला ती कमलासारखी असली तरी तिचा आवाज निराळा होता. राजकन्येने ओळखले की फसून आपण स्वतः



होऊनच तिच्याबरोबर इथे आलो आहोत. ती स्त्री कमलेसारखी भासली तरी वास्तवतः ती कमला नव्हतीच.

''चला युवराणी, आता इथून पुढे तुमचं रहायचं ठिकाण हा महालच.'' ती स्त्री म्हणाली.

''पण आत्ता आपण कुठे आहोत?'' राजकन्येने विचारले.

परंतु त्या स्त्रीने राजकन्येला काहीच उत्तर दिले नाही.

''तू खरी कोण आहेस? मला इथे का घेऊन आलीयस? तू तर म्हणाली होतीस की माझे बाबा आजारी आहेत अन् त्यांना मला भेटायचंय? मग कुठायत



माझे बाबा? हा महाल कोणाचा? मला इथं का आणलंय?'' युवराणी विद्यावतीने तिला पुन्हा विचारले.

''युवराणी, माझ्यावर रागावू नका. पण मी तुमच्या साऱ्या प्रश्नांची उत्तरं देऊ शकणार नाही. हां, एक मात्र सांगते–या विशाल महालाचं नाव आहे 'जादूचा महाल'. एक गोष्ट लक्षात ठेवा, इथे तुम्हाला कसल्याही प्रकारचा त्रास होणार नाही. तुम्हाला आरामात व सुरक्षित संभाळायची जबाबदारी माझ्यावर आहे. मी नेहमी सजग, सावध राहीन-की तुम्हाला कशाची कमतरता पडणार नाही. तोपर्यंत....''

पण ती पुढे काही बोलणार, तोच राजकन्येने तिला टोकत विचारले, ''पण कुठवर? अन् शेवटी तू आहेस तरी कोण?''

''तुम्ही मला तुमची दासी 'कमला' हिच्याच नावाने बोलवू शकता.'' इतके सांगून ती जरा थांबली अन् पुढे म्हणाली, ''माझे मालक तुम्हाला जोवर ठेवू इच्छितील तोवर तुम्ही बिनासंकोच इथे राहू शकता.''

''कोण आहे तुझा मालक?'' युवराणीने तिला धमकावत विचारले.

''ते तुम्हाला हळूहळू आपोआप कळेल. आता कृपा करून माझं ऐका. आत चला. तुमच्या विश्रामगृहातील झोपेत व्यत्यय आलेला आहे. आता तुम्ही आरामात झोपावं, इतकीच माझी विनंती.'' ती बाई दृढ स्वरात म्हणाली.

नंतर ती कहारांकडे वळून त्यांना म्हणाली, ''आता तुम्ही लोकही जा.''

कहारांनी वाकून तिला नमस्कार केला व ते निघून गेले. ती बाई पुढे होऊन म्हणाली, ''चला युवराणी!'' अन् ती जादूमहालाच्या पायऱ्या चढू लागली. मागोमाग विद्यावतीलाही मुकाट्याने जावे लागले. तो महाल मोठा सुन्दर होता. विशाल अशा खोल्यांच्या भिंतींवर व खांबांवर सुन्दर आरसे







लावलेले होते. जाऊ तेथे आपलेच प्रतिबिंब विद्यावतीला दिसू लागले. ती स्त्री व विद्यावती महालाच्या समोरचा मंडप पार करून महालाच्या प्रमुख भागाच्या पायऱ्यां जवळ पोचल्या. त्या चढून दोघीजणी महालाच्या वरच्या भागात असलेल्या एका मोठ्याशा खोलीत पोचल्या. ती खोली मौल्यवान हिरे जवाहिरांनी सजवलेली होती. त्याचबरोबर विविध फुलांचीही मोठ्या रसिकतेने रचना केलेली होती. तेथील प्रत्येक वस्तूच अद्‌भुत अशा तेजाने झळकत होती. सर्वत्र आरसे लटकलेले होते.

त्या खोलीत एक सुन्दरसा मोठा पलंग होता, त्याकडे इशारा करत ती स्त्री म्हणाली. ''युवराणी, आता इथं आरामात झोपून जा. मी येऊन उठवीपर्यंत झोपू शकता तुम्ही.'' तिच्या आवाजात एक प्रकारची ऐट होती.

तिला विरोध करणे उचित नव्हे, असे विद्यावतीने ठरवले. ती मुकाट्याने जाऊन पलंगावर पडली व तिने आपले डोळे मिटून घेतले. त्या स्त्रीने आपल्याला इथे का आणलं? बाबा कसे असतील? आपण तिथे नाही असं पाहून आई बाबांना किती वाईट वाटलं असेल?'-हेच विचार वारंवार तिच्या मनात येत होते. 'आपले असे अचानक अदृश्य होणे लक्षात आल्यावर कमला दासीची काय परिस्थिति झाली असेल? देवा, तिचं बिचारीचं रक्षण कर! या जादू-महालात पुढे काय-काय होणार आहे, कुणास ठाऊक! ती विचार करत राहिली.

* * *

सेनापती उग्रसेन हा महाराणी वज्रेश्वरीचा भाऊच होता. नावाड्याने येऊन सांगताच तो ताबडतोब सरोवरातील विश्रामभवनात पोचला. राजाने त्याला सारी हकिकत सांगितली.

सेनापती पुन्हा तेथून येऊन नावाड्याकडे निरखून पाहू लागला. ''महाराज! काल मी दासींना आणून किनाऱ्यावर सोडलं, अन् मी तिथेच थांबून गेलो, हललोही नाही तिथून! रात्रीही मी कुठेच गेलो नाही. नावेतच पडून होतो. बिचाऱ्या युवराणीवर काय बेतलं असेल!''

उग्रसेन गप्पच होता. त्याच्या मनात अनेक विचार उठत होते. पण नाविक खोटे बोलत असेल, असे मात्र त्याला मुळीच वाटले नाही. 'मग युवराणी विद्यावती गेली तरी कुठे?'

उग्रसेन राजाला म्हणाला, ''महा-राज! या बेटाच्या आसपास ही सोडून दुसरी नावही नसते. तेव्हां युवराणी नावेतून कुठे गेली असेल असे वाटत नाही. सरोवराच्या पलिकडे तसेच पोचणेही शक्य नाही. कारण किनारा खूप दूर आहे अन् पाणीही मधून मधून खूप खोल आहे. पोहत जाणंही शक्य नाही अन् तशी तिला जरूरच काय? तेंव्हा कोणीतरी लपून छपून विश्रामभवनात पोचून गोड गोड बोलून वा धमकावून तिला घेऊन गेलं असेल अशीच जास्त शक्यता वाटते. तेंव्हा आपण असा निष्कर्ष काढू शकतो, की युवराणीचं अपहरण झालेलं आहे.''

सेनापतीचा हा विचार राजाला उचित वाटला, म्हणून मौनपणे त्याने ही डोके हलवले.

दासी कमलाला विश्रामभवनातच सोडून राणी, राजा व उग्रसेन येऊन नावेत बसले. नाव चालू लागली. तिघांच्याही मनात विचारांचे काहूर माजले होते-विद्यावती कोठे गेली? तिचे अपहरण कोणी केले? तिला बिचारीला शत्रु तरी कोण असणार? त्याचा पत्ता तरी कसा लागेल? तिचे रक्षण कसे करावे? आता प्रथम कोणते पाऊल उचलावे—इत्यादि विचार ते काळजी-ग्रस्त त्रिकूट मनात घेऊनच राजवाड्यात पोचले. (क्रमशः)



# दोन चोर

एका जमीनदाराच्या आंबराईतील झाडांना खूप आंबे लागले होते. झाडांवर पाहू तिथे आंबेच आंबे! त्यामुळे सर्वांचीच नजर आंबराईने वेधून घेतली होती. आंब्यांची चोरीही बरीच होऊ लागली. जमीनदाराने पहारेकऱ्याला पहारा चांगला कडक करायची आज्ञा दिली.

एके दिवशी पहारेकऱ्याने दहा वर्षांचा एक मुलगा आंबे चोरताना पकडला; अन् तो त्याला म्हणाला, "कोण रे तू? वीरसिंहचा मुलगा दिसतोयस तू? बरोबर न? बोल की!"

भीतीने थरथर कापतच मुलगा उत्तरला, "होय." मग पहारेकऱ्याने दातओठ खात त्याला चांगल्या शिव्या मोजल्या अन् म्हणाला, "बदमाष कुठचा! सांग आता या चिंचेच्या फोकाने मारून तुला चांगला सरळ करू, की हे काम तुझ्या बापावर सोपवू?"

थरथरतच मुलगा म्हणाला, "तू नको मारू, माझ्या बाबांनाच सांग."

"ठीक आहे, चल तर आपल्या बापाकडे!" असे म्हणत मुलाची बकोट धरून पहारेकरी त्याला खेचू लागला.

"थांब! मीच आत्ता बाबांना बोलवतो." असे म्हणून मुलगा मोठ्याने "बाबा! बाबा!" हाक मारत ओरडला.

दुसऱ्याच क्षणी तिथल्याच एका झाडावरून या मुलाचा बाप वीरसिंह घाबरून खाली येताना दिसला! त्याच्या पाठीवर आंब्यांचे एक मोठेसे पोतेच लटकत होते!

सौ.शुभा भिषून





# रूप-परिवर्तन

आपला निश्चय अढळ असणारा विक्रमराजा पुन्हा त्या झाडाजवळ गेला. फान्दीला लटकलेले प्रेत काढून ते आपल्या खांद्यावर टाकून, नेहमीप्रमाणे मौन स्वीकारून तो स्मशानाची वाटचाल करू लागला. मधेच त्या प्रेतात निवास करणारा वेताळ बोलू लागला, "राजा! या वेळी तर आपल्या राजवाड्यातल्या मऊ शय्येवर पडून तुला आरामात झोपी जायला हवं होतं. पण तू तर या एकाकी अन् भीतीदायक स्मशानात मध्यरात्री कष्ट उपसत बसला आहेस. हे पाहून मला तुझी फार दया येत आहे. पण मोठमोठे विवेकी पुरुषही कधी-कधी स्वतःच्याच बाबतीत अगदी बुध्दिहीन असल्यासारखे निर्णय घेतात. असे निर्णय घेण्यामागची त्यांची



भूमिका शोधणं आपल्याला कठीणच! त्याचा पुरावा म्हणून मी तुला मालव देशाच्या युवराजाची गोष्ट सांगतो. त्याचे एका तरुणीवर जिवापाड प्रेम होते. पण तिच्याबाबत त्याने आजवरी जे वर्तन केले ते केवळ फार असंगतच नव्हे, तर अविवेकीपणाचेही होते. गोष्ट ऐकताना तुझी करमणूकही होईल अन् थकवाही नाहीसा होईल, गोष्ट नीट लक्ष देऊन ऐक." आणि वेताळ मालवदेशच्या युवराजाची गोष्ट सांगू लागला.

मालवराजा वीरसिंह चांगलाच म्हातारा झाला होता. त्याला सूर्यवर्मा नावाचा एकच पुत्र होता. सूर्यवर्मा आता पुरेसा मोठा झालेला होता; तेंव्हा त्याचा विवाह करून देऊन लगेच राज्याभिषेकही करावा, असा राजाचा विचार होता. वधु शोधायचा काही प्रश्न नव्हताच, कारण कुंतलदेशची राजकन्या चन्द्रप्रभा व सूर्यवर्मा यांचे एकमेकांवर फार प्रेम होते. चन्द्रप्रभेचा पिता कुन्तलराजाही या विवाहाला तयार होता. परन्तु दरबारी पुरोहितच एक वर्षापासून चांगला मुहूर्त नाही नाही म्हणत टाळाटाळ करत राहिला होता.

अशातच सूर्यवर्मा एक दिवस आपला मित्र विदुषक याला घेऊन रथातून फिरायला गेला होता. रथ जंगलातल्या रस्त्यातून जात होता. जंगली जनावरें व तऱ्हेतऱ्हेच्या पक्ष्यांच्या आवाजांनी जंगल दुमदुमून गेले होते. एकूण वातावरण सूर्यवर्माला छान वाटले. मधेमधे काही चुटके, विनोद वगैरे सांगून विदुषकही त्याला हसवत होता.

सूर्यवर्मा अशा प्रकारे सूर्यास्तापर्यंत जंगलात फिरत राहिला. चहूकडे अन्धार पसरू लागला, तेंव्हा युवराजाने सारथ्याला रथ राजधानीकडे परत फिरवायला सांगितला. अंधारात वाट चुकायची भीती असल्यामुळे सारथ्यालाही तेच हवे होते. तो घोड्यांना वेगाने पिटाळू लागला. जंगलातल्या ओबडधोबड रस्त्यावरून रथ वाऱ्याच्या वेगाने धावू लागला.

इतक्यात रस्त्याच्या मधेच हत्तीच्या ओरडण्याचा आवाज ऐकून घोडे बुजले आणि रस्ता सोडून ते झाडोऱ्यातून बेफाम धावू लागले. सारथीही त्यांच्यावर ताबा मिळवू शकेना.

या आकस्मिक प्रकाराने सूर्यवर्मा व विदुषक अवाक झाले. थोड्याच वेळात परिस्थिति ध्यानात येऊन रथातून उडी टाकावी की कसे-या विचारात ते पडले. इतक्यात रथाचे एक चाक एका मोठ्या झाडाच्या खोडाला घासत जाऊन पुढे गेले. परिणामतः रथ उलटून उतारावर घसरला. विदुषक व सारथी जवळच्याच झाडोऱ्यात पडले अन् सूर्यवर्मा मात्र घरंगळत जाऊन जवळच्या सरोवरात पडला.

थोडया वेळात भिजल्या कपड्यातला युवराज थरथरत सरोवरातून बाहेर पडला. लहान सहान जखमा झालेले विदुषक अन् सारथी जेंव्हा झाडीतून बाहेर पडले, तेंव्हा युवराज त्यांच्या दृष्टीस पडला. त्याला पाहून तर त्यांच्या आश्चर्याला पारावारच उरला नाही!

त्यांचे आश्चर्य पाहून सूर्यवर्माने त्यांना विचारले, "असे काय रोखून पहाताय माझ्याकडे?"





पण आपला आवाज ऐकून आता खुद्द सूर्यवर्माही आश्चर्यात पडला! कारण त्याचा कडक, धारदार आवाज जाऊन तो आता कोमल आणि एकाद्या स्त्रीच्या आवाजासारखा मधुर झाला होता! त्याने आता आपल्या शरीराकडे निरखून पाहिलं. साडी, चोळी, हातात बांगड्या अन् पायात पैंजण! कसरतीने बलवत्तर बनलेले लोखंडाच्या कांबीसारखे शरीर आता कोमल व नाजुक बनलेले होते.

सूर्यवर्माला आता कुठे कळून चुकले की सारथी व विदुषक आपल्याकडे असे आश्चर्याने का पहात आहेत. त्या सरोवराच्या पाण्यातच अशी काही अद्‌भुत शक्ती असली पाहिजे की ज्यामुळे आपले रूप स्त्रीत परिवर्तन झाले आहे.

यानंतर त्या तिघांनी मिळून रथ अुतारावरून अुचलला व घोड्यांना धरून आणून रथाला जुंपले. सकाळ होता होता ते राजधानीत पोचले.

आपल्या मुलाचे मुलीत रूपान्तर झाल्याचे कळल्यावर राजाराणी फार दुःखी झाले. सकाळनंतर ही बातमी दावानलाप्रमाणे संपूर्ण राज्यात पसरली.

"आपला युवराज सूर्यवर्मा याची आता सूर्यप्रभा झाली आहे." असे लोक आपसात म्हणू लागले.

त्या दिवशी सूर्यवर्मा लज्जेमुळे राजवाड्याबाहेर पडलाच नाही. त्याचे शरीर जरी स्त्रीरूप झाले असले तरी मन काही त्याप्रमाणे बदलले नाही. त्याचे मन अजूनही पूर्वीच्या सूर्यवर्माचेच राहिले होते. रूप स्त्रीचे, अन् विचार मात्र पुरुषाचे! अशा प्रकारे परस्पर विरोधी गोष्टीमुळे तो गोंधळून गेला होता.

एके दिवशी राजा वीरवर्माने दरबारी दैवज्ञाला विनंती केली की, त्यांनी आपल्या पुत्राच्या या प्रश्नावर काही तोडगा पहावा.



दैवज्ञाने सांगितले की, "महाराज, आपल्या राज्याच्या ईशान्येला एक अद्‌भुत असं मायासरोवर आहे. त्याबद्दलची माहिती फारच थोड्या लोकांना आहे. एका यक्षाच्या शापामुळे त्या सरोवरात प्रवेश करणारा पुरुष स्त्रीत, अन् स्त्री पुरुषात परिवर्तित होते. युवराज चुकून त्याच सरोवरात पडल्यामुळे ही आपत्ति ओढवली आहे. केवळ 'दुर्भाग्य' समजून आता गप्प रहाण्यावाचून काहीच इलाज नाही. आपण काहीच करू शकणार नाही."

हे बोलणे ऐकून राजाला फारच दुःख वाटले. या परिस्थितीत काय करायला हवे याबद्दल तो विचार करू लागला. एका निरोप्या बरोबर त्याने कुंतलराजला ही घटना कळवून सांगितले की, "हे राजा, माझा पुत्र दुर्भाग्याने निसर्गाविरुध्द स्त्रीरूप धारण करून बसला आहे, अन् त्यामुळे आता तो आपल्या कन्येशी विवाहाला अयोग्य झालेला आहे."

अुत्तरादाखल चन्द्रप्रभेने त्याच दूताबरोबर पत्र लिहिले—"युवराज! आपली परवानगी असेल पर मीही त्या मायासरोवरात अुतरून पुरुषरूप प्राप्त करून घेईन. मग आपल्याला पति-पत्नी बनायला



काहीच हरकत रहाणार नाही."

पत्र वाचून सूर्यवर्माने ते आपल्या माता-पित्यांच्या हाती ठेवले. चन्द्रप्रभेचा विचार जाणून ते म्हणाले, "बेटा, चन्द्रप्रभेचं तुझ्यावर किती प्रेम आहे हे यावरून कळून येतंय. तिच्या या विचाराला तुझी काही हरकत नाही नं?"

यावर स्त्रीरूपी सूर्यवर्मा बराच विचारात पडला. नंतर तो निर्धाराने म्हणाला, "बाबा, चन्द्रप्रभेच्या या विचाराशी मी मुळीच सहमत नाही. या गोष्टीला संमति देणं म्हणजे पुढे आणखी संकटांच्या मालिकेला तोंड देणं! मी

आजच तिला पत्र लिहून कळवतो, की तिने दुसरा योग्य युवराज पाहून त्याच्याशी विवाह करावा आणि आपलं जीवन सुखी करावं."

इथवर गोष्ट संपवून वेताळाने विक्रमराजाला विचारले, "राजा, सूर्यवर्माने असा निर्णय का बरं घेतला? अशा प्रकारे विचार करणं-म्हणजे कार्यकारणाचा संबन्ध शोधणं, हे चूक नव्हे का! तो अविवेकी अन् अहंमन्य आहे असं समजून आपण गप्प रहावं का! त्याच्या मनात असं आलं असेल न, की चन्द्रप्रभा जेंव्हा पुरुष बनेल, तेंव्हा आपल्यालाच तिच्यासमोर दबून-नमून रहावं लागेल? या विचारनेच त्याची पुरुषी अस्मिता, त्याचा 'अहम्' वृद्धिंगत झाला असेल? त्याचं जर खरोखरच चन्द्रप्रभेवर प्रेम असतं, तर तिने दुसऱ्या कोणाबरोबर विवाह करावा, असं लिहूच कसं शकला असता? काही असो; सूर्यवर्माचं वागणं विवेकशून्य आणि असंबद्धच वाटतं आहे; होय न? या प्रश्नांचं अुत्तर माहीत असून तू दिलं नाहीस, तर तुझं मस्तक फाटून जाईल."

राजा विक्रम अुत्तरला, "सूर्यवर्माच्या निर्णयाचं कारण शोधणं मुळीच कठीण नाही. त्याचे कार्यकारण संबंध तर अगदी स्पष्ट आहेत. स्त्रीरूप व पुरुष मनाने जगणं किती कठीण आहे ते तो अनुभवानेच जाणून चुकलाय! आता युवराणी चन्द्रप्रभा सरोवरात अुतरून पुरुषरूप प्राप्त करू शकली, तरी मनाने ती स्त्रीच रहाणार अन् परिणामतः तिलाही मानसिक पीडेला तोंड द्यावे लागणार. सूर्यवर्माचं खरोखरच तिच्यावर जिवापाड प्रेम आहे. असं प्रेम करणारा कोणीही पुरुष आपल्या प्रेमिकेला आजीवन अशी पीडा सहन करू देणार नाही. यामुळेच त्याने चन्द्रप्रभेचा प्रस्ताव नाकारला. त्याच्या या निर्णयात अविवेक, असंबध्दता किंवा पुरुषी अंहकार वगैरे वासालाही नाही!"

अशा तऱ्हेने सुयोग्य अुत्तर देअूनही राजाचे मौन भंग झाल्यामुळे शवातील वेताळ शवासह अदृश्य झाला आणि पुन्हा त्याच झाडाच्या फान्दीला लटकू लागला.

कल्पित





# जन्मजात कवि

वेंकटापुरच्या जमीनदाराला काव्य-शास्त्राची आवड असल्याने कवि-पंडितांवर त्याचे फार प्रेम असे. दरवर्षी वसन्तोत्सव साजरा करून कवि लोकांचा तो सत्कार करी. त्याच्या दरबारच्या कवींची मुलेही काव्यवाचन करून दरबारी व जमीनदार यांचे खूप मनोरंजन करीत.

अशा प्रकारे पद्यपठन करणाऱ्या तीन बालकवींचे खूप कौतुक करून जमीनदार म्हणाला, "अरे वा! वंशपरंपरेप्रमाणे कविता चातुर्य प्राप्त करणारे हे बालकवि मला फारच आवडले आहेत."

यावर दिवाण म्हणाला, "हुजूर त्यांचं काव्य हे केवळ पोपटपंचीसारखं आहे. कविता नावाची ही चीज काही शिकून येत नसते. ती तर जन्मजात आपोआप येणारी चीज आहे. हे बालकवि कवि-परिवारातलेच आहेत, त्यामुळे थोडीफार नक्कल ते नक्कीच करू शकतात, पण स्वतःच्या कल्पना-शक्तीच्या बळावर भविष्यात ते कविच बनू शकतील की नाही, याची काही शाश्वति नाही."

जमीनदार ताबडतोब म्हणाला, "ठीक आहे, हे भविष्यात कवि बनू शकतील की नाही, याची परीक्षा मीच घेईन."

दोन महीने निघून गेले. जमीनदाराच्या वाढदिवसाचा अुत्सव साजरा केला जात होता. त्या रात्री आमराईत मेजवानीचा बेत होता. कवि-पंडितांबरोबरच त्या मेजवानीला अुपस्थित असणारात ते तीन बालकवि खास आमन्त्रित केले गेले होते.

माणिक जेऊरकर

मेजवानी संपली. तोवर आकाशात अर्धचन्द्र चांगलाच वर आला होता. जमीनदाराने तीन्ही बालकवींना आपल्याजवळ बोलावले व म्हटले, "तो आकाशातला अर्धचन्द्र पहा, अन् तुम्हाला त्याबद्दल काय वाटतंय ते सांगा."

तिघांनीही त्या अर्धचन्द्राकृतीकडे थोडा वेळ पाहिले.

"भगवान शंकराच्या जटेतल्या चन्द्रापैकी जो अर्धा उरला आहे, तो आत्ता आकाशातून डोकावत आहे."- एक बालकवि उद्गारला.

"असं वाटतंय की जणू काही जमीनदार महाशयांच्या जन्म-दिनोत्सवासाठी त्या चन्द्राने आपला अर्धा प्रकाश या दिव्यांना बहाल केला आहे." दुसरा बालकवि म्हणाला.

त्यांच्या उत्प्रेक्षा ऐकून जमीनदार प्रसन्न झाला. तेथे असणाऱ्या सर्व पाहुण्यांनीही हर्षोद्गार काढले.

तेवढ्यात तिसऱ्या बालकवीकडे वळून जमीनदाराने विचारले, "बालकवि! आता तू सांग बरं हा अर्धचन्द्र पाहून तुला काय वाटतं?"

त्या तिसऱ्या बालकवीने पुन्हा एकदा आकाशाकडे पाहून घेऊन म्हटले, "मी तर शेवटी बालकवीच ना! मला तर हा चन्द्र पाहून तोंडात विरघळणारी 'लिंबाची फाक' वाली गोळीच आठवतेय!"

स्वत:ला 'बाल' कवि म्हणवून बालसुलभ वृत्तीने त्याने जेंव्हा अशा प्रकारे चमत्कारपूर्ण पद्धतीने उत्तर दिले, तेव्हा जमीनदार त्याच्यावर फारच खूश झाला; अन् त्याला आशिर्वाद देत तो म्हणाला, "बालकवि, तू भविष्यात एक जन्मजात कवि बनून कीर्ति मिळवशील."



# चान्दोबा पुरवणी-४४



भारतातील पशु-पक्षी

## गेंडा

भारत, इंडोनेशिया व आफ्रिकेच्या काही भागात गेंडा हे जनावर आढळते. गेंड्यांचे पाच प्रकार आहेत. त्यातला भारतीय विशाल गेंडा खूप प्रसिद्ध आहे. आफ्रिकेत आढळणारे काळे गेंडे, सफेद गेंडे, जावातील गेंडे व सुमात्रातले गेंडे हे उरलेले चार प्रकार होत. कुरूप दिसणाऱ्या या गेंड्यांचे वैशिष्ट्य म्हणजे नाकाच्या पृष्ठभागावर उगवलेलं शिंग! भारतीय गेंड्यांच्या नाकावर फक्त एकच शिंग असते, पण आफ्रिकी गेंड्यांच्या नाकावर दोन-दोन शिंगे असतात. ही शिंगे म्हणजे हाडे नव्हेत. त्यांच्या चेहऱ्यावर केसांचे थरचे थर जमून कडक होतात आणी त्यांना शिंगाचा आकार प्राप्त होतो. त्यांच्या कानांच्या चारही बाजूंना व शेपटीच्या टोकांवर केस असतात. त्यांचे शरीर खूप वजनदार व अगडबंब असते. या जनावरांची उंची सामान्यत: १८० सें.मी. असते.

काही लोकांचा असा विश्वास आहे की गेंड्यांच्या शिंगात औषधी गुण आहे, व या शिंगांसाठीच लोक निर्दयपणे गेंड्यांची शिकार करतात. यामुळे त्यांची संख्या दिवसें दिवस रोडावत चालली आहे. अशा तऱ्हेने नष्ट होणारी ही जात वाचवण्यासाठी आपल्या सरकारने यांच्यासाठी खास वन्यपशु संरक्षण केन्द्रांची व्यवस्था केलेली आहे. अशा प्रकारची प्रसिद्ध केन्द्रे म्हणजे-काझिरंगा, जल्दापाडा, गोरुमारा व आसाम मधील सोनाई रुपाई. ऐतिहासिक काळापूर्वीही ही जनावरे भरपूर संख्येने अस्तित्वात असल्याचे पुरावे आहेत.

बालकांविषयी बातम्या



# लहान वयाची फिल्मी संगीतकार

आंध्रच्या पश्चिम गोदावरी जिल्ह्यांतील पाच वर्षांची एक बालिका आई-बापांना काहीही न सांगता सरळ मद्रासला निघून आली. आपल्या प्रिय गीतकार व संगीतकारांना भेटण्याची तीव्र इच्छा ती दाबू शकली नाही. खूपदा विनंती करूनही तिच्या पित्याने तिच्याकडे लक्ष न दिल्यामुळे कंटाळून शेवटी तिने हा पळून जाण्याचा मार्ग स्वीकारला!

अशा तऱ्हेने सात वर्षांपूर्वी पळून आलेल्या या बालिकेने प्रसिद्ध गायिका चित्रा हिने तेलगू फिल्मसाठी गायलेल्या गाण्याला संगीत दिले आहे. आता या फिल्म संगीतकार मुलीचे वय आहे बारा वर्षे! तिचे नाव आहे श्रीलेखा!

सात वर्षांपूर्वी पाच.वर्षे वय असताना ती जेंव्हा मद्रासला पळून आली. तेंव्हा पोलिसांनी तिला पकडून आईबापांच्या हवाली केले होते. तिचे संगीत प्रेम पाहून ते विचारात पडले व आपल्या कर्तव्याबद्दल विचार करू लागले. त्यावेळी स्वतः संगीतकार असणाऱ्या त्यांच्या एका नातेवाईकाने तिची जबाबदारी स्वतःवर घेतली. त्या संगीतकाराचे नाव आहे मरकतमणि. त्याने श्रीलेखेला शास्त्रीय संगीताचे पद्धतशीर ज्ञान दिले, व त्याबरोबरच तो तिला लोकसंगीत व पाश्चिमात्य संगीताचे धाडेही देत राहिला. अशा तऱ्हेने श्रीलेखा संगीत मोठ्या प्रेमाने शिकत राहिली.

ती शाळेतही जात नसे. दोन वर्षेपर्यंत श्रीलेखाने मोठ्या प्रेमाने व अचल श्रद्धेने संगीताचे शिक्षण घेतले. ती फिल्मस् पहात असे, फिल्मी संगीत ऐकत असे व बास! संगीताशिवाय अन्यत्र कुठेही तिचे मन लगत नसे. तिची स्मरण शक्ति फार धारदार आहे. शेकडो चाली व श्लोक ती सहजपणे लक्षात ठेवू शकते. तिच्या अपूर्व संगीतज्ञानामुळे प्रभावित होऊन मरकतमणी तिला रेकॉर्डिंग थिअेटरमध्ये घेवून जात असे.

एकदा रेकॉर्डिंगच्या वेळी ऑर्केस्ट्रात भाग घेण्यासाठी मरकदमणीने श्रीलेखाला आमन्त्रण दिले. तिला हार्मोनियम वाजवता येत असे. त्यामुळे ती सुलभपणे हार्मोनियम वाजवू लागली. एका तमिळ कवीने त्या सुरांचे केवळ तीन मिनिटांत एक गाणे बनवले. मोठमोठे अनुभवी संगीतकारही या प्रतिभावान बालिकेवर फार प्रसन्न झाले.

संगीत टीकाकारांनी श्रीलेखाचे संगीत फार पसन्त केले व म्हटले की-शास्त्रीय, लोक व पाश्चिमात्य संगीताचे हे एक अद्भुत असे सम्मेलन आहे! सध्या तरी फिल्म संगीत देणारांमधे सर्वात कमी वयाची संगीतकार आहे श्रीलेखाच! लवकरच गिनीज बुक ऑफ वर्ल्ड रेकॉर्डमध्ये तिचा अुल्लेख येण्याची शक्यता आहे.

श्रीलेखाची इच्छा आहे की आपल्या नावाबरोबर आपले शिक्षक व शुभचिन्तक मरकतमणि यांचे नावही सतत जोडलेले असावे. म्हणून तिने 'मणिमेखला' असे नाव धारण केले आहे. मणिमेखलेचे संगीत-दिग्दर्शन असलेल्या फिल्म्स् लवकरच अस्तित्वात येणार आहेत.

जीन्स कुरता किंवा सलवार-कमीज घालून कपाळावर तिलक लावलेली, खूप धारदार दिसणारी ही बाल संगीतकार रोज देवघरात खूप वेळ घालवते. चॉकलेट व आइसक्रीम तिला फार आवडते. वेळ मिळेल तेव्हा कॅरम खेळायलाही तिला आवडते.

# तुम्हाला माहीत आहे काय?

१. केरळमधे शेतीच्या वर्षाचा आरंभ 'विषु' (युगादी) या नावाने साजरा केला जातो. त्याचप्रमाणे अुत्तर भारतातही एका राज्यात नव्या सालाची ओळख म्हणून बरोबर ह्याच दिवशी एक सण साजरा केला जातो. ह्या सणाचे नाव काय? ते राज्य कोणते?
२. मे दिवस (मे-डे) याच दिवशी एका ख्रिश्चन संताचा दिवस ही साजरा केला जातो. तो सन्त कोण?
३. बॉकेफला शहर दोन विश्वविख्यात नावांची आठवण करून देते. ती नावे कोणती?
४. तेल चोपडलेल्या नारळाचा, भारतातल्या एका खेळात अुपयोग केला जातो. त्या खेळाचे नाव काय व तो कोठे खेळला जातो?
५. चन्द्रगुप्त मौर्याने किती वर्षे राज्य केले? त्यापेक्षाही एक वर्ष जास्त राज्य केलेल्या त्याच्या पुत्राचे नाव काय?
६. रशियन भाषेची लिपि कोणती?
७. केन्द्र-सचिव म्हणून प्रथम स्थान मिळालेल्या एका राजवंशीय स्त्रीचे नाव काय?
८. चन्दीगड मधे असलेल्या 'रॉक गार्डन' चा निर्माता कोण?
९. कट्टर पंथाविरुद्ध गेलेल्या आपल्या एका कन्येला औरंगजेबने २० वर्षे कैदेत ठेवले होते. तिचे नाव काय?
१०. जयदेवच्या 'गीत-गोविन्द' मधील गीतांना पवित्र 'ग्रन्थ-साहेब' मधे स्थान देणारा शीख गुरु कोण?
११. घराच्या अंगणात तुळशीचे रोप का लावतात?
१२. कलकत्ता पार्लमेण्टमधे निवड झालेला, पण राजनीतिज्ञ नसलेला माणूस कोण?
१३. कार्ल लुईसने स्थापन केलेले १०० मीटर्सचे रेकॉर्ड कोणी मोडले?
१४. ज्यांना आवाजच नसतो, असे बगळे आपल्या सोबतिणीला कसे आकर्षित करतात?
१५. नेपोलियन १८०४ मधे फ्रान्सचा सम्राट बनला. त्याच वर्षी परिवहन क्षेत्रात एक महान् घटना घडली. ती कोणती?

## उत्तरे

१. "बिहू", आसाम
२. सेंट जोसेफ, येशूचा पालक (पिता).
३. अलेक्झांडर व त्याचा घोडा बुसेफालस. हे नगर घोडा मेलेल्या जागी निर्माण झाले.
४. यूबी-लकवी, मणिपुर
५. २४ वर्षे. अशोकचा पिता बिन्दुसार.
६. सिरिल्लिक.
७. नेहरू मंत्रिमंडळात राजकुमारी अमृत कौर. ही स्वास्थ्य-मंत्री पहिली स्त्री-मंत्री होती.
८. नेकचन्द.
९. झेबुन्निसा.
१०. गुरु अर्जुनसिंह.
११. तुळस ही सुरक्षा व समृद्धीची सूचक मानली जाते.
१२. मेघनाथ साहा.
१३. लिरॉय बुरेल.
१४. मोठ्या अुत्साहाने नाच करून.
१५. पहिले स्टीम-इंजिन ट्रेविथिकने अबाध गतीने चालवले होते.

# चांदोबाच्या बातम्या

### तळहाताच्या आकाराचे कॉम्प्यूटर्स!



नुकतेच तळहाताएवढ्या आकाराचे पॉकेट कॉम्प्यूटर्स बनविले गेले आहेत. त्यांचे नाव आहे-पिको कॉम्प्यूटर. 'पिको' शब्दाचा अर्थ आहे 'ट्रिलियनचा एक भाग'. याबाबत विचार करणेही सोपे नाही. डेस्क टॉप पर्सनल कॉम्प्यूटरला मायक्रो-कॉम्प्यूटर म्हणतात. हा आतापर्यंत सर्वात लहान कॉम्प्यूटर मानला जात असे. पण 'पिको कॉम्प्यूटर' हा त्याहीपेक्षा लहान आहे. या तळहाताच्या आकाराच्या कॉम्प्यूटरमधे न्यू सुपर चिपचा उपयोग केला जातो. आता हा (P.L) कॉम्प्यूटर आपल्या हातावरच्या घड्याळात किंवा पेनमधेही बसवण्यात येण्याचा दिवसही दूर नाही.

### अति वेगवान आगगाडी



जपान मधे वायव्य प्रान्तात धावणारी शिनकानसेन एक्स्प्रेस ताशी ३४५ कि.मी. वेगाने धावून एक रेकॉर्ड प्रस्थापित करत आहे. जोमो-कोगेन व उरावा या दोन स्टेशनांमधील बोगद्यात हिची पहिली यात्रा झाली. मागल्या मार्चमधे ही गाडी ३३७ कि.मी. वेगाने धावली होती. तरीही सर्वात जास्त गतीचे विश्वरेकॉर्ड फ्रेंच टीजीव्ही सुपर एक्स्प्रेसलाच प्राप्त झाले आहे. (५१५.३ कि.मी.). हे मे १९९० मधे बनले.

### अतिप्राचीन शिला



जवळ जवळ १५० वर्षांपूर्वी (१८५० च्या आसपास) स्कॉटलंडमधे काही शिला खोदून काढण्यात आल्या होत्या. ऑक्सफर्डच्या वैज्ञानिकांनी नुकतीच त्यांची परीक्षा केली, आणि त्यांनी असे अनुमान व्यक्त केले की ३७० मिलियन वर्षांपूर्वी पृथ्वीवर फिरणाऱ्या पाठीचा कणा असलेल्या जनावरांशी यांचा संबंध आहे. कदाचित हे मोठमोठे साप किंवा मगरी असतील असा विचार प्रकट केला गेला. ग्रीनलंडमधे सापडलेल्या शिला याच आतापर्यंत सर्वात प्राचीन मानल्या जात. परंतु आता या स्कॉटलंड-मधील शिळा त्याहीपेक्षा प्राचीन मानल्या जात आहेत.



# चिकाटीची किंमत

देवासर गावात सदानन्द नावाचा एक श्रीमन्त गृहस्थ रहात असे. आपल्या जमीन-जुमल्या पासून मिळणाऱ्या प्राप्तीचा हिशोब वगैरे लिहिण्यासाठी योग्य माणसाच्या शोधात तो होता. जवळच्या गावात रहाणाऱ्या त्याच्या विद्यानन्द नावाच्या मित्राला जेंव्हा याबद्दल कळले,तेंव्हा एक शिफारस-पत्र देऊन त्याने आपला भाचा नारायण याला सदानन्दकडे पाठवले.

नारायण जेंव्हा सदानन्दच्या घरी पोचला, तेंव्हा ती खबर नोकराकडून सदानन्दाला कळली. तो आपल्या नोकराला म्हणाला, "हे बघ, त्या मुलाला सांग की मी घरी नाहीये! अन् मला परत यायला कमीत कमी दोन-तीन तास लागतील."

नोकराने हा निरोप नारायणला सांगितला. परन्तु नारायण मात्र पुन: पुन्हा नोकराला विचारू लागला "आले का मालक?" अन् नोकर उत्तर देत राहिला, "नाही आले अजून." अशा तऱ्हेने एक तास निघून गेला.

नारायणला वाटू लागले की, आज काही सदानन्दची भेट होणार नाही. आता एक-एक मिनिट त्याची वाट पहात बसून रहाणे त्याला फार जड जाऊ लागले. नोकराला बोलावून तो म्हणाला, "मालक आले की त्यांना सांग की, मी आत्तापर्यंत त्यांची वाट पहात बसलो होतो व अगदी आत्ताच दोन मिनिटांपूर्वी इथून निघून गेलो मी. इथे का आलोय हे माहीत आहे न तुला?"

नंतर नारायण तेथून नदीकिनारी आला. त्याने ठरवले होते की आता काही आज सदानन्दला भेटणे जमणार नाही. आणखी दुसऱ्या एकाद्या दिवशी भेटावे असा विचार करून आपल्या गावी परतावे असे त्याने ठरवले. नदीकिनाऱ्यावर बरेच लोक आपसात बोलत उभे असलेले त्याला दिसले.

त्यांच्यातल्या एकाला नारायणने विचारले की नाव केंव्हा निघेल.

अनुसूया अंभग



तो माणूस उत्तरला, "केंव्हा निघेल हे सांगणं कठीण आहे. नाव चालवणाऱ्या नावाड्याचाच कुठे पत्ता नाहीय. एक तासभर आम्ही त्याची वाट पहात आहोत."

पहाता पहाता आणखी एक तासही निघून गेला. तेंव्हा नारायण अतावीळ होत म्हणाला, "नावाडी केंव्हा येईल, अन् येईल का नाही कुणास ठाऊक! आपल्यातला कोणी जाऊन त्याला शोधून का आणत नाही?"

तेंव्हा गर्दीतला एकजण म्हणाला, "तुमच्यासारखंच आम्हाला ही पलीकडे लवकर जायचंय, पण घाई करून काय उपयोग? आपल्याला जशी लवकर पलीकडे जायची इच्छा आहे, तशी नावाड्यालाही आपल्याला पोचवून पैसे कमावण्याची गरज आहेच ना?"

आणखी थोड्या वेळाने नारायणची प्रतीक्षा करण्याची सहनशक्ति संपली. अन् तो लोकांना म्हणाला, "इतका उशीर होतोय, पण तुम्हा कुणाला त्याचं काहीच नाही! मीच जाऊन त्या नावाड्याला घेऊन येतो आता." अन् नारायण घाटावरून गावाकडे चालू लागला.

गावात नावाड्याचे घर शोधून काढून नारायण तेथे पोचला, तेंव्हा त्याला कळले की, त्याचं पोट फार जोरात दुखू लागल्यामुळे तो औषधासाठी दवाखान्यात गेला होता. औषध मिळायलाच उशीर झाल्यामुळे आत्ताच तो धावत-पळत घाटाकडे गेला आहे.

आता नारायण भराभरा पुन्हा घाटाकडे गेला. पण तोवर नाव निघूनही गेली होती. नदीच्या मध्यावर ती दिसत होती. नारायण वैतागून आता तिकडे पाहू लागला. इतक्यात नुकताच तेथे आलेला एक माणूस त्याला म्हणाला, "तू नाव वेळेवर पकडू शकला नाहीस असं दिसतंय. आता आणखी एक तास इथे थांबलास, तर ही आता गेलेली नाव परत येईल आणि मी नावाड्याला आपल्या दोघांसाठीच पुन्हा जायची विनंती केली, तर तो आपल्याला घेऊन जाईल.

बोलता बोलता नारायणला कळले की आपण शिफारस-पत्र ज्याच्याकडे घेऊन गेलो होतो तोच हा सदानन्द! आता नारायणचा चेहरा आनन्दाने उजळला. त्याने शिफारस-पत्र तेथेच ताबडतोब दाखवायचा प्रयत्न केला. पण सदानन्दने ते पत्र स्वीकारले नाही.

"तुझ्या मामाने मला अगोदरच कळवलं होतं, की तो तुला माझ्याकडे पाठवणार आहे. तू मला घरी भेटायला हवंस, इथे रस्त्यावर नव्हे, पुन्हा केंव्हा तरी माझ्या घरी येऊन भेट मला." सदानन्द त्याला म्हणाला.

नारायण आता हताश होऊन काही बोलला नाही. थोड्या वेळाने नाव परत आली. नारायण व सदानन्द तीत बसून नदीपार पोचले.

नारायण बरोबरच सदानंद सरळ विद्यानन्दच्या घरीच आला आणि नारायण आपल्या घरी आल्यासून परत येईपर्यंत जे जे घडले, ते त्याने विद्यानन्दला सांगितले व तो म्हणाला, "मला माहीत आहे की तू ज्याला माझ्याकडे नोकरीसाठी पाठवशील, त्याच्यापेक्षा अधिक विश्वासू आणखी कोणी असूच शकणार नाही. माझे आजोबा म्हणत असत की जो चिकाटी धरू शकत नाही, वाट पाहू शकत नाही, त्याला दोनदा वाट पहावी लागते. माझी खूप कामं आहेत अन् मी ती ज्याच्यावर सोपवणार त्याच्या सहनशक्तीच्या, चिकाटीच्या बाबतीत जाणण्याची माझीही इच्छा होती! म्हणून मी नारायणची अशी परीक्षा घेतली."

नारायण हे ऐकून फार शरमिन्दा झाला. तो सदानन्दला म्हणाला, "माझ्यातले दोष आपण मला फार उत्तम तऱ्हेने दाखवून दिलेत. चिकाटी-सहनशक्ती ही माणसात जन्मजात असायला हवी. मी इतकंच सांगू इच्छितो की संधी मिळाली तर आपणासा रख्यांच्या छत्रछायेत राहून मी स्वतःला सुधारेन. मला स्वतःला याबद्दल खात्री वाटतेय."

मोठ्या प्रेमाने नारायणच्या खांद्यावर थोपटत सदानन्द म्हणाला, "तू खरं तेच बोलतोयस हे मला कळतंय. उद्याच येऊन नोकरीवर हजर हो. मला इथे काही कामं आहेत, चलतो मी." अन् सदानन्द तेथून निघून गेला.



# नुकसानीचा हिशोब

एका गावात सुभाष नावाचा एक बडा व्यापारी व नरसिंह नावाचा एक सामान्य शेतकरी यांची खूप मैत्री होती. नरसिंहला नारायण नावाचा एकच मुलगा होता. नारायण शिक्षणात चांगलाच हुशार होता. ही गोष्ट ओळखून त्याच्या शिक्षणासाठी सुभाष नरसिंहला नेहमीच आर्थिक मदत करी.

नारायणचे शिक्षण संपल्याबरोबर नरसिंहने सुभाषला त्याला एकादी नोकरी देण्याबद्दल सुचवले. त्यावेळी शहरातल्या आपल्या व्यापाराचा हिशोब ठेवणासाठी गणितात हुशार असणाऱ्या नोकराची गरज होती हे नरसिंह जाणून होता.

सुभाषने नारायणला बोलावून विचारले, "तुला शेवटच्या परीक्षेत गणितात किती टक्के गुण मिळाले?"

"नव्याण्णव टक्के मिळाले काका!" नारायण उत्तरला.

"म्हणजे तू शंभरात एक चूक केलीस. अर्थात शंभरात एक नुकसान! शंभरात एक, हजारात दहा, दहा हजारात शंभर-अशा तऱ्हेने नुकसान वाढतच रहाणार! माझा तर लाखांचा व्यवसाय आहे, मी असं हजारोंचं नुकसान सोसायला तयार नाही बाबा! तू स्वतःला खरोखर गणितात हुशार समजत असशील, तर राजधानीत खजिन्यात नोकरीसाठी राज्य-पातळीवर ज्या परीक्षा घेतल्या जातात, त्यात भाग घेणं तुला योग्य होईल." सुभाष म्हणाला.

नारायणने तसेच केले. राज्यातल्या कर-वसुली शाखेत अधिकाऱ्याच्या स्थानावर त्याची नियुक्ती झाली. ही बातमी मिळताच सुभाषला भेटून नरसिंह म्हणाला, "नारायणला ही नोकरी मिळाली. यात सरकारी खजिन्याचं काहीच नुकसान होणार नाहीये. तू मोठ्या बुद्धिमानीने स्वतःचं नुकसान होण्यापासून वाचवलेस खरं, पण राजा काही तसं करू शकला नाही." नरसिंह सुभाषला टोमणा मारत होता, यात काहीच शंका नाही.

तेंव्हा प्रेमाने नरसिंहच्या खांद्यावर हात ठेवत सुभाष म्हणाला, "माझ्याकडची नोकरी मोठी, की राजाच्या खजिन्यावरची नोकरी मोठी? मी जेंव्हा नारायण गणितात चांगला हुशार आहे असं पाहिलं तेंव्हा मी असा विचार केला की, भविष्यात यांच काही नुकसान होऊ नये. म्हणूनच आपल्या नुकसानाबद्दल खोटंच बोलून तुम्हा लोकांना चक्रात फसवलं. नारायणला ही नोकरी मिळाल्याबद्दल मी तर बेहद्द खूष आहे!"





# निरुपयोगी दिव्यशक्ति

शीतल आईबापांवाचून पोरका होता. त्याचा काही जमीन-जुमला वगैरेही नव्हता. त्याचे शरीर मात्र चांगले पिळदार व भक्कम होते. पाहूनच असे वाटे, की हा कुठलेही काम करू शकेल. परंतु तो फार भिडस्त होता. लोक त्याच्याकडून फुकटच काम करवून घेत. त्यामुळे भरपूर मेहनत करूनही त्याला योग्य असा फायदा मिळत नसे. तो मोठ्या कठीण परिस्थितीत जगत होता!

शीतल दिसायला छान तरतरीत होता. त्याच गावात रहाणाऱ्या प्रभातची मुलगी श्यामा हिचे त्याच्यावर फार प्रेम होते. एके दिवशी तिने आपल्या मनची भावना शीतलला बोलून दाखवली व त्याने आपल्याशी लग्न करावे असे ही सुचवले.

शीतलने याबाबत अनुभवी लोकांजवळ सल्ला विचारला. सर्वांनी त्याला एकच सांगितले, "श्यामा मोठी चावट व खोडकर मुलगी आहे, धटिंगण वृत्तीची आहे. ती स्वतःच्या आईवडलांनाच फार त्रास देते. तू तर फार भिडस्त आणि गरीब स्वभावाचा आहेस. तू जर तिच्याशी लग्न करशील तर तुझं जीवन नरक बनेल."

लोकांकडून हे बोलणे ऐकून शीतल खरोखरच फार भ्यायला. अन् लग्नाचा विचार त्याने मनातून काढून टाकला.

एके दिवशी श्यामाचा बाप प्रभात शीतलकडे येऊन म्हणाला, "माझी मुलगी तुला सोडून दुसऱ्या कुणाशीही लग्नाला तयार नाही. तू तर अगदीच बेकार अन् नालायक आहेस. माझ्या मुलीच्या खूपच महत्वाकांक्षा .आहेत, त्या पुऱ्या करणे तुझ्याच्यानं जमणार नाही. मी तिच्यासाठी खूप चांगला नवरा शोधू शकेन. पण काय उपयोग? तू जोवर इथे तिच्या नजरेसमोर रहाशील, तोवर ती दुसऱ्या कुणाशी लग्नाला तयार व्हायची नाही.

सुमन दीक्षित



तू दया कर माझ्यावर! काही दिवस हा गाव सोडून दुसरीकडे कुठं तरी रहायला जा."

शीतलने प्रभातचे सांगणे मानले व तो गाव सोडून जंगलाच्या वाटेने चालू लागला. रस्यात त्याला एक साधु भेटला. शीतलने त्याला साष्टांग प्रणिपात केला व आपली रामकहाणीही सांगितली. साधूने त्याला स्वतः बरोबर चलायला सांगितले.

शीतल मुकाट्याने साधूमागोमाग चालू लागला. दोन आठवडे त्याने साधूची खूप सेवा केली. शीतल साधूसाठी पाणी आणून भरत असे, स्वयंपाक करत असे, त्याचे पायही दाबत असे.

अशा रीतीने दोन आठवडे गेले. अन् साधु त्याला म्हणाला, "आता मला काशीला जायचंय, तेंव्हा तू आता दुसरा एकादा साधू पहा.

मुकाट्याने मान हलवून शीतल जायला निघाला. ते पाहून साधूला त्याची दया आली अन् त्याने त्याला थांबायला सांगितले. शीतल थांबला.

साधु म्हणाला, "तू खरोखरच फार भिडस्त आहेस. असा राहशील तर लोक तुला फसवतील. मी तुला काही दिव्यशक्ति देतो. तू त्या शक्तींचा स्वतःसाठी नव्हे, पण दुसऱ्यांसाठी करशील, तेंव्हाच त्यांचा उपयोग होईल. तू ज्याला आपला मालक मानशील, तो जे म्हणेल ते तू करू शकशील." असे म्हणून साधूने शीतलच्या डोक्यावर हात ठेवून एक मन्त्र म्हटला आणि त्याला आशिर्वाद देऊन साधु तेथून निघून गेला.

शीतल तेथून परत फिरला. वाटेत एका गावात तो थांबला. एका घरासमोर उभा राहून शीतलने मालकाकडे काम मागितले.

मालकाने चिडून म्हटले, "अरे तू काय काम करणार? माझ्या घरामागे एक तलाव आहे. त्यांचं सारं पाणी पिऊन दाखव पाहू!"

शीतलने 'हो' म्हटले अन् तो घरामागे जायला निघालेला पाहून मालक फार आश्चर्यात पडला. परन्तु पहाता-पहाता शीतलने तलावातले सारे पाणी पिऊन टाकले अन् मालकाचे आश्चर्य आणखीच वाढले!

त्या रिकाम्या तलावात मालकाला एक रत्नकंकण सापडले. ते पाहून तो म्हणाला, "माझा जुना नोकर म्हणत होता की कंकण तलावात पडलंय. पण मी विश्वास ठेवला नाही अन् त्याला नोकरीवरून काढून टाकला. त्याच्यासारखा विश्वासू नोकर कुठे शोधूनही सापडणार नाही. असं पहातापहाता तलावातलं पाणी पिऊन टाकणाऱ्या तुझ्या सारख्याला मी रे काय काम देणार? मी आपल्या त्या जुन्या नोकरालाच बोलावून घेईन."

शीतलला वाटले की अगदी जमता जमता आपले काम बिघडून गेले. तो पुन्हा तिथून दुसरीकडे गेला व त्याने तेथील खूप श्रीमंत अशा रामप्रसादकडे काम मागितले.

हा रामप्रसाद एक नंबरचा कंजूष माणूस होता. त्याने शीतलकडून आपले सगळे घर व परसूही साफ करवून घेतले. कठिणात कठीण कामही शीतल मोठ्या सहजतेने करू लागला. तेंव्हा त्याला एक उपाय सुचला. गावातल्या सर्वांसाठी लाकडे फोडून घेणे, कपडे धुणे वगैरे कामे तो शीतलकडून करून घेऊ लागला. गावच्या लोकांकडून तो यासाठी पैसे वसूल करी. पण शीतलला मात्र तो पोटभर खायलाही देत नसे.

शीतलने कित्येक वेळा सांगून पाहिले की, त्याला पगार हवा अन् खाणे थोडे जास्त हवे. पण दरवेळी रामप्रसाद नुसतेच हसून त्याला म्हणे, "तू एक शापग्रस्त प्राणी आहेस. अन् शापग्रस्ताला जसं ठेवायला



हवं, तसंच ठेवतो आहे मी तुला, यातच तुझं कल्याण आहे."

रामप्रसादचे हे वागणे पाहून, इथे आपला काहीच फायदा नाही-हे शीतलने ओळखले आणि तो आपल्या गावी निघून आला. तेथे जाऊन आपल्यावर काय काय बेतले ते सारेचे सारे त्याने प्रभातला सांगून टाकले.

ते ऐकून प्रभात प्रसन्न झाला अन् शीतलला म्हणाला, "तुझ्याजवळ जर दिव्यशक्ति आहेत, तर तुला उगाच इतरांची सेवा करायचं काय कारण? तू माझ्या श्यामाशी लग्न कर अन् तिलाच मालक मानून तिच्या इच्छा पूर्ण कर. यापुढे तूही सुखी होशील अन् मलाही सुख लागेल."

अशा तऱ्हेने श्यामा व शीतल यांचा विवाह झाला. शीतल बायकोला म्हणाला, "तू माझी मालकीण! तू मला आज्ञा देत जा. कितीही कठीण काम असलं तरी मी ते करत जाईन."

यावर लाजून श्यामा म्हणाली, "असं काय म्हणताय तुम्ही? मी तुमची बायको आहे, तेंव्हा तुम्हीच माझ्यावार हुकुमत चालवायची! तुम्ही मला खूप प्रेम द्या फक्त. मी खूश राहीन. तुम्हीच माझ्या जीवनाचे मालक आहात, इथून पुढे कोणाची ताबेदारी करणं नको, स्वतन्त्रपणे काम करत जा, म्हणजे मला आनन्द वाटेल.मी तुम्हाला आपल्या बुध्दीची साथ देत राहीन."

श्यामाने शीतलला आपला मालक म्हटले, तेंव्हा त्याच्या मनात आनन्दाने गुदगुल्या झाल्या; गर्वही वाटला त्याला! त्या दिवसापासून त्याने आपला भिडस्तपणा सोडला. लवकरच शीतल चांगला धनवान बनला. श्यामा ही त्याला चांगली साथ देऊ लागली, त्यामुळे शीतलला परिवार-सुखही भरपूर मिळू लागले.

दिव्यशक्तींच्या आधाराने सेवक म्हणून जगण्यापेक्षा, कडक मेहनत करून आत्मगौरवाने स्वतन्त्र जीवन चालवणे श्रेयस्कर-ही गोष्ट शीतलने अनुभवाने जाणली. यानंतर श्यामा-शीतल यांचे दिवस आनन्दाने जाऊ लागले.





# वीर हनुमान

दरम्यान वानर-वीरांनी प्रहस्ताशी सामना केला. आणखी एकदा वानर आणि राक्षसांनी एकमेकांच्या सैन्यातील अनेक वीरांचा वध करवला. प्रहस्ताचे चार ही मंत्री वीरोचित उत्साहाने वानरांना गाजर-मुळ्याप्रमाणे कापू लागले. हे पाहून द्विविद नावाच्या वानर-वीराने एक मला मोठा दगड फेंकून नरांतकाला ठार मारले. त्याचप्रमाणे दुर्मुख नावाच्या वानर-वीराने समुन्नताला, जांबवानने महानादाला व तारने कुंभहनुला ठार मारले. अशा रीतीने प्रहस्ताचे चार ही मंत्री मृत्युमुखी पडले.

हे सर्व प्रहस्ताने आपल्या डोळ्यांनी पाहिले आणि तो अत्यंत क्रोधाने वानर सेनेचा विध्वंस करू लागला. आता प्रहस्ताने नीलशी सामना केला. प्रहस्ताने बाणांनी व नीलने शिला आणि वृक्ष यांच्या साहृयाने युद्ध केले. नीलच्या शरीरात बाण घुसू लागले. पण त्याने त्यांची पर्वा केली नाही. त्याने प्रहस्ताच्या रथाला जुंपलेल्या घोड्यांना मारून टाकले. आणि नंतर त्याचं धनुष्य मोडून टाकलं. नंतर प्रहस्त व नील दोघे जण मल्ल-युद्ध करू लागले. या युद्धात नीलने दगडाने प्रहस्ताचे डोके फोडून टाकले. अशा रीतीने जेव्हा प्रहस्त ठार झाला, तेव्हा बाकीचे राक्षस आक्रोश करीत लंकेकडे निघाले.

प्रहस्ताच्या मृत्यूची वार्ता जेव्हा

२५. कुंभकर्णाला झोपेतून जागे केले!



रावणाला समजली. तेव्हा त्याचे पित्त खवळले. त्याने निश्चय केला की आता आपण स्वतःच युद्धासाठी प्रस्थान केलं पाहिजे. उत्तम घोडे जुंपलेल्या रथावर तो स्वार झाला.

तो नगरीतून जेव्हा बाहेर पडला, तेव्हा झाडे व दगड हाती घेतलेली सुसज्ज वानर-सेना त्याला दिसली. रावण जेव्हा युद्ध करण्यासाठी पुढे येऊ लागला तेव्हा त्याला पाहून रामाने विभीषणाला विचारले-"अपार सैन्यासह अनेक ध्वज लावलेल्या रथात बसून येणारे हे कोण आहेत?"

विभीषणाने रामाला एकेकाचा परिचय करून दिला. रावणाचा मुलगा अकंपन हा त्यांच्यापैकी एक होता. शिवाय इंद्रजित होता, अतिकाय होता आणि होता महोदर पण. यांच्या खेरीज रावणाबरोबर पिशाच, त्रिशुर, कुंभ नि निकुंभ इत्यादि राक्षसवीर पण होते.

रावणाचे तेज पाहून रामाला आश्चर्य वाटले. देव-दानवात सुद्धा असं तेजस्वी कोणी क्वचितच असतं. रावण आता आपल्याला सामोरा येत आहे असं पाहून रामाला खूप आनन्द झाला. सीतेला पळवून नेणाऱ्या दुष्टाचा चांगला सूड घेणे आता शक्य होते. असा विचार करून रावणाशी युद्ध करण्यासाठी राम लक्ष्मणासह सज्ज झाला.

वानर-सेनेला घाबरून सोडीत येणाऱ्या रावणाशी प्रथम सुग्रीवाने सामना केला. रावणाने सुग्रीवाला एका बाणातच बेशुद्ध करून टाकले. हे पाहून राक्षसांनी विजयोन्मादाने आरोळ्या ठोकल्या.

हे पाहून गवाक्ष, गवय, ऋषभ, ज्योतिर्मुख आणि नभ इत्यादि वानर-वीरांनी विशाल रूप धारण केले आणि डोंगरावरील मोठमोठ्या शिलांसह रावणाशी युद्ध करायला आले. रावणाने या सर्वांवर बाणांचा भडिमार केला. वानर-वीर आता घाबरले नि रामाच्या आश्रयाला आले.

रावण जेव्हा वानर-सैन्याचा नाश करू लागला, तेव्हा त्यांचे संरक्षण करण्यासाठी राम पुढे सरसावला. हे पाहून लक्ष्मणाने रामाला प्रार्थना केली की



रावणाला मारण्याची संधि त्याला दिली जावी. लक्ष्मणाला सावध राहण्याची सूचना देऊन रामाने त्याला रावणाशी लढायला परवानगी दिली.

आता लक्ष्मणाने रावणाशी युद्ध करायला सुरुवात केली. हे पाहून हनुमानच प्रथम रावणाला सामोरा आला, आणि उजवा हात वर करून म्हणाला-"ही गोष्ट खरी आहे की तू देव-दानव, गंधर्व, यक्ष आणि राक्षसांना जिंकलं होतंस! पण वानरांपासून तुझ्या जिवाला धोका आहे. मी माझ्या हातांनी आता तुला मारून टाकतो बघ."

हे ऐकून रावणाचा पारा चढला आणि तो म्हणाला-"हे हनुमान, निर्भयपणे तू मला मार. एका माकडाने रावणाला मारलं अशी शाश्वत कीर्ति तुला मिळेल खचित! नंतर मग मी तुला ठार करीन."

"एकदा पुन्हा आठव. तुझा मुलगा अक्ष याला मीच मारून टाकलंय।" हनुमानाने आणखी एकदा धोक्याची सूचना दिली.

यावर रावणाने हनुमानाच्या छाती वर एक जोरदार ठोसा लगावला. हनुमान थोडा विचलित झाला. या रागाच्या भरात त्याने ही रावणाच्या छाती वर आणखी जोरदार एक ठोसा मारला. भूकंपामुळे पर्वत हलावा अशी रावणाची स्थिति झाली. ते दृश्य पाहून वानर संतोषपूर्वक आरोळ्या देऊन आपला आनंद व्यक्त करू लागले.



हनुमानाच्या पराक्रमाची रावणाने ही प्रशंसा केली. पण हनुमान म्हणाला-"रावणा, जळला माझा सारा पराक्रम! माझा ठोसा सहन करून ही तू अजून जिवन्तच आहेस. तू आणखी एकदा मला गुद्दा घाल, म्हणजे मी तुला आपल्या गुद्यांनी यमसदनाला पाठवतो."

यावर रागात येऊन रावणाने आपल्या मुठीने हनुमानाच्या छातीत एक गुद्दा घातला. यामुळे हनुमान चक्कर येऊन पडला. तो शुद्धीवर येईपर्यंत रावणाने नीलशी युद्धाला सुरुवात केली.

नील तर वानरांचा सेनापति होता. रावणाचे बाण जेव्हा त्याला घायाळ करू लागले, तेव्हा त्याने अतिशय रागाने



एक भली मोठी गंडशिला रावणावर फेकली. दरम्यान हनुमान शुद्धीवर आला आणि त्याने रावणाकडे आपला मोर्चा वळवला. आता तो रावणाला म्हणाला- दुसऱ्या कोणाशी तरी लढत होतास, म्हणून तुझे प्राण वाचले आहेत.

रावणाने आपल्यावर पडणाऱ्या गंडशिलेचे आपल्या बाणांनी तुकडे-तुकडे करून टाकले. नंतर त्याने आपल्या आग्नेयास्त्राने नीलला मूर्च्छित करून टाकले. आणि त्याने लक्ष्मणाशी लढायला सुरुवात केली.

लक्ष्मण रावणाला ललकारत म्हणाला- "हे राक्षसराजा, त्या वानरांशी कसली लढाई करीत आहेस? माझ्याशी लढ म्हणजे तुझे गर्वाचे घर खाली होईल."

"हे लक्ष्मणा, तुझं आयुष्य सरलं, म्हणून तर तू आता माझ्यासमोर आला आहेस, मी आता तुला यम-पुरीला पाठवतो!" रावण म्हणाला

लक्ष्मण म्हणाला-"पापात्म्या, फार आत्मस्तुति करू नकोस. तुझी शक्ति नि पराक्रम मी चांगला जाणतो. मी तुझ्याशी युद्ध करायला तयार आहे."

आता रावणाला खूपच राग आला. त्याने लक्ष्मणावर बाणां वर बाण सोडले. लक्ष्मणाने आपल्या बाणांनी ते सर्व बाण परतवले. अशा रीतीने दोघांनी बाण-युद्ध केले. मध्यंतरी मूर्च्छित झालेल्या लक्ष्मणाकडे येऊन रावणाने त्याला आपल्या हातांनी उठवण्याचा प्रयत्न केला होता, पण हनुमान मधेच येऊन टपकला आणि त्याने आपल्या मुठीने रावणाच्या छातीत एक जबरदस्त बुक्का मारला. यामुळे रावण तोंडावर खाली पडला. त्याचे तोंड, कान व डोक्यातून रक्त वाहू लागले.

हनुमानाने मूर्च्छित अवस्थेतील लक्ष्मणाला उचलले व थेट रामाजवळ जाऊन पोंचला.

काही वेळानंतर लक्ष्मण व रावण शुद्धीवर आले. आता रावण युद्धासाठी पुन्हा तयार झाला.

मग राम रावणाशी युद्ध करायला आला. हे पाहून हनुमान रामाला म्हणाला-



"रावणाशी युद्ध करण्यासाठी आपण माझ्या खांद्यांवर बसावं."

रामाने तसं केलं. तो हनुमानाच्या खांद्यावर बसून रथातील रावणाशी युद्ध करायला निघाला.

रामाचे वाहन बनलेल्या हनुमानावर रावणाने आपले तीक्ष्ण बाण सोडले. पण त्या बाणांमुळे हनुमानाचे तेज अधिकच वाढले. हे पाहून रामाला फार राग आला. त्याने रावणाच्या रथाची चाके, घोडे, ध्वज, छत्र व सारथी सर्वांना आपल्या बाणांनी एकामागून एक जमीनदोस्त केले आणि एक बाण तर असा फेकला की तो थेट रावणाच्या छातीत घुसला. या बाणाने रावण विचलित झाला व त्याच्या हातातील धनुष्य सुटले. आणि रावण बेशुद्ध होऊन जमिनीवर कोसळला.

रामाने एका अर्धचन्द्राकार बाणाने रावणाच्या मुकुटाचे तुकडे तुकडे करून टाकले. आणि रावणाला म्हणाला-"अनेक वीरांचा वध करून तू आता थकला आहेस. मी आता तुला मारीत नाही. तू जा, थोडी विश्रान्ति घे आणि मग युद्धासाठी तयार होऊन ये. मी तुला तसं करायला परवानगी देतो.

असल्या गोष्टी ऐकण्याची पाळी आपल्यावर यावी, याबद्दल रावणाला फार लाज वाटली. निरुपायाने तो लंकेकडे परत फिरला. यानंतर राम व लक्ष्मण यांनी युद्धात घायाळ झालेल्या वानरांची सेवा-सुश्रूषा केली.



रावण लंकेत पोचला. रामाच्या बाणांचा त्याने धसकाच घेतला. घाबरलेला रावण आपल्या सहकाऱ्यांना म्हणाला-"इंद्राहून पराक्रमी मी एका माणसाच्या हातून हारलो! मी केलेलं महान् तप निष्फळ झालं. ब्रह्मा पूर्वीच म्हणाला होता की एका मनुष्याकडून मला धोका आहे आणि ते खरंच सिद्ध झालं! मनुष्याच्या हाती मला मृत्यु न यावा असं वरदान मी ब्रह्मदेवाला मागितलं नाही. राक्षस-वीरांनो, आता तुम्ही पराक्रमाची शर्थ करून शत्रु-सैन्याचा संहार करीत सुटले पाहिजे. खूप सावधपणे लंका-नगरीचे संरक्षण करा. तुमच्यापैकी



काहींनी जाऊन कुंभकर्णाला झोपेतून जागं करावं!"

युद्ध सुरू होण्यापूर्वी नऊ दिवसांपासून कुंभकर्ण झोपला होता. जर कुंभकर्ण उठला तर तो तावडतोब रणांगणावर जाऊन राम-लक्ष्मणाचा अंत करील असा रावणाला विश्वास होता. या विश्वासाचं कारण असं होतं की कुंभकर्णाला आजपर्यंत कोणी शाप दिलेला नव्हता.

रावणाच्या आज्ञेनुसार काही राक्षस आपल्या बरोबर चन्दन, फुलांच्या माला व अनेक खाद्य-पदार्थ घेऊन कुंभकर्णाकडे निघाले. ते घर खूपच मोठं होतं. राक्षसांना कुंभकर्णाच्या घरात प्रवेश करणं जिकीरीचं झाले, कारण कुंभकर्ण जेव्हा निःश्वास सोडी, तेव्हा ते राक्षस मागे ढकलले जाऊं लागले.

त्या विशाल घरात एकाद्या पर्वतासारखा कुंभकर्ण गाढ झोपलेला होता. त्याला जागवणं मोठ्या कष्टाचं काम होतं. या अशक्यप्राय कामासाठी ते राक्षस पुढे सरसावले. प्रथम त्याच्या समोर मांसाचा ढीग ठेवण्यात आला. तसेच मोठमोठी पात्रे मद्याने भरून ठेवण्यात आली. त्याच्या शरीरावर चंदनाचा लेप लावण्यात आला. अनेक पुष्प-मालांनी त्याचा देह आच्छादित करण्यात आला. आणि मग ते शंख फुंकू लागले. मोठमोठ्याने राक्षसांनी आरडा-ओरड सुरू केली. कुंभकर्णाच्या देहावर त्यांनी नाचायला सुरवात केली. नंतर उच्चारवात वाद्ये वाजवली. पण कशाचा काय फायदा? कुंभकर्ण आपला झोपलेलाच!

गदा, मुसळ व अन्य हत्यारांनी राक्षसांनी कुंभकर्णाच्या शरीरावर प्रहार करायला सुरुवात केली. पण त्यांचा ही कांही उपयोग झाला नाही. आता राक्षसांनी कुंभकर्णाच्या शरीरावर घोडे, उंट, हत्ती वगैरे जनावरांना नाचू दिले.

शेवटी कुंभकर्ण एकदाचा जागा झाला. जागे होताच त्याला प्रचंड भूक लागली. आपल्या समोरील खाद्य पदार्थ व मांसावर तो तुटून पडला मधून मधून त्याने मद्य-प्राशन ही केले. जेव्हा पोट भरले तेव्हा त्याने



एकदा राक्षसांकडे पाहिले नि विचारले- "तुम्ही सर्वांनी मला कशासाठी उठवलं? रावण कुशल-पूर्वक आहे न? कुणावर काही संकट तर नाही ना आलं?"

तरी पण जरूर काही तरी अघटित घडलंय हे कुंभकर्णाच्या लक्षात यायला वेळ लागला नाही.

रावणाचा मंत्री यूपाक्षने कुंभकर्णाच्या प्रश्नाचे उत्तर दिले-"कुंभकर्ण, आतापर्यंत कोणत्याही देव, दानव वा दैत्याकडूनही जो त्रास झाला नाही, तो हे मानव प्राणी आज देत आहेत. असंख्य वानरांनी येऊन लंकेला वेढा घातला आहे. सीतेला पळवून आणल्यामुळे रामाला जो क्रोध आला आहे, त्याच्या पोटी त्याने लंकेवर आक्रमण केले आहे. पहिल्याने एका वानराने येऊन लंकेला आग लावून दिली आणि अक्षकुमाराला सैन्यासह मारून टाकले. आता रामाने रावणाला युद्धात मारून अशा विचाराने सोडून दिले की रावण मेलेला आहे. देव, दैत्य, दानव आतापर्यंत रावणाचा पराभव करू शकले नाहीत, ते काम रामाने करून दाखवले."

आपल्या भावाच्या पराभवाची वार्ता ऐकून कुंभकर्णाला फार राग आला, नि तो यूपाक्षला म्हणाला-

"मी आता जाऊन वानर-सैन्याचा सर्वनाश करतो. राम व लक्ष्मण यांना मारून टाकतो. नंतरच मी रावणाला भेटायला जाईन. राक्षसांना वानरांचे रक्त-मांस खायला घालून, राम-लक्ष्मणाचं रक्त मी स्वतः पिऊन टाकीन."

मागचा-पुढचा काही विचार न करता रागाच्या भरात कुंभकर्ण गर्वाने जे बरळला, ते ऐकून महोदरने कुंभकर्णाला हात जोडून विनंती केली-"तू अगोदर रावणाकडे जा. तो जे सांगेल ते नीट ध्यानपूर्वक ऐक. चांगल्या-वाइटाचा विचार कर. नंतर शत्रूंचा पराभव करण्यासाठी रण-भूमीवर जा!"





# भोळा-भाबडा

एका गावात एक विधवा बाई रहात असे. तिला एकच मुलगा होता. तो फारच साधा-सुधा आणि भोळा होता. त्यामुळे त्याला सर्वजण 'भोलानाथ' असेच म्हणत. दुकानातून एका रुपयाचे सुटे पैसे आणाचंही त्याला जमत नसे. हे माहीत असल्याने पुष्कळसे दुकानदार त्याला नेहमी फसवत.

आपल्या मुलाचा भोळसटपणा आईला चांगला माहीत होता. त्यामुळे ती नीट लक्ष ठेवत असे: त्याला तीनदा खायला घालून खूप प्रेमाने त्याचे पालनपोषण करीत असे. पण भोलानाथलाच आपल्या बुद्धिहीनतेबद्दल चिन्ता वाटे.

"मला जराशी बुद्धी असती, तर तर काय छान झालं असतं आई! डोकं नसल्याने माझा तुला काहीच उपयोग होत नाही. आपल्या दोघांचा साराच भार तुला उचलावा लागतो अन् मी मात्र नुसताच भटकत असतो." भोलानाथ स्वतःच्या स्थितीबद्दल आईजवळ बोलून दाखवी.

मग आई त्याला म्हणे, "बाळा, अरे सर्वचजण बुद्धिमान कसे असू शकतील? तुला देवानं बुद्धी नसेल दिली, पण त्यात काय बिघडतंय? तुला त्यानं सोन्यासारखं शुद्ध मन तर दिलं आहे ना? दोन माणसांइतकं शारीरिक बळही दिलंय तुला. तू जितकी मेहनत करू शकतोस, तितकी आणखी कोण करू शकतं?"

अशा तऱ्हेने आई त्याची समजूत काढायचा प्रयत्न तर करायची, पण त्याला तिचं बोलणं आवडायचं नाही. भोलानाथ नेहमीच आईला विचारून सतावी, "आई, मला सांग ना अक्कल कशी मिळवावी?"

अशा तऱ्हेने अनेकदा विचारल्यावर

२५ वर्षांपूर्वी चांदोबात प्रकाशित झालेली कथा



एकदा आई त्याला म्हणाली, "जा, काळ्या पहाडावर रहाणाऱ्या जादुगारीण जृंभिका हिच्याकडे जाऊन थोडीशी अक्कल मागून आण."

भोलानाथ मोठ्या खुशीने काळ्या पहाडावरच्या जृंभिकाकडे गेला. त्यावेळी ती चुलीजवळ बसून स्वयंपाक करत होती.

तिला पाहून भोलानाथ म्हणाला, "जादुगारीण आत्या! मी अगदीच भोळा आहे; त्यामुळे आईला माझा काहीच उपयोग होत नाही. आई म्हणाली, की माझ्यासारख्या बुद्धिहीनाला तू अक्कल देऊ शकतेस. मग जराशी अक्कल दे ना मला."

जृंभिकाने एकदा भोलानाथला पायापासून डोक्यापर्यंत पाहून घेतलं; अन् म्हणाली, "ठीक आहे, अगोदर तुला सर्वात आवडणारी वस्तु आणून दे मला! मग देईन मी तुला अक्कल."

भोलानाथ तसाच आपल्या आईकडे परत आला. जृंभिकेची मागणी तिला सांगून त्यानं विचारलं, "आई, मला सर्वात काय बरं आवडतं?"

"अरे वेड्या, इतकंही नाही लक्षात? तुला कोंबडीचं मांस सर्वात जास्त आवडतं ना? मग उद्या जृंभिका आल्याला एक कोंबडं नेऊन दे. अन् घेऊन ये त्या बदल्यात अक्कल!" आईने त्याला सांगितलं.

दुसऱ्या दिवशी भोला कोंबडी घेऊन जृंभिकाकडे गेला आणि म्हणाला, "आत्या मला हे कोंबडं भारी आवडतं, हे घे अन् दे अक्कल मला."

"ठीक आहे. पण मला बरोबर पारखायला हवं, की तू खरं बोलतोयस की नाही. मला एका प्रश्नाचं उत्तर दे. बिन पायांनी पळणारा कोण?" जृंभिकाने प्रश्न विचारला. भोलाने थोडा वेळ डोकं खाजवलं अन् मग त्याने सांगितलं की आपल्याला नाही माहीत.

"याचाच अर्थ असा की तू यापेक्षा तुला आवडणारी वस्तु दिली नाहीस. यावेळी तू आता परत जा अन् यापेक्षा जास्त



आवडणारी वस्तु घेऊन परत ये." असं म्हणून जृंभिकेनं भोलानाथला परत पाठवलं.

तो परत आला तोपर्यंत त्याच्या आईनं अंथरूण धरलं होतं. कित्तीतरी शेजारी येऊन तिची सेवा-शुश्रूषा करत होते. त्यांना विचारल्यावर ते भोलाला म्हणाले, "अरे, तुझ्या आईला लकवा झालाय. वैद्यांनी इलाज केला, पण त्याचा काही उपयोग होत नाहीय."

तेंव्हा भोलाला आपल्या जवळ बोलावून आई म्हणाली, "आता मी जगणार-नाही बेटा! जृंभिकानं तुला दिली न अक्कल? मी आता निश्चिन्त होऊन जात आहे." असे म्हणून तिने प्राण सोडला.

त्या रात्रभर भोला आपल्या आईसाठी रडत राहिला. तो विचार करू लागला, "आई शिवाय कसा जगणार मी? आता माझी खबरबात कोण विचारील? माझ्या गरजा कोण पुरवील?" असा विचार करताकरताच एक गोष्ट त्याच्या ध्यानात आली ती ही कि, या जगात त्याची सर्वात आवडीची गोष्ट म्हणजे आईच!

त्याने आईचा देह एका पोत्यात गुंडाळला व तो जृंभिकाकडे घेऊन जाऊन तो म्हणाला, "सर्वात आवडती वस्तु आणली मी आत्या; आता दे मला अक्कल!"

"तुझ्या म्हणण्यातला खरेपणा



पडताळायला हवा मला! बोल, सोन्याशिवाय, तितकीच चमकणारी वस्तु कोणती?" भोलानाथला जृंभिकेनं विचारलं.

बराच विचार करून आपल्याला ते माहीत नसल्याचं भोलानं सांगितलं. तेव्हां जृंभिकेनं पुन्हा त्याला परत जाऊन याहून आवडीची वस्तु आणायला सांगितलं.

आईच्या प्रेताचं पोतं घेऊन भोला पुन्हा घराकडे निघाला. वाटेत एका ठिकाणी बसून तो आपल्या स्थितीबद्दल जोरजोरात रडू लागला. इतक्यात कुणीसं विचारलं, "का रडतोस?"

आपल्यासमोर उभ्या असलेल्या त्या राधा नावाच्या मुलीला भोलाने आपली

रामकहाणी सांगितली. आपल्या आईचा मृत्यु, आणि जृंभिकेचे प्रश्न वगैरे सारं त्यानं सांगितलं व आपल्याला अक्कल न मिळाल्याबद्दल दुःख व्यक्त केले.

सगळे ऐकून हसत राधा म्हणाली, "बिन पायांनी पळू शकते, ती नदी. सोन्यापेक्षाही चमकतो तो सूर्य. इतकंही तुला कळत नसेल तर तुझी काळजी घेणारं कुणीतरी असायला हवं. अच्छा, ते काम मीच करीन. मी ऐकलंय की भोळीभावडी माणसं आपल्या बायकोवर खूप प्रेम करतात. तू करशील लग्न माझ्याशी?"

"तुझी हरकत नसेल तर मला मंजूर आहे." भोला म्हणाला. नंतर त्या दोघांचं लग्न झालं. राधा भोलाची त्याच्या आईपेक्षा ही अधिक काळजी घेऊ लागली.

भोलाही राधाला खूश ठेवू लागला. राधा म्हणेल ते तो करी, अशा तऱ्हेने त्यांचं एकमेकांवर प्रेम वाढत राहिलं.

एकदा भोलाच्या लक्षात आलं की, आपली सर्वात आवडीची वस्तु म्हणजे बायकोच! म्हणून तो बायकोला घेऊन पुन्हा जृंभिका जादुगारणीकडे गेला. तो तिला म्हणाला, "आत्या, आता मात्र मी खरोखरच आपली सर्वात प्रिय वस्तु घेऊन आलोय. ही बघ!"

जृंभिकाने एकवार दोघांकडे पाहिलं अन् विचारलं, "बिन पायांनी पैदा होऊन, प्रथम दोन पाय प्राप्त करून नंतर चार पाय प्राप्त होतात, ते काय?"

भोलानाथ डोकं खाजवू लागताच राधाने त्याच्या कानात सांगितले, 'बेडूक'. मग भोलाही उत्तरला, "बेडूक!"

"अच्छा! तुझ्या खोपडीत अक्कल नसली तरी तुझी बायको मात्र 'अकलेचा कांदा' आहे. तेव्हा आता तीच अक्कल तुम्ही दोघांनी वाटून घ्या, अन् सुखाने रहा." इतकं म्हणून जृंभिकाने त्यांना आशिर्वाद देऊन परत पाठवलं.





# नवीन वैद्य

चन्द्रकान्तने नव्यानेच वैद्यकीय पेशा सुरू केला होता. एकदा त्याच्याकडे सांसर्गिक रोगाचा एक रोगी आला. चन्द्रकान्तने त्याला औषध देऊन रवाना केले आणि तो स्वतः मात्र पायापासून डोक्यापर्यंत थरथर कापू लागला. ते पाहून त्याच्या बायकोने विचारले, "काय झालं?"

"आता इतक्यात जो रोगी आला होता न, त्याला स्पर्शजन्य रोग आहे. मला भीती पडलीय की त्याचाच रोग मला लागलाय!" चन्द्रकान्त उत्तरला.

इतके बोलून तो पुढे काही बोलूच शकेना. एकाएकी त्याचा घसा बसला. अन् तो अगदीच मुका झाला. ते पाहून त्याची बायको सुनन्दा घाबरून गेली. अन् ती तावडतोब चन्द्रकान्तचा मामा श्रीनाथ याच्याकडे गेली.

श्रीनाथ हा त्या गावचा फार मोठा वैद्य होता. भाचा चन्द्रकान्त वैद्यकी शिकला होता. सुनन्दाकडून हकिकत कळल्यावर तो तावडतोब चन्द्रकान्ताकडे आला. त्याची नाडी बघून श्रीनाथ सुनन्दाला म्हणाला, "याची तब्येत अगदी छान आहे. कसलाही स्पर्शरोग याला झालेला नाही. पण हा कापतो आहे, त्याअर्थी असं वाटतंय की याला सर्दी झालीय. त्याचं बोलणं बन्द झालय त्याअर्थी त्याच्या मेन्दूला काही तरी झालय. याची शस्त्रचिकित्सा करावी लागेल. दोन दिवस याला कार्ल्याची खटाई, कार्ल्याची चटणी अन् तुपात तळलेलं कार्लं जेवणातून दे आणि पाण्याऐवजी कार्ल्याचा रसच प्यायला दे."

सुनन्दाने त्याप्रमाणेच स्वयंपाक करून नवऱ्याला जेवायला बोलावले. सुनन्दा वाढू लागल्यावर कार्ल्याची भाजी पाहून चिडून चन्द्रकान्त विचारू लागला, "हा कसला स्वयंपाक केलायस तू? आजपर्यंन्त मी कधी एकदा तरी कार्ल्याची भाजी खाल्ली आहे!

अशोक साठे



"अगोदरच मी आजारी आहे. मला जरा स्वादिष्ट जेवण द्यावं असंही नाही वाटलं तुला?"

नवऱ्याच्या ओरडण्याचे सुनन्दाला जराही वाईट वाटले नाही, "ओहो! शस्त्र चिकित्से-शिवायच तुमची बोलणी सुरू झाली पुन्हा? तुमचे मामा म्हणाले होते की-असं होईल म्हणून! अन् अगदी बरोबर तसंच झाले बघा! काय बरं वाटलं मला!" सुनन्दा म्हणाली.

चन्द्रकान्तला आता खरा प्रकार कळून चुकला. आपल्याला नापसन्त पदार्थ दिसल्याने आपला मेन्दु प्रभावित होऊन शस्त्र चिकित्सेशिवायच आपण बरे झालो. मामाला ही गोष्ट माहीत आहे, पण मला नाही शिकवली त्याने! कदाचित् ही एक नवीच चिकित्सा-प्रणाली असावी. असा चन्द्रकान्तने निष्कर्ष काढला.

नन्तर तो सुनन्दाला म्हणाला, "तू लक्ष्मीकान्ताच्या घरी जा. इकडल्या तिकडल्या गप्पा काढून त्याच्या बायको कडून माहिती काढून घे, की लक्ष्मीकान्तच्या बापाला कोणते पदार्थ अप्रिय आहेत. फार महत्वाचं आहे हं हे! तो बाप एकदा अशाच रोगाची तक्रार घेऊन माझ्याकडे आला होता. त्याची चिकित्सा करताना मामाचा सल्ला घ्यायचा मला संकोच वाटला होता. आता हा नवा अुपाय करून पहावा म्हणतो."

पतीच्या बुध्दिमत्तेवर खूश झालेली सुनन्दा लक्ष्मीकान्तच्या घरी गेली. रस्त्यात तिला श्रीनाथ भेटला. चन्द्रकान्तच्या तब्येतीबद्दल त्याने सुनन्देला विचारले. खरी गोष्ट सुनन्दा त्याच्या पासून लपवू शकली नाही. तिने इत्थंभूत सारी गोष्ट त्याला सांगून टाकली.

हें ऐकून श्रीनाथ हसत म्हणाला. "असंच काहीतरी घडेल हे ताड़लंच होतं मी. खरी गोष्ट जाणण्यासाठी मी ही काल्यांची गोष्ट सांगितली. लक्ष्मीकान्तच्या पित्यावर तो हा प्रयोग करील तर काय परिणाम होईल? ती तर काही ढोंग करण्याची गोष्ट नव्हे! खरा आजार आहे तो! त्याचा अुपाय निराळाच आहे. चल. घरी जाऊ या." आणि सुनन्दाला घेऊन श्रीनाथ भाचा चन्द्रकान्त याच्या घरी गेला. नंतर भाच्याची चांगली तासडंपट्टी करून तो म्हणाला. "लक्ष्मीकान्तचा बाप प्रथम माझ्याकडे आला होता. मी सांगितलेले पैसे जास्त वाटले, म्हणून तो तुझ्याकडे आला. मला वाटलंच होतं की तो नंतर तुझ्याकडे येईल आणि त्याची चिकित्सा केलीस तर तुझं चांगलं नाव होईल. मी तुझ्यासाठी इतकी धडपड करतो, पण तू मात्र चिकित्सा शास्त्रातल्या अडचणी मला विचारायचा संकोच करतोस. हे काही बरं नव्हे. काय? समजतंय ना माझं बोलणं?"

चन्द्रकान्तने आपली चूक कबूल केली. नंतर त्या रोगाची चिकित्सा पद्धती त्याने मामाला विचारून घेतली. मामा गेल्या बरोबर चन्द्रकान्त पुन्हा कापू लागला.

"आता काय झालं कापायला? आता कुणाच्या अुपायाचा प्रश्न आहे?" सुनंदाने विचारले.

"अजून माझा थरथरण्याचा आजार संपला नाही. अजून काही दिवस मला खाटेवर रहायला हवं. लक्ष्मीकान्तच्या बापाला मी औषध पाठवून देईन. पण आणखी एकादा रोगी मी तपासू इच्छित नाही." चन्द्रकान्त म्हणाला.

यावर हसून सुनन्दा म्हणाली, "रोज रात्री झोपताना मी तुम्हाला तुळशीच्या मुळाचं चूर्ण, पानांच्या रसात घालून देत जाईन. हे औषध रोज दोन्ही वेळा घेत रहाल तर कोणत्याही अन् कितीही स्पर्शजन्य रोग्यांवर इलाज केलात तरी तुम्हाला कसलाही आजार होणार नाही. अुगीचच घाबरून तुम्ही आपल्या व्यवसायात बदनाम होअू नका." "तुला हे कसं कळलं की मी स्पर्श-रोग्यांना भितो आहे?" चन्द्रकान्तने आश्चर्याने विचारले. "वैद्यकी सुरू करताना नवीन नवीन असंच होतं, ही गोष्ट तुमच्या मामांनी सांगितली होती. इतकंच नव्हे, तर तुमचे विचार व आचार अगदी त्यांच्याच-सारखे आहेत. त्यामुळे त्यांच्या अनुभवांचा तुम्हाला लाभ घेता येईल, हेही मामांनी तुम्हाला सांगितलं होतं." सुनन्दा म्हणाली.

हे ऐकून चन्द्रकान्त अवाक् झाला! त्याने ओळखले की मामासमोर गर्व करणं, किंवा त्यांना काही विचारायला लाजणं—हा आपलाच मूर्खपणा होईल. त्यांच्याकडूनच वैद्यक-शास्त्र शिकून घेअून, त्यांच्याही पेक्षा 'मोठा वैद्य' म्हणून नाव मिळवण्याच्या आपल्या लालसेबद्दल चन्द्रकान्तला आता लाज वाटली.

दुसऱ्याच दिवसापासून चन्द्रकान्त निःसंकोचपणे आपल्या मामाकडे जाअून आपल्या अडचणी सोडवून घेअू लागला अन् थोड्याच दिवसात 'कुशल वैद्य' म्हणून चन्द्रकान्तची कीर्ती होअू लागली.





# कापालिनी

एके काळी काश्मीरमधे एक क्षत्रीय रहात असे. त्याला सीमंतिनी नावाची एकुलती एक मुलगी होती. सीमन्तिनी लावण्यवती होती. तिचा पिता स्वर्गवासी झाल्यावर त्याची सारी संपत्ती, म्हणजे अनेक बने, अरण्ये व त्याचा किल्ला वगैरेंची तीच मालकीण बनली. त्यामुळे आसपासचे काही घरंदाज तरुण तिच्याशी विवाह करायला अुत्सुकता दाखवू लागले. त्यांच्यातला गणदेव नावाचा एक तरुण खरोखरच तिच्या प्रेमात पडला. परन्तु सीमन्तिनीच्या मनात विवाहाचा विचारच नसल्याने, तिने सर्वांनाच धुडकावून लावले.

सीमंतिनीला जंगल, पहाड व तऱ्हेतऱ्हेच्या पशुपक्ष्यांचे भारी आकर्षण वाटे.ती खूपदा पायी किंवा घोड्यावर बसून जंगलाच्या वाटेने खूप दूर जाई व 'गरुड शिखर' नावाच्या टेकडीवर बसून दूरवर दिसणारे निसर्गसौन्दर्य तासंतास पहात राही ते पहाताना तिचे मन आनन्दाने भरून जाई.

अशा तऱ्हेने निसर्गावर प्रेम करणाऱ्या सीमन्तिनीच्या मनात अचानकच कापालिक शक्ति प्राप्त करून घेण्याची इच्छा जागृत झाली. वेताळाला वशीभूत करून घेण्यासाठी, परकाया प्रवेश, कामरूप व कामगमन इत्यादि सिध्दी प्राप्त करुन घेण्यासाठी ती विचित्रशा पूजा वगैरे करू लागली. त्यासाठी आवश्यक असा अजब प्रकारचा आहार घेअू लागली आणि खूपच चमत्कारिक व आश्चर्यजनक अशा अुपासना-पध्दतींचे पालन करू लागली. ती कधी-कधी चन्द्राकडे पहात राहून, बेशुध्द होअून बसरून पडे. विचित्रशा कंदमुळांचा काढा करून तो पीत असे. आपल्या शरीराला ती फार कठीण अशी पीडा देत असे. अशा विचित्र साधनेने तिला काही शक्ति मिळाल्याही.

हे सर्व ऐकून गणदेवला फार दुःख वाटे. सीमंतिनी सर्वसामान्य मानवतेपासून दूर जात चालली आहे. ती जेंव्हा सर्वसाधारण होती, तेंव्हाच तिने माझ्याशी लग्नाला नकार दिला होता. अन् आता तर अशा परीस्थितीत माझं तिच्याशी कसं काय लग्न होणार?" असेच विचार नेहमी त्याच्या मनात पिंगा घालत.

तो नेहमी 'सीमन्तिनीला पूर्वीची सर्वसामान्य सीमन्तिनी कशी बनवता येईल' हाच विचार करीत बसे. तो तिला न दिसेल अशा रीतीने, ती कसकसल्या पूजा वगैरे करीत आहे यावर नजर ठेवी.

जसजसे एकामागोमाग एक महिने जाअू लागले, तसतशी गणदेवच्या मनात एक इच्छा फळ धरू लागली की सीमंतिनीला कसेही करून या साऱ्या प्रकारातून सोडवायला हवे. शेवटी त्याने पिंगलिनी नावाच्या एका जादूगारणीकडे मदत मागितली.

पिंगलिनी ही अद्‌भुत मन्त्र-तन्त्र जाणणारी जादूगारीण मानली जात असे. ती आपल्या बागेत तऱ्हतऱ्हेच्या वनस्पती वाढवून त्यांच्या मुळांपासून व पानांपासून औषधे बनवत असे. तिने गणदेवचे बोलणे लक्षपूर्वक ऐकले.

"सीमन्तिमीला कापालिनी बनायचं असेल तर आपण तिला अडवायचं काय कारण?" पिंगलिनीने गणदेवला विचारले.

"कारण माझी तशी इच्छा नाही. समजलं? तुला हवे तेवढे पैसे मी देईन. तू फक्त इतकंच सांग, की तू तिला पुन्हा सर्वसामान्य मुलगी बनवू शकशील की



नाही?" गणदेव झटकन अुत्तरला.

"कापालिनीच्या जीवनात आनन्द नसतोच, असं तुला वाटतं का?" त्याच्याकडे निरखून पहात पिंगलिनीने विचारले.

"आनन्द मिळतही असेल, पण सुख नाही मिळत ना?" गणदेवने प्रश्न केला.

"होय हे मान्य आहे मला. तुझी पत्नी बनूनच तिला सुख लागेल." पिंगलिनीने कबुली दिली.

"म्हणूनच तर मी तुला विनवतो आहे. तिला माझी पत्नी बनवण्यासाठी काहीतरी कर. मी जन्मभर तुझा कृतज्ञ राहीन." गणदेव म्हणाला.

"ठीक आहे. करीन की तुला मदत मी, सांगते तसं कर. पुढल्या अमावास्येला



# कापालिनी

एके काळी काश्मीरमधे एक क्षत्रीय रहात असे. त्याला सीमंतिनी नावाची एकुलती एक मुलगी होती. सीमन्तिनी लावण्यवती होती. तिचा पिता स्वर्गवासी झाल्यावर त्याची सारी संपत्ती, म्हणजे अनेक बने, अरण्ये व त्याचा किल्ला वगैरेंची तीच मालकीण बनली. त्यामुळे आसपासचे काही घरंदाज तरूण तिच्याशी विवाह करायला अुत्सुकता दाखवू लागले. त्यांच्यातला गणदेव नावाचा एक तरूण खरोखरच तिच्या प्रेमात पडला. परन्तु सीमन्तिनीच्या मनात विवाहाचा विचारच नसल्याने, तिने सर्वांनाच धुडकावून लावले.

सीमंतिनीला जंगल, पहाड व तऱ्हेतऱ्हेच्या पशुपक्ष्यांचे भारी आकर्षण वाटे. ती खूपदा पायी किंवा घोड्यावर बसून जंगलाच्या वाटेने खूप दूर जाई व 'गरूड शिखर' नावाच्या टेकडीवर बसून दूरवर दिसणारे निसर्गसौन्दर्य तासंतास पहात राही ते पहाताना तिचे मन आनन्दाने भरून जाई.

अशा तऱ्हेने निसर्गावर प्रेम करणाऱ्या सीमन्तिनीच्या मनात अचानकच कापालिक शक्ति प्राप्त करून घेण्याची इच्छा जागृत झाली. वेताळाला वशीभूत करून घेण्यासाठी, परकाया प्रवेश, कामरूप व कामगमन इत्यादि सिध्दी प्राप्त करुन घेण्यासाठी ती विचित्रशा पूजा वगैरे करू लागली. त्यासाठी आवश्यक असा अजब प्रकारचा आहार घेअू लागली आणि खूपच चमत्कारिक व आश्चर्यजनक अशा अुपासना-पध्दतींचे पालन करू लागली. ती कधी-कधी चन्द्राकडे पहात राहून, बेशुध्द होअून बसरून पडे. विचित्रशा कंदमुळांचा काढा करून तो पीत असे. आपल्या शरीराला ती फार कठीण अशी पीडा देत असे. अशा विचित्र साधनेने तिला काही शक्ति मिळाल्याही.

हे सर्व ऐकून गणदेवला फार दुःख वाटे. सीमंतिनी सर्वसामान्य मानवतेपासून दूर जात चालली आहे. ती जेंव्हा सर्वसाधारण होती, तेंव्हाच तिने माझ्याशी लग्नाला नकार दिला होता. अन् आता तर अशा परीस्थितीत माझं तिच्याशी कसं काय लग्न होणार?" असेच विचार नेहमी त्याच्या मनात पिंगा घालत.

तो नेहमी 'सीमन्तिनीला पूर्वीची सर्वसामान्य सीमन्तिनी कशी बनवता येईल' हाच विचार करीत बसे. तो तिला न दिसेल अशा रीतीने, ती कसकसल्या पूजा वगैरे करीत आहे यावर नजर ठेवी.



जसजसे एकामागोमाग एक महिने जाअू लागले, तसतशी गणदेवच्या मनात एक इच्छा फळ धरू लागली की सीमंतिनीला कसेही करून या साऱ्या प्रकारातून सोडवायला हवे. शेवटी त्याने पिंगलिनी नावाच्या एका जादूगारणीरडे मदत मागितली.

पिंगलिनी ही अद्‌भुत मन्त्र-तन्त्र जाणणारी जादूगारीण मानली जात असे. ती आपल्या बागेत तऱ्हतऱ्हेच्या वनस्पती वाढवून त्यांच्या मुळांपासून व पानांपासून औषधे बनवत असे. तिने गणदेवचे बोलणे लक्षपूर्वक ऐकले.

"सीमन्तिमीला कापालिनी बनायचं असेल तर आपण तिला अडवायचं काय कारण?" पिंगलिनीने गणदेवला विचारले.

"कारण माझी तशी इच्छा नाही. समजलं? तुला हवे तेवढे पैसे मी देईन. तू फक्त इतकंच सांग, की तू तिला पुन्हा सर्वसामान्य मुलगी बनवू शकशील की नाही?" गणदेव झटकन अुत्तरला.

"कापालिनीच्या जीवनात आनन्द नसतोच, असं तुला वाटतं का?" त्याच्याकडे निरखून पहात पिंगलिनीने विचारले.

"आनन्द मिळतही असेल, पण सुख नाही मिळत ना?" गणदेवने प्रश्न केला.

"होय हे मान्य आहे मला. तुझी पत्नी बनूनच तिला सुख लागेल." पिंगलिनीने कबुली दिली.

"म्हणूनच तर मी तुला विनवतो आहे. तिला माझी पत्नी बनवण्यासाठी काहीतरी कर. मी जन्मभर तुझा कृतज्ञ राहीन." गणदेव म्हणाला.

"ठीक आहे. करीन की तुला मदत मी, सांगते तसं कर. पुढल्या अमावास्येला

विश्व-सम

# अफगाणिस्तानात शांति




अफगाणिस्तानात गेली चौदा वर्षे चाललेले युद्ध आता संपले आहे. मुजाहिदीन गोरिलांनी प्रथम सोवियत संघाने स्थापिलेल्या बाबरक कर्माळ सरकारशी आणि नंतर डॉ. नजीबुल्ला सरकारशी लढाई केली. इतकंच नव्हे, तर कट्टर राष्ट्रवादी गट आपापसात लढत राहिले.

डॉ. नजीबुल्ला यांनी आपल्या अध्यक्ष-पदाचा राजीनामा दिल्यावर मुजाहिदीन गटाने प्रो. सिबागतुल्ला मुजाहिदीला आपले अंतरिम सरकार स्थापन करण्याची विनंती केली. तेव्हा त्यांनी ३१ सदस्यांचे कौन्सिल बनविले, आणि नंतर कट्टर-पंथी गट हज़्बे इस्लामीचे पुढारी गुलबुद्दीन हिकमतयार यांना आपल्या कौन्सिल मध्ये सामिल होण्याची विनंती केली. श्री. हिकमतयार यांनी यासाठी आपल्या काही अटी पुढे मांडल्या. त्यापैकी प्रमुख अट होती-नजीबुल्ला सरकारचे समर्थक जनरल अब्दुल रशीद दोस्तुम यांच्या नेतृत्वाखाली काम करणाऱ्या उज़्बेकी सैन्याला काबुल मधून बाहेर काढणे. याउलट सिबागतुल्ला यांच्या मते हिकमतयार यांनी बिन शर्त



अंतरिम सरकारात सामिल व्हावे. हिकमतयारचे प्रतिपक्षी व सौम्य कट्टरतावादी जमात-ए-इस्लामीचे गृहमंत्री अहमदशाह मसूद यांनी याबाबत विशेष आग्रह धरला.

दरम्यान हज्ब-ए-इस्लामीच्या सेनेने जनरल दोस्तुम यांच्या सैन्याशी युद्ध सुरू करून, काबुल वर बाँब टाकायला सुरुवात केली. यामुळे काबुल मधील अनेक जुन्या इमारती व अध्यक्षांचे निवास-स्थान यांचे खूप नुकसान झाले. यामुळे अंतरिम सरकारला तांबडतोब सैन्य काढून टाकणे अजिबात योग्य वाटले नाही. व या सरकारने आपले तसे मत जाहिर केले.

जलालुद्दीन हक्कानी यांच्या नेतृत्वाखाली नेमलेल्या मध्यस्थी-समितीने विरोधी गटांना एकत्र आणण्याचा आपला प्रयत्न चालू ठेवला. अंतरिम सरकारचे कमांडर अनुभवी मुजाहिदीन यांनी हिकमतयार यांच्याशी व्यक्तिशः बोलणी केली. कोणत्या ना कोणत्या कारणास्तव मसूद यांचा सरकारात समावेश होऊ शकत नव्हता. शेवटी २५ मे रोजी असा निर्णय झाला की जुने वैर सर्वांनी विसरून जावे व अंतरिम इस्लामी सरकारशी सर्वांनी सहकार्य करावे. या बरोबरच असेही ठरले की इतकी वर्षे चालू असलेले युद्ध आता संपविण्यात यावे.

सहा महिन्यात निवडणुका घेण्याचा व काबुल मधून सैन्य मागे घेण्याचा निर्णय ही झाला. हिकमतयारने निश्चय केला आणि घोषित केले की जोपर्यंत काबुल मधून सेना हटविली जात नाहीं तोपर्यंत ते सरकारशी सहकार्य करणार नाहीत. निवडणुका होईपर्यंत अंतरिम सरकार आपला कारभार नीट करू शकण्यासाठी काबूल मधे सैन्य ठेवणे आवश्यक आहे असं ही काही लोकांना वाटत आहे.






# राक्षसाशी विवाह

स्वर्णपुरी राज्यावर धर्मवर्धन राजा राज्य करत होता. त्याची कन्या स्वर्णमुखी ही अलौकिक सौन्दर्यवती होती. कौण्डिण्यपुरी राज्यावर सर्पदंष्ट्र राजा राज्य करत होता. त्याला जेव्हा स्वर्णमुखीच्या लावण्याबद्दल कळले, तेव्हा प्रौढ वयाचा असूनही तिच्याशी विवाह करण्याची लालसा त्याच्या मनात जागी झाली. त्याला रात्री झोप लागेना. ध्यानी मनी स्वप्नी त्याला स्वर्णमुखीच दिसू लागली. आपला एक दूत पाठवून त्याने धर्मवर्धनकडे त्याच्या कन्येला मागणी घातली.

स्वर्णपुरीपेक्षा कौण्डिण्यपुरीचे राज्य खूपच मोठे होते. आणि धर्मवर्धनपेक्षा सर्पदंष्ट्र होताही चांगला बलशाली. तरीही आपल्या लाडक्या कन्येला प्रौढ वयाच्या सर्पदंष्ट्रची दुसरी पत्नी म्हणून रहावे लागणे त्याला मुळीच मान्य नव्हते. त्यामुळे त्याने मोठ्या नम्रपणे मृदु शब्दात त्याची मागणी नाकारली.

परन्तु सर्पदंष्ट्र हा जन्मतःच मोठा अहंकारी व दुष्ट प्रवृत्तीचा होता. त्याला धर्मवर्धनचा नकार अपमानकारक वाटला. त्याने ताबडतोब सैन्य घेऊन जाऊन स्वर्णपुरीवर चढाई केली आणि राजा धर्मवर्धन व त्याची राणी यांना कैद केले.

कैदेत राजा व राणी यांच छळ करायला त्याने सुरुवात केली. कसे का होईना, पण स्वर्णमुखीशी विवाह करण्याची जबरदस्त आकांक्षा तो बाळगून होता.

नंतर स्वर्णमुखीला भेटून तो म्हणाला, "तुझ्या अद्‌भुत सौन्दर्याबद्दल ऐकल्याबरोबर तुझ्याशी विवाह करण्याची इच्छा झाली मला. तू माझ्याशी विवाहाला तयार झालीस तर मी तुझ्या मातापित्यांची तुरुंगातून सुटका करीन, अन् त्यांचं राज्यही त्यांना परत करीन.

वर्षा खुपेरकर



पण ऐकून ठेव! जर माझा प्रस्ताव नाकारलास तर मी जबरदस्तीनं तुझ्याशी लग्न लावीन. तुझ्या आई-वडिलांवर तुरुंगात काय गुजरेल याची तूच कल्पना कर. एखाद्या वेळी त्यांना आपल्या प्राणांना ही मुकावे लागेल."

हे बोलणे ऐकून रागाने असळत स्वर्णमुखी बोलली, "तू तर ही गोष्टही न कळण्याइतका मूर्ख आहेस की 'कळी कधी जबरदस्तीनं फुलवता येत नसते. वेळ पडली तर मी आपणहून एखाद्या राक्षसाशीही विवाह करीन, पण तुझ्यासारख्या दुष्टाशी कधीही करणार नाही. समजलं?"

स्वर्णमुखीच्या या अुत्तराने सर्पदंष्ट्र रागाने लालीलाल झाला. कडक आवाजात तो तिला म्हणाला,"मी तुला एक महिन्याची मुदत देतो. या दरम्यान तुझं मन बदललं तर ठीकच आहे. न पेक्षा जबरदस्तीनं का होईना, मी तुझ्या गळयात मंगळसूत्र बांधीनच, अन् त्याबरोबरच तुझ्या आईबापांना फाशीही देईन."

अशा तऱ्हेने आपला राग बाहेर काढत दाणदाण पाय आपटत सर्पदंष्ट्र तेथून निघून गेला. तो गेल्याबरोबर एक राक्षस स्वर्णमुखीसमोर प्रकट झाला. त्याला पाहून ती दचकलीच! राक्षस तिला म्हणाला, "मी कंचुक. अदृश्य रूपात इकडून जात असताना मी तुझं बोलणं ऐकलं. आता तू माझ्याशी विवाह कर."

स्वर्णमुखीला त्याचे बोलणे ऐकून जास्तच आश्चर्य वाटले. ती म्हणाली, "मी तसं अुगीच बोलले होते. मी तुझ्याशी खरोखरच विवाह करीन, असं तुला वाटलंच कसं? राक्षस आणि मानव युवतीचा संबंध कसा शक्य आहे?"

"तू एक राजकुमारी आहेस. वचनभंग तुला शोभत नाही. वचनपालन करणं, म्हणजेच राजवंशाची कुलीनता अक्षुण्ण ठेवणं!" राक्षस म्हणाला.

स्वर्णमुखी बिचारी आधीच सर्पदंष्ट्रमुळे पिडलेली होती. आता त्यात या राक्षसाची आणखी भर पडली. तिला थोडा वेळ याबद्दल फार दुःख वाटले. शेवटी ती म्हणाली, "माझ्याशी विवाहाच्या तीन अटी आहेत: त्या तू पाळायला कबूल व्हायला हवेस."

"अटी? कसल्या अटी?" घाबरत



कंचुकने विचारले.

"पहिली अट-तू या क्षणापासून मांसभक्षण सोडून द्यायचंस. दुसरी-आपली हिंसक वृत्ति सोडायला हवीस तू. अन् तिसरी म्हणजे-आमच्या राज्यात एक जीवनदी वहाते. एका पहाडाने तिचे पाणी मधे अडवलं आहे, त्यामुळे बरंचसं पाणी समुद्रात वाहून जातंय. तू तो पहाड तिथून हटवलास, तर आमच्या राज्यातली बरीचशी जमीन हिरवी होईल. स्वर्णमुखीने अटी सांगून टाकल्या.

कंचुक स्वर्णमुखीकडे पहात म्हणाला, "पहाडाची काय गोष्ट! तो मी आत्ताच हटवू शकतो. फार सोपं आहे ते. पण तुझी पहिली अन् दुसरी अट फार कठीण आहे. तरीही तुला माझी बायको बनवण्यासाठी त्याही अटी पाळीन मी. तुझ्या अटी पूर्ण करून लवकरच येईन मी इथे." असे म्हणून राक्षस अदृश्य झाला.

एकाच आठवड्यात स्वर्णमुखीला बातमी मिळाली की, नदीचे पाणी अडवणारा पहाड तेथून दूर झाला आहे. यानंतर आणखी एक आठवडा लोटल्यावर कंचुक परत आला. तो खूपच अशक्त व बारीक झालेला दिसला. त्याला राजकुमारीने असे होण्याचे कारण विचारले.

मोठ्या दीनपणे राक्षस म्हणाला, "तुझ्या अटीसाठी मी मांसभक्षण सोडून दिलंय. केवळ फळं अन् कन्दमुळं खात असतो हल्ली मी. परन्तु ते खाअून जगणं मला फार कष्टाचं जात आहे."



आता स्वर्णमुखी म्हणू लागली, "कंचुक! मला तुझं कौतुक केल्याशिवाय रहावत नाहीये. तुझ्याशी विवाह करायला मी आता तयार आहे." आणि तिने दुष्ट सर्पदंष्ट्र राजाबद्दल सांगून कंचुकला म्हटले, "प्रथम त्या दुष्टाचा अन्त व्हायला हवा; म्हणून तू त्याला मारून टाक."

आता कंचुक थोडा वेळ विचारात पडला. तो म्हणाला, "सर्पदंष्ट्रला मारणं मला कठीण नव्हे; पण आता ते काम माझ्याच्याने होणार नाही. तुझ्या अटीप्रमाणे मी आता शान्त स्वभावाचा झालो आहे. मी हिंसा नाही करू शकत."

हे ऐकताच स्वर्णमुखीला फार आनन्द वाटला. आपल्यासाठी याने तर राक्षसवृत्तीच



अजिबात सोडून दिली. प्रथमच तिला राक्षसाच्या कृतीबद्दल आनन्द वाटला अन् आता तर मनात त्याच्याबद्दल प्रेमही वाटू लागले. दोन-तीन क्षण विचार करत ती चुप राहिली अन् नंतर आपल्या मनातले बोलू लागली.

"सर्पदंष्ट्र जिवन्त असेपर्यंत आपल्याला तो लग्न करू देणार नाही. त्याने अनीतिने आमच्या राज्यावर हल्ला केला. माझ्या आई-बाबांना त्याने तुरुंगात डांबले अन् जबरदस्तीनं माझ्याशी विवाह करायचं ठरवलं. अशा दुष्टाला मारण्यामुळे तुझा व्रतभंग मुळीच होणार नाही."

तरीही नकारात्मक स्वरात कंचुक म्हणाला, "दुष्टाचा अंत करणं चूक नव्हे. पण त्यानं माझी कुठे काय आगळीक केलीय?" अशा व्यक्तीला मारून तुझ्याशी लग्न करायचं म्हटलं तर तो स्वार्थ होईल माझा. म्हणूनच हे काम नाही करणार मी."

राक्षसाचे बोलणे खरे आहे हे मानून स्वर्णमुखी थोडा वेळ चुप राहिली. नंतर ती म्हणाली, "ठीक आहे-पण मला विचार करायला थोडा वेळ हवा. एक आठवड्यानन्तर आपण पुन्हा या उद्यानात भेटू या."

पुन्हा एक आठवडा लोटला. स्वर्णमुखी उद्यानात एका झाडाखाली बसून उलटसुलट विचारात गुंतली होती. इतक्यात कंचुक तेथे प्रकट होऊन विचारू लागला, "राजकुमारी, काय विचार केलास, बोल लवकर!"

त्याच वेळी नेमका सर्पदंष्ट्र तेथे आला. राक्षस व स्वर्णमुखी यांच्याकडे आश्चर्याने पाहिले अन् स्वर्णमुखीला विचारले, "राक्षसाशी अगदी न भिता बोलत आहेस! कोण आहे हा राक्षस?"

स्वर्णमुखीही न भिता उत्तरली, "हाही तुझ्याचसारखा माझ्याशी विवाह करण्यासाठी प्रतीक्षा करत आहे. पण तुझ्याप्रमाणे कैदेत वगैरे ठेवून जबरदस्तीने नव्हे. मी तयार असेन तरच."

हे ऐकताच सर्पदंष्ट्रने म्यानातून आपली तलवार बाहेर खेचली आणि तो म्हणाला, "अरे राक्षसाधमा, माझ्याशी स्पर्धा करायचं साहस करवलंच कसं तुला? चल, मी आत्ताच वध करतो तुझा." आणि त्याने कंचुकवर तलवार उगारली.

कंचुक आता रागावला. त्याने सर्पदंष्ट्रच्या हातातली तलवार खेचून घेऊन दूर फेकून दिली आणि त्यालाही उचलून हवेत गरगर खूप फिरवून लांब फेकून दिले. खाली पडताच रक्त ओकत सर्पदंष्ट्र मरून गेला.

राजा मरून पडताच कौंडिण्यपुरचे सैन्यही पळून गेले. स्वर्णपुरीचे राजा-राणी मुक्त झाले. त्यांना जेव्हा सारी हकिकत कळली, कि स्वर्णमुखी राक्षसाशी विवाह करायला निघाली आहे, तेव्हा ते घाबरून गेले. पण स्वर्णमुखी म्हणाली की, "सर्पदंष्ट्रच खरा राक्षस होता; पण कंचुक मात्र राक्षस-रूपातला श्रेष्ठ मानवच म्हणायला हवा." शेवटी राजा धर्मवर्धन व राणी यांना या विवाहाला संमति द्यावी लागली.

शेवटी एका शुभमुहूर्तावर कंचुक व राजकुमारी स्वर्णमुखी यांचा विवाह पक्का झाला. स्वर्णमुखीच्या गळ्यात कंचुकने मंगळसूत्र बांधताच त्याचे राक्षसरूप पालटून एक सुंदरसा राजकुमार तेथे दिसू लागला.

सर्वजण आश्चर्याने पाहू लागले. राजकुमार बोलू लागला, "मी वत्सल देशचा युवराज विक्रमसिंह. गुरुकुलातून परत येत असता एका देवकन्येने माझ्याशी विवाहाची इच्छा प्रकट केली. मी नकार दिल्याने तिने मला शाप दिला अन् मी राक्षस बनलो. मी प्रार्थना केल्यावर त्या देवकन्येने मला उःशाप दिला की, एकादी राजकुमारी स्वेच्छेने माझ्याशी विवाह करील तर मला माझं रूप परत मिळेल."

राक्षसाची ही कहाणी ऐकून राजा-राणीसह स्वर्णपुरीची सारी जनताही खूष झाली. विवाहानंतर स्वर्णमुखीला आपल्याबरोबर वत्सलदेशी घेऊन जाऊन विक्रमने आपल्या माता-पित्यांना सारी हकिकत निवेदन केली. तेही खूप आनन्दले. नंतर विक्रम वत्सलदेशचा व स्वर्णपुरीचाही राजा झाला व आनंदाने त्याने दोन्ही राज्यांचे पालन केले.



# राजनीति

हेमन्तपुर राज्याचा कोषाध्यक्ष वीरभद्र याच्याबद्दल राजाकडे खूप तक्रारी आल्या की, खोटे हिशोब लिहून तो खजिन्यातला पैसा खात आहे. अनेकांनी राजाला सांगितले की वीरभद्र भ्रष्टाचारी आहे.

एके दिवशी वीरभद्रला राजाकडून बोलावणे आले. लोकांना वाटले की आता वीरभद्र पदच्युत होणार! परंतु राजाने त्याला केवळ इशारा देऊन सोडून दिले. तो म्हणाला की-येथून पुढे हिशोबात काही गडबड दिसली तर माफ केले जाणार नाही. लोकांना तर माहीत होते की भ्रष्टाचारी लोकांना राजा कधीच दया दाखवत नाही. मग याच वेळी असे कसे घडले? कोणालाच काही समजेना. महाराणीलाही शंका आली, अन् तिने ती राजासमोर प्रकट केली.

यावर हसत राजा म्हणाला, "वीरभद्रने आपल्या दोन कुरूप मुलींचे विवाह उरकले; रहायला चांगलंसं घर बांधलं. त्याचं आता वयही झालं आहे. इथून त्याची हकालपट्टी झाली, तर त्याला अन्यत्र कुठे नोकरीही मिळणार नाही. म्हणून इतके दिवस हिशोबात गोलमाल पाहून ही मी तिकडे दुर्लक्ष केलं. पण आता तो कधी खजिन्याच्या रकमेत ढवळाढवळ करायचं साहस करणारच नाही. आता जर आपण दुसऱ्या कोणाला कोषाध्यक्ष केलं, तर याच गोष्टीची पुनरावृत्ति होईल की नाही? म्हणूनच वीरभद्रला नोकरीवरून कमी न करून मी ही पुनरावृत्ति टाळली आहे. आता आपणच सांगा महाराणी, कि मी ठीक केलं की नाही?"

महाराणीने हसून राजाला संमति दर्शवली.

—शारदा जोशी





# माया महाल

४

(ज्योतिषाचार्यांच्या सल्ल्यावरून राजा वीरसेन व राणी वज्रदेवी जेंव्हा विद्यावतीला भेटायला बेटावरील विश्रामभवनात गेले, तेंव्हा राजकुमारी तेथून नाहीशी झाल्याचे त्यांना आढळले. तिला शोधून कसे काढावे याबाबत राजा, राणी आणि सेनापती उग्रसेन यांनी बराच विचार केला अन् विचार करतच ते सारेजण राजवाड्यात परतले. त्यानंतर....)

राजा वीरसेन दरबारात आपल्या स्थानी बसला होता. मन्त्री, सेनापति, न्यायाधीष, सल्लागार वगैरे सर्व अधिकाऱ्यांनी दरबार गच्च भरला होता. युवराणीच्या नाहीशी होण्याची वार्ता राजाने त्यांना थोडक्यात सांगितली.

ही वार्ता कळताच दरबारात कुजबूज सुरू झाली. राजाचे तिकडे लक्ष जाताच एक सल्लागार उभा राहून म्हणाला, "युवराज्ञी विद्यावतीला ग्रीष्मकालीन विश्रामभवनात पाठवण्यात आलं, तेव्हा तिच्या रक्षणाची कडक व्यवस्था न ठेवल्याबाबतच मला संशय येत आहे. युवराणीबरोबर रहाण्यासाठी केवळ एकच म्हातारी दासी ठेवणं आणि जेवणखाण नेण्यासाठी असणाऱ्या दासींचं ताबडतोब परत फिरणं, वगैरे ज्योतिषाचार्यांनी सांगितलेल्या साऱ्या अटी संशयास्पद वाटत आहेत."



सल्लागाराचे हे बोलणे ऐकताच दरबारात खळबळ माजली. तेव्हा साऱ्यांना शान्त करण्याच्या प्रयत्नात राजा म्हणाला, "या बाबत आचार्य वाचस्पति यांचा संशय घेणं बरं नाही. ते राजपरिवाराचे एक निकटवर्ती हितचिन्तक आहेत. त्यांच्यावर आम्हा सर्वांचाच गाढ विश्वास आहे. काल त्यांनीच आम्हाला असा सल्ला दिला होता की, आम्ही आज सकाळीच विद्यावतीला भेटून यावे. त्यांनी आम्हाला याबद्दलही सावधगिरीची सूचना दिली होती की तिची वाईट ग्रहदशा आता सुरू होत आहे. अशा माणसाबद्दल संशय घेणं बरोबर होणार नाही."

यानंतर मिनिटभर दरबार अगदी शान्त होता. मन्त्र्याने ती शान्तता मोडत विचारले, "हे जगत्पति आचार्य खरे कोण आहेत?"

"आपल्या प्रमुख ज्योतिषाचार्यांचे मित्र आहेत ते. तेही स्वतः एक महान् ज्योतिषाचार्य आहेत. विशेष घटनांबाबत ते आपले ज्योतिषाचार्य वाचस्पति यांच्याशी नेहमीच विचारविनिमय करत असतात. त्यांच्या शास्त्रीय ज्ञानाबाबत शंका घेण्यासारखे काही मला तर दिसत नाही." राजाने माहिती पुरवली.

युवराज्ञीच्या अदृश्य होण्याची वार्ता साऱ्या राज्यात प्रसृत करण्याचा निर्णय घेऊन दरबार समाप्त झाला.

युवराणीच्या नाहिसे होण्याची वार्ता ऐकून साऱ्या राज्यातले लोक चकित झाले. शहरातली जनता इकडे-तिकडे टोळक्या-टोळक्यांनी जमून याच गोष्टीबद्दल आपसात बोलत राहिली. प्रत्येकाने आपापल्या परीने आपला संशय बोलून दाखवला. पण वस्तु-स्थितीचे खरे ज्ञान कोणालाच नव्हते.

"ज्याने राजकुमारीला पळवले असेल, तो आपल्या राज्यातला माणूस नक्कीच नसेल. हे कोणा तरी परकीय माणसाचे काम असावे. आपण सर्वजण महाराज व महाराणीवर इतके प्रेम करतो की त्यांना दुःख होईल असे कृत्य आपल्या हातून घडणे केवळ अशक्य!" एक म्हातारी म्हणाली.

"सरोवराच्या आसपासच्या जंगलातल्या गुहांबद्दल मला खडान् खडा माहिती आहे.



मी आजच तिकडे युवराणीच्या शोधासाठी जाईन युवराणीचा शोध लागेपर्यंत मी एक घोट भर पाणी सुद्धा पिणार नाही." एक तरूण म्हणाला.

इकडे युवराणीच्या गायब होण्याची वार्ता ऐकून आचार्य वाचस्पति महालात येऊन राजाला विचारू लागला, "महाराज, राजकुमारी बद्दल मी ऐकलं ते खरं आहे?"

"जे न घडावं, ते तर घडून चुकलंय. आता विद्यावतीवर अन्य काही संकट न यावं, यासाठी आपण काही करायला हवं! काय करावं, याबद्दल आपण काही सुचवू शकाल? तिच्या तब्येतीसाठी आपण ज्या सूचना दिल्यात, सल्ला दिलात, तो पाळून आम्ही तिला सरोवरभवनात ठेवली होती. आता ती कुठे आहे, याचा पत्ता आपणच लावायला हवा." गंभीर स्वरात राजा उत्तरला.

"माझी विद्यावती फारच नाजुक आहे. आता ती कुठे आहे अन् तिच्यावर बिचारीवर काय संकटं आली आहेत कुणास ठाऊक? कुठे ही असो, सुरक्षित असली म्हणजे बरं! तिच्या जिवावर तर काही बेतलं नसेल ना? आमच्या भाग्यात काय काय वाढून ठेवलंय कोण जाणे?" डोळ्यांना पदर लावत राणी उद्गारली.

ज्योतिषाचार्य काही वेळ काही बोलूच शकला नाही. नंतर स्वतःला सावरून राजदंपतीला सान्त्वना देत तो म्हणाला, "आता असं नुसतच दुःख करत राहून कसं



चालेल? आपण दोघांनी धैर्यानं या संकटाला तोंड द्यायला हवं. युवराणीवर काहीही संकट येणार नाही. पूर्ण चन्द्रावर अशी ग्रहणकाली काही वेळ छाया पडते. तसंच आहे हे! मी आत्ता तावडतोब जाऊन तिची जमपत्रिका काळजीपूर्वक पाहून, ती आज कोणत्या दिशेला आहे याचा शोध लावून तुम्हाला लगेच येऊन सांगतो." आणि तो तेथून निघून गेला.

घरी येऊन वाचस्पती युवराणीच्या पत्रिकेचे बारकाईने अध्ययन करू लागला. ताडपत्रीचे ग्रन्थ काढून संदर्भ पाहू लागला. खूप वेळ गेला, पण जगत्पती आचार्याचा कुठेच काही पत्ता नव्हता. केवळ त्याच दिवशी नव्हे, तर पुढल्या दिवशीही तो आला



नाही. तिसऱ्या दिवशीही तो न आल्याने वाचस्पतीला आश्चर्य वाटू लागले. त्याच्या मनात एक एक करून अगोदरच्या साऱ्या घटना येऊ लागल्या. युवराणीला अचानक अशक्तपणा येणे, तिच्यासाठी आपण सुचवलेले उपाय, तिच्याबद्दल जगत्पतीशी केलेली चर्चा - या साऱ्या गोष्टी त्याला आठवल्या.

जगत्पती तसा राजघराण्यातला होता. त्याचा आजा कैलासपती हा तर हिमगिरीचा राजा त्रिलोकपती याचा धाकटा भाऊच होता. वृध्द मोठ्या भावाला मूलबाळ नसल्याने त्याच्या जागी आपणच हिमगिरीचा राजा बनणार असल्याचे स्वप्न तो बाळगून होता. परंतु त्रिलोकपतीच्या मृत्युनंतर त्याच्या बहिणीचा मुलगा उमापती हा राजा बनला आणि कैलासपतीवर राज्यभ्रष्ट होऊन जंगलात रहाण्याची पाळी आली. पुढे अचानक आपल्या दुर्भाग्याचा विचार करताना त्याला ज्योतीषशास्त्राबद्दल आकर्षण वाटू लागले. देशोदेशीच्या ज्योतिषी लोकांना भेटत, मानवजीवनातल्या भाग्याचा खेळ पहातपहात त्याने आपले आयुष्य घालवले. कैलासपतीचा पुत्र गजपती यानेही ज्योतिषशास्त्रावर चांगलेच प्रेम होते. त्याने आपला पुत्र जगत्पती याला ज्योतिषशास्त्रा बरोबरच पुरातन ग्रन्थातले व जंगली जातीच्या लोकांकडून स्वत: शिकून घेतलेले मन्त्र-तन्त्रही शिकवले. अशा रीतीने जगत्पती मंत्र-तंत्र व इंद्रजाल विद्येतही प्रवीण झाला.

जगत्पतीने राज्यभ्रष्ट झालेल्या आपल्या आजोबा व पित्याचा जंगलातला महाल आणखी चांगला मजबूत केला. हा महाल फारसा कोणाच्या लक्षात येण्यासारखा नव्हता. त्या बाजूला फारसे कोणी फिरकत नसे. अनेकांना तर जंगलात इतकं आत जायला भीतीच वाटे. आणि तिथे राहून तो रात्रंदिवस मन्त्र-तन्त्र आणि इन्द्रजाल-विद्येत आणखी आणखी प्रवीण होण्याचा परिश्रम-पूर्वक प्रयत्न करत राहिला.

जगत्पती केवळ मन्त्र-तन्त्र व ज्योतिषशास्त्र एवढ्यावरच संतुष्ट नव्हता, तर आपल्या विद्येच्या सहाय्याने हिमगिरीचा







सोडला तरी आणखी दुसऱ्या एकाद्या राज्याचा राजा बनायची आशा करू लागला. त्यासाठी तो राजनीति शास्त्राचाही अभ्यास करू लागला. अशातच अचानक विद्यावती बद्दलची वार्ता ऐकून त्याच्या मनात आशा पालवली की, आता तर नशीब आपल्याच दाराचा दरवाजा ठोठावत आहे!

वीरगिरीच्या राजाची एकुलती एक कन्या विद्यावती सरोवरातील विश्रामभवनात एकटीच होती. वाचस्पतीने म्हटले होते की तिची ही ग्रहदशा संपल्याबरोबर तिला विवाहयोग आहे. ही सर्व माहिती मिळाल्यावर जगत्पतीच्या मनात आले की, आपला या विद्यावतीशी विवाह झाला, तर वीरगिरीचे सिंहासन आपल्याच हाती येईल. हा विचार डोक्यात शिरल्यावर मात्र तो शान्त राहिला नाही. आपला विचार सत्य-सृष्टीत आणण्यासाठी वेगवेगळ्या योजना त्याने आखल्या. लपूनछपून त्याने सरोवराच्या आसपासच्या भागाचे नीट निरीक्षण केले. नावेच्या घाटापासून दूर असणारी, झाडाझाडातून जाणारी एक अरुन्दशी वाटही त्याने शोधून काढली आणि गुप्तपणे एका नावेचीही व्यवस्था करून ठेवली.

विश्रामगृहातून राजकुमारीचे अपहरण करून जंगलाच्या मध्यभागी असलेल्या आपल्या जादूच्या महालात तिला लपवून ठेवायचे आणि तिची ग्रहदशा संपल्यावर स्वतःच तिला घेऊन जाऊन राजाहाती सोपवायचे; वर असे दाखवायचे की जसे काही तिच्या अपहरणाबाबत आपल्याला काही माहीतच नाही! आपणच तिला शोधून काढले व आता तिला राजाकडे घेऊन आलो आहोत-असे सर्व नाटक करण्याचा त्याने घाट घातला. राजदंपती खुश होऊन तिचा ते आपल्याशीच विवाह करून देतील. असा एकूण जगत्पतीचा विचार होता. बास, आपला हा विचार अंमलात आणायच्या उद्योगाला लागला तो!

आचार्य वाचस्पतीला याबद्दल जराही काही कल्पना नव्हती. तो जगत्पतीची वाट पहात राहिला. तीन दिवसपर्यन्त त्याची वाट पाहून शेवटी वाचस्पती स्वतःच राजाकडे



भेटायला गेला.

तो राजवडयात पोचताच, त्याला सेनापती अुग्रसेन युवराणीला शोधण्यासाठी आपण कायकाय केले, त्याचा अहवाल राजाला सांगत असलेला दिसला. वाचस्पतीला पहाताच राजाने विचारले, ''आचार्य! विद्यावती आहे तिथे ठीक तर आहे ना? तिच्या जिवाला काही धोका दिसत नाही ना? तिचे प्रकृतिमान ठीक असेल ना?''

''महाराज याबाबत आपण जराही संशय बाळगू नका. युवराणी असेल तिथे नक्कीच अुत्तम स्थितीत असेल. तिच्यावर कसलेही संकट आलेलं नसेल! ग्रहस्थिति पाहून असं वाटतंय की ती आत्ता आपल्या नगराच्या पश्चिमेकडे आहे. तिच्या जिवाला कसलाही धोका नाही. तिची प्रकृति अगदी उत्तम आहे. आपण मुळिच काळजी करण्याचे कारण नाही.'' वाचस्पतीने आपला शोध सांगितला.

''आपल्या राज्याच्या पश्चिमेला तर जंगल व पहाडच आहेत ना! तरीही जितकं घुसता आलं, तितकं आत जाअून शिपायांनी शोध केला. अुत्तरेकडे गेलेले शिपाई मात्र अजून परतलेले नाहीत.'' अुग्रसेन बोलला.

''त्यांना परत येअू देत. त्यानन्तर ज्योतिषाचार्यांच्या बोलण्यानुसार पुन्हा पश्चिमेकडे सैनिक पाठवू. अच्छा, तू म्हणत होतास की कोणी एक युवक विद्यावतीला शोधायला जायची परवानगी मागत आहे!



कुठे आहे तो? त्याच्याबरोबर शिपाई हवेत अशी त्याची मागणी आहे का?'' राजाने विचारले.

''नाही महाराज! तो म्हणतोय की राजकुमारीला शोधायला तो एकटाच जाणार आहे. त्या प्रयत्नात सफल झाला तर ठीक, पण त्यात जर त्याला मृत्यु स्वीकारावा लागला, तर त्याच्या म्हाताऱ्या आईची जबाबदारी मात्र आपण घ्यावी-इतकीच त्याची विनंती आहे. त्या तरुणाला पाहून तर तो कोणी लुंगा-सुंगा माणूस वाटत नाहीये. मला वाटतंय की त्याला संमति द्यावी. तो सफल झाला तर आश्चर्य वाटायला नको!'' अुग्रसेनने म्हटले.

''असं? तो तरुण आहे कुठे?''

राजाने विचारले.

"महालाच्या प्रवेशद्वारीच वाट पहात आहे तो! बोलवायचं त्याला आत? तो बराच वेळ आत बोलवण्याची वाट पहात आहे." अुग्रसेनने विचारले.

"हो, बोलवा ताबडतोब. मला त्याच्याशी काही सल्लामसलत करायची आहे." राजाने आज्ञा दिली.

अुग्रसेनने एका शिपायाला त्या तरुणाला घेअून यायला सांगितले. नंतर वाचस्पतीकडे वळून त्याने विचारले, "आपण जगत्पती आचार्यांना पाहिलंत? पाहिलं असलंत तर केव्हा पाहिलंत आपण त्याला?"

"नाही. चार दिवसांपूर्वी तो माझ्याकडे आला होता. त्यापूर्वी रोज तो माझ्याकडे येत असे. रोज दोन-तीनदा माझ्याकडे आल्याशिवाय जणू त्याला चैनच पडत नसे. आता का येत नाहीये, हे कळत नाही मला! कदाचित् काही महत्वाच्या अशा कामासाठी कुठे गेला असेल. पण तसे असेल तर एव्हा पर्यंत त्याने परत येअून मला भेटायला हवं होतं. माझ्याकडे आल्यावर पाठवू का त्याला आपणाकडे?" आचार्य वाचस्पतीने विचारले.

"नको. महाराजांकडून मला कळलं की चार दिवसांपूर्वी तोही आपणाबरोबर आला होता. मी आपलं सहज म्हणून विचारलं, की युवराणीच्या अदृश्य होण्याबद्दल त्यांचं काही म्हणणं असेल तर विचारावं. या बाबत त्याला काही माहिती असण्याची शक्यता आहे." अुग्रसेन म्हणाला.

वाचस्पती तेथून निघणार इतक्यात एक शिपाई एका युवकाला घेअून तेथे पोचला. युवक मोठा रुबाबदार दिसत होता. त्याचे तीक्ष्ण डोळे पाहून ज्योतिषाचार्य क्षणभर दचकले. ते विचारात पडले की युवराणीला एकटाच शोधायला निघणारा या युवक कोण असावा? बरोबर कोणाला तरी घेअून जण्यात याला काय बरे अडचण असावी? विचार करतच तो महालाबाहेर पडला.

(पुढे चालू)





# वीणाधरीचा विवाह

अटळ निश्चयी विक्रम पुन्हा पहिल्या प्रमाणे झाडाकडे गेला; त्यावरून प्रेत अुतरवून ते त्याने खांद्यावर टाकले आणि मौन स्वीकारून तो स्मशानाकडे चालू लागला. तेंव्हा त्या प्रेतातला वेताळ बोलू लागला, "राजा, या मध्यरात्री तू अगदी मनापासून हे जे कष्ट करत आहेस, ते पाहून मला असं वाटतंय की तुला काही विशिष्ट अुद्दिष्ट साध्य करायचं आहे. कसलं काम आहे ते? ते काम तुझ्या शक्ति-सामर्थ्याला व प्रतिभेला प्रतिष्ठा प्राप्त करून देणारं असेल, कि त्यामुळे तुला अपमानित व्हावं लागेल? अनुभवी लोक नेहमी असंच सांगतात की कोणीही कधी आपल्या शक्ती बाहेर असाध्य असं असणारं काम करायचा प्रयत्न करू नये. ही एक सत्यवाणी आहे. हे तथ्य स्पष्ट करून सांगणारी वीणाधरीची गोष्ट मी तुला सांगतो. नीट लक्ष देअून ऐक. तुझी वाटही सुलभपणे संपेल व कष्टही जाणवणार नाहीत." आणि

## वेताळाच्या गोष्टी



वेताळ गोष्ट सांगू लागला.

चन्द्रकान्त राज्यात रामदेव नावाचा एक गरीब शेतकरी रहात असे. त्याच्या बायकोचं नाव होतं कामाक्षी. त्यांना विवाहानंतर बऱ्याच काळाने एक मुलगी झाली. ती दिसायला फारच सुन्दर होती. तिचं शरीर सुवर्णकान्तीने झळाळत असे. तिचं अद्भुत असं सौन्दर्य पाहून रामदेव फारच आनन्दित झाला. आसपासचे लोक आले की तिच्या सौंदर्याची तोंड भरून स्तुति करीत. त्यानं तिचं नाव ठेवलं 'वीणाधरी.'

वीणाधरी चन्द्रकले प्रमाणे दिवसेंदिवस वाढत राहिली अन् त्याबरोबर तिचं सौन्दर्यही जास्त जास्तच निखरू लागलं. तिला पाहून गावकरी म्हणत की 'वीणाधरी' तर एकाद्या राजकुमारालाच शोभेशी दिसतेय. असे अद्भुत लावण्य राजवाड्यातही सहसा पहायला मिळत नाही. रामदेव खरोखरीच मोठा भाग्यवान आहे की त्याला अशी अनुपम लावण्यवती कन्या लाभली आहे.

ही बोलणी वीणाधरीच्याही कानी पडत. त्यामुळे तिच्या मनात ही गोष्ट पक्की रुजली की, आपल्यासाठी एकादा राजकुमारच योग्य पति असेल. अन्य कोणीही नाही. तिने आपल्या मनाशी निश्चय केला की लग्न करीन तर एकाद्या सुरेख राजकुमाराशी, नाहीतर नित्य कुमारिकाच राहीन.

रामदेवचा मित्र चन्द्रकिशोर याच्या मनात आलं की, वीणाधरीला आपली सून करून घ्यावी. त्याला शिवकुमार नावाचा एक मुलगा होता. चन्द्रकिशोर मित्राला नेहमी म्हणे, "मी तुझ्या वीणाधरीला आपली सून करून घेईन. माझा मुलगा ही काही कमी सुंदर नाही. शिवाय तो चांगला कलाकार आणि सद्गुणसंपन्न आहे. दोघे ही एकमेकांना अगदी अनुरूप आहेत.

वीणाधरी व शिवकुमार विवाहयोग्य वयाचे झाले. एक दिवस शिवकुमार वीणाधरीला म्हणाला, "वीणा, मी आपल्या मनची गोष्ट तुझ्याजवळ बोलतोय, नीट ध्यान देऊन ऐक. तू मला आपल्या प्राणाइतकी प्रिय आहेस. तू संमति दिलीस तर आपला विवाह झालाच म्हणून समज."

यावर वीणाधरी उत्तरली, "तुझ्याशी विवाह करायचा जराही विचार माझ्या मनात नाही. मला तर एकाद्या राजकुमाराशी लग्न करायचे आहे. माझ्याशी विवाह करण्याचा विचार तू आपल्या डोक्यातून काढून टाक."

हे ऐकून शिवकुमारचं मन खट्टू झालं. तो म्हणाला, "जाऊ दे, विवाहाच्या बाबतीत जोर-जबरदस्ती थोडीच चालते? हां, पण एक गोष्ट मात्र मी सांगून टाकतो. मी विवाह केला तर तुझ्याशीच करीन, नाहीतर जन्मभर तसाच राहीन."

या बोलण्यावर वीणाधरीने काहीच भाव दाखवला नाही, ती मुकाट राहिली. एकाद्या राजा-युवराजाशी विवाह करायचा म्हटलं, तर केवळ सौन्दर्य पुरेसं होणार नाही. त्यासाठी व्यवस्थित पोशाख आणि साफ-सुथरी भाषा यांच्या बरोबरच दुसऱ्याशी वागण्याची नीट सुधारलेली पद्धतही माहीत हवी. वीणाधरीच्या मनात असा विचार आला. यासाठी अनुभव असायला हवा. वीणाधरीने यासाठी उपायही शोधून काढला- महाराणीची सेविका बनून रहाणं!

वीणाधरीची एक मैत्रीण पद्मदीपिका काही दिवसांपूर्वीपासून महाराणी चन्द्रावतीकडे सेविका म्हणून काम करत होती. तिच्या मदतीने वीणाधरीने महाराणीकडे काम मिळवले. राजवाड्यात वावरायची कला शिकू लागली. राजघराण्यांच्या रीती-भातींचे तिने अध्ययन केले. गोड बोलण्याची कला तिने आत्मसात् केली. थोडे संगीत शिकून घेतले.



एकदा एक चित्रकार महाराणीकडे आला व म्हणाला, "महाराणी, मी काढलेलं एक चित्र आपणाला भेट म्हणून द्यायला आलो आहे."

वीणाधरीने ते चित्र घेऊन महाराणीच्या हाती दिले. त्या चित्रात सूर्यास्ताच्या वेळचे फारच मनोरम चित्रण केलेले होते; त्याची रंगसंगती फार सुरेख साधली होती. त्यावर मुग्ध होऊन महाराणीनं चित्रकाराला एक हजार अशर्फी भेट म्हणून दिल्या.

नंतर महाराणीने वीणाधरीला विचारले, "कसं आहे हे चित्र?"

वीणाधरी उत्तरली, "आपण रोज पहातो तोच सूर्य तर आहे या चित्रात! विशेषसं



काय आहे? काहीही असो, पण एक हजार अशर्फी या चित्रासाठी बक्षिस देणं नाहक वाटतं.''

महाराणी हसून तिला म्हणाली, ''वीणा, देवानं तुला रूप तर मोठे सुन्दर दिलंय; पण कलात्मकता नाही दिली. ते असो, पण आम्ही जे बक्षिस देतो, ते आमच्या अधिकाराला अनुसरून देतो, हे काय तुला माहीत नाही?''

वीणाधरी यावर काहीच बोलू शकली नाही. चुप राहिली ती.

पुढे एक दिवस महाराणी व महाराज अंतःपुरात बसून गोष्टी करीत होते. तेथेच जवळ वीणाधरीही त्यांच्यावर चवरी ढाळून वारा घालत होती. इतक्यात एक गुप्त हेर तेथे आला अन् म्हणाला, ''महाराज, वैदेहीचा राजा शक्तिसिंह आपणावर हल्ला करण्याच्या विचारात आहे. त्याने जमवलेले सैन्य केंव्हाही आपणावर तुटून पडायची शक्यता आहे.'' इतके सांगून तो तेथून निघून गेला.

पण युद्धाची वार्ता ऐकून वीणाधरी मात्र घाबरून अचेत झाली, चवरी हलवायचेही भान तिला राहिले नाही. महाराणीही विचारात गढून गेली.

महाराज महाराणीला म्हणाले, ''शक्तिसिंह हल्ला करू शकतो, पण तो हल्ला अगदी अचानक होणार नाही. त्याला स्वर्णमुखी नदी पार करून यावं लागेल, अन् आपलं सैन्य तेथे सावध चित्तानं अुभं आहे.'' नंतर वीणाधरीकडे वळून राजा म्हणाला, ''अंतःपुरात काम करणारीच इतकी भिअून गेली तर इतरांचा काय पाड? जरा धीराने रहायला शीक.''

अशीच एकदा राणी चन्द्रावती वनविहारासाठी गेली. साऱ्या सेविकाही तिच्या मागोमाग गेल्या; पण डोकेदुखीच्या बहाण्याने वीणाधरी मात्र गेली नाही. कारण फार दिवसांपासून राणीचे दागिने घालून आरशात आपलं रूप पहायचं तिच्या मनात होतं. त्यासाठी ही संधी अुत्तम होती.

महाराणी निघून गेल्याबरोबर वीणाधरीने तिची रेशमी वस्त्रे नेसून दागिनेही चढवले. नंतर आरशासमोर अुभी राहून ती त्यात आपले रूप न्याहाळू लागली.





नेमका त्याच वेळी एक तरूण त्या महालात आला आणि वीणाधरीच्या अद्भुत सौन्दर्यावर भाळून त्याने विचारलं, ''हे सुन्दरी, तू कोण आहेस?''

सर्वसामान्य वस्त्रं धारण केलेल्या त्या तरुणाला खिजवण्यासाठी वीणाधरी म्हणाली, ''मी विशालपुरची युवराणी! इथल्या राणीच्या निमंत्रणावरून मेजवानीसाठी इथे आले आहे.''

यावर तो युवक म्हणाला, ''मी या देशाचा युवराज विजयदीप! आपला विद्याभ्यास संपवून आत्ताच मी गुरुकुलातून परत येत आहे. तुझं सौन्दर्य मला मोहवीत आहे. तुझी हरकत नसेल, तर वडील-धाऱ्यांच्या सहमतीने मी आपल्या विवाहासाठी खटपट करीन.''

हे अुत्तर ऐकून वीणाधरी दचकलीच! युवराजाशी चेष्टा-मस्करी! पटकन जाअून ती युवराजाच्या पायांवर कोसळली अन् माफी मागत म्हणाली, ''मला क्षमा करा युवराज! मी महाराणीं जवळची एक सामान्य सेविका आहे. महाराणींचे दागिने घालून पहायच्या मोहाने मी ही चूक केलीय. आणि आपणाला एक सर्वसामान्य माणूस समजून आपल्याशी चेष्टा-मस्करी केली मी! क्षमा कराल न मला?''

खरी गोष्ट समजल्यावर विजयदीप हसला. तो म्हणाला, ''घाबरू नकोस. मातीत लपलेल्या हिऱ्याचं मूल्य मी ओळखू शकतो. तू सेविका असलीस तरी काय? मी तुझ्याशी विवाह करू इच्छितोच.''

आता भानावर येत वीणाधरी म्हणाली, ''मी आपणाला एक प्रश्न विचारते. मी या विवाहाला संमति न दिली तर आपण काय कराल?''

या प्रश्नाने विजयदीप चकित झाला आणि म्हणाला, ''मी या देशाचा भावी मालक आहे. मी स्वतःच एकाद्या तरुणीशी विवाह करू इच्छित असलो, तर कोणती तरुणी नकार देईल? तू नकार देणार असशील, तर तू फार घमेंडखोर तरी असावीस किंवा मूर्ख असावीस, असं समजून तुझ्यापेक्षा सुंदर तरुणी शोधून मी तिच्याशी विवाह करीन.''

यावर वीणाधरी म्हणाली, ''माफ करा युवराज! मी आपणाशी विवाह करू शकत

नाही. तो अगोदरच एकाशी ठरलेला आहे. त्याला नकार देणे मला शक्य नाही. तसे केले तर मी वचन-भंग केल्याचे पाप लागेल मला!'' असे म्हणून ती तेथून आपल्या गावी निघून आली अन् शिवकुमारशी तिने विवाह केला.

गोष्ट इथे संपवून वेताळाने विचारले, ''राजा, वीणाधरी तर लहानपणा पासूनच एकाद्या राजपुत्राशी विवाहाचं स्वप्न पहात होती न? मग ते साकार होऊ लागायची संधी तिने का सोडून दिली? महाराणीने तिला 'कलाहृदय नाही' असे म्हटले अन राजाने तिला 'धैर्यानं रहायला शीक' असे म्हटले. या सर्वांवरून वीणाधरीला आपण राजपुत्राची योग्य पत्नी बनू शकणार नाही असं वाटलं का? आपल्या ताकतीबाहेरचं कार्य साधायचा प्रयत्न मूर्खपणाचा आहे, हे ओळखूनच तिने तो प्रयत्न सोडून दिला असावा-असंच वीणाधरीच्या बाबतीत घडलं असावं काय? या प्रश्नाचं उत्तर माहीत असूनही द्यायचं टाळलंस, तर तुझ्या मस्तकाची छकलं-छकलं होऊन जातील.''

राजा विक्रम लगेच उत्तरला, ''वीणाधरीने युवराजाला नकार देण्यामागे हे कारण नाही. एकदा आपलं स्वप्न साकार झालं तर शक्ति-सामर्थ्याचा प्रश्नच उठत नाही. पण युवराज म्हणाला की-तिने नकार दिला तर आपण आणखीही सुन्दर तरुणी पाहून लग्न करू. म्हणजे याचा अर्थ असा होतो की वीणाधरी पेक्षा सुन्दर तरुणी दिसली तर तिच्याशीही तो विवाह करून घेईल. आणि वीणाधरीची स्वतःची परिस्थिती केविलवाणी होईल. नवऱ्याच्या प्रेमाला आंचवेल ती! याच विचाराने तिने युवराजाचा प्रस्ताव धुडकावला;' अन् आपल्यावर प्राणापेक्षा अधिक प्रेम करणाऱ्या शिवकुमारची ती पत्नी बनली.''

असे उत्तर ऐकून मौनभंग झाल्यामुळे वेताळ राजाच्या खांद्यावरून अदृश्य होऊन पुन्हा त्या झाडाच्या फान्दीला लटकू लागला.





# आईचे ऋण

गणपतिनगरमधे शान्ताबाई नावाची एक विधवा रहात असे. तिला दोन मुलगे होतें. दोघेही विवाहित होते. त्यामुळे शांताबाई दोन्ही मुलांकडे सहा-सहा महिने रहात असे. दोन्ही सुना सासूवर आईसारखे प्रेम करीत. दोघींकडे दोन दोन मुले होती. त्यांच्याशी खेळण्यांत, त्यांना गोष्टी सांगण्यात शांताबाई रमून जाई. मुलांचे ही आईपेक्षा आजीवर जास्त प्रेम. सुना सासूच्या खाण्यापिण्याची आबाळ होऊ देत नसत. सासूचे काही दुखले- खुपले तर मनापासून सेवा करीत. तिच्या कपड्यां- लत्यांकडे लक्ष देत. थोरला चांगला श्रीमन्त होता. धाकट्याचे स्वतःचे छोटेसे घर होते, अन् त्याला त्याच गावात एक लहानशी नोकरीही होती. येणाऱ्या पगारातून मुलाबाळांचे व नवरा-बायकोंचे बऱ्यापैकी भागे.

अशातच शांताबाई एकदा धाकट्याच्या घरी रहात असताना आजारी पडली व तेथेच तिचे देहावसान झाले. ती बातमी कळल्यावर थोरला सहकुटुंब धाकट्याकडे आला. थोरला रामराज रडत रडत धाकट्या सोमराजला म्हणाला, ''अरे सोम, आईचं ऋण तू चुकवलंस, म्हणूनच आईने शेवटी तुझ्या घरी प्राण सोडला. मी मोठा आहे, तेव्हा आता अन्त्येष्टीचा सारा खर्च मीच करीन.''

ते ऐकल्यावर तेथे जमलेले सारे नातेवाईक म्हणाले, ''वा,वा! मुलगा असावा, तर असा! रामराज म्हणजे शंभर नंबरी सोनं आहे सोनं!''

रामराजने प्रथम वचन दिले खरे, पण अकराव्या दिवसा पर्यन्त अन्त्येष्टीचा जो खर्च होईल त्याचा विचार मनात येताच त्याचे काळीज धडधडू लागले. अंत्येष्टीच्या प्रमुख दिवशी दोघेही भाऊ अन्य नातेवाईकांसह नदीकिनारी गेले. तेथे रामराज व सोमराज

अशोक पवार

यांनी स्नान केल्यावर पुरोहितांनी मन्त्रपठण वगैरे केले आणि रामराजने कावळ्यांसाठी पिंडदान देऊन भक्तीने हात जोडले.

परन्तु आसपासच्या झाडांवर अनेक कावळे असूनही एकही कावळा पिंड खायला येईना, हे पाहून सारे नातेवाईक आश्चर्यात पडले. तेथे जमलेले सारे भाऊबन्द आपापली नावे घेऊन, मृतात्म्याचे ध्यान करून 'कृपया पिंड स्वीकारावा' अशी प्रार्थना करू लागले.

शेवटी मामा पुढे आला अन् सर्वांना गप्प रहायला सुचवून म्हणाला "ताई, हे सारेजण तुझ्या थोरल्या लेकाने केलेल्या खर्चाबद्दल त्याचीच फक्त स्तुति करत आहेत, याचंच तुला दुःख आहे न? सोमने जो खर्च केला, त्याही बाबत मी साऱ्यांना सांगतो. पण कृपा करून पिंड स्वीकार."

बस, लगेच कावळे खाली आले अन् पिंडावर तुटून पडले. हे पाहून सर्वांना आश्चर्य वाटले. तेंव्हा रामराजला मामा सांगू लागला, "आईला आपली सारीच मुलं सारखी असतात. जेंव्हा थोरल्या रामराजने अंत्येष्टी व नंतरचे दिवस घालण्याचा सारा खर्च सोसण्याची गोष्ट केली, तेंव्हा सोमराजने गावच्या अनाथालयाला एक मोठी रक्कम देणगी म्हणून देऊन अशी व्यवस्था केली की दरवर्षी त्या रकमेच्या व्याजातून आईच्या श्राद्धदिनी गरिबांना अन्नदान केले जावे. हेही आईचं ऋण चुकवण्यासारखंच आहे ना?"

हे ऐकून रामराजला पश्चात्ताप वाटू लागला. तो म्हणाला, "सोमू, आता खरी गोष्ट मी सांगतो. आईच्या या कर्मकांडासाठी जेंव्हा इतका खर्च करावा लागला, तेंव्हा मी मनातल्या मनात चरफडत होतो. पण तू मात्र गुप्त रूपाने अनाथालयाला देणगी देऊन आईचं ऋण फेडलंस. तू महान आहेस!"

यावर सोमराज म्हणाला, "अरे दादा, आईच्या परलोकसुखासाठी तू खर्च केलास अन् मी या लोकात आईचं नाव रहावं म्हणून खर्च केला. खरं म्हणजे आपण दोघंच काय, या जगात कुणीच आईचं ऋण पूर्णतः फेडू शकत नाही."



# चान्दोबा पुरवणी-४५



भारतातील पशुपक्षी

## कच्छमधील फ्लेमिंगो

भारतात एक वैशिष्ट्यपूर्ण समजला जाणारा पक्षी म्हणजे फ्लेमिंगो (रोहित). भारतातल्या एका भागाला याचे नाव प्राप्त झाले आहे. तो भाग म्हणजे गुजराथचा कच्छ. याला 'फ्लेमिंगो सिटी' असे नाव पडले आहे.

फिक्कया लाल रंगाचे पाय व बाकडी लांब मान असणारा हा फ्लेमिंगो पक्षी शरीराने आपल्या पाळीव बदका इतकाच मोठा दिसतो. त्याची उंची मात्र असते चार फूट. त्याचे एक वैशिष्ट्य म्हणजे त्याची मोठी लाल चोच. ही चोच अर्धी खाली वळलेली असते. याच्या पायांची रचना बदकासारखीच (म्हणजे चोटे चामड्यासारख्या पडद्यांनी एकमेकांना जोडलेली) असते. उथळ पाण्यात आपली चोच बुडवून आपले भक्ष मिळवायच्या उद्योगात हे मग्न असतात. चोच खाली वाकलेली असल्यामुळे चिखलपाण्याच्या वरच्या पातळीवर खरडून आपले अन्न मिळवणे त्यांना सोयीचे होते. त्यांची जीभ चाळणीप्रमाणे अन्नकण चाळून घेण्याचे काम करते.

सरोवर, तलाव व छोट्या डबक्यांतून हे लहान लहान टोळकी करून वसलेले दिसतात. ते जेंव्हा उडतात, तेंव्हा आकाशात आपले पंख फैलावून 'V' आकारात उडत रहातात.

ऑक्टोबर व मार्च या दरम्यान कच्छच्या रॅन भागात सुमारे पाच लाख फ्लेमिंगो येऊन पोचतात. संपूर्ण जगात हीच अशी एक जागा आहे की जेथे हे पक्षी जास्तीत जास्त संख्येने अंडी घालून उबवतात.

# खूप लहान वयाचा गोल्फ क्रीडापटु



असे मानले जाते की गोल्फ हा खूप रिकामा वेळ असणाऱ्या अमीर लोकांचा खेळ आहे. अशा खेळात लहान मुलांनीही आपली प्रतिभा दाखवावी ही आश्चर्याची गोष्ट खरीच!

शिविन नावाचा पाच वर्षांचा एक मुलगा एकदा आपला पिता पर्सी क्वाट्रा याच्याबरोबर गोल्फ मैदानावर गेला. हिरवी चादर पसरल्यासारखे दिसणारे ते हिरवेगार मैदान पाहून तो फार खूष झाला. त्याला असे वाटले की या मैदानावर कितीही धावले-बागडले तर कोणी 'नको' म्हणणार नाही; परंतु तिथले गोल्फ खेळाडू चेंडूला काही मारल्यावर त्याच्यामागे पळत नव्हते, तर हळूहळू चालत 'खळग्या' पाशी जात होते अन् चेंडू पडल्या जागेपासून खळग्यापर्यंतचे अंतर मोजून पॉइंट मिळवण्यासाठी, मोठ्या सावधगिरीने चेंडू त्या खळग्यात ढकलत होते. या खेळाला वेळ खूप लागत होता. तरीही छोट्या शिविनला तो खेळ खेळून पहावासा वाटला. तेंव्हा पासून तो नेहमीच पित्याबरोबर गोल्फ-मैदानावर जाऊ लागला. मुलाचा अुत्साह पाहून बाप त्याला गोल्फ शिकवू लागला. शिविनचा बाप एक चांगला गोल्फ-पटु होता.

पित्याच्या शिकवणीने शिविन पाच वर्षांतच ज्यूनिअर-चॅम्पियन बनला. वय नअूही पूर्ण नसताना त्याने प्रथमतः अंतर्राष्ट्रीय चढाओढीत भाग घेतला होता. इंडोनेशिया व जकार्तामधे झालेल्या बाराव्या आशिया-पॅसिफिक ज्यूनिअर चॅम्पियनशिप चढाओढीत त्याने भाग घेतला. या चढाओढीत पाच देशांच्या एकूण वीस ज्यूनिअर खेळाडूंनी भाग घेतला होता, व शिविनला त्यात दहावा क्रमांक मिळाला होता.

गेल्या वर्षीच्या नवव्या ज्यूनिअर वर्ल्ड कप चॅम्पियनशिपसाठी शिविन ने भारताकडून भाग घेतला होता. आपल्या देशातर्फे आणखीही तीन बाल-खेळाडूंनी यात भाग घेतला होता. या चढाओढीत भाग घेणाऱ्या दहा देशांच्या सर्व बाल-खेळाडूंमधे सर्वात कमी वयाचा होता शिविन। म्हणूनच इटलीच्या एका वृत्तपत्राने शिविनला 'पिकोल्लो' (छोटा) म्हणून त्याच्या अद्भुत प्रतिभेचे अपूर्व असे वर्णन केले होते.

नवी दिल्ली येथे झालेल्या तेराव्या आशिया-पॅसिफिक ज्यूनिअर चॅम्पियनशिप (१२ वर्षांच्या आतील खेळाडूंसाठी) मधे शिविनने रौप्य पदक जिंकले होते. फिलिपाइन्सच्या जेसन गिरोनेल्ला याला प्रथम क्रमांक मिळाला. तरीही शिविननेच आपल्या खेळाने सर्वांना आकर्षित करून घेतले होते.

कलकत्याला झालेल्या 'नॅशनल गोल्फ चॅम्पियनशिप, चढाओढीत शिविनने 'नॅशनल सबज्यूनिअर' (१५ वर्षाच्या आतील खेळाडूंसाठी) हे स्थान पटकावले. गोल्फचा तोच सर्वांत कमी वयाचा अन मोठा प्रतिभावान असा खेळाडू आहे.

# तुम्हाला माहीत आहे काय?

१. आपल्या देशाचा अतिप्राचीन ग्रन्थ कोणता?
२. परशुरामाचा जन्म कोणत्या वंशात झाला होता?
३. ज्यूडासने येशूला कोणत्या अुद्यानात फसवले होते?
४. 'भारत जातीय काँग्रेस' चे पहिले नाव काय होते?
५. दहा वर्षेपर्यंत भारताचे 'अुपराष्ट्रपति' पद कोणी भूषवले होते?
६. सम्राट हर्षवर्धन त्याच्या एका मन्त्र्याकडून मारला गेला. हा मन्त्री कोण?
७. शक संवत्सराचा प्रारंभ केंव्हा झाला. तो कशाची आठवण करून देतो?
८. पुराणाप्रमाणे, श्रीमहाविष्णूंनी मगरीच्या तावडीतून ज्याला वाचवले होते, त्या हतीचे नाव काय?
९. ज्यूलियन कॅलेण्डर कोणी बनवले?
१०. अुत्तरप्रदेशातल्या 'भाईदूज' प्रमाणेच दक्षिणभारतात एक सण साजरा केला जातो. तो कोणता?
११. एका प्रसिद्ध खेळाला प्रथम 'पूना' नावाने संबोधले जाई. तो खेळ कोणता?
१२. कलकत्त्याच्या एका विशेष जातीचे लोक 'कबुतरांच्या लढाई' बद्दल विशेष प्रेम दाखवतात; ते लोक कोण?
१३. सुप्रसिद्ध 'हर्षचरित' (संस्कृतमधे) कोणी लिहिले?
१४. कोणत्या नदीवर 'नागार्जुन सागर' धरण बांधले गेले आहे?
१५. 'महाबलीपुरम्' ची निर्मिती कोणी केली?

## अुत्तरे

१. यजुर्वेद.
२. भृगु वंश.
३. गेत्थसमेन.
४. इण्डियन नैशनल यूनियन.
५. डॉ. एस्. राधाकृष्णन्.
६. अर्जुन.
७. ई.स. ७८ मधे. कनिष्कचा राज्याभिषेक.
८. गजेन्द्र.
९. ज्युलियस सीझर. याने ई.स.पू. ४६ मधे महिने व वर्ष यांना नावे दिली.
१०. कानु पोंगल.
११. बॅडमिंटन.
१२. चिनी लोक.
१३. बाणभट्ट.
१४. कृष्णा नदी.
१५. नरसिंह वर्मन्.

# 'चांदोबा'च्या बातम्या



### अंतरिक्षातील अुच्चांक

राशियातील अंतराळ-वीरांनी अंतरिक्षातील स्टेशनावर अनेक महिने मुक्काम केला. पण गेल्या मे महिन्यात आकाशातून परत आलेल्या अमेरिकेच्या 'ऐंडीवर' या स्पेस-शटल मध्ये अंतरिक्षात राहून आलेल्या कमांडर बॉडेन सॅटन याने आकाशात ७४० तास म्हणजे जवळ जवळ ३१ दिवस राहून एक नवीन विक्रम केला. तो चार वेळा अंतरिक्षात जाऊन आला. पूर्वी नॉर्म थगार्ड हा स्पेस-शटल मध्यें ६०४ तास राहिला होता. आणि तो पण अंतरिक्षात चारदा जाऊन आला होता.

### नगरांचे नाते

निरनिराळ्या शहरांमधे बंधुभाव निर्माण करण्यासाठी एक योजना बनवली गेली होती. या योजनेनुसार अमेरिकेच्या कोलोराडोमधील डेन्वर शहराची आठ बंधु-शहरे आहेत. त्यातले आठवे शहर आहे मद्रास. डेन्वरच्या जनतेला मद्रासबद्दल जास्त माहिती देण्यासाठी तेथे लवकरच 'डेन्वर मद्रास-पार्क' तयार करण्यात येणार आहे.





# पोत्यातली अब्रू

श्रीपुरमधे नारायण नावाचा एक धनसंपन्न गृहस्थ रहात असे. श्रीधर हा त्याचा बालसखा शेजारच्या नरसिंहपुरमधे रहात असे. एके दिवशी नारायणला भेटायला श्रीधर श्रीपुरला आला. खूप दिवसांनी भेट होत असल्याने नारायण आपले मोठ्या प्रेमाने स्वागत करील असे श्रीधरला वाटत होते. त्याचे श्रीपुरमधे काही कामही होते.

श्रीधरच्या अंगावरचे कपडे अगदी जुनेपुराणे होते. त्याला पाहिल्या बरोबरच नारायणने ताडले की, "याची परिस्थिती अगदीच हलाखीची आहे. आपल्याकडे काही मदतीच्या अपेक्षेनेच आला असला पाहिजे हा." मग त्याला पाहिल्यावर नारायणने चौकशीही केली नाही की, "तू कसा आहेस? काय काम काढून श्रीपुरला आला आहेस? इ." अुलट तो त्याच्याशी आपल्या मोठेपणाच्या गोष्टीच बोलत राहिला. आपण कशी अन् किती कमाई केली, मोठ्या-मोठ्या लोकांशी आपली कशी ओळख आहे, त्यांच्यात अुठणे-बसणे आहे-वगैरे वगैरे!

नारायणचे हे सारे बोलणे श्रीधर शान्तपणे ऐकून घेत होता. ते चालू असतानाच कोणी एक माणूस येअून नारायणच्या हाती एक चिठ्ठी देअून गेला. ती वाचून पुन्हा नारायण गर्वाने म्हणाला. "पाहिलंस, कसली कसली माणसं माझ्या परिचयाची आहेत? आज रात्री जमीनदाराकडे मेजवानी आहे. जमीनदारानेच खुद्द चिठ्ठी लिहून मला निमन्त्रण दिलंय. ही तीच चिठ्ठी बघ!"

श्रीधर हसत म्हणाला, "तू आपल्या कमाईबद्दल बोललास तेंव्हाच तुझा इथे किती दबदबा असावा, कशा बड्या बड्या



लोकांशी तुझी दोस्ती असावी वगैरे मी ओळखलंय. खरं म्हणजे तुझ्या मार्फत जमीनदाराकडून माझं एक काम करवून घ्यायच्या आशेनंच आलो होतो मी तुझ्याकडे. आता तर मला खात्रीच वाटतेय की माझं ते काम नक्की सफल होणार!"

थट्टेखोरपणा दाखवत नारायण म्हणाला. "काय?. जमीनदाराकडे तुझं काम? हा, हा, हा! काय पण मजेचं बोलतोयस."

"होय रे, खरंच! त्यांच्याकडूनच माझं एक काम होणार आहे. तुझ्या या जमीनदाराची काही शेतं आमच्याही गावात आहेत. सध्या तिथे काहीच शेती केली जात नाही. मी ऐकलंय की यन्दा जमीनदार ती शेतं खंडाने द्यायच्या विचारात आहे.तू माझ्या वतीने जमीनदाराशी बोलून ती शेतं मलाच खंडाने मिळवून दे. इतकीच तुझी मदत मागायला आलोय मी." श्रीधर बोलला.

हे कामही बहुधा नारायणला आवडलं नाही. तो म्हणाला, "एक बोललो तर वाईट वाटून घेऊ नकोस. आमच्या जमीनदाराला तुझ्या सारखा फाटका माणूस माझा मित्र आहे असं कळलं, तर तो मलाच लुंगासुंगा समजू लागेल आणि त्याच्या दृष्टीनं माझी किंमत कमी होईल."

परन्तु श्रीधर यावरही गप्प राहिला नाही. तो पुन्हापुन्हा आर्जवे करू लागला कि "काहीही करून शेते मिळवून देच. सध्या माझी परिस्थिती फारच खालावलेली आहे - एक एक दिवस घालवणं कठीण जाऊ लागलंय."

पण नारायणवर त्याचा काहीच परिणाम झाला नाही. त्याने इतकेच सांगितले की, "आता मेजवानीला जायची वेळ झालीय, मला उद्या येऊन भेट." नाइलाजाने श्रीधर तेथून निघून गेला.

दुसऱ्या दिवशी श्रीधर पुन्हा नारायणकडे आला, तेंव्हा त्याच्या जवळ दुसरा एक माणूस बसलेला होता. नारायणने त्या माणसाचा परिचय करून देत श्रीधरला म्हटले, "यांचं नाव धनीराम आहे. नावाप्रमाणेच मोठे धनी आहेत. आमच्या गावात मोठा व्यापार आहे यांचा. रोज थोडा वेळ येऊन माझ्याशी चार गोष्टी केल्यावाचून चैनच पडत नाही यांना."



धनीरामने एकदा श्रीधरकडे नीट निरखून पाहिले अन् नारायणकडे वळून तो म्हणाला, "काय, या पोती वहाणाऱ्या माणसाशी तुमची बरीच दोस्ती दिसतेय!"

दचकून नारायणने एकदम विचारले, "काय म्हणताय? याचं नाव श्रीधर आहे. लहानपणी आम्ही दोघं एकत्र शिकत होतो. त्याच परिचयामुळे तो माझ्याकडे नेहमी येत जात असतो. याला तुम्ही 'पोती वहाणारा' का म्हणता? मला तर काहीचं समजत नाही! काय झालं? तुम्ही असं का म्हणालात?"

धनीराम स्पष्टच बोलू लागला, "काल रात्री दुकान बन्द करून एका संबंधिताने दिलेल्या आंब्याच्या दोन करंड्या घरापर्यन्त वाहून नेण्यासाठी मजूर शोधत होतो. तेव्हाच बाजारच्या रस्त्याने डोक्यावर मोठंसं पोतं वाहून नेताना मला हा माणूस दिसला. मी त्याला विचारलं की, जरा तुझं पोतं उतरून ठेऊन माझ्या करंड्या घरापर्यन्त पोचवून देतोस? तर माझ्याकडे नुसतंच हसून पाहून हा निघून गेला. म्हणून तर मी इतक्या सहजपणे ओळखला याला." अन् नंतर धनीराम तेथून निघून गेला.

हे सारं ऐकून नारायणला आपला अपमान झाल्यासारखा वाटला अन् रागाने तो श्रीधरला म्हणाला, "असलं हलकं काम करणं तुला अपमानास्पद नाही वाटलं? मागितले असतेस, तर दहा-वीस रुपये मीही तुला दिले असते, पोती वहायची काय गरज



पडली तुला? पोती वहाणारा एकजण माझा मित्र आहे असं कळून माझी बेअब्रू होईल. पुढे कधी माझ्याकडे येत जाऊ नकोस अन् माझी अब्रू धुळीला मिळवू नकोस."

जरासं हसून श्रीधर म्हणाला, "काय करू? मला ते पोतं वहावंच लागलं. तुझी अब्रू धुळीला मिळवायला नव्हे, तर ती वाचवण्यासाठीच मी तसं केलं. त्या पोत्यात पण तूच होतास ना!"

आता मात्र खूप रागावून नारायण ओरडला, "काय बडबडतोयस? पोत्यात मी होतो? याचा काय अर्थ?"

"अरे बाबा, रागावतोयस का इतका? जरा लक्ष देऊन ऐक मी काय सांगतोय ते! काल रात्री मी जेव्हा आपल्या गावाकडे निघालो

तेंव्हा जमीनदाराच्या घराबाहेर बेहोश अवस्थेत पडलेल्या तुला मी पाहिलं. तुझ्यापाशी दारूचा वास मारत होता अन् तू काहीतरी बडबडत, गात होतास. मला वाटलं की, अशा स्थितीत तू कुणाला दिसलास तर तुझी अब्रू धुळीला मिळेल. माझ्याजवळ एक पोतं होतं, म्हणून मी मुकाट्याने तुला त्या पोत्यात बसवून डोक्यावर घेतलं अन् तुला तुझ्या घरी पोचवून दिलं. त्याच वेळी धनीरामनं मला रस्त्यात पाहिलं. मी तर या गावात नवखा होतो. त्यामुळे अब्रूची मला काहीच पर्वा नव्हती. पण तुझी मात्र अब्रू वाचली, इतकं पुरे! जातो मी आता." श्रीधर म्हणाला.

इतक्यात नारायणची बायको देवाला जाऊन परत आली होती. ती म्हणाली, "होय, श्रीधरभाऊजींनी योग्य तेच केलं. वेळेवर भावजी आले नसते, तर तुमची अब्रू कशी राहिली असती? तुमची स्थिती पाहून मला रात्री झोप आली नाही. सकाळीच देवळात जाऊन तुमच्या नावे अभिषेक करून आले. आपण ऋणी आहोत यांचे. रात्रीची घटना इतरांना कळली असती तर लोक तुमच्यामागे तुम्हाला हसले असते आणि जमीनदारांनी तर तुम्हाला झटकूनच टाकलं असतं. कारण आपल्या दोस्ताला 'दारूबाज' म्हटलं जातं. वाचलात ते केवळ तुमच्या या मित्राने वेळेवर योग्य अुपाय केला म्हणूनच!"

आता कुठे नारायणला खरी गोष्ट कळून चुकली. मान खाली घालत तो श्रीधरला म्हणाला, "मित्रा! मला माझ्या अहंकाराबद्दल योग्य प्रायश्चित्त मिळालं. तू आपल्या अब्रूचा विचार न करता माझी अब्रू मात्र पोत्यात बंद करून सहीसलामत घरी पोचवलीस. मी फार फार आभारी आहे तुझा! मी आजच शपथ घेतो की, पुन्हा कधी मी असल्या दुर्बळपणाचा गुलाम बनणार नाही."

नंतर त्याने श्रीधरला कडकडून मिठी मारली अन् त्याच दिवशी जमीनदाराशी बोलणे करून त्याचे कामही करून टाकले.





# विद्वत्तेचे मूल्य

चन्दनपुर गावात कुशल नावाचा एक विद्वान पंडित रहात असे. त्या गावात मजूर आणि व्यापारी खूप होते, परन्तु कुशलचे पांडित्य ओळखणारा मात्र कोणीही नव्हता. तो दुसरे कोणतेच काम जाणत नव्हता, त्यामुळे राजाकडूनच आपल्या विद्वत्तेच्या बळावर काही मदत मिळवण्यासाठी तो राजधानीच्या शहरी गेला.

खूप प्रयत्न करूनही कुशलला राजदर्शन मिळणे दुरापास्त झाले. त्याच वेळी त्याच्या भाग्याने चन्दनपुर मधेच पूर्वी रहाणारा चतुर नावाचा माणूस त्याला भेटला. तो कुशलचा लहानपणचा वर्गमित्र होता. पण चतुर काही मेहनत करू शकत नसल्यामुळे व व्यापार करायची त्याची इच्छा नसल्याने तो दहा वर्षांपूर्वीच आपले गाव सोडून राजधानीत येऊन राहिला होता. लोकांशी गोड गोड बोलून त्यांचा आश्रय मिळवण्यात चतुर चांगला हुशार असल्यामुळे राजदरबारात स्वत: साठी नोकरी मिळवण्यात तो सफल झाला अन् थोडयाच दिवसात राजाचा प्रियपात्र ही बनून गेला.

कुशलला चतुर म्हणाला, "मी राजाशी तुझी गाठ घालून देईन. पुढे राजाला खूष वगैरे करायचं तुझं तू पाहून घे."

कुशलला खूप आनन्द झाला अन् त्याने आपली सहमती प्रकट केली.

दुसऱ्याच दिवशी त्याची राजाशी भेट झाली. कुशलची विद्वत्ता पाहून राजा चकित झाला. त्याने दरबारातच रहावे अशी इच्छा राजाने प्रकट केली. परन्तु कुशल म्हणाला, "महाराज, चन्दनपुर सोडून रहायची माझी इच्छा नाही. आपण कृपा करून मला काही धनाची मदत करावी. मी त्या रकमेतून तेथेच जमीन खरीदून शेती करून माझं

प्रणवकुमार डोळे



आयुष्य व्यतीत करीन.

कुशलला खजिन्यातून पन्नास हजार अशर्फी देवबून राजा त्याला म्हणाला, "माझ्याजवळ राजनीतिबद्दल लिहिलेला एक जुना ग्रन्थ आहे. पंडित लोक म्हणतात की, चाणक्याच्या अर्थशास्त्रातही न आढळणाऱ्या काही खास गोष्टी या ग्रन्थात आहेत. परन्तु ग्रन्थाची भाषा क्लिष्ट आहे. माझे दरबारी पंडितही त्याचा बरोबर अर्थ सांगू शकत नाहीत. आपण एक वर्षभरात त्या ग्रन्थाचा सुलभ भाषेत अर्थ लिहून द्या. मी आपणाला आणखी पन्नास हजार अशर्फी देऊन आपला सत्कार करीन."

तो ग्रन्थ घेऊन कुशल आपल्या गावी निघून गेला.

राजाने चतुरजवळ कुशलची खूप तारीफ केली आणि म्हटले, "माझ्या दरबारात आल्यापासून तू जी काही कामं केली असशील, त्यातलं सर्वांत आनन्ददायक काम म्हणजे या कुशलचा तू माझ्याशी करून दिलेला परिचय!"

यानन्तरही राजा वरचेवर चतुरजवळ कुशलची प्रशंसा करत राहिला.

यामुळे हळूहळू चतुरला कुशलचा हेवा वाटू लागला. राजाला कुशल इतका आवडेल असे त्याला वाटले नव्हते. तो स्वत: गेली दहा वर्षे राजाजवळ काम करत होता. त्याचे दिवसही तसे आरामात जात होते, परन्तु त्याच्याजवळ तसे फारसे धन नव्हते. कुशल मात्र एकाच दिवसात पन्नास हजाराची रक्कम मिळवून बसला. या हेव्यामुळे त्याला राजा कुशलची करीत असलेली स्तुति अप्रिय वाटू लागली. कुशलबद्दल राजाचे मन कलुषित करून द्यावे असे त्याला वाटू लागले. त्यामुळे चतुर राजाला एकदा म्हणाला, "महाराज, या कुशलचा खूप पूर्वीच आपणाला परिचय करून द्यायचा माझा विचार होता. मी त्याला अनेकदा आपल्या भेटीसाठी बोलावलंही होतं. पण त्यानं दर वेळी नकार दिला. आता पोट भरणं कठीण झालं तेंव्हा झक्कत आला. नाहीतर यापुढेही तो कधी आपणाकडे आला नसता."

हे ऐकल्यावर राजा चतुरजवळ पुन्हा कुशलबद्दल कधी बोलला नाही. असेच सहा महिने निघून गेले. एक दिवस राजा चतुरला म्हणाला, "मी दिलेल्या ग्रंथाचं काम कुशल कसं काय करत आहे याबद्दल जाणून घ्यावंसं वाटतंय मला. त्याला एकदा बोलावून घेऊ शकशील?"

चतुरने विचार केला की, ही छान संधि आपल्या हाती आलीय. त्याने कुशलकडे काहीच निरोप वगैरे पाठवला नाही. पण दोन दिवसांनी राजाकडे जाऊन तो म्हणाला, "महाराज, कुशलने निरोप पाठवलाय की तो इतक्यात आपल्याला भेटायला येऊ शकत नाही."

परंतु चतुरने अपेक्षिल्याप्रमाणे राजाने कुशलबद्दल मुळीसुध्दा राग वगैरे प्रकट केला नाही. उलट तो म्हणाला, "होय, खरं तर माझीच चूक आहे. मी त्याला एक वर्षाची मुदत दिली होती. मधेच त्याच्यासारख्या पंडिताच्या कामात व्यत्यय आणणं बरं नव्हे. मीच एकदा वेळ काढून त्याच्याकडे जाऊन काम पाहून यावं हे उचित होईल. उद्याच मी जातो चन्दनपुरला."

'अशा तऱ्हेने तर आपलाच खोटेपणा बाहेर येईल'-या विचाराने चतुर म्हणाला, "तसं कशाला महाराज? मीच जाऊन त्याला विनवून घेऊन येतो." असे म्हणून तो लगेच चन्दनपुरला रवाना झाला.

तो कुशलकडे जाऊन म्हणाला, "तुझी महानता आता ओळखली मी! तुझ्या पांडित्यावर राजा जे प्रेम दाखवू लागला, ते पाहून माझ्या मनात हेवा उत्पन्न झाला अन् मीच आपल्या वर प्राणसंकट ओढवून घेतलं." नंतर आपण राजाकडे जे खोटे बोललो, ते सांगून चतुर कुशलला म्हणाला,



"खरी गोष्ट राजाला कळली, तर माझी नोकरी तर जाईलच, पण मला तुरुंगवासही भोगावा लागेल. आता तूच माझं रक्षण कर बाबा!"

"तुझं रक्षण करायचा एकच मार्ग दिसतोय मला. आताही तू राजाकडे जाऊन असंच सांग की, मी राजाला भेटायला येऊ शकत नाही. म्हणजे तुझ्या पहिल्या सांगण्याला पुष्टि मिळेल. राजा माझं काय करील, ते मागून पहाता येईल?" काहीसा विचार करत कुशलने सुचवले.

मित्राचा भलेपणा चतुरने ओळखला. त्याने त्याची खूप तारीफ केली. आपल्या चुकीबद्दल पुनःपुन्हा माफी मागून तो परत फिरला. परन्तु गावच्या सीमेवरच त्याला राजाचा रथ दिसला.

चतुरने राजाला सांगितले. "महाराज कुशल म्हणाला की, आपल्याला राजाकडे यायला वेळ नाहीय. मी हेच आपणाला सांगावे असं म्हणाला तो!"

जरासे हसत राजा म्हणाला, "तुझा मित्र अहंकारी नाहीय. मी दिलेल्या कामात मन एकाग्र करून तो त्याचा फडशा पाडत असावा. म्हणूनच आपल्याला असं मधेच येता येणार नाही असं त्यानं सांगितलं. तू जाऊनही तो येणार नाही हे ओळखून मीच स्वतः निघून आलोय."

नंतर राजा काही दिवस चन्दनपुरात राहिला. पंडितां बरोबरच राहून त्याने तो ग्रन्थ त्याच्या तोंडून श्रवण केला. आणि तृप्त होऊन राजा राजधानीला परतला.

हा सारा प्रकार पाहून चन्दनपुरचे ग्रामवासी एक गोष्ट समजून चुकले की, चतुर सारखी माणसे वर्षानुवर्ष राजाकडे राहिली तरी स्वतःपुरतंच पहातात. परंतु कुशलसारख्या विद्वानांमुळे आपल्या गावची कीर्ति चहूदिशांना पसरते.

यानन्तर चन्दनपुरचे लोक कुशलकडे मोठ्या आदराने पाहू लागले. आणि पुढे त्या गावातही पंडित व कलाकार लोकांचा अुदरनिर्वाह व्यवस्थितपणे होअू लागला.






महोदराने जेव्हा असं सांगितलं, तेव्हा कुंभकर्ण तावडतोब त्या राक्षसांसह रावणाच्या महालाकडे निघाला. कुंभकर्ण पोंचण्यापूर्वीच राक्षसांनी जाऊन रावणाला सांगितलं-"कुंभकर्ण झोपेतून उठला आहे. त्याला खूपच भूक लागलेली आहे. त्याच्या भोजनाची व्यवस्था आम्ही केलेली आहे. आपण त्या बाबत काळजी करू नये. त्याला आपली काय आज्ञा आहे? त्याने परस्पर रणांगणावर जावं की आपल्याला भेटायला यावं?"

"मला त्याला भेटायचंय. गौरवपूर्वक त्याला इथे घेऊन या. त्याला त्रास होईल असे काही करू नका. आता मला त्याच्या मदतीची फार आवश्यकता आहे." रावण म्हणाला.

राक्षसांकडून हा निरोप मिळाल्यावरच कुंभकर्ण रावणाकडे निघाला होता.

बाहेरूनच वानरांनी कुंभकर्णाला पाहिलं, नि ते भिऊन इकडे तिकडे पळू लागले. त्याचे रौद्र रूप पाहून त्याच्याशी भिडायला कोणी धजले नव्हते. वाट मिळेल तिकडे वानरांनी पळायला सुरुवात केली. रामाने ही कुंभकर्णाला पाहिलं. भीतीने सैरावैरा पळून जाणाऱ्या वानरांना ही रामाने पाहिले. तेव्हा रामाने संभ्रमाने विभीषणाला विचारलं-"एकाद्या मोठ्या काळ्या ढगासारखा हा राक्षस कोण आहे? याचं आक्राळ-विक्राळ रूप पाहूनच वानर भिऊन गेलेले आहेत हा आहे तरी कोण?"

२६. कंभकर्णाशी युद्ध



तेव्हा बिभीषणाने रामाला सांगितलं-"हा विश्रवसूचा मुलगा कुंभकर्ण आहे. युद्धात याने यमराज व इंद्र यांना ही जिंकलं आहे. याच्या इतकं विशाल शरीर दुसऱ्या कुठल्या ही राक्षसचं नाही. दुसरे राक्षस वरदान मिळवून बलशाली व पराक्रमी झाले, पण कुंभकर्णाची गोष्ट तशी नाही. हा जन्मापासूनच बहादूर व पराक्रमी आहे. जन्म झाल्या बरोबर आपली भूक शमविण्यासाठी याने अनेक हजार प्राणी खाऊन टाकले. हे पाहून लोक घाबरून पळून गेले व जाऊन इन्द्राकडे तक्रार केली. इन्द्राने रागावून कुंभकर्णावर वज्रायुध फेकलं. त्यावेळी कुंभकर्णाने जो आरडा-ओरडा केला, तो ऐकून पृथ्वीवरील सर्व लोक घाबरून गेले. कुंभकर्णाने ऐरावत हत्तीचा एक दात उपसला व तो इंद्राच्या छातीत खुपसला. तेव्हा इंद्र आपल्या प्रजेसह ब्रह्मदेवाकडे गेला. सर्वांनी ब्रह्मदेवापुढे आपले गाऱ्हाणे मांडले. तेव्हा ब्रह्मदेवाने सर्व राक्षसांना बोलवले. त्यांच्यांतील कुंभकर्णाला पाहून साक्षात् ब्रह्मदेव ही मनात थोडा घाबरला. ब्रह्मदेव कुंभकर्णाला म्हणाला- "प्राण्यांचा सर्वनाश करण्यासाठीच जणू विश्ववसूने तुला जन्म दिला आहे. तुझ्याकडून काही सत्कर्माची अपेक्षा करणं व्यर्थ आहे. तू नेहमी कोणत्याही अवस्थेत झोपत राहशील! माझा तुला शाप आहे."

ब्रह्मदेवाने जेव्हा हा शाप दिला तेव्हा कुंभकर्ण तावडतोब ब्रह्मदेवापुढे खाली पडला नि गाढ झोपी गेला. हे पाहून रावण ब्रह्मदेवाला म्हणाला-"आपल्या प्रपौत्राला असा शाप देणं योग्य नाही. तू जे बोललास ते असत्य होणे ही शक्य नाही. याच्या झोपण्याच्या नि जागण्याच्या वेळा निश्चित करून टाक." तेव्हा ब्रह्मदेव म्हणाला की "कुंभकर्ण सहा महिने झोपेल व फक्त एक दिवस जागा राहील. जो जेव्हा जागृत होईल तेव्हा आपली भूक भागवण्यासाठी समोर जे दिसेल ते खाऊन टाकील. म्हणून तो जागा होण्यापूर्वी त्याच्या भोजनाची





चांगली व्यवस्था करून ठेवायला हवी. अन्यथा तो आपला-परका असा विचार न करता समोर दिसेल त्याला आपले भक्ष्य बनवील!" हा एक मोठा धोका आहे. आता रावणाने थोड्या भयानेच कुंभकर्णाला जागविले आहे. महान पराक्रमी नि अति खादाड कुंभकर्ण आता वानरांना खाण्यासाठी येईल. वानर त्याच्याशी कसं युद्ध करू शकतील? याच्या पराक्रमा पुढे वानर म्हणजे किस झाड की पत्ती? वानरांना सांगितलं पाहिजे की हे एक चालतं बोलतं यंत्र आहे.

विभीषणाचं हे बोलणं ऐकून राम विचार करू लागला. नील म्हणाला की लंकेच्या सर्व प्रवेश द्वारांवर हल्ला केला पाहिजे. गवाक्ष, हनुमान आणि अंगद हे पर्वत-शिखरे हाती घेऊन युद्धासाठी सज्ज झाले.

दरम्यान कुंभकर्ण अर्ध-निद्रित अवस्थेत रावणापाशी आला. त्याने पाहिलं की रावण खूप उदास व दुःखी आहे. कुंभकर्णाला पाहून रावण उत्साहाने आपल्या आसनावरून उठला आणि पुढे होऊन त्याने कुंभकर्णाला मिठी मारली. आणि दोघे ही खाली बसले. आज रावण फार प्रेमात आलेला पाहून कुंभकर्णाला मोठे आश्चर्य वाटले. तो विचार करूं लागला की आज रावणावर कोणते महासंकट आले असावे बरें? कुंभकर्णाने विचारले-"कशासाठी झोपेतून मला जागवलं गेलं? आता तू कुणाला असा भीत आहेस? तो कोणी ही असो, त्याचा मृत्यु आता जवळ येऊन ठेपलेला आहे, समज!माझ्या बळाची तुला कल्पना आहेच. मी इथे असताना आता तू कसलीच काळजी करूं नकोस. आता तुझी सर्व संकटे पळून गेल्यासारखी आहेत. बोल, मी आता तुला काय मदत करू?"

तेव्हा रावण म्हणाला-"रामामुळे माझ्यावर संकट आलेलं आहे. तो सुग्रीव वानरसैन्य घेऊन समुद्र पार करून इथं आला आहे आणि आपल्या सेनेचा सत्यानाश करीत चालला आहे. युद्धात एक ही वानर-वीर मृत्यु-मुखी पडला नाही, अनेक राक्षसवीर मात्र कामी आले. आता तू सर्व वानर-वीरांना मारून लंकेचं संरक्षण कर. म्हणून मी तुला आता झोपेतून जागं केलं."

यावर कुंभकर्ण हसून म्हणाला-"आपल्या पैकी काही जणांना ज्याबाबत भीति वाटत होती, ते खरं ठरलं! तू सीतेच्या अपहरणाचं पाप केलंस, त्याचा परिणाम आता तुला भोगावा लागत आहे. याबाबत आपला छोटा भाऊ विभीषण जे सांगत होता, त्यात आपलं हितच होतं! आतां तुला जे योग्य वाटेल ते कर."

कुंभकर्णाचं बोलणं रावणाला रुचलं नाही. रागावून तो म्हणाला-"माझ्याहून लहान असून आता तू मला हितोपदेश करू लागलास? ही विचार करीत बसण्याची वेळ नाही. मी केलं ते चूक की बरोबर हे तू सांगण्याची आवश्यकता नाही. माझं काही चुकलं असेल तर त्याचे फळ मी भोगीन. आता तू आपला सर्व पराक्रम दाखव."

यावर कुंभकर्ण म्हणाला-"राक्षसराज, मी तुझा छोटा भाऊ आहे. मी तुझा हितैषी आहे, म्हणून एक हिताची गोष्ट सांगितली. तुझी चिंता मला समजली, आता तू अगदी निश्चिन्त रहा. मी राम व लक्ष्मण यांना ठार करून वानरांना पळवून लावतो. अनेक स्वजनांच्या मृत्यूमुळे दुःखीं झालेल्या



राक्षसांना मी संतोष देईन. मी जोपर्यंत जिवंत आहे, तो पर्यंत राम व लक्ष्मण तुझ्या केसाला धक्का लावणार नाहीत. राम-लक्ष्मणाचे भय तू आता मनांतून काढून टाक. या युद्धात जय तुझाच होणार याबाबत खात्री बाळग."

तेव्हा महोदर धमकावणीच्या सुरात कुंभकर्णाला म्हणाला-"रावणाने जेव्हा सीतेला पळवून आणण्याचा घाट घातला, तेव्हा आपण सर्वांनी त्याला मान्यता दिली. कुणाला ही न विचारता तर रावणाने हे काम केलेले नाही. आता आपल्या पराक्रमाच्या बळावर तू एकदम युद्धासाठी जाण्याचा विचार करीत आहेस, हे मला योग्य दिसत



नाही. रणांगणावर एकट्या रामाने अनेक राक्षसांना मारून टाकले. त्या रामाला तू एकटा कसा मारू शकशील? रणांगणावर हारलेले राक्षस आता सुद्धा रामाचं नाव ऐकलं की घाबरून उठतात. रामाच्या पराक्रमाची तुला कल्पना नाही असं दिसतंय."

आणि मग रावणाकडे वळून महोदर म्हणाला-"आमच्यापैकी ही काही लोकांना तू युद्धासाठी पाठव. आम्ही रामाला ठार करून तुला येऊन सांगू-राम संपला! तू विजयोत्सव साजरा करण्याची तयारी कर. सीतेला तिच्या पतीच्या मृत्यूची वार्ता कळव आणि तिला आपली पट्ट राणी बनव. युद्ध न करताच सगळं काम होऊन जाईल."

महोदरच हे बोलणं ऐकून कुंभकर्णाचा क्रोध भडकला. तो महोदरला म्हणाला-"गप बस, पुन्हा असं काही बोलण्याचं धाडस करू नकोस. सावधान! तुझ्यासारखे भ्याड आणि बुद्धिहीन लोक वेळ आली म्हणजे उपयोगी पडत नसतात. तुझ्यासारख्यांचं बोलणं ऐकून तर आता रावणावर हे संकट येऊन ठेपलं आहे. खरं म्हणजे तू युद्धाला भितोस. राजा म्हणेल त्याला होकार देऊन टाळ्या वाजवणं तुला माहीत आहे. तुझ्यासारख्या खुशमस्कऱ्यांच्या मुळेच प्रकरण या थरापर्यंत पोचलं आहे. तुम्हां लोकांमुळे लंकेचा सर्वनाश होऊ पहात आहे. सर्व खजिना रिकामा झालेला आहे. किती तरी सेना मारली गेली आहे. असं वाटतं की राजाला तुम्ही आपला शत्रु समजता. तुम्ही लोकांनी केलेल्या चुका दुरुस्त करण्यासाठी मी आता रणांगणाकडे निघालो आहे."

कुंभकर्णाचं बोलणं ऐकून रावण खूप हसून म्हणाला—"महोदर तर रामाचं नाव घेतलं की भयानं कापतो. म्हणूनच त्याला युद्ध नको आहे. मला तुझ्याहून अधिक जवळचा कोणी नाही. तुझ्यासारखा पराक्रमी दुसरा कोण? तू तावडतोब युद्धासाठी नीघ. वानरांना खाऊन टाक आणि युद्धात विजय मिळव. तुला पाहताच वानर पळून जातील. राम-लक्ष्मण घाबरून गेले तर त्यात आश्चर्य कसले?"

आता वानरांच्यात नवीन उत्साह संचारला. वृक्ष व शिला यांच्यासह ते युद्ध भूमीकडे निघाले. मस्त हत्तींप्रमाणे त्यांनी कुंभकर्णाशी झुंज घेतली. आपल्याकडे येणारी झाडे व दगड यांनी कुंभकर्ण जरा ही विचलित झाला नाही. उलट त्याने वानरांना ठार मारायला सुरुवात केली.

कुंभकर्णाच्या प्रहारांमुळे आता वानरांची पिछेहाट झाली. काही वानरांनी समुद्रात उड्या मारल्या. काही हवेत उडाले. काही वानर ज्या सेतूवरून आले, त्याच सेतूवरून मागे जाऊ लागले.

अंगद वानरात उत्साह भरू लागला-पळून जाऊ नका. तुम्ही हजारो वानर, एकट्या कुंभकर्णाला पाहून घाबरताय ही शर्मेची गोष्ट आहे. अंगदाच्या उत्साहवर्धक बोलण्याने वानर युद्धभूमीकडे परत फिरले. हनुमानाने ही या कामी अंगदाला मदत केली.

कुंभकर्णाने रावणाचा आशीर्वाद घेतला व सर्व शस्त्रास्त्रांसह रण-भूमीकडे निघाला. राक्षसांची प्रचंड सेना त्याच्या बरोबर निघाली. कुंभकर्णाला पाहून वानर भयभीत होऊन पळून जाऊ लागले. वानरांचा उत्साह वाढविण्यासाठी अंगद त्यांना



म्हणाला- "आपल्याला भीति दाखवण्यासाठी हे एक यंत्र बनवलेले आहे. आपण महान् वीर आहोत, सामान्य माकडे नव्हे! आपल्याला भीण्याचे काही कारण नाही. आपण लवकरच याचा नाश करूं. चला, पुढे व्हा."

नंतर हनुमान सेनापति बनला. ऋषभ, शरभ, मैंद, धूम्र, नील, कुमुद, सुषेण, गवाक्ष, रंभ, तार, द्विविद व पनस नांवाच्या योद्धयांना बरोबर घेऊन तो युद्धासाठी निघाला. ते सर्वजण युद्धांत आपले प्राण द्यायला तयार होते.

दरम्यान कुंभकर्णाने वानरांना खायला सुरुवात केली. द्विविदाने एक पर्वत उचलला

आणि कुंभकर्णाशी युद्ध करायला निघाला. त्याने तो पर्वत कुंभकर्णाच्या रोखाने फेकला, पण नेम चुकल्यामुळे तो कुंभकर्णाच्या मागे असलेल्या राक्षसांवर पडला. त्याच्या खाली दबून अनेक राक्षस, त्यांचे रथ व घोडे यांचा चुराडा झाला. यानंतर द्विविदाने आणखी एक डोंगर त्या राक्षसांवर फेकला. त्यामुळे ही आणखी काही राक्षस मरून गेले. रथावर आरूढ असलेल्या राक्षसांनी अनेक वानरांना मारून टाकले. वानरांनी महाकाय वृक्ष फेकून अनेक राक्षसांचा वध केला.

हनुमान आकाशात उडाला व तेथून खाली कुंभकर्णावर त्याने झाडे व दगडांचा वर्षाव केला. कुंभकर्णाने आपल्या त्रिशूलाने त्या दगडांचा चुराडा केला आणि झाडे बाजूला हटवली. नंतर तो आपल्या त्रिशूलाने वानरांना पळवून लावू लागला. इतक्यात हनुमानाने एक भला मोठा पहाड कुंभकर्णावर जोरात फेकला.

कुंभकर्ण घायाळ झाला. त्याच्या शरीरातून रक्त वाहू लागले. त्याने आपला त्रिशूल जोराने हवेत फिरवला आणि हनुमानाच्या छातीवर फेकला. हनुमान किंचाळून उठला. त्याच्या तोंडातून रक्त बाहेर आले व तो बेशुद्ध होऊन पडला.

नीलने कुंभकर्णावर आणखी एक पहाड फेकला. कुंभकर्णाने आपल्या मुठीने तो आडवला व त्याचे तुकडे तुकडे करून टाकले. आता ऋषभ, शरभ, नील, गवाक्ष व गंधमादन या पाच वानरवीरांनी कुंभकर्णावर तुफानी हल्ला चढवला. दगड, डोंगर व वृक्ष यांचा त्यांनी जणू वर्षाव केला. मुठींनी आणि पायाच्या लाथांनी ते कुंभकर्णाला मारू लागले. पण या सर्वांचा कुंभकर्णावर काही ही परिणाम झाला नाही. उलट त्यांनी तो सुखावला. नंतर कुंभकर्णाने त्या पाची वानर-वीरांना एका मागून एक असं पिटलं की ते पाच जण ही रक्त ओकायला लागले व जमिनीवर अचेत होऊन पडले.





# चप्पल योगी

भूषण हा राजा चन्द्रसेन याचा दरबारी विदूषक होता. तो खूप गमतीदार होता. मोठमोठ्या लोकांना आपल्या बोलण्याने खूष करण्यात तो मोठा पटाईत होता. एकदा राजा चन्द्रसेनला भूषणबद्दल प्रेमाचे भरते आले अन् तो भूषणला म्हणाला, "हे बघ, माझं ज्यामुळे काहीच नुकसान होणार नाही, अन् तुझा मात्र फायदा होईल, असं काहीही माग माझ्याकडे. मी ताबडतोब देईन तुला."

भूषण धोरणीपणे म्हणाला, "महाराज! आपण आत्ता हा जो वर मला देत आहात, त्याचा मी गरज पडेल तेंव्हा अुपयोग करीन." राजाने त्याच्या या म्हणण्याला रुकार दिला.

चन्द्रसेनला रुद्रसेन नावाचा एकच पुत्र होता. अति लाडाने तो बिघडू लागल्याने राजाने त्याला एका गुरुकुलात रवाना केले. तेथे जेंव्हा जेंव्हा तो काही आगळीक करी, बेशिस्तपणे वागे, तेंव्हा तेंव्हा त्याला राजधानीत परत पाठवले जाई. एकदा राजाने रुद्रसेन बद्दलची आपली काळजी भूषणजवळ व्यक्त केली.

"पण युवराजांबद्दल यात चिंता करण्यासारखं काय आहे?" भूषणने विचारले.

"जेंव्हा जेंव्हा त्याची वागणूक ठीक नसते, तेंव्हा तेंव्हा गुरुकुलाधिपती त्याला शिक्षा म्हणून इकडे पाठवतात. त्याला कसं सुधारावं, हेच समजत नाहीये मला!" राजा स्पष्टच बोलला.

"असं जर खरोखरीच असेल तर मग अशी काळजी करून काय होणार? म्हटले आहे ना प्रयत्न केल्यास वाळूतून तेल काढता येईल, पण मूर्खांचे हृदय द्रवणार नाही!" भूषण म्हणाला.

शीला केतकर



हे ऐकून चन्द्रसेनच्या रागाचा पारा चढला. तो म्हणाला, "काय? माझ्या मुलाला मूर्ख म्हणालास तू? थांब, आत्ताच तुरुंगात डांबतो मी तुला."

भूषण यावर ताबडतोब म्हणाला, "चूक झाली महाराज! क्षमा असावी."

परन्तु राजाचा राग अजून कमी झाला नाही, त्यामुळे तो आपले म्हणणे मागे घेईना. आता राजाने दिलेल्या वचनाची आठवण देऊन विदुषक म्हणाला, "आपणाला नुकसान होणार नाही, अन् माझा फायदा होईल असा वर मी आत्ता मागत आहे. माझ्या चुकीची शिक्षा म्हणून मी एका ठिकाणी येणाऱ्या-जाणाऱ्या लोकांच्या चपला स्वच्छ करायचं काम करीन. फक्त मी हे काम शिक्षा म्हणून करतोय, असं कुणाला कळता कामा नये." राजाने विदुषकाची मागणी मान्य केली.

दुसऱ्याच दिवशी विदुषक एका देवळाच्या दाराशी जाऊन बसला. येणाऱ्या भक्तांना तो म्हणू लागला, "लोकहो, देवदर्शनासाठी येऊन जाणाऱ्या लोकांच्या चपला साफ करायची माझी इच्छा आहे. असे करून आपल्यातला अहंभाव दूर करायचा आहे मला."

प्रथम तर लोकांनी त्याची चेष्टा केली, परंतु त्याने तिकडे लक्ष दिले नाही. रोज तो देवळाच्या महाद्वारी बसे व गीता-पाठ करी. मंदिरात येणाऱ्या सर्वांच्याच चपला तो प्रेमाने स्वच्छ करू लागला.

असे काही दिवस निघून गेले; अन् लोकांच्या मनात भूषणबद्दल आदरभाव जागृत झाला. खूपसे लोक त्याच्याकडून आपल्या चपला साफ करवून घेताना आदराने त्याला नमस्कार करू लागले. काही दिवसांनंतर देवळात कधी न जाणारे नास्तिक लोक ही केवळ त्याला पहाण्यासाठी मंदिरात येऊ लागले.

तीन आठवडेही उलटले नसतील तोवर लोकांनी भूषणला 'चप्पल-योगी' असे बिरुद बहाल केले. लोक असेही म्हणू लागले की, 'चप्पल योग्याकडून चपला साफ करवण्यामुळे आपल्या इच्छा पूर्ण होतात'.

चप्पल-योग्याबद्दलची ही माहिती राजाच्याही कानी गेली. तेंव्हा राजा





सहपरिवार या योगीमहाराजांची भेट घेण्यासाठी मंदिराकडे आला. परंतु 'चप्पल-योगी' म्हणून भूषणला तेथे बसलेला पाहून त्याला महदाश्चर्य वाटले. भूषणने राजाच्या चपला स्वच्छ केल्या अन् आसपासच्या लोकांना तो म्हणाला, "लोकहो! आजपासून माझ्या या व्रताची समाप्ति होत आहे. आपण सर्वांनी दिलेल्या सहकार्याबद्दल मी आपणा सर्वांचा फार आभारी आहे. माझे रिक्त स्थान आता कोणाला ग्रहण करायचे असल्यास, तसे करून स्वतःला 'चप्पल-योगी' म्हणवून घ्यावे."

तेंव्हा एक-दोन नव्हे, तर अनेक लोक 'मी, मी' करत पुढे झाले. त्यांना शांत करत एकाला 'चप्पल-योगी' निर्धारित करून भूषण त्याला म्हणाला, "आता तुला जेंव्हा वाटेल की, आपल्यातला अहंकार अजिबात नष्ट झाला आहे, तेंव्हा तू आपलं हे स्थान दुसऱ्याला अर्पण कर." असे सांगून भूषण स्वतः राजवाड्याकडे निघून गेला.

हा सारा प्रकार पाहून राजा चन्द्रसेनला फार आश्चर्य वाटले. तो म्हणाला, "मला तुझा राग आला, अन् तुला चपला साफ करायची शिक्षा मिळाली हे ठीक, पण तू 'योगी' कसा काय बनलास?"

हसत हसत विदुषक उत्तरला, "महाराज, एकादा ऋषी खाली डोकं, वर पाय अशा अवस्थेत लटकू लागला तर त्याला आपण 'तप' म्हणतो. पण चोर तसा लटकलेला पाहिला तर आपण त्याला 'शिक्षा' म्हणू. वेळेच्या संदर्भाप्रमाणे इथे भल्याबुऱ्याचे रंग



बदलतात. 'शिक्षा' असं न म्हणता, आपण मला काहीही शिक्षा दिलीत तरी मी त्यातून गौरव मिळवू शकतो. पण लोकांना कळलं, की ते काम मला 'शिक्षा' म्हणून मिळालंय, तर लोक माझ्यावर दगड फेकून माझी टर उडवतील. चप्पल साफ करायचं काम मला 'शिक्षा' म्हणून मिळालंय हे न कळल्यामुळेच मी 'योगी' बनू शकलो.''

''पण तू ज्याअर्थी हे काम केलंयस, त्याअर्थी त्यामागे तुझा नक्कीच काही हेतू असणार. तेव्हां तुला खरं खरं मला काय सांगायचंय ते आता सांगून टाक न!'' राजा चन्द्रसेनने भूषणला विचारले.

''महाराज, युवराजांना गुरुकुलाधिपतींनी शिक्षा केली असेल, तर युवराजांवर त्याचा परिणाम व्हायला हवा. अर्थात् लोकांना ही शिक्षा आहे, असं कळलं, तर युवराजांच्या मनाला वाईट वाटेल. अन् तेच आवश्यक आहे. युवराजांना पश्चात्ताप वाटायला हवा, म्हणजेच त्यांचे वर्तन सुधारेल. गुरुकुलात नीट न वागल्याने शिक्षा म्हणून युवराज राजवाड्यात आले, अन् शिक्षेचा काळ सर्व सुखोपभोगात त्यांनी मजेत व्यतीत केला तर ती शिक्षा, शिक्षा कसली? त्यांना आपली चूक कळणार कशी महाराज?'' भूषणने विचारले.

भूषणच्या या प्रश्नावर चन्द्रसेनने जरा विचार केला आणि म्हटले, ''होय, चप्पल योग्याच्या कीर्तीमुळे आकर्षित होऊन, गावात प्रत्येकजण 'चप्पल योगी' म्हणवून घ्यायला अहमहमिकेने पुढे येत आहे. तू बोललास ते अगदी बरोबर आहे. मी गुरुकुलाधिपतीला आज्ञा देईन की युवराज जेंव्हा काही चूक करील, तेंव्हा त्याला अन्य विद्यार्थ्यांबरोबर तेथेच गुरुकुलाच्या नियमाप्रमाणे शिक्षा भोगायला लावावी.'' एका विशेष अशा गोष्टीकडे आपले लक्ष आकर्षित करून दिल्याबद्दल राजाने विदुषकाबद्दल प्रसन्नता व्यक्त केली आणि त्याला अनेक अमूल्य वस्तु भेट दिल्या.

शिक्षेचे स्वरूप बदलल्यानंतर युवराजातही चांगले परिवर्तन झाले. त्याचे वागणे लवकरच सुधारले.





# अशिक्षित मांडलीक

स्पेन देशात एक मांडलीक राजा होता. तो अगदीच अशिक्षित होता. त्याच्याजवळ अपार धन व नोकरचाकर असल्यामुळे त्याला वाटे की, 'आपल्याला तर सर्व काही कळतं, मग लिहाय-वाचायला आलंच पाहिजे याची काय आवश्यकता? आपण पैसे फेकून चांगल्या सुशिक्षित लोकांना कामाला लावू शकतो, त्यामुळे अशिक्षित असलो तरी आपलं काय नुकसान? मुद्दाम मेहनत करून अक्षरं गिरवून अभ्यास करणं, शब्द पाठ करणं वगैरे आपल्या इतमामाला शोभणार नाही.'

नेहमी आपल्या बरोबरच राहून कारकुनी काम करण्यासाठी या मांडलिकाने एका गरीब माणसाला नोकरीवर ठेवले.

एकदा कुठेसं युद्ध निघालं अन् मांडलिकाला सम्राट राजाकडून हुकूम मिळाला की, ''आपलं सैन्य घेऊन युद्ध-भूमीवर हजर व्हावे.'' हुकूमनामा कारकुनाकडून वाचवून घेतल्यावर आपलं सैन्य गोळा करून तो युद्धभूमीकडे रवाना झाला. त्याने कारकुनालाही बरोबर घेतलं होतं.

काही दिवस सर्व काही ठीक ठाक चाललं. रोजच्या या युद्धाचा अहवाल कारकुनाकडून लिहवून स्वतःची मोहर लावून मांडलीक सम्राटाकडे पत्र रवाना करी. परंतु एक दिवस शत्रूचा एक बाण कारकुनालाच लागून त्याचा मृत्यू ओढवला.

आता मांडलिकाला नव्या कारकुनाची आवश्यकता होती. परंतु ते काम इतकं तावडतोब होण्यातलं नव्हतं. तरीही मांडलिकाचा गर्व काही उतरला नाही. त्याच्या मनात असं काही आलं नाही की, 'मीच स्वतः शिकलो-सवरलो असतो, तर किती बरं झालं असतं!'

**स्पेनमधील लोककथा**



एवढ्यात एक अडचण अुपस्थित झाली. सम्राटाकडून एक दूत आला व मांडलिकाला एक पत्र देअून ताबडतोब परत फिरला. पत्रात काय लिहिलं आहे, याची मांडलिकाला काहीच कल्पना नव्हती, युद्ध चालू ठेवावं असा संदेश आहे, की बन्द करावं असा आहे-मांडलिकाला काहीच समजेना.

अंधारात चाचपडत रहावं अशी अवस्था झाली मांडलिकाची. इतक्यात त्याला एक लिहितावाचता येणारा सैनिक दिसला. मांडलिकाच्या चांगल्या माहितीचा होता तो. त्याला बोलावून चिठ्ठी त्याच्या हाती ठेवत तो म्हणाला, "अरे, वाचून दाखव बरं, यात काय लिहिलंय ते. चुकीचं वाचलंस तर चामडी लोळवीन चांगली! अन् काय वाचशील ते गुप्त राहिलं पाहिजे. आपण दोघं सोडून कुणाला काही समजलं नाही पाहिजे यातलं! नीट सावध रहा."

या सैनिकाचा आपल्या मालकावर काही कारणाने राग होता. त्याने काही दिवसांपूर्वी लहानशी चूक केली होती; अन् त्याबद्दल मांडलिकाकडून त्याला अर्धमेलं होईपर्यंत चाबकाने फोडून काढण्यात आलं होतं. आता आपला राग काढण्याची, सूड घेण्याची चांगली संधी चालून आली होती त्याला. त्या सैनिकाने पत्र पाहून आश्चर्य प्रकट करत म्हटलं, "शीः! फार वाईट झालं! सेनानायकाचे पद सोडून ताबडतोब आपल्याला दरबारात हजर होण्याचा राजाकडून हुकूम आला आहे. यात असं लिहिलंय की कोणीसा आपल्याबद्दल-आपण राजद्रोही आहात असा आरोप केला आहे."

हे ऐकून मांडलिकाला फार राग आला! अन् तडकून तो म्हणाला, "काय? मी राजद्रोही? अशी अफवा अुठवणारे किती बदमाष असतील! मी स्वतःच जाअून शिरच्छेद करतो त्यांचा."

तो ताबडतोब राजधानीकडे निघाला. लांबची वाट होती. वाटेन न कुठलं गाव होतं, ना घर! मांडलिकाने आपला घोडा रात्री एका झाडाला बांधला अन् तो जमिनीवरच झोपून गेला. सकाळी अुठल्यावर पाहिलं, तर रस्त्याकडेच्या एका दगडावर काही लिहून ठेवलेलं आढळलं त्याला. जवळून





पाहिल्यावर काही लक्षात येईल, या अुद्देशाने तो त्या दगडाच्या अगदी जवळ गेला. त्यावर लिहिलं होतं-'जवळ येअू नका, धोका आहे.'

पण दगडाच्या फार जवळ गेल्यामुळे मांडलिकाचा पाय घसरून तो शेजारच्या खंदकात कोसळला. त्यातून बाहेर पडायला त्याला फार कष्ट पडले. बाहेर पडला, तेवढ्यात त्याच्या कमरेत अुसण भरली! चालणंही कठीण झालं त्याला! कसातरी खुरडत तो जवळच्या एका गावात पोचला. अन् तिथल्या एका धर्मशाळेत रात्रीच्या मुक्कामापुरती जागा मिळवली त्यानं.

त्या धर्मशाळेत मांडलिकाला आपल्या जवळच्या गावचा एक माणूस दिसला. तो मांडलिकाची नजर चुकवून पळून जाअू पहात होता. त्याने जेव्हा मांडलिकाची अवस्था पाहिली, तेंव्हा तो भीतीने शहारलाच! परंतु मांडलिकाला मात्र त्याला पाहून फारच संतोष वाटला.

"अरे, माझ्या या परिस्थितीत देवानंच पाठवलं बघ तुला माझ्याकडे! मी आता या अवस्थेत राजाकडे जाअू शकणार नाही. मी काय परिस्थितीत आहे, याबद्दल तूच राजाला पत्र लिही. मी बरा झाल्याबरोबर राजाला भेटेन अन् ज्याने माझ्यावर खोटेनाटे आरोप केलेत त्याची चांगली खबर घेईन." मांडलिकाने त्या माणसाला विनवले. पण त्याने मात्र मांडलिकाने सांगितल्याप्रमाणे न लिहिता चिठ्ठीत राजाला शिव्या देत देत मजकूर खरडला. मांडलिकाने त्यावर आपली मोहर अुठवून पत्र पाठवून दिले.

ते पत्र वाचल्यावर राजा क्रोधाने लाल झाला. त्याने आपल्या सेनापतीला आज्ञा दिली की, "या माणसाला जिवन्त अथवा मेलेला-कसाही माझ्यासमोर हजर कर." मांडकिकाला आणून तुरुंगात डांबले गेले. तो पहिल्यापासून फार घमेंडखोर असल्याने त्याने राजाकडे कसलीही कैफियत दिली नाही. 'काय व्हायचं असेल ते होवो' अशा विचाराने तो तुरुंगात मुकाट बसून राहिला.

मांडलिकाकडून खरं काढून घेण्यासाठी त्याचा हरतऱ्हेने छळ करण्यात आला परंतु आपण निर्दोषी आहोत, असं सांगणंही

मांडलिकाला अपमानास्पद वाटत होतं. शेवटी राजाच कंटाळला. तो शेवटी म्हणाला, "या राजद्रोह्याला शिरच्छेदाची शिक्षा द्यावी असं वाटतंय मला. याशिवाय दुसरी कोणती ही शिक्षा याला योग्य होणार नाही."

आता न्यायाधीश म्हणाला, "महाराज, मला एक शंका येतेय. अशी शक्यता आहे की, ज्या पत्रांवर त्याने मोहर अुठवली आहे, ती त्याने स्वतः वाचलीच नसावीत. त्याला लिहिता-वाचता येतं की नाही याबद्दल मला शंका वाटतेय."

नंतर आणखी एक कर्मचारी म्हणाला, "हां, लोक म्हणतात की हा अगदी अशिक्षित आहे. मला वाटतं की याला मुळीच लिहिता-वाचता येत नाही. याला विचार करून शिक्षा केली पाहिजे."

"अशिक्षित? मी स्वतःही पाच वर्षं मेहनत करून लिहिणं-वाचणं शिकलो. या बुद्धिहीनाला इतकंही करावंसं वाटलं नाही? पण हे कसं शाबित करायचं की तो खरोखरच अशिक्षित आहे?" राजाने विचारले.

न्यायाधिशाने राजाने दिलेल्या मृत्युदंडाचा मजकूर एका पत्रात लिहिला आणि ते मांडलिकाकडे घेअून जाअून म्हटले, "तू याच्यावर सही कर म्हणजे तुला सोडून देण्यात येईल."

"काय लिहिलंय यात?" मांडलिकाने विचारले.

"यात असं लिहिलंय की तू निर्दोष आहेस. तुझ्यावर जो आरोप आहे तो खोटा सिद्ध झालाय." न्यायाधीश अुत्तरला.

"ओहो! असं असेल तर द्या कागद इकडे, मी मोहर अुठवतो." असे म्हणून पत्रावर त्याने मोहर अुठवली.

आता मात्र राजाला कळून चुकलं की हा प्राणी अगदीच निरक्षर आहे. मांडलिकाला सोडून देण्यात आले आणि ज्याने त्याच्या बाबतीत द्रोह केला होता, त्याला आजीवन तुरुंगवासाची शिक्षा दिली गेली.





# अनपेक्षित पाहुणचार

श्रीधरपूर मधे कमलानाथ नावाचा एक व्यापारी रहात असे. शहरात त्याची एक विशाल अशी कोठी होती. त्याचे अनेक व्यापार होते. दररोज रात्र झाल्याबरोबर रोजच्या फायद्याचे रुपये नीट मोजून, तिजोरीत टाकून कुलूप लावायची त्याची पध्दत होती.

एका रात्री कमलानाथ नेहमीप्रमाणे रुपये मोजत असताना कोणीसा दरवाजा खटखटावला. त्याबरोबर चटईवर असलेला रुपयांचा ढीग त्याने एक कपडा टाकून झाकला आणि मग जाअून दरवाजा अुघडला.

दरवाज्यात त्याला त्याच्या दूरच्या नात्यातला रामध्यान अुभा असलेला दिसला. या दोघांमधे चांगले मैत्रीचे संबन्धही होते. रामध्यान सरळ खोलीत येअून चटईवर झाकून ठेवलेल्या रुपयांच्या ढिगाजवळच बसला. कमलानाथला काहीच सुचेनासे झाले. त्याने रामध्यानला इतकेच विचारले- "का रे! रात्रीचा आलास? काय गडबड आहे?"

रामध्यान म्हणाला "अरे, एक लहानसं काम आहे तुझ्याकडे; म्हणून आलो रे! मला अचानक पंचवीस रुपयांची गरज पडली. काय करू? म्हणूनच इतक्या रात्री येअून तुला त्रास देत आहे. तू सोडून अशा अडचणीच्या वेळी मला मदत करणारं आहेच कोण?"

थोडा वेळ तर कमलानाथच्या तोंडून शब्दच बाहेर पडेना. पण नंतर सावरून तो म्हणाला, "हल्ली माझा व्यापार तितकासा बरोबर चालत नाहीये. नुकसानीत चालणाऱ्या या व्यापाराचा कंटाळा आला आहे मला. आज तर दुकानात पाच रुपयांचीही विक्री झाली नाही. मग आणखी या व्यापाराबद्दल काय सांगू?"

पण रामध्यान एवढ्याने गप्प बसणार

चान्दोबात २५ वर्षांपूर्वी प्रकाशित गोष्ट

नव्हता. तो पुन: पुन्हा कमलानाथला विनवू लागला की-हवं तेवढं व्याज घे, पण कर्ज तर मला हवंच. इतक्यात खिडकीतून जोराचा वारा आला आणि खोलीतला तेलाचा दिवा विझून गेला. खोलीत एकदम काळोख झाला.

कमलानाथ गडबडीने रामध्यानचे दोन्ही हात पकडून म्हणू लागला, "रामध्यान, गैरसमज करू नकोस. पण मीच सध्या वाईट परिस्थितीत असल्याने तुला मदत करू शकत नाही. माफ कर मला! असते तर तुला नाही तर कोणाला दिले असते?"

आता रामध्यान म्हणाला, "ठीक आहे. तुझ्याजवळ पैसेच नसले, तर तू तरी कुठून देशील? चल, मी दुसरीकडे कुठे प्रयत्न करीन. निघतो मी."

परन्तु तरीही रामध्यानचे हात न सोडता कमलानाथ त्याला विनवू लागला, "अरे, तू तर कित्ती दिवसांनी आलास माझ्याकडे. आता माझ्यावरोबर जेवण करूनच जा तू."

रामध्यान आपण जेवूनच निघाल्याचे सांगू लागला. तरीही कमलानाथ त्याचे हात न सोडता म्हणू लागला.

-"असं नको म्हणू रे! माझ्यासाठी आज जेव न माझ्या बरोबर!"

इतक्यात कमलानाथची बायको एक दिवा लावून घेऊन तेथे आली. लगेच रामध्यानचे हात सोडून देत कमलानाथ म्हणाला, "हो, हो! मी विसरूनच गेलो. रात्र खूप झालीय अन् तुलाही अजून पैशांची सोय करायची आहे. जेवण कुठेही केलं, तरी काय फरक पडतो!"

"हां, तू बरोबरच म्हणतोयस. जातो मी." म्हणून रामध्यान तेथून निघून गेला.

कमलानाथच्या बायकोला समजेना की आपला नवरा कमलानाथचे हात धरून त्याला जेवायचा आग्रह का करीत होता. तिने विचारल्यावर कमलानाथ हसत म्हणाला, "अग वेडे! दिवा तर विझला, अन् पैसे इथे चटईवरच आहेत कपड्याखाली. पैशांचं रक्षण करावं म्हणून मला हे नाटक करावं लागलं." नवऱ्याच्या बोलण्याने ती चकित झाली!





## निळे गुलाब

अनुसंधानकलेत असाध्य मानली जाणारी एक गोष्ट बहुधा लवकरच घडणार आहे. ऑस्ट्रेलियातील काही वैज्ञानिक गेली चार वर्षे करत असेलल्या खटपटीला यश आले, तर ती गोष्ट असाध्य रहाणार नाही. निळ्या रंगाची पेटूनिया आणि इरिश या फुलांना निळा रंग प्रदान करणारी जीवतत्वे (जीन्स) काढून घेऊन ती गुलाबाच्या रोपात पोचवायचा प्रयत्न हे वैज्ञानिक करत आहेत. अशी माहिती मिळाली आहे की त्यांचा प्रयत्न जवळजवळ सफल होत आला आहे आणि १९९३ पर्यंत पहिले निळे गुलाब तयार करण्यात ते सफल होतील अशी आशा आहे.



## असामान्य गिधाडे

भारतात गिधाडांचे आठ प्रकार आहेत, त्यातला 'पॉंडिचेरी गिधाड' हा एक प्रकार लुप्त होत चालला आहे. प्रथम ही गिधाडे श्रीलंका व बांगला देशात पहायला मिळत. पण आता मात्र तो प्रकार पूर्णत: गायब झाला आहे. अहमदाबादच्या 'कमला नेहरू झू' मधे अशी तीन गिधाडे आहेत की ज्यांना 'राजगिधाड' (King Vulture) असेही म्हटले जाते. ही गिधाडे मनुष्यवस्तीत जायला भितात.



## खूप मोठी संख्या

अन्य प्राण्यांच्या तुलनेत चिलटांची संख्या ही सर्वात जास्त आहे असे मानले जाते. त्यांच्या जवळजवळ २,५०,००० इतक्या जाती आहेत. सर्वच कीटकांची गोष्ट विचारात घेतली तर त्यांचे प्रकार ५०,००,००० मानले जातात. किड्यांची एकूण संख्या १,०००,०००,०००,०००,००० मानली जाते.



# रिओ डी जनीरोची परिषद



गेल्या जून महिन्यात ब्राझीलच्या रिओ डी जनीरो नगरीत संयुक्त राष्ट्रसंघाच्या नेतृत्वाखाली झालेल्या शिखर-परिषदेचा उद्देश होता 'पृथ्वीचे संरक्षण'. पृथ्वीवरील वातावरण अधिक कलुषित होऊ नये, पृथ्वीवर सर्व काही अधिक स्वच्छ ठेवण्यासाठी काय व्यवस्था करता येईल याबाबत विचार-परामर्ष करण्यासाठी हे शिखर-संमेलन योजण्यात आले होते. या संमेलनाची विशेषता म्हणते यात जगातील ११५ देशांनी भाग घेतला होता. जगातील अधिकाधिक देशांचे नेते या परिषदेच्या निमित्ताने एका ठिकाणी आले, म्हणून या घटनेला इतिहासात विशेष महत्त्वाचे स्थान आहे.

या संमेलनात भाग घेणाऱ्या सर्व नेत्यांनी दोन गोष्टींवर विशेष भर दिला - विविधतेने भरलेली जीव-सृष्टि (बायोडायव्हर्सिटी) व पृथ्वीवरील उष्णतेची वाढ (ग्लोबल वॉर्मिंग). सर्व नेत्यांची भाषणे श्रोत्यांनी लक्षपूर्वक ऐकली. पण प्रसिद्ध आंतरराष्ट्रीय वातावरण संस्था 'ग्रीन प्लेस' ने आपला अभिप्राय दिला की या परिषदे द्वारे पृथ्वीच्या संरक्षणाच्या कामी काही विशेष कार्य घडले नाही.

संमेलनात चार मुलांनी ही भाग घेतला. कॅनडातील दोन, चिलीचा एक व जर्मनीचा एक अशी चार मुले मोठ्या उत्साहाने भाषणे करीत होती. या मुलांनी जे विचार मांडले त्यांनी परिषदेतील श्रोत्यात एक नवीन उत्साह संचारला. ते म्हणाले की पृथ्वीच्या संरक्षणासाठी आपण जे कार्य करतो, त्याची पद्धत आपण बदलली पाहिजे आणि सर्व राष्ट्रीय नेत्यांना हीच आमच्या मनातील गोष्ट सांगण्यासाठी आम्ही इतक्या लांबून या संमेलनात भाग घेण्यासाठी इथे आलो आहोत. कॅनडातून आलेली १२ वर्षे वयाची मुलगी सिवेर्न सुजुकी आपल्या भाषणात म्हणाली-

''मी आपल्या भविष्यासाठी झगडत आहे. सर्व जगातील भूक व तृष्णा यांनी त्रस्त झालेल्या मुलांच्या वतीने मी बोलत आहे. या धरतीवर क्षणोक्षणी जे मूक प्राणी व पक्षी मृत्यु-मुखी पडत आहेत त्यांच्या भावना मी

व्यक्त करीत आहे. उन्हातून चालताना मला भीति वाटते की साचलेल्या ओझोनच्या छिद्रांतून कोणकोणते घातक रासायनिक पदार्थ बाहेर पडत असतील कोण जाणे! या पृथ्वीवरील परिस्थिति केव्हा ही सुधारो, मी तुम्हाला एवढीच प्रार्थना करणार आहे की तिला अधिक दूषित करू नका. तुमच्या सारख्या थोर मंडळींना माझे विचार सांगण्यासाठी खूप लांबून मी इथे आले. खर्चासाठी आवश्यक रक्कम जमा करण्यासाठी मला खूप प्रयत्न करावे लागले.''

या मुलीचे भाषण ऐकून संमेलनांतील लोकांना मोठे आश्चर्य वाटले, त्यांना आनंद ही झाला. काही लोकांच्या डोळ्यात आनंदाश्रू तरळले.

संमेलनाच्या शेवटच्या अधिवेशनात 'अजेंडा २१' नावाचा कार्यक्रम संमत झाला. गेल्या एक-दोन दशकांत विकसित देश नैसर्गिक संपत्तीची खूप लुटालूट करीत आहेत. त्यामुळे वातावरण फार कलुषित होत चालले आहे. ही हानि भरून काढणे या विकसित देशांचे मुख्य कर्तव्य आहे, मग त्यासाठी खर्च करताना त्यांनी मागे पुढे पाहू नये.




मनुष्य जातीच्या प्रगतीसाठी नैसर्गिक संपत्तीचा उपयोग करणे यात काही वावगे नाही, पण त्याला ही काही मर्यादा आहे. मनुष्य, जीव सृष्टि व पृथ्वीची हानि होणार नाही असा काही तरी मधला मार्ग आपण शोधला पाहिजे. भारताचे प्रधान मंत्री श्री. पी.व्ही. नरसिंहराव यांनी परिषदेत भाग घेऊन आपल्या भाषणात एक श्लोक ऐकवला, त्याचा अर्थ आहे-''पर्वताला आपले वक्ष व समुद्राला आपले वस्त्र बनवणाऱ्या भू-माते, माझा नमस्कार स्वीकार कर. मी आपल्या पायांनी तुला स्पर्श करीत आहे, याबद्दल मला क्षमा कर!''

ब्राझीलचे अध्यक्ष परिषदेच्या प्रारंभी म्हणाले की नव्या विश्वाच्या निर्मितीची ही शेवटची संधि आपल्याला लाभली आहे, ती आपण गमावता कामा नये.

आपण विश्वासपूर्वक म्हणू शकतो की धरती-मातेची स्वच्छता व संरक्षण करणे आजच्या आपल्या नेत्यांना न जमले, तरी येत्या पिढीच्या युवक-युवतींना या प्रयत्नात अवश्य विजय मिळेल. एकविसावे शतक अशा महान् भविष्य-निर्मात्यांचे स्वागत करीत आहे.



# हुंडयाची भुते

रामेश नावाच्या एका गरीब माणसाला विमला नावाची एक अुपवर मुलगी होती. तिच्यासाठी तीन-चार स्थळेही सांगून आली. परंतु मुलगी पसंत पडूनही रामेश देअू शकत असलेली हुंड्याची रक्कम न पटल्यामुळे विमलाच्या लग्नाचे जमले नाही.

रामेशचे नेहमीच कल्याण चिंतणारा लहानपणापासूनचा मुकेश नावाचा एक मित्र होता. तो एक व्यापारी होता. त्याला शहरात चांगली नोकरी होती. विमला त्यांना पसंत पडली. त्यांनी फक्त दहा हजारच हुंडा मागितला.

रामेशने मुकेशला एका बाजूला घेअून जाअून म्हटले, ''तू माझ्या शक्तीबाहेरचं स्थळ का बरं आणलंस? मी हे सगळं कसं जमवू शकेन?''

मुकेश हसत अुत्तरला, ''लग्नाचा खर्चच फक्त तू अुचल हुंड्याची रक्कम, आत्ता मी देईन. येत्या पाच वर्षात थोडी थोडी करून माझी रक्कम फेडून टाक.''

मुकेशच्या मदतीने विमलाचे लग्न ठरले अन्, पंधरा दिवसांनंतरचा मुहूर्त ठरवला गेला, रामेश लग्नाच्या तयारीला लागला. तयारीत दिवस जात राहिले, पण मुकेशने कबूल केलेली रक्कम तर अजून हाती आली नाही.

हुंड्याच्या रकमेसाठी रामेश स्वतःच शहरात गेला.

कामांच्या गडबडीतही रामेश आलेला पाहून त्याची क्षमा मागत मुकेश म्हणाला, ''आजच पैसा हाती आला. माझ्याकडून अुशीर झाल्याबद्दल माफ कर मला. अुद्या माझ्या आईचं श्राध्द आहे. ते काम

नारायण आठवले



अुरकून लगेच रक्कम घेअून मी तुझ्याकडे यावं असा विचार केला होता. हे बघ पैसे बांधूनच ठेवलेत."

मुकेशच्या हातून थैली घेअून ती नीट आपल्या कमरेला खोचत रामेश त्याला म्हणाला. "मी आता इथे आणखी वेळ घालवू शकत नाही. गैरसमज नको करून घेअूस. तिकडे ढीगभर कामं खोळंबली आहेत. चलतो मी."

रामेश ताबडतोब तेथून परत फिरला. रात्र झाली होती. कोठे भाड्याची गाडीही मिळेना. परत जायच्या रस्त्यावर झाडां-झुडपांनी दाट भरलेलं एक छोटंसं जंगलही होतं.

रामेश त्या अंधारातून एकटाच गावाकडे चालत होता. अचानक एका शाल वृक्षामागून विजेच्या स्फूर्तीने येअून एक चोर रामेश समोर अुभा ठाकला. त्याने आपादमस्तक बुरखा ओढून घेतलेला होता. त्याने रामेशसमोर सुरा परजत म्हटले, "आवाज न करता मुकाट्याने तू तुझ्याकडे काय असेल ते धन माझ्या हवाली कर, नाहीतर प्राणास मुकशील बघ!"

भयाने रामेशची बोबडीच वळली! चोराने त्याचे कपडे चाचपून कमरेची थैली काढून घेतली अन् पोबारा केला. रामेश बिचारा दुःखाने वेडापिसा झाला. "आता जन्मात काही आपण मुलीचे लग्न करू शकणार नाही, असे त्याला वाटले. अशाच विचारात कसातरी पाय घासपटत तो पुढेपुढे चालत होता.

वाटेत एका ठिकाणी दोन भुते थंडीपासून आपला बचाव करण्यासाठी लाकडांची शेकोटी पेटवून शेकत बसली होती. मधून-मधून त्यांच्या गप्पाही चालल्या होत्या. त्यांच्या बोलण्यात विमलाचे नाव ऐकून रामेश चमकला अन् एका झाडाआड दडून त्यांचे बोलणे ऐकू लागला.

"काहीही झालं, तरी अुद्या विमलाचं लग्न होणारच." एक भूत असे बोलून हसू लागले.

"पण हुंड्याची रक्कम तर चोर घेअून गेला नं? मग कसं होणार लग्न?" दुसरे भूत विचारू लागले.

"तुझी दृष्टि बहुतेक क्षीण होत असावी. त्या चोराला तर साप चावला, अन् तो आता तिथेच शालवृक्षाखाली मरून पडलाय. मग कसं म्हणतोस की हुंड्याची रक्कम नाहीशी झालीय?" पहिले भूत बोलले.

हे बोलणे ऐकून रामेशचा जीव भांड्यात पडला. तो मागे वळून भराभरा त्या झाडाकडे गेला. चोराचे प्रेत खरोखरच तेथे पडले होते. जवळच त्याला आपल्या पैशांच्या थैलीबरोबर आणखी एक दागिन्यांचे गाठोडे पण पडलेले दिसले. रामेशने विचार केला की, लग्नाची धामधूम संपली की दागिन्यांचं गाठोडं शहरात जाअून कोतवालाला सुपूर्त करावं. दोन्ही वस्तु अुचलून रामेश आनन्दाने घरी परतला.

सारी हकिकत ऐकून रामेशची बायको म्हणाली, "काहीही असो. आज भाग्य आपल्या बाजूचं आहे, आपल्याला आपले पैसे परत मिळाले."

त्याच दिवशी संध्याकाळी मुलाकडील वऱ्हाड आले, विमलाची बहीण जेंव्हा मुलाकडच्यांना लिंबाचे सरबत द्यायला गेली, तेव्हा नवऱ्यामुलाची मोठी बहीण हळूच आपल्या आईला म्हणाली, "आई! अग तिकडे बघ! बुरखेवाला चोर माझे



दागिने पळवून घेअुन गेला नं, ते तर या मुलीच्या गळ्यात दिसतायत!" इतके बोलून तिने लगेच मुलीचा हात पकडला.

चोराजवळचे दागिन्यांचे जे गाठोडे आपण आणले त्यातले दागिने काढून आपल्या धाकट्या मुलीने घातलेत, हे रामेशला किंवा त्याच्या बायकोलाही मुळीच माहीत नव्हते.

"हा चोरीचा माल तुमच्या घरी कसा आला? तो बुरखेवाला चोर, म्हणजे तुमचाच हस्तक असावा असं वाटतंय!" नवऱ्या मुलाच्या आईने कडक आवाजात विचारले, अन् बोलता बोलता मुलीच्या गळ्यातले दागिनेही तिने

काढून घेतले.

इतक्यात तेथे आलेल्या रामेशवरही सर्वांनी सरबत्ती सुरू केली, "हे दागिने तुम्हाला कसे मिळाले, बोला!"

"एका बुरखेवाल्या चोराच्या प्रेताजवळ मिळाले." रामेश अुत्तरला.

"खोटं! आताच आम्ही म्हणत होतो, की आमचे दागिने एका बुरखेवाल्याने चोरले. म्हणूनच तुम्ही म्हणताय कि ते तुम्हाला चोराच्या प्रेताजवळ सापडले. तुम्ही लोकच चोर आहात. आम्हाला चोरांशी नातं नाही जोडायचं!" इतके बोलून मुलाकडचे लोक त्याच क्षणी निघून गेले.

त्या रात्री रामेशच्या घरात कोणालाच झोप लागली नाही. अजून अुजाडलेही नव्हते, तोच त्याच्या घराच्या दारावर थाप पडलेली ऐकू आली. विमलाने स्वतःच अुठून दरवाजा अुघडला, पहाते तो बाहेर नवरामुलगा शंकरच अुभा!

रामेश व त्याची बायकोही तेथे आले. शंकर त्यांना म्हणाला, "तुमची हरकत नसेल तर ठरलेल्या मुहूर्तावर मी तुमच्या मुलीशी लग्न करायला तयार आहे. हां, अन् हुंडाबिंडा काहीही नको."

अशा तऱ्हेने विमलाचे लग्न निर्विघ्नपणे पार पडले. त्या दिवशी संध्याकाळी विमलाने शंकरला विचारले, "तुम्ही लोक तर सर्वांसमोर निघून गेला होतात. मग एकटेच परत येअून तुम्ही माझ्याशी लग्न कसं काय केलंत? मला यातलं रहस्य कळू शकेल?"

शंकरने जरासे हसून जे सांगितले, त्याची थोडक्यात हकिकत अशी - आपल्या आईबापांबरोबरच परत निघालेला शंकर रजा रद्द करून कामावर जाण्यासाठी वाटेतूनच शहराकडे निघाला. रस्त्यात शेकोटीपाशी बोलत बसलेली दोन भुते त्याला दिसली. एका झाडाआडून त्याने त्यांचा संवाद ऐकला, कारण त्यांच्या बोलण्यात त्याचा स्वतःचा अुल्लेख भुतांनी केला होता.

"विमलाचं लग्न ज्याच्यामुळे थांबलं, त्या शंकरबद्दल तुझं काय म्हणणं आहे?" एक भूत विचारत होते.

"ते सांगीन. पण अगोदर हे सांग की तुला भूत का बनावं लागलं?" दुसऱ्या भुताने प्रतिप्रश्न केला.

"मी लहान-मोठ्या चोऱ्या करत असे. दोन कुटुंबांची माझ्यामुळे वासलात लागली. त्या पापाचा परिणाम म्हणून मला हे भुताचे जिणे मिळाले. अच्छा, आता तुझी हकिकत सांग?" पहिल्याने दुसऱ्या भुताला विचारले.

दुसरे भूत अुत्तरले, "मी आपल्या दोन्ही मुलांच्या लग्नातच सुना आणि त्यांच्या आई बापांना हुंड्यावरून आणि रीतिरिवाजांवरून खूप त्रास दिला होता. एक सुनेचा बाप तर माझ्या भीतीने घर सोडून अंगाला राख फासून निघून गेला.





दुसरी सून माझा छळ सहन करू शकली नाही, अन् तिला मतिभ्रम झाला. या सगळ्या पापांची शिक्षा आज मी भूत बनून भोगतो आहे."

"हो, ठीकच बोलतोयस तू! आपल्या दोघांना ही आपापल्या करणीचं फळ मिळालंय! म्हणूनच म्हणतात की-करावं तसं भरावं!" पहिले भूत म्हणाले.

थोड्या वेळाने पहिले भूत पुन्हा दुसऱ्याला म्हणाले "त्या शंकरच्या बाबतीत विचारत होतास न? खरं तर वधूपक्षाकडून हुंड्याच्या नावानं चांगली मोठी रक्कम अुपटायचा विचार केला त्या लोकांनी! ते तर एक पाप आहेच, अन् वर त्यांच्यावर चोरीचा खोटाच कलंक लावला. आपल्या होणाऱ्या सासऱ्याच्या बोलण्यातलं सत्य जाणूनही न घेताच शंकरने हिऱ्यासारख्या विमलाला नाकारलं. अशा तऱ्हेने मधेच लग्न मोडलेल्या मुलीचा पुन्हा विवाह होणं मुश्किलच! या पापाची शंकरला कशी शिक्षा मिळेल, माहीत आहे?"

का माहीत नसेल? स्वत:च त्या प्रकारच्या शिक्षेचं अुदाहरण आहोत न आपण? जाअू दे, सगळेच चांगले असावेत अशी अपेक्षा कशी करावी आपण? काही जण तर आपल्यासारखे असणारच, अन् भूतं बनून ती आपली संख्या वाढवत राहाणारच!" असे म्हणून दुसरे भूत खदखदून हसू लागले.

इतकी हकिकत सांगून शंकर विमलाला म्हणाला, "विमला, हा संवाद ऐकून मी ओळखलं, की तुझे बाबा निर्दोष आहेत. त्या भुतांनी माझे डोळे अुघडले, म्हणूनच मी परत फिरलो. काहीही असो, तू माझी बायको झालीस, हेच माझं भाग्य!"

विमलाने मनातल्या मनात त्या अज्ञात भुतांचे आभार मानले. दुसऱ्या दिवशी मोठ्या आनन्दाने ती शंकर बरोबर सासरी रवाना झाली.





# माया महाल

## ५

(सारस सरोवरातील विश्राम भवनातून वीरगिरीची राजकन्या विद्यावती अदृश्य झाली. राजाच्या आज्ञेवरून सेनापति अुग्रसेन याने तिच्या शोधासाठी चारी दिशांना शिपाई पाठवले. यानन्तर युवराणीच्या शोधास जाण्यासाठी परवानगी मागायला एक युवक राजाला भेटायला आला.—पुढे वाचा)

शिपायाबरोबर आलेल्या युवकाने राजाला हात जोडून सादर नमस्कार केला. राजाने त्याच्याकडे पायापासून डोक्यापर्यन्त नीट निरखून पाहिले. वेषभूषा अगदी साधी असली, तरी त्याच्या चालचलणुकीत कमालीचा गंभीरपणा आणि रूपात राजघराण्यातल्या एकाद्या माणसाचा रुबाब असल्याचे राजाला जाणवले. सेनापतीने आपल्याला या युवकाबद्दल जे सांगितले, ते सर्व अगदी हुबेहूब खरेच आहे असे त्याला वाटले.

सेनापति अुग्रसेन राजाकडे पाहून म्हणाला, "महाराज, युवराणीला शोधून काढण्यासाठी जाण्याची अनुमति मागणारा हाच तो युवक."



"हे तरुणा, तू कोण आहेस? नाव काय तुझं? आमचे शिपाई राजकुमारीच्या शोधासाठी जाअून परतही आले. आणखी काही शिपाई आसपासच्या राज्यांतून तिला सापडवण्यासाठी हिंडत आहेत. अन् तू तर एकटाच तिला शोधायला जायचं म्हणतोस; तुला हे शक्य होईल का? समज तुला राजकुमारी दिसली; तरी पण तू तिला ओळखू कसा शकशील?" राजाने त्या तरुणाला विचारले.

हात जोडूनच तो युवक नम्रपणे अुत्तरला, "दरवर्षी राजकुमारीच्या जन्मदिवशी जी मिरवणूक निघते, ती पहायला मी अन् माझी आई न चुकता जात असतो. त्यामुळे मी युवराणीला अगदी सहज ओळखू शकेन."

"असं होय? पण तू कोण हे अजून नाही सांगितलंस?" राजाने विचारले.

युवक सांगू लागला, "महाराज! माझं नाव महेन्द्रनाथ. राजधानीपासून थोड्या दूर असणाऱ्या देवीच्या मंदिरात मी आपल्या आईसह रहात असतो. माझी आई रोज आसपासनं फुलं तोडून आणून त्याची माळ करून देवीला वाहते. मी तीन वर्षांचा असतानाच माझे बाबा वारले. तेव्हापासून आम्हा दोघांचा अुदरनिर्वाह माझे काका चालवत असत. परंतु माझी काकूही अचानक वारली, अन् त्यामुळे काकांचं मन संसाराला विटलं. ते आम्हाला सोडून कुठं तरी निघून गेले. मला जरा समजूत आल्या दिवसापासून मीच स्वतः कमाई करून आईचं पालनपोषण करत असतो."

"ठीक आहे. पण तू जे काम करायला सिद्ध झाला आहेस, ते वाटतं तितकं सोपं नव्हे. त्यासाठी तुला फार त्रास सहन करावा लागेल; खूप अडचणी येतील." युवकाला पुन्हा एकदा इशारा देत राजा म्हणाला.

"होय, आपलं म्हणणं अगदी बरोबर आहे महाराज. पण मी ती सर्व कल्पना करूनच आलोय. मी युवराणीला शोधायला जाईन, तेव्हा त्या कामात माझे काही दिवस नक्कीच जातील. येणाऱ्या अडचणींना मी मुळीच भीत नाही. पण मी परतेपर्यंत 'माझ्या आईचा सांभाळ' हीच माझ्यापुढली एक समस्या आहे. ही गोष्ट मी सेनापतींना सांगितली आहे." महेन्द्रनाथने आपली अडचण सांगत म्हटले.

"होय, सेनापतीने ते आम्हाला सांगितलंय. ते काम आम्ही व्यवस्थित संभाळू. तू आमचं काम साधलंस तर तुला आम्ही खूप बक्षिसं देअू. तुझी याशिवाय आणखी काही विशेष इच्छा असेल तर सांग." राजाने युवकाला विचारले.

"महाराज, बक्षिसाच्या आशेनं मी युवराणीला शोधायच्या कामगिरीवर जात नाहीय. अशा कठीण परिस्थितीत आपल्या देशासाठी आपल्याकडून शक्य ते सारं करणं हे प्रत्येक नागरिकाचं कर्तव्यच नव्हे का? जंगलाच्या आसपासचा भाग माझ्या चांगल्या माहितीचा असल्यामुळेच हे काम करायला मी अुद्युक्त झालो आहे." शान्त, गंभीर आवाजात महेन्द्रनाथ बोलला.

"ठीक आहे. कामगिरीवर जायला मी तुला परवानगी देत आहे. केव्हा निघायची इच्छा आहे तुझी?" राजाने विचारले.



"मी अुद्याच निघू म्हणतोय. पण..." मधेच बोलता बोलता महेन्द्रनाथ थांबला.

"पण काय?" त्याच्याकडे निरखून पहात राजाने विचारले.

अुग्रसेनही महेन्द्रनाथ काय म्हणतोय हे अुत्सुकतेने ऐकू लागला.

"महाराज, राजकुमारींना तर मी ओळखेनच. पण मी आपल्याच अनुमतीने आलो आहे याबद्दल त्यांचा विश्वास कसा पटावा? मी याचाच खूप विचार करतो आहे." महेन्द्रनाथ अुत्तरला.

"पण महाराज, खूण म्हणून



युवराणीला दाखवण्यासाठी एकादी वस्तु वगैरे देणं अुचित होणार नाही. वस्तु वाटेत गहाळ होअू शकेल, किंवा एकादे वेळी चोरीलाही जाईल.'' अुग्रसेनने तावडतोब धोका व्यक्त केला.

यावर राजा अुग्रसेनला म्हणाला, ''होय खरंच! अुग्रसेन, तू अगदी बरोबर बोललास, मलाही तसंच वाटतं.'' नन्तर महेन्द्रनाथकडे वळून तो म्हणाला, ''युवराणीच्या अुजव्या दंडावर एक डाग आहे. ही गोष्ट मी अन् महाराणी यांच्याशिवाय कोणालाच माहीत नाही. युवराणीला भेटलास, की तू याबद्दल अुल्लेख कर, म्हणजे तू आमच्यातर्फेच भेटत आहेस, यावर तिचा विश्वास बसेल. तिसऱ्या कोणाला मात्र ही गोष्ट सांगू नकोस. सावध रहा!'' पुढे तो महेन्द्रला म्हणाला, ''तुझ्या आईच्या सांभाळाची जबाबदारी मी खुद्द सेनापतीवर सोपवत आहे. तेंव्हा आता तू निश्चिन्तपणे दौऱ्याला नीघ अन् विजयी होअून परत ये. आम्ही वाट पहात असू.'' इतके बोलून राजा आसनावरून अुठून अंतःपुराकडे निघून गेला.

नंतर सेनापती महेन्द्रला म्हणाला, ''संध्याकाळी आपल्या आईला घेअून इथे ये, बाकीचं सगळं तेंव्हाच ठरवू.''

महेन्द्र तेथून निघून आपल्या घरी पोचला, तेंव्हा त्याची आई संध्याकाळच्या पूजेसाठी फुलांच्या माळा ओवत बसलेली होती.

''आई, महाराजांना भेटून आलो मी.'' आईला तो म्हणाला.

''काय म्हणालास? वीरसेन महाराज भेटले तुला? खरेच? राजदरबारात नोकरी मिळाली तुला?'' मोठ्या आनन्दाने अन् आश्चर्याने आई विचारू लागली.

''नोकरीला नन्तर लागेन मी आई! आणि युवराणीला शोधायला जायची







परवानगी दिलीय त्यांनी मला.'' महेन्द्रनाथ म्हणाला.

''अं? युवराणीचा शोध घेणार तू? अरे कुठे, कुठे शोधशील तिला? एकट्यानं जंगलात फिरणं धोक्याचं नव्हे का बाळा? तू परत येईपर्यन्त माझं काय होईल रे?'' आई दु:खी आवाजात विचारू लागली.

''ती काळजी सोड आई! युवराणीचा पत्ता लावून मी नक्कीच खुशालीने परत येईन. तोवर तुझ्या सांभाळाची जबाबदारी महाराजांनी स्वीकारलीय. आजच संध्याकाळी आपण सेनापतींना भेटायला जायचंय. बघ तुझ्या साऱ्या अडचणी मिटल्या ना?'' अशा तऱ्हेने आईला धीर देऊन महेन्द्रनाथ आपल्या जुळवाजुळवीला लागला.

त्या दिवशी संध्याकाळी महेन्द्रनाथ आपल्या आईसह सेनापति अग्रसेनकडे गेला. अग्रसेनने त्याच्या आईला मोठ्या आदराने बसवून घेतले अन् म्हटले, ''आई! तुमच्या मुलाला या कामात नक्कीच यश मिळेल. त्याच्यामुळे राजपरिवार अन् सर्व प्रजा पुन्हा आनन्दी होणार आहे. तो परत येईपर्यंत तुमची जबाबदारी खुद्द मी उचलत आहे. राजवाड्यातून तुम्हाला तीन वेळचं खाणं मिळेल, अन् बाकी सर्व कामांसाठी एक खास शिपाई तुमच्या तैनातीला नेमलाय मी. तुम्ही स्वत: निश्चिन्त होऊन आपल्या मुलाला मनापासून आशिर्वाद द्या.''

नंतर अग्रसेन महेन्द्रला म्हणाला, ''आता तूही आपल्या आईची काळजी सोड. आचार्य वाचस्पतींनी जंगलात पश्चिमेकडे शोध घ्यायला सुचवलंय हे विसरू नकोस. महाराजांनी दिलेल्या सूचनाही लक्षात ठेव. उद्या सकाळी नीघ अन् विजयी होऊन परत ये.''

यानंतर ते मायलेक मोठ्या आनन्दाने घराकडे परतले. महेन्द्रने आईला नमस्कार केला. तिचे आशिर्वाद घेऊन अन् तिने करून दिलेलं शिदोरीचं गाठोडं घेऊन तो सरोवराकडे चालू लागला.

सारस-सरोवरातले जे विश्रामभवन त्याने जवळून कधी बघितले नव्हते, ते पाहून तो सरोवराच्या चारी बाजूचे बारकाईने निरीक्षण करू लागला. घाटाशी एक नाव होती अन् तिचा नावाडी जवळच एका झाडाखाली बसलेला दिसला. त्याने उठून महेन्द्रला नमस्कार करत विचारले. ''तुम्ही राजवाड्यातून आला आहात इथे?''

''असं का बरं विचारतोयस?'' महेन्द्रने त्याला उलट विचारले.

''मी युवराणीबद्दलच्या बातमीची वाट पहात आहे. राजकुमारी परत आली म्हणजेच विश्रामभवनातली दासी राजवाड्यात परत जाऊ शकेल. ती बिचारी सध्या एकटीच तिथे रहात आहे.'' नावाडी बोलला.

''अजून राजकुमारीची काही खबर नाही. तिलाच शोधायला निघालो आहे मी!'' महेन्द्रने बातमी दिली.

''छान! हे ऐकून संतोष वाटतोय मला. पण मी एक गोष्ट सांगतो तुम्हाला. त्या दुष्टांनी तिचं अपहरण या घाटावरून नाही केलेलं. या सरोवरातून नक्कीच दुसरा एकादा मार्ग असला पाहिजे.'' नावाड्याने सांगितले.

''मी सरोवराला प्रदक्षिणा घालून दुसरा एकादा मार्ग आहे की काय हे पाहीन. जंगलाकडे जाणारा एकादा मार्ग दिसला, तर मी त्याच मार्गानं पुढे जाईन. रामराम!'' असे म्हणून महेन्द्र पुढे निघाला.

''तुझा प्रवास सफल होवो हीच माझी देवाजवळ प्रार्थना! जा बाबा!'' नावाडी गदगदल्या स्वराने बोलला.

**क्रमशः**



# आकाशाएवढी लांब छडी

एका बड्या जमीनदाराच्या पदरी दोन खुशमस्करे (विदुषक) होते. त्यांची नावं होती रामू अन् श्यामू. एके दिवशी संध्याकाळी दोघेही जमीनदाराबरोबर फेरफटका मारायला बाहेर पडले. समोर लवलवणारी हिरवीगार शेतं पाहून अश्रूभरल्या डोळ्यांनी रामू म्हणाला, "मालक, दूरवर पसरलेली ही सारी शेतीवाडी एके काळी माझ्या पणजोबांच्या मालकीची होती."

लगेच दुसरा विदुषक श्यामू त्याची तळी अुचलून धरत म्हणाला, "होय हो मालक! रामूचं म्हणणं खरंच आहे! याच्या पणज्याच्या विशाल जमिनीवर माझा पणजा पाअूस पाडत असे. कसा पाडत असे, माहीत आहे तुम्हाला? माझ्या पणजोबांजवळ आकाशाएवढी लांबच लांबच अशी एक छडी होती. ती हातात घेअून ते ढगांना हवं तिथं हाकलत नेअून पाअूस पाडत असत! अरे काय छडी होती ती! साक्षात् इन्द्राचं वज्रच असं म्हणा मालक!"

"इतकी मोठी लाठी? तुझे पणजोबा ती कुठं ठेवत असत श्यामू?" हसत हसत जमीनदाराने श्यामूला विचारलं.

"लाठी नका म्हणू मालक! ती तर माझ्या पणजोबांच्या हातची छडीच होती हं! ती या रामूच्या पणज्याच्या शेतात लपवून ठेवत असत माझे पणजोबा." रुसल्या आवाजात श्यामू अुत्तरला.

"असं? मग आता कुठंय ती?" आपलं हसू दाबत जमीनदाराने विचारलं.

"मालक! म्हणतात नं, की क्रोध ही मोठी वाईट गोष्ट आहे? एकदा माझ्या पणजीवरच्या रागात त्यांनी ढग इतके हाकलले अन् त्यांना इतकं मारमारून दामटवलं की तीन दिवस आणि तीन रात्री आभाळ नुसतं बदाबदा ओतत राहिलं होतं! त्या पावसामुळे आलेल्या पुरात ती आकाशाएवढी छडी कुठे तरी वाहून गेली हो! बहुधा पुढे कुठे तरी खडकांवर आपटून तुटून गेली असली पाहिजे ती!" श्यामू दुःखी आवाजात बोलला.

यावर रामू पटकन् म्हणाला, "हां मालक! ती छडी अंशी नाहीशी झाली, अन् मग पाअूसही पडेनासा झाला ना! मग चिडून माझ्या पणजोबांनी आपली सगळी शेतं प्रत्येकाला वाटून देअून संपवून टाकली. त्यामुळे माझ्याजवळ आता दोन बिघे जमीनही अुरली नाही मालक!"

ही सारी गोष्ट ऐकून हसून हसून जमीनदाराची मुरकुंडी वळली. त्यांनी रामू-श्यामूना प्रत्येकी एकेकशे एकर जमीन बक्षिस दिली.

निलेश सरवटे





# कूबरची गोष्ट

आपल्या निश्चयाबाबत अढळ असा राजा विक्रम पुन्हा त्या झाडाजवळ गेला. फान्दीवरून प्रेत अुतरवून, ते खांद्यावर टाकून तो पूर्वीप्रमाणेच स्मशानाची वाट चालू लागला. तेंव्हा त्या प्रेतातला वेताळ बोलू लागला, "राजा, आपली शक्ती किंवा बुद्धि यांचा अजिबात अुपयोग न करता ही केवळ वंशपरंपरेमुळेही तुझा राज्यकारभार अत्यन्त सुरळीत चालू आहे. असे असूनही, त्यात समाधान न मानता, तू या अंधाऱ्या रात्री असल्या स्मशानात कष्ट का अुपसत आहेस हे ओळखणे माझ्या बुद्धीपलीकडील आहे. तुझी कदाचित सम्राट बनायची इच्छा असावी. पण तुझी केवळ हीच इच्छा असेल, तर त्यासाठी दृढसंकल्प व ध्येयसिद्धीसाठी अथक प्रयत्न या गोष्टींची आवश्यकता आहे. हे सर्व प्राप्त करणे केवळ काही महासत्त्वशाली लोकांनाच शक्य होते. परंतु कधी कधी असे महासत्त्वशाली लोकही

वेताळाच्या गोष्टी



दया, करुणा, प्रेम आणि सहानुभूती या भावनांच्या अधीन होताना आढळतात. उदाहरण म्हणून मी तुला कूबर नावाच्या तान्त्रिकाची गोष्ट सांगतो. ती नीट लक्षपूर्वक ऐक; म्हणजे तुझा रस्ता सुलभपणे संपेल, तुला थकवाही जाणवणार नाही." आणि वेताळ गोष्ट सांगू लागला—

अवन्तीच्या राजकुमारी स्वर्णलतेच्या सौन्दर्याची ख्याती चारही दिशांना पसरलेली होती. अर्थातच तिचा आपल्याच राजकुमाराशी विवाह व्हावा म्हणून देशोदेशीच्या राजकुमारांच्या तसबिरी अवंतीला येऊन पोचत होत्या. स्वर्णलतेकडे असा बराच संग्रह जमला, तेंव्हा ती आपल्या पित्याला म्हणाली, "बाबा, विवाहाच्या बाबतीत मी तुमचा निर्णय पाळीन. कोणत्या राज्याशी आपले संबंध अधिक चांगले व्हावेत याबद्दल नीट विचार करून त्या देशच्या राजकुमाराची निवड करा."

हसून राजा म्हणाला, "मग निहार देशच्या राजपुत्राशी तुझा विवाह करून देतो मी. आवडेल तुला तो?"

हे ऐकल्याबरोबर राजकन्येचा चेहरा अुतरला. कारण निहार-राजकुमार अत्यंत दुष्ट, नीच, प्रजाकंटक होता. कन्येच्या चेहऱ्याचा रंग अुडालेला पाहून राजा म्हणाला, "बाळे, अग मला कळलं आहे की विदेह राजकुमार चित्रसेन तुला फार आवडतो; त्याच्यावर तुझं प्रेम आहे. चित्रसेनशीच विवाह करून मजेनं आपलं आयुष्य व्यतीत कर."

यावर नकारात्मक मान हलवत स्वर्णलता म्हणाली, "त्या प्रेमासाठी मी आपल्या देशाचं भविष्य अन् त्याचं कल्याण यांचा त्याग नाही करू शकत! म्हणूनच त्याच्या भल्यासाठी निहारच्या राजपुत्राशी मी विवाह करू इच्छिते."

स्वर्णलतेचे हे बोलणे ऐकून राजा मृदु स्वरात तिला म्हणाला, "तुझ्यात देशभक्ती अगदी पूर्णतः भरलेली आहे, अन् माझ्या निर्णयाबद्दल तुझ्या मनात वसणारा विश्वासही महान असाच आहे. तुझ्या मनात ज्याच्याशी विवाह करायचा असेल, त्याच्याशीच तो होईल." इतके बोलून राजा तेथून निघून गेला.

चित्रारण्यात कूबर नावाचा एक तान्त्रिक रहात असे. निम्न अशा दैवतांची आराधना करून त्याने अनेक शक्ती प्राप्त करून घेतल्या होत्या. साऱ्या भूमंडळाचा आपण राजा बनावे अशी त्याची इच्छा होती. एका देवतेने त्याला सांगितले होते की-तुझा विवाह स्वर्णलतेशी झाला, तरच तुझ्या मनातली ही इच्छा पूर्ण होईल. यात आणखीही एक अडचण आहे. हा विवाह स्वर्णलतेच्या संमतीनेच व्हायला हवा. अन्यथा विवाह झाला तर त्या तुझ्या तन्त्रविद्येच्या सर्व शक्ती नाहीशा होऊन जातील.

हा इशारा मिळताच कूबरने आपल्या मन्त्रशक्तीने स्वतः अदृश्य होऊन स्वर्णलतेच्या अन्तःपुरात प्रवेश मिळवला. त्यावेळी राजकुमारी आपल्या हंसाकृती मंचकावर गाढ निद्रेत होती. जवळून तिचे सौन्दर्य अवलोकन केल्यावर कूबरचे डोळे दिपूनच गेले. त्याच्या मनात आले की-आपण आतापर्यंत सार्वभौम सत्ता मिळवण्यासाठी स्वर्णलतेच्या प्राप्तीची इच्छा करत होतो. पण आता असं वाटतंय की, हिच्याशी विवाह होणं म्हणजेच सार्वभौमत्व हाती येण्यासारखं आहे.

स्वर्णलता सकाळी जागी झाली तेंव्हा कूबर दृश्य स्वरूपात तिच्यासमोर आला. त्याला पाहून ती एमदम घाबरून गेली.



परन्तु कूबर तिला म्हणाला, "हे सुन्दरी! घाबरू नकोस. माझ्याकडून तुला कसलाही त्रास होणार नाही. मला तुझ्याविषयी प्रेम वाटू लागलं, म्हणूनच मी येथे आलो." नन्तर कूबरने तिला स्वतःची हकिकत सांगितली.

त्याचे बोलणे ऐकून घेतल्यावर स्वर्णलता म्हणाली, "मी एक राजकन्या आहे. माझा विवाह एकाद्या राजपुत्राशीच होणं शक्य आहे."

कूबर यावर हसला आणि म्हणाला, "तुला अजून माझ्या शक्तीची कल्पना नाही, म्हणूनच तू असं बोलू धजलीस. माझ्या मनात आलं, तर या तुझ्या



महालासकट मी तुला कुठेही अुचलून नेअू शकतो. महाशक्तिशाली अशा राजपुत्रांना मी आपले दास बनवू शकतो. तू माझ्याशी विवाह केलास तर या पृथ्वीतलावरली सर्व सुखं हात जोडून तुझ्यापुढे हजर असतील."

तान्त्रिकाचे बोलणे ऐकून, हा खरोखरच आपले राज्य नष्ट करील अशी भीती स्वर्णलतेला वाटली.

जरा विचार करून ती कूबरला म्हणाली, "माझ्या तीन अटी आहेत. तू त्या कबूल केल्यास तर मी या विवाहला मान्यता देईन."

तान्त्रिक म्हणाला, "ठीक आहे. सांग तुझ्या अटी."

"आमच्या या देशात दोन धर्मांचे लोक आहेत. ते सारे आपापल्या धर्माचेच गोडवे गात राहून आपला वेळ वाया घालवत असतात. त्यांची मनं सुधारून त्यांच्यात बन्धुभाव जागवण्याचं काम तू केलं पाहिजेस. ही माझी पहिली अट!" स्वर्णलताने सांगितले.

"ठीक आहे. आता तुझी दुसरी अट सांग." कूबरने विचारले.

"माझ्या बाबांनी प्रजेच्या हितासाठी अनेक कायदे केले, अन् ते अंमलात आणण्यासाठी अनेक कर्मचाऱ्यांची नियुक्ती केली. परंतु त्यातील अधिकांश कर्मचारी भ्रष्टाचारी बनले आहेत. तू या भ्रष्टाचाऱ्यांचा पत्ता लावून त्यांच्यातही परिवर्तन घडवून आणायचंस. ही झाली माझी दुसरी अट." स्वर्णलतेने दुसरी अट सांगितली.

कूबर जरासा विचारात पडला. इतक्यात स्वर्णलता म्हणाली, "निहार देशचा राजपुत्र अत्यन्त नीच अन् दुष्ट आहे. त्याचं माझ्यावर प्रेम असून तो माझ्या बाबांना अशी धमकी देत असतो की मी त्याच्याशी विवाह केला नाही तर तो आमचं राज्य नेस्तनाबूत करील. तू निहार राजपुत्रात चांगले गुण प्रविष्ट करायचे-ही माझी तिसरी अट!"

हे ऐकून कूबर दचकलाच! त्याने विचारले, "म्हणजे याचा अर्थ असा की तू त्या चित्रसेनवर प्रेम करतेस. अशा परिस्थितीत मी जर तुझ्या तीनही अटी पाळल्या, तर काय तू माझ्याशी विवाह करशील?"

"आपल्या देशाच्या भल्यासाठी मी त्या दुष्ट निहार-राजकुमाराशी सुद्धा विवाहाला तयार नाही का झाले? मग जर तू ही सर्व चांगली कामं करून माझ्या देशाचं हित साधलंस, तर मी तुझ्याशी विवाह करायला नकार का बरं देईन?" स्वर्णलतेने कूबरच्या प्रश्नाला प्रतिप्रश्नानेच अुत्तर दिले.

"ठीक आहे. मी आता जातोय. मी परत येईपर्यन्त तुला दुसऱ्या कोणाशी लग्न करता येअू नये म्हणून ही माळ मी तुझ्या गळ्यात घालत आहे. मी सोडून दुसऱ्या कोणी तुला स्पर्श केला, तर या माळेचा साप बनून तो त्याला डसेल, त्याचा प्राण घेईल. माझ्याशिवाय ही माळ कोणी तुझ्या गळ्यातून काढूनही ठेवू शकणार नाही." असे म्हणत तान्त्रिकाने राजकन्या स्वर्णलता हिच्या गळ्यात एक मोत्यांची माळ घातली आणि तो निघून गेला.

कूबर प्रथम आपल्या अुपासना-मंदिरात गेला. त्याने मन्त्रोपासना करून आपल्या साऱ्या निम्न देवतांना आमंत्रित केले. ते प्रकट झाल्यावर त्याने त्यांना आपली इच्छा कथन केली. ती ऐकून देवता म्हणाल्या, "आजपर्यन्त आमच्याजवळ कोणीच अशा इच्छापूर्तीची मागणी केली नव्हती.



तुझ्यामुळे आम्हीही पुण्यात्मा बनू. आता आम्ही आमच्या साऱ्या शक्ति तुला प्रदान करत आहोत. परन्तु आपल्या या कार्यासाठी तुला प्रेमदेवीची आराधना करायला हवी. नंतरच आमच्या शक्तीमुळे तुझी ताकत वाढेल! जगातली अन्य कोणतीही शक्ति तुझ्यापुढे टिकाव धरू शकणार नाही. पण एक गोष्ट लक्षात ठेव, केवळ मानवावर विजय मिळवण्यासाठीच ही शक्ति अुपयुक्त होईल. मनावर विजय मिळवण्यासाठी प्रेमाचीच आवश्यकता आहे. तू जे काम सुरू करत आहेस त्याचा प्रेमाशी संबंध आहे, हे तुला माहीत आहे की नाही कुणास ठाअूक!"



कूबरने ताबडतोब प्रेमदेवीची आराधना सुरु केली. लवकरच प्रकट होऊन प्रेमदेवी म्हणाली, "प्रेमाशिवाय तुझी इच्छापूर्ति होणार नाही. पण तू तर परम नीच अन् स्वार्थी आहेस. तेंव्हा तुझ्या मनात प्रेम अंकुरायला पुष्कळ वेळ लागेल. तुझी कार्यसिद्धि होण्यासाठी माझा तुझ्यावर प्रभाव राहील. तुला हे मंजूर असेल तर बोल."

मोठ्या खुशीने तांत्रिक कूबरने संमति दर्शवली. तो प्रथम जनतेत जाऊन पोचला व सांगू लागला की आपणात काही दैवी अंश आहे. तो ज्या ज्या काही शक्ति दाखवू लागला, त्यामुळे लोक त्याच्याकडे आकर्षित झाले. थोड्याच दिवसात लोक त्याचे भक्त बनले.

कूबरने कित्येक चांगली कामे केली. कित्येकांचे असाध्य रोग त्याने नाहीसे केले, अंधांच्या डोळ्यांना प्रकाश दिला, गरीब लोकांना धन-दौलत दिली. कोरड्या पडलेल्या जमिनीत पाणी अुत्पन्न केले आणि अुत्तम पिके तयार करण्यात भरपूर योगदान दिले.

यानंतर कूबरने देवाचा प्रचार सुरू केला. सर्वांना त्यांच्या त्यांच्या धर्माप्रमाणे त्यांची त्यांची दैवते दाखवून तो सांगू लागला, "आपापल्या तर्काप्रमाणे भगवान कोणत्याही रूपात असला तरी तुम्ही सर्व एकमेकांचे भाईबंद आहात. आपसातला वैरभाव सोडून बंधुभावाने रहा. तुमच्यातलं वैर पाहून मला दुःख वाटतं, मला दुःख होईल असं काहीही यापुढे करत जाऊ नका."

हळूहळू जनमानसात फरक पडू लागला. कूबरच्या बोलण्याचा प्रभाव त्यांच्यावर दिसून येऊ लागला. अशा तऱ्हेने अवंती देशातले आपसातले वैर, द्वेष संपून लोक कूबरचे भक्त बनले आणि त्यांनी भ्रष्टाचार सोडून दिला. सर्व राजकर्मचारी कूबरच्या निकट येऊन आपली पापे धुवून टाकू लागले व नवे आयुष्य जगू लागले.

कूबर यानन्तर विविध राज्यांतून संचार करू लागला. तो जेथे जेथे पोचेल, तेथे तेथे लोक भक्ति व प्रेमाने आपली मस्तके त्याच्यासमोर नमवू लागले. अशा रीतीने निहार देशाचा परमदुष्ट युवराजही कूबरचा भक्त बनला व चांगल्या वागणुकीने त्याने आपल्यात सुधारणा घडवून आणली.

फारच थोड्या काळात अवंतीमधे असाध्य मानल्या गेलेल्या गोष्टी साध्य करून कूबर स्वर्णलतेकडे परत आला.

त्याच्या पायावर लोटांगण घालून स्वर्णलता म्हणाली, "तू केवळ तांत्रिकच नव्हेस, तर प्रत्यक्ष भगवानच आहेस. अशी असाध्य कामं साध्य करणं, हे माझ्या दृष्टीने तरी एका मानवाला अशक्य आहे. तू माझ्याशी विवाह केलास, तर ते मी आपलं अहोभाग्य मानीन."

तेंव्हा कूबर हसून गंभीर आवाजात बोलू लागला, "मी तुझ्याशी विवाह करण्यासाठी नव्हे, तर तुझ्या गळ्यातली ती मोत्यांची माळ काढून घेऊन तुला मुक्त करायला आलो आहे."

एकदम आश्चर्यात पडून स्वर्णलतेने विचारले, "म्हणजे काय? तुम्ही खरोखर माझ्यावर प्रेम नाही करत?"

अुत्तरादाखल कूबर म्हणाला, "मी तान्त्रिकाच्या रूपात होतो, तेंव्हा तुझ्याशी विवाह करायचा विचार माझ्या मनात नक्कीच होता. पण आता माझ्यात दैवी अंश जागृत झालेला आहे. त्यामुळे आता माझी ती इच्छा राहिली नाही. माझी एवढीच इच्छा आहे की तुझ्या प्रेमाला न्याय मिळावा.



तमच्या प्रेमी-प्रेमिकेच्या जोडीवर अन्याय होऊ नये. तू विदेहच्या राजकुमार चित्रसेनशी विवाह करून सुखात रहा."

इतके बोलून त्याने स्वर्णलतेच्या गळ्यात घातलेली ती मौक्तिकमाला काढून घेतली आणि प्रशान्त चेहऱ्याने तो तेथून निघून गेला.

आपली गोष्ट संपवून वेताळ म्हणाला, "हे राजा, कित्येक कष्ट करून, निम्नदेवतांना आपल्याला वश करून कूबरने सार्वभौम बनण्याचे स्वप्न पाहिले होते. आता ते स्वप्न साकार होण्याची वेळ निकट आलेली असताना, ऐन वेळी त्याने ती सुवर्णसंधी हातची का सोडली? स्वतःला 'देवांशवाला' म्हणवून घेणं हे त्याचे

अज्ञानच नव्हे काय? हा त्याचा अहंकार आहे न? किंवा स्वर्णलतेच्या अटी पूर्ण करण्याच्या भरात प्रेम-बंधुभाव वगैरे शब्द अुगाळून अुगाळून आपण एक तांत्रिक आहोत, ही गोष्ट तो विसरून तर नाही गेला? आणि अशा तऱ्हेने तो एक सर्वसामान्य माणसाच्या अवस्थेला पोचला असं तर नाही झालं? विक्रमराजा, या साऱ्या प्रश्नांची अुत्तरं माहीत असूनही तू तोंड अुघडलं नाहीस तर तुझं मस्तक फुटून जाईल."

राजा विक्रम अुत्तरादाखल बोलू लागला, "कूबरचं स्वार्थ व अधिकार यांवर प्रेम होतं, त्यामुळे त्याने ज्या देवतांची आराधना केली त्यांना निम्नदेवता म्हटलं गेलं. पण जेंव्हा त्याचं स्वर्णलतेवर प्रेम बसलं, तेंव्हा त्याचं अुपास्य दैवत प्रेमदेवी हे बनलं. त्यामुळे त्याच्याजवळ असलेल्या सर्व शक्ति या चांगल्या कामाला लागून दैवी शक्ती बनल्या. ही गोष्ट जाणूनच कूबर म्हणू लागला की आपण आता देवांशयुक्त झालो आहोत. यात अज्ञान वगैरे मुळीच नाही. कूबर आपल्या पहिल्या व दुसऱ्या अवस्थेतही चांगला शक्तिसंपन्नच होता, यात काही संशय नाही. तांत्रिक असताना तो क्षुद्रशक्तींची आराधना करत होता आणि समस्त भूमंडळाचा प्रभु बनू इच्छित होता. त्याच वेळी तो स्वर्णलतेकडे आकृष्ट झाला आणि तिच्या अटी पूर्ण करण्याकडे अग्रेसर झाला. या कामातच त्याचा स्वभाव पार बदलून गेला व तो खऱ्या सोन्याप्रमाणे चमकू लागला. त्यामुळेच त्याने स्वर्णलतेवर अन्याय होअू दिला नाही. तिच्याशी केलेला विवाहाचा प्रस्ताव त्याने मागे घेतला. तिला आपल्या प्रेमिकाशी विवाह करायचे स्वातंत्र्य दिले."

अशा तऱ्हेने अुत्तर देअून विक्रमराजा थांबताच, आता त्याचे मौन भंग झाले. म्हणून वेताळ त्या शवासह अदृश्य होअून पुन्हा त्याच झाडाकडे जाअून फांदीला लटकू लागला.

कल्पित



# चान्दोबा पुरवणी-४६




भारतातील पशुपक्षी

## काळे हरीण (काळवीट)

आपल्या देशात विशेषतः चार प्रकारची हरणे आढळतात. चिकारा, ब्लॅकबक, सांबर व नीलगाय नावाचे हरीण. ब्लॅकबक म्हणजे काळे हरीण व सांबर म्हणजे फाटे असलेल्या शिंगांचे हरीण. नीलगाय नावाच्या हरणाचा रंग निळसर असतो. या चारही प्रकारात 'ब्लॅक-बक' दिसायला फार सुंदर असते. 'अँटिलोप सर्व्हिओकाप्रा' जातीतला हा एकच प्रतिनिधि होय. संपूर्ण शरीरावर काळे व पांढरे चमकदार आकर्षक केस हेच त्याचे वैशिष्ट्य. याची पिळदार शिंगेही पाहणाराचे मन मोहून टाकतात. अुभे असताना यांची खांद्यापर्यंतची उंची ८० सें.मी. व वजन ४० किलो असते. त्यांची नजर चांगलीच तीक्ष्ण असते. परन्तु त्या मानाने हुंगणे व ऐकण्याची शक्ती कमी असते. एके काळी संपूर्ण भारत भर आढळणारी ही जात, आता फक्त गुजराथ, राजस्थान व पंजाब इतकीच सीमित झालेली आहे. भारतात दक्षिणेला मद्रासच्या "गिंडी नॅशनल पार्क" मधे ही काळी हरणे पहायला मिळतात. १९२४ मधे त्यावेळच्या मद्रासच्या गव्हर्नरने काळी हरणे प्रथम या पार्कमधे आणून सोडली होती. चतुष्पाद प्राण्यात सर्वात जलद गतीने धावणारी ही हरणे लांब झेपा घेत धावतात, तेंव्हा ते दृश्य मोठे मनोहर वाटते.

# गोष्टी सांगण्यात प्रवीण



मद्रासमधील एका प्रसिद्ध पत्रिकेने नुकतीच लहान मुलांची गोष्टी सांगण्याची स्पर्धा आयोजित केली. या स्पर्धेत जवळजवळ १०० मुलांनी भाग घेतला. त्यातली ५० मुले बरी निघाली; आणि त्यांच्यातलीही फक्त १३ मुलेच प्रवीण म्हणून निवडली गेली व त्यांना बक्षिसे दिली गेली. या बक्षिसपात्र मुलांत पाच वर्षांचा बालक दीपक श्रीनिवासनही सामिल आहे. इतकेच नव्हे, तर या स्पर्धेत भाग घेणारांच्यात दीपक हा एकटाच विकलांग 'स्पॅस्टिक्स चाइल्ड' होय. शरीरातील नाड्यांना पीळ पडण्याबद्दलच्या रोगाचे नाव आहे स्पॅस्टिक्स.

या रोगामुळे बोलायला काहीशी अडचण येत असूनही स्पर्धा चालू असताना दीपकने परीक्षकांना मोठ्या अुत्साहाने तेनालीराम व बीरबल यांच्या गोष्टी सांगितल्या. परीक्षक त्या ऐकून इतके खूष झाले की दीपकला विजेत्या बालकात एक स्थान मिळाले.

'स्पॅस्टिक्स सोसायटी ऑफ इंडिया'च्या वतीने मद्रासमधे चालवल्या जाणाऱ्या एका शिक्षण-केन्द्रात दीपक शिकत असतो; आणि असे कळते की, तेथील सर्व विद्यार्थ्यांत दीपक हाच एक खास विद्यार्थी मानला जातो. शाळेत कधीही त्याच्या चेहऱ्यावर चिडचीड किंवा दुःख दिसून येत नाही; तो नेहमी हसतमुखच असतो. घरात टी. व्ही. पहाणे व विशेषतः फिल्मी संगीत ऐकणे या त्याच्या खास आवडी आहेत. प्रत्येक आठवड्यात टी.व्ही. वर येणारा कार्यक्रम 'वर्ल्ड धिस वीक' तो मनापासून पहातो. इतकेच नव्हे, तर त्याची आठवण इतकी पक्की आहे की, एक महिन्यानंतरही कधी विचारले तर तो त्या बातम्या एका पाठोपाठ एक अशा घडाघड सांगत सुटतो!

हा बालक केवळ पाचच वर्षांचा असला तरी आपल्या घरी येणाऱ्या कौटुंबिक मित्र व पाहुण्यांची नावे, पत्ते व त्यांचे फोन नंबर वगैरे लक्षात ठेवून, केंव्हाही विचारले तर अगदी बिनचूक सांगतो. या मुलाला क्रिकेट, टेनिस व फुटबॉल हे खेळ विशेष आवडतात. कपिलदेव हा त्याचा खास आवडता खेळाडू.

खूपच हुशार दिसणारा हा मुलगा इतका भाग्यवान नाही, की आपल्या हाताने काही लिहू शकेल! ते शक्य झाले असते, तर कदाचित दीपकने चांगल्या चांगल्या गोष्टी लिहून खूप नाव मिळवले असते.

# तुम्हाला माहीत आहे काय?

१. सर्वात पहिलं 'साहित्य संमेलन' कोठे भरले होते?
२. रामायणाची रचना हिन्दीत प्रथम कोणी केली?
३. कलकत्त्याच्या 'बोटॅनिकल गार्डन्स' चे वैशिष्ट्य काय?
४. एका पर्शियन ग्रन्थात असा अुल्लेख आहे की-एक पिता-पुत्र लढण्यासाठी एकमेकांसमोर अुभे ठाकले आणि आपले नाते काय आहे हे समजण्यापूर्वीच एकमेकावर हल्ला करून दोघे मरणही गेले. हे दोघे कोण?
५. आपल्या नवव्या लोकसभा-निवडणुकीची एक खास गोष्ट आहे. ती कोणती?
६. जवाहरलाल नेहरुंनी किती वेळा कॉंग्रेसचे अध्यक्षपद भूषविले?
७. इंग्रजीत एकूण २६ अक्षरे आहेत. युरोपातील आणखी दोन भाषांच्या बाबतीतही तसेच आहे. त्या भाषा कोणत्या?
८. सिंहलमधील एका वीराने भारतात येअून रामनाडच्या चोल राजांना हरवून पांड्य राजाला सिंहासनावर बसवले होते. तो वीर कोण?
९. दिल्लीच्या एका सुलतानाचे 'पोलो' खेळताखेळताच देहावसान झाले. तो सुलतान कोण?
१०. राणा रणजितसिंहाचे ज्या घोड्यावर अतिशय प्रेम होते, त्या घोड्याचे नाव काय?
११. गंगा व यमुने बरोबरच आणखी तीन पवित्र नद्यांचा कुंभमेळ्याशी संबंध आहे. त्या नद्यांची नावे कोणती?
१२. शिखांच्या दोन गुरुंचे जन्मोत्सव मोठ्या धुमधडाक्याने साजरे केले जातात. ते गुरू कोण?
१३. 'बुल फाईट' मधे मेटॅडोर जेंव्हा विजयी होतो, तेंव्हा त्याला कोणते बक्षिस दिले जाते?
१४. बंगलोरच्या शाश्वती म्युझिअमचे वैशिष्ट्य काय?
१५. भारताचा सर्वप्रथम 'आर्चबिशप' कोण होता?

## अुत्तरे

१. मदुरा-तमिळ संघ.
२. तुलसीदास-रामचरितमानस.
३. आशियातील सर्वात मोठे.
४. पोहराब-रुस्तुम.
५. मतदानाकरता आवश्यक वय १८ हे कमी केले गेले आणि हंग पार्लमेण्ट बनले, कारण कोणत्याही पार्टीला बहुमत मिळाले नाही..
६. सात वेळा.
७. जर्मन व डच.
८. परक्रामा बाहु.
९. कुतुबुद्दीन ऐबक.
१०. लैली.
११. नर्मदा, कावेरी व गोदावरी.
१२. गुरुनानक व गुरु गोविंदसिंह.
१३. बैलाचे दोन कान व शेपूट.
१४. स्त्रियांबद्दलचे भारतातले पहिले म्युझियम.
१५. बिशप जुआन डी अल्बुकर्क

# 'चांदोबा'च्या बातम्या

### पोस्ट तिकिटाच्या किंमतीचा अुच्चांक

फारच दुर्मिळ अशा पोस्ट-तिकिटांची किंमतही खूप अधिक असते. इंग्लंडच्या सम्राट सातव्या एडवर्डच्या डोक्याचे चित्र असणारे १९०४ मधले एक तिकीट ५६,००० अमेरिकन डॉलर्सना नुकतेच विकले गेले. विसाव्या शतकातले हे सर्वात अधिक मूल्य असलेले तिकीट स्वित्झर्लंडच्या एका तिकिटप्रेमी व्यक्तीने खरीदले.





### दीर्घकाळ टिकणारा बल्ब

अनेक वर्षांच्या संशोधनानंतर कॅलिफोर्नियाच्या एका कंपनीने २०,००० तास जळू शकेल असा विजेचा बल्ब तयार केला. 'इलेक्ट्रॉनिक लाइट' किंवा 'ई-लैम्प' या नावाने ओळखला जाणारा हा बल्ब रोज तीन तास याप्रमाणे जळत ठेवला, तर तो १८ वर्षे काम देअू शकेल, असे मानले जाते.

### सुएझ कॅनॉल

भूमध्य व तांबडा समुद्र यांना जोडणाऱ्या 'सुएझ कॅनॉल'ची खोली १८ मीटर इतकी आहे. आता ती खोली वाढवून २२ मीटर, इतकी करण्याचे काम चालू आहे. हे काम पूर्ण होईल तेव्हा आणखीही काही जहाजे आफ्रिकेच्या किनाऱ्याला वळसा न घालता सरळ जाअू शकतील. या आधुनिकीकरणामुळे जगातील कमीत कमी १० टक्के नौकांना फायदा मिळेल असे वाटते.






# मनाचे औदार्य

रतनपुरला सुदर्शन नावाचा युवक नव्यानेच आला होता. येथे त्याला अध्यापकाची नोकरी मिळाली होती. गावच्या लोकांबद्दल किंवा गावाबद्दलही त्याला अजिबात काही माहिती नव्हती. तो सरळ गावच्या जमीनदाराकडे गेला व त्याने स्वतःचा परिचय सांगितला. जमीनदाराने सुदर्शनला घराची सर्व व्यवस्था करून दिली.

सुदर्शनला गावात येअून एक आठवडा लोटला अन् गणेशअुत्सव जवळ आला. सणाच्या आधीच्या दिवशी आकाश काळ्या मेघांनी व्यापून गेले आणि मुसळधार पाअूस पडला.

रस्त्याच्या कडेला गणेशमूर्ति आणि फुले-पत्री वगैरे विकायला बसलेले विक्रेते ग्राहकांची वाट पहात होते.

गणेश-पूजेसाठी सामान घ्यायला सुदर्शनही घराबाहेर आला. एका ठिकाणी खुद्द जमीनदारच हातात छत्री घेअून फले-फुले विकणारांशी घासाघीस करत होता. ते दृश्य पाहून सुदर्शनला खूपच आश्चर्य वाटले. माल स्वस्तात खरीदायचा प्रयत्न या जमीनदारासारखा माणूस का करत आहे, हे त्याला अुमगेना. त्याला जमीनदाराबद्दल एक प्रकारची घृणा वाटू लागली. एक जमीनदार असूनही बिचाऱ्या गरीब विक्रेत्यांच्या पोटावर तो मारत असल्यासारखे सुदर्शनला वाटले.

अशा प्रकारे स्वस्तात सौदा करून जमीनदाराने तिथल्या जवळजवळ साऱ्याच विक्रेत्यांजवळचा सगळा माल खरेदी केला.



इतकी सगळी फळे-फुले अन् पत्री घेऊन जमीनदार त्याचे काय करणार आहे, हेही सुदर्शनला समजेना.

इतक्यात सुदर्शन बरोबर काम करणारा आणखी एक अध्यापक तेथे खरेदीसाठी आला. आपण पाहिलेला प्रकार सुदर्शनने त्याला सांगून म्हटले, "असं वाटतंय की, जमीनदाराला भिऊन या गरीब लोकांनी आपला माल त्याला खूप स्वस्तात देऊन टाकलाय! लोकांशी अशी वर्तणूक करणारा हा जमीनदार बराच निर्दय वाटतोय. हे बिचारे पोटासाठी इथे थंडीत कुडकुडताहेत अन् जमीनदार त्यांच्या पोटावर असा पाय आणतोय हे मला तर फार नीचपणाचं वाटतंय. माणुसकी सोडून, स्वस्तात सौदा करत असताना मी त्याला आपल्या डोळ्यांनी पाहिलं आत्ता!"

सुदर्शनच्या या बोलण्याने त्या अध्यापकाला दुःख वाटले. सुदर्शनला आणखी काही बोलू न देता तो तावडतोब म्हणाला, "तुम्ही उगीचच असे जमीनदारांबाबत अपमानकारक बोलू नका. ते आम्हा सर्वांना देवतुल्य वाटतात हे तुम्हाला बहुतेक माहीत नसावं!"

"असं? देव असा असतो, हे मला माहीतच नव्हतं!" सुदर्शन अवहेलना करत त्या सहअध्यापकाला कुत्सितपणे म्हणाला.

तो अध्यापक यावर काही बोलू इच्छित असूनही बोलला नाही. तो सुदर्शनला इतकेच म्हणाला, "चला! एकदा तुम्ही आत्ता माझ्याबरोबर जमीनदारांकडे चलाच!" असे म्हणून तो अध्यापक पुढे व सुदर्शन त्याच्या मागे मागे असे चालू लागले.

ते जेंव्हा तेथे पोचले, तेंव्हा एका उंचशा चबुतऱ्यावर जमीनदार ती सर्व सामग्री नोकरांकरवी मांडून घेत होते. त्याने सुदर्शन व बरोबरच्या अध्यापकाकडे पाहून आनन्दाने म्हटले, "ओहो! आज सणाला अचानकच पाहुणे आले की! भिजलेले दिसताय बरेच." असे म्हणून त्याने लगेच नोकरांकडून नवी वस्त्रे घरातून



मागवून दोघा अध्यापकांच्या हाती देत म्हटले, "हे, हे घ्या. अगोदर पंचाने आपली डोकी कोरडी करून हे कपडे घाला बरं त्या खोलीत जाऊन."

जमीनदाराची वागणूक पाहून सुदर्शन बावचळल्यासारखा झाला. त्या अध्यापकाबरोबर खोलीत जाऊन त्याने नवे कपडे घातले. जेंव्हा ते खोलीबाहेर आले तेंव्हा जमीनदाराने त्यांना गरम गरम दूध प्यायला दिले.

जमीनदाराच्या औदार्याबद्दल सुदर्शनला आश्चर्य वाटत होते. त्याने जमीनदाराला म्हटले, "हे पहा महाराज, गैरसमज करून घेणार नसाल तर एक छोटी शंका विचारायचीय तुम्हाला."

"मी कशाला गैरसमज करून घेईन? विचारा ना, काय विचारायचंय ते. मनात काही लपवायची गरज नाही." जमीनदार म्हणाला.

आता फळे-फुले अन् पूजा-पत्री विकणारांबरोबर जमीनदाराने केलेल्या घासाघिशीचा उल्लेख करून सुदर्शन म्हणाला, "त्या बिचाऱ्या लोकांशी भावाबद्दल बराच वेळ घासाघीस करणारे जमीनदार अन् आत्ता माझ्यासमोर उभे असणारे जमीनदार, हे दोन्ही एकच का?-हीच माझी शंका. माझ्या स्पष्ट बोलण्याबद्दल माफी असावी हं!"



आता मात्र जमीनदार गडगडून हसला अन् म्हणाला, "अडचणीच्या वेळी एका माणसाने दुसऱ्याला मदत करावी, हे मान्य आहे ना तुम्हाला?"

"हे काय बोलता तुम्ही? आपण केलंत ते काय त्यांच्या अडचणीत मदत करणं झालं?" सुदर्शनने आश्चर्य दर्शवीत विचारले.

"मग, तुम्हाला काय वाटतं? या पावसात इतक्या कष्टाने आणलेल्या फळा-फुलांची अन् पत्री वगैरे साहित्याची विक्री कुठे झाली असती? म्हणूनच त्यांच्याजवळचं बरंचसं साहित्य मीच विकत घेतलं. अन् आता माझा विचार आहे की, हे सर्व आसपासच्या

घरांतून वाटून टाकावं." जमीनदार म्हणाला.

"आहो, यावरून असं कळून चुकतं, की तुम्ही चांगलेच उदार आहात. मग आपण लहान लहान मुलांशी सुद्धा खरेदी करताना स्वस्तात खरेदी करण्याचा आटापिटा का बरं केलात! या सर्वांची काय जरूर होती? जरूर तर थोडी रक्कम अशीच देऊन तुम्ही त्यांना मदत करू शकला असतात नं?" सुदर्शनने विचारले.

यावर नकारात्मक डोके हलवीत जमीनदार म्हणाला, "मी असे पैसे वगैरे देऊन त्यांना कधीच बिघडवणार नाही. तुम्ही या गावात नवे आला आहात, म्हणून त्यांच्या बाबतीत तुम्हाला सविस्तर सांगणं हे मी आपलं कर्तव्य समजतो. गणेशचतुर्थीच्या वेळी इथे या गावात थोडाफार पाऊस पडणं, ही दरवर्षीचीच गोष्ट आहे. तरीही इथले पूजासामग्री विकणारे समजत असतात की-यंदा पावसामुळे विक्री बरोबर होत नाहीय, अन् निदान जमीनदार तरी थोडीफार खरेदी करून आपल्याला मदत करील. त्यांमुळे ज्या वर्षी असा खूप पाऊस होतो, त्यावर्षी जेंव्हा यांचा माल विकलाच जात नाही, तेंव्हा मीच अगीच खरेदीच्या मिषाने त्यांच्याकडचा हा माल घेतो. असं न करता त्यांना नुसतेच पैसे दिले, तर ते आळशी बनतील. माझ्या मते, माणसाला आळशी बनायला प्रोत्साहन देण्यासारखं दुसरं मोठं पाप या जगात नाही. तुम्ही दोघं शिक्षक आहात, माझ्या म्हणण्याचा तुम्हीच नीट विचार करा."

आता मात्र सुदर्शनच्या डोक्यात प्रकाश पडला! जमीनदाराच्या वागण्यातला मूळ मुद्दा त्याला कळून चुकला. त्याने ताबडतोब हात जोडून जमीनदाराला नमस्कार केला. त्याला जणू सर्वांसमक्ष जमीनदाराच्या औदार्याची तारीफ करायची होती.





# चोर भक्त

रहीम नावाच्या एका धनवान माणसाला रजिया नावाची एकुलती एक मुलगी होती. दिसायला ती फारच सुंदर होती. रहीमची इस्टेट अफाट होती.

रहीमचा 'अल्ला' वर फार विश्वास होता. तो एक महान भक्त होता. आपल्याजवळचे सारे अल्लाचेच आहे, अशी त्याची धारणा असे.

रजिया चन्द्रकलेप्रमाणे वाढून मोठी झाली. ती उपवर झाल्याबरोबर मोठ-मोठ्या घराण्यातले श्रीमन्त युवक अहमहमिकेने तिला मागणी घालायला येऊ लागले. परन्तु रहीमला त्यातला कोणीच पसन्त पडेना, कारण त्यातला एकही तरूण देवभक्त नव्हता.

एके रात्री रहीमची बायको सुलताना त्याला म्हणू लागली, "हे पहा, आपल्या लेकीसाठी असंख्य उत्तम स्थळं सांगून येत आहेत. त्यांच्यातले कित्येक खूप धनवानही आहेत. पण तुम्हाला का कुणास ठाऊक, एकही स्थळ पसन्त पडत नाहीये!"

बोलता बोलता दुःखाने सुलतानाचा गळा भरून आला. रहीम ही गोष्ट जाणून होता की सुलतानाला खरोखरच फार चिन्ता लागून राहिली आहे. तिचे सान्त्वन करत तो म्हणाला, "अग वेडे! आपल्याला अल्लाने दिलेला पैसा अन् मानमरातब काही कमी नाहीय. त्यामुळे आपला जावई पैसेवालाच असायला हवा, अशी काही आवश्यकता नाही. मी योग्य अशा नवरदेवाच्या शोधात आहे. अल्लाची इच्छा असेल तर रजिया लवकरच एक घरवाली होईल; तू मुळीच चिन्ता करू नकोस."

त्या रात्री नासिर नावाचा एक चोर चोरी करण्यासाठी रहीमच्या घरात

(अरबमधील लोककथा)



घुसला.मियाबिबीचे हे बोलणे त्याने लपून ऐकले अन् त्याच्या मनात एका अजब कल्पनेने घर केले!

दुसऱ्या दिवशी भल्या पहाटे रहीम जेंव्हा नमाज पढायला निघाला, तेंव्हा त्याच्या अगोदरच नासिर त्या मशिदीत पोचला, आणि मोडक्या-तोडक्या का होईना; पण मोठ्या आवाजात नमाज पढू लागला. ते पाहून रहीमने एकदा त्याला विचारले, ''कोण आहेस बेटा तू? कुठल्या गावचा तू?''

नासिर अुत्तरला, ''मी एक कमनशिबी प्राणी आहे, मला ना आई, ना बाप! आपलं म्हणावं असं घरदारही नाही मला!''

''मग जेवायला कसं मिळतं तुला? तुझ्या तहान-भुकेची व्यवस्था काय?'' रहीमने सहानुभूतीने विचारले.

''अल्लाचं नाव घेत असताना मला तहान-भुकेचं काही भानच नसतं. रात्री अुशिरानं कधी भूक लागलीच, तरी काळजीचं काही कारण नसतं.'' चोराने खोटेच सांगून टाकले.

तसे पाहिले तर, अलिकडे नासिर आपला जास्तीत जास्त वेळ मशिदीतच घालवत असे. अन् ते माहीत असलेले भक्त लोक नासिरला खाण्यासाठी काही ना काही पाठवत असतच.

चोराचे सारे बोलणे रहीमला अगदी खरेच वाटले. 'खरी भक्ती तर हीच!' असे वाटले त्याला. लगेच त्याच्या मनात विचार आला-अरे! इतक्या लहान वयात एवढी भक्ती? मुलगा तर सुन्दर अन् प्रामाणिक दिसतोय! चला, आपल्या शोधाचं फळ मिळालं आपल्याला! आपल्या पोरीला हाच योग्य वर आहे. याच्याशीच रजियाचा निकाह लावून द्यावा!

त्या दिवसापासून रहीम दररोज नासिरसाठी आपल्या घरून अुत्तम असे जेवण पाठवू लागला.

असेच चाळीस दिवस निघून गेले. तोपर्यन्त हा चोर खरोखरच अल्लाच्या भक्तीत बुडून गेला. कायम मशिदीत रहाण्याचाही परिणाम असेल; पण तो रहीमकडून आलेले अन्न खाअून सारा वेळ अल्लाची प्रार्थना करी, अन् नमाज पढे. वडिलधाऱ्या भक्तांचे बोलणे सारखेच त्याच्या कानी पडत असे आणि सगळाच वेळ सत्संगात व्यतीत होई. त्यामुळे चोराच्या मनात परिवर्तन घडले.

एके दिवशी रहीम नासिरला म्हणाला, ''बेटा, जेंव्हा जेंव्हा तू माझ्या दृष्टीस पडतोस, तेंव्हा तेंव्हा माझं मन आनन्दानं भरून जातं बघ! तुझ्यासारख्या भक्ताचीच वाट पहात होतो मी! तू माझ्या मुलीशी निकाह कर; फार संतोष वाटेल मला.''

हे ऐकताच नासिरने रहीमच्या पायांवर लोटांगण घालून म्हटले, ''क्षमा करा मला! मी खरं म्हणजे एक चोर आहे, चोरी करायला एक दिवस तुमच्याच घरात घुसलो होतो मी! तुम्हा नवराबायकोंचं आपसातलं बोलणं ऐकून 'आपण तुमच्या मुलीशी निकाह करून सारी संपत्ती बळकावावी' असा विचार मनात आला माझ्या! आपलं मन वेधून घेण्यासाठी 'बगुला-भगत' बनलो मी! पण गेल्या चाळीस दिवसात माझं मन खरोखरच पालटून गेलं, अन् आपल्या साऱ्या नीच कृत्यांचा पश्चात्ताप वाटायला लागला मला! इथून पुढे चोऱ्या करणं बन्द करून, खूप मेहनत करून जगायचा विचार आहे माझा! तुमच्या मुलीच्या योग्य नव्हे मी! दुसऱ्या कुणाशी निकाह करून द्या तिचा! तुम्हाला फसवल्याबद्दल योग्य वाटेल ती शिक्षा द्या मला. आनन्दाने भोगेन मी!''

नासिरचे हे बोलणे ऐकून प्रथम तर रहीम एकदम चकितच झाला! पण नंतर पुन्हा भानावर येअून तो म्हणाला, ''वेड्या, अज्ञानामुळे ज्या चुका तू केल्यास, त्या तर आता तुझ्या पश्चात्तापाने धुवून गेल्या. आता तू धुवून काढलेला स्वच्छ मोती आहेस. अल्लानं खरंच माझ्या मुलीसाठीच तुला इथं पाठवलंय. आता तूच माझा जावई आहेस.''

नासिर व रझिया यांची शादी झाली अन् नासिर 'सासऱ्यायोग्य जावई' म्हणून प्रसिद्ध झाला.



# व्यवहारकुशल

विशालपूर गावच्या चौकात प्रमोद नावाच्या एका व्यक्तीने पादत्राणांचे दुकान उघडले. चपला घेण्यासाठी बरीच गिऱ्हाइके तेथे येत, पण एकही जोडी पसन्त न पडल्याने काही खरेदी न करताच परत जात. यामुळे प्रमोद फारच काळजीत पडला. व्यापार चालावा यासाठी काय करावे याचाच तो सदैव विचार करू लागला.

एक दिवशी प्रमोदच्या दुकानात एक गिऱ्हाईक आले. त्या माणसाने एक जोड पसंतही केला. पण त्याने जेंव्हा चप्पल पायात घालून पाहिली, तेंव्हा त्याला ती काहीशी घट्ट वाटली. हे कारण सांगून तो माणूस जेंव्हा दुकानातून तसाच बाहेर पडू लागला, तेंव्हा त्याला थांबवत प्रमोद म्हणाला, "अजून नव्याच आहेत नं चपला, म्हणून त्या अशा घट्ट वाटतायत. पायात घालून चालत राहिलात की एक दोन दिवसातच आपल्या पावलांबरोबर, बेताच्या सैल होऊन जातील त्या! आत्ताच बरोबर मापाच्या घेतल्यात, तर नंतर सैल नाही का पडायच्या त्या?"

हे ऐकून गिऱ्हाइकाने होकारात्मक डोके हलवले, अन् चप्पल खरीदून तो निघून गेला.

दुसऱ्या दिवशी आणखी एका गिऱ्हाइकाने आपल्या मुलासाठी एक जोड पसन्त केला. पण त्या घालून पाहिल्यावर तो माणूस म्हणाला, "या तर बऱ्याच सैल वाटतात! मला नकोत या चपला." यावर प्रमोद म्हणाला "असं पहा, तुमच्या मुलाचा पाय अजून वाढत राहील ना? तेंव्हा जरा वाढत्या मापाच्या चपलाच बऱ्या. आत्ता बरोबर मापाच्या घेतल्यात, तर लवकरच घट्ट व्हायला लागतील न त्याला?"

"हो, हो! बरोबर आहे तुमचं म्हणणं. मी याचा विचारच नव्हता केला!" असे म्हणून त्याही गिऱ्हाइकाने चपला खरेदी केल्या.

व्यवहारकुशलतेचे काय मूल्य असते, हे आता प्रमोदने बरोबर ओळखले. जो माणूस व्यवहारकुशल नसेल, तोंडदेखलं गोड बोलू शकत नसेल, त्याचे व्यापारात कधीही नीट बस्तान बसणार नाही.





# वीर हनुमान

हजारो वानर कुंभकर्णावर तुटून पडले. त्या पर्वतप्राय राक्षसाला त्यांनी ओरबाडलं, त्याचे चावे घेतले, त्याला गुद्दे घातले. पण कुंभकर्ण जरा ही विचलित झाला नाही. तो वानरांचा नाश करीत सुटला. कुंभकर्णाला आवरणं वानरांना शक्य नाही हे सिद्ध झालं.

कुंभकर्णाने सुग्रीवावर आपला भाला फेकला. हनुमानाने मधेच तो पकडला नि मोडून टाकला. हे पाहून वानरांना फार आनंद झाला व आनंदाने ते नाचू लागले. तेव्हा कुंभकर्णाने एका पर्वताचे शिखर उचलले व सुग्रीवाच्या रोखाने फेकले. यामुळे सुग्रीव मूर्च्छित झाला. सुग्रीवाला घेऊन कुंभकर्ण लंकेत परत आला.

हे सर्व पाहून हनुमानाला मात्र मुळीच भीति वाटली नाही. सुग्रीव मूर्च्छितावस्थेतून बाहेर आला की तो स्वतः आपले रक्षण करील याबद्दल त्याला खात्री होती.

हनुमानाच्या अंदाजाप्रमाणेच घडलं, सुग्रीव शुद्धीवर आला तेव्हा त्याच्या लक्षात आलं की आपण कुंभकर्णाच्या हातावर आहोत. त्याला समोर लंकेतील रस्ते दिसू लागले. त्याने लगेच कुंभकर्णाचे नाक व कान कापून टाकले. कुंभकर्णाच्या नाकातून व कानातून रक्ताच्या चिळकांड्या उडाल्या आणि त्याने लगेच

**२७. राम-लक्ष्मण मूर्च्छित**



सुग्रीवाला जमिनीवर आपटलं. कुंभकर्ण त्याला आपल्या पायाखाली तुडवू लागला. परंतु सुग्रीव त्यामुळे घायाळ झाला नाही. तो तत्काळ आकाशात उडाला नि रामाजवळ जाऊन पोचला.

कुंभकर्ण रामाशी लढाई करण्यासाठी पुढे सरसावला.

राम त्याला म्हणाला-''कुंभकर्णा, तू इन्द्राचा पराभव केला असशील, पण मी इन्द्र नाही हे लक्षात ठेव.''

''हे रामा, मी विराध, वाली वा मारीच नाही. मी आहे कुंभकर्ण! तू आपला पराक्रम दाखवच, नंतर मी तुला आपले भक्ष्य बनवीन.'' कुंभकर्ण रामाला म्हणाला.

मग रामाने आपले वायव्यास्त्र काढले. या अस्त्रामुळे कुंभकर्णाचा हात गदेसह तुटून खाली पडला.

तो जोरात ओरडू लागला. दुसऱ्या हाताने एक मोठे झाड उखडून तो रामाशी युद्ध करायला सरसावला. तेव्हा रामाने इंद्रास्त्र फेकून कुंभकर्णाचा दुसरा हात ही छाटून टाकला. तरी ही कुंभकर्ण रामाशी लढण्यासाठी पुढे येण्याचा प्रयत्न करू लागला. म्हणून रामाने कुंभकर्णाचे पाय-च कापून टाकले. शेवटी रामाने कुंभकर्णाचं डोकं ही उडवलं.

कुंभकर्णाच्या मृत्यूमुळे राक्षस ओक्साबोक्षी रडू लागले, रामाला पाहताच ते थर थर कापू लागले. रामाचे नाव ऐकताच ते घाबरून जाऊ लागले. रामाच्या अवती-भवती बसून वानर त्याची पूजा करू लागले.

राक्षसांनी रावणाला खबर दिली की रामाने कुंभकर्णाला ठार मारले आहे. ही वार्ता ऐकून रावण मूर्च्छित झाला. त्याचे मुलगे देवांतक, नरांतक, त्रिशर आणि अतिकाय मोठमोठ्याने रडू लागले. तसेच कुंभकर्णाचे धाकटे भाऊ महोदर नि महापार्श्व पण अतिशय दुःखाने रडू लागले.

रावण शुद्धीवर आला तेव्हा त्याला वाटले की आता लंका वानरांच्या ताब्यात जाणार! तो खूपच घाबरला होता आणि आता आपले सर्व राजभोग संपले असं त्याला वाटलं. राज्याच्या बाबतीत आपले कर्तव्य संपले असं त्याच्या मनाने घेतलं. सीतेला प्राप्त करण्याची आशा आता सोडलीच पाहिजे. आपल्या छोट्या भावाचा वध करणाऱ्या रामाचा सूड उगवण्याचा त्याने विचार केला. जर रामाला आपण मारू न शकलो तर आपले प्राण गेलेले बरे असं रावणाला वाटलं. आता पहिल्या प्रथम रावणाच्या मनात आलं की विभीषणाचा उपदेश न ऐकण्यात आपण फार मोठी चूक केलेली आहे. आपण जे काही केले त्याबद्दल त्याला पश्चात्ताप होऊ लागला.

रावणाचे दुःख पाहून त्रिशर म्हणाला-''तू तिन्ही लोकांना पराभूत करू शकतोस, असं अधीर होण्याचं काय कारण आहे? मला युद्ध-भूमीवर पाठव. मी रामाला मारून परत येतो.''

हे ऐकून देवांतक, नरांतक व अतिकाय यांनी पण युद्ध-भूमीवर जाण्याची आपली उत्सुकता प्रकट केली. त्यांचे धैर्य पाहून रावण प्रसन्न झाला. आणि त्याने आपल्या पुत्रांना रामाशी लढायला पाठवले.

मग राक्षस नि वानर यांच्यात युद्ध जुंपले. राक्षसवीर नरांतक वानरांचा



समाचार घेऊ लागला. हे पाहून सुग्रीव अंगदाला म्हणाला-''तू आता या नरांतकाला आपला पराक्रम दाखव. त्याला मृत्यूची वाटच दाखव.'' तेव्हा अंगद नरांतकाशी भिडला, थोडा वेळ त्याच्याशी लढला नि शेवटी त्याने नरांतकाला यम-सदनी रवाना केले.

हे पाहून त्रिशर, महोदर आणि देवांतक अंगदावर चालून गेले. अंगद साहसपूर्वक तीन राक्षसांशी लढू लागला. हनुमानाने हे पाहिलं आणि एकच गुद्दा घालून त्याने देवांतकाला ठार मारलं, त्याचप्रमाणे नील अंगदाच्या मदतीसाठी धाऊन आला व त्याने महोदराला मारून टाकलं.



ऋषभाने महापार्श्वशी जोरदार युद्ध केले आणि शेवटी त्याचा वध केला. अशा रीतीने अनेक महावीरांचा वध झालेला पाहून राक्षसांनी आपल्या हातातील शस्त्रे टाकली व ते पळून जाऊ लागले.

युद्धात कामी आलेल्या राक्षस-वीरांबाबतची वार्ता कानी आल्यावर अतिकाय रणांगणावर आला. एकाद्या छोट्या पर्वतासारखा अतिकाय पाहून रामाने विभीषणाला विचारले-''हा नवा महाकाय राक्षस कोण?''

विभीषण म्हणाला-''रावणाला राणी धान्यमालिनी पासून झालेला हा मुलगा अतिकाय. हा रावणासारखाच महापराक्रमी आहे. ब्रह्मदेवाला खुश करून याने एक वर मिळविला आहे- देव अथवा राक्षस यांच्याकडून याला मृत्यु येणार नाही. याने जे कवच परिधान केले आहे आणि ज्या रथावर हा आरूढ झाला आहे, तो खुद्द ब्रह्मदेवाने याला दिलेला आहे. यांच्या साहाय्याने याने अनेक वेळा देव व दानवांना पराभूत करून राक्षसांचं संरक्षण केले आहे. याला जर लवकर मारून टाकलं नाही, तर आपल्या वानर-सेनेचा हा नाश करून टाकू शकेल!''

दरम्यान वानर-सेनेशी लढण्यासाठी आलेल्या अतिकायचा कुमुद, द्विविद, मैंद, नील व शरभ या वानर-वीरांनी सामना केला. पण ते अतिकायच्या केसाला ही धक्का लावू शकले नाहीत. अतिकायच्या बाणांनी मात्र बिचारे घायाळ झाले.

जे आपल्याशी लढत नाहीत त्यांची काळजी करण्याचे अतिकायला कारण नव्हते. तो थेट रामापाशी आला आणि विचारलं-''भ्याडासारखे पळून जाणारे आहेत, त्यांच्याशी लढण्याची माझी इच्छा नाही. असा कोण वीर आहे, ज्याला माझ्याशी युद्ध करायचंय?''

या बोलण्याचा लक्ष्मणाला अतिशय राग आला. अतिकायला सामोरे जाऊन





त्याने आपल्या धनुष्याचा टणत्कार केला. त्याला पाहून अतिकाय म्हणाला-''लक्ष्मणा, तू अजून लहान आहेस! शेवटी तुझा पराक्रम तो किती? मोठा आला माझ्याशी लढायला? व्यर्थ मरणाची इच्छा का करीत आहेस? माझं म्हणणं ऐकशील तर बाजूला हो. नसते दुःसाहस करू नकोस.''

''जर आपला पराक्रमच दाखवायचा असेल तर ही नुसती बडबड कशासाठी? करूनच दाखव की! आपल्या तोंडाने आपली स्तुति करीत बसण्यापेक्षा, चल, आपला पराक्रमच दाखव मला!'' लक्ष्मणाने त्याला ललकारलं.

धनुष्य-बाण हाती घेऊन दोघांनी युद्ध सुरू केलं. लक्ष्मणाची बाण सोडण्याची कला पाहून अतिकायच्या मनात त्याच्याविषयी आदराची भावना निर्माण झाली. तो मोठ्या उत्साहाने लक्ष्मणाशी लढू लागला. दोघांनी एकमेकांवर दिव्यास्त्रे फेंकली. अतिकायच्या बाणांनी लक्ष्मण संत्रस्त होत होता. पण लक्ष्मणाच्या बाणांनी मात्र अतिकाय वर काही ही परिणाम झाला नाही. कारण अतिकायने चांगले मजबूत कवच परिधान केलेले होते. आता लक्ष्मणाने अतिकायवर ब्रह्मास्त्र टाकले. त्याला कुचकामी करण्याचा अतिकायने प्रयत्न केला. पण त्याचा काही उपयोग झाला नाही. ब्रह्मास्त्राने अतिकायचे शिर धडापासून उडविले.

अतिकायच्या मृत्यू मुळे राक्षसांना अत्यंत दुःख झाले. रावणाला जेव्हा ही वार्ता समजली तेव्हा त्याला मोठे आश्चर्य वाटले. कारण महान राक्षसवीर एकामागून एक राम-लक्ष्मणाकडून मारले जात होते. त्याला आता कळले की आपण वानरांच्या शक्तीचा बरोबर अंदाज केला नाही. याबाबत आपण चुकलोच!

आपले वडील दुःखी झालेले पाहून इंद्रजित म्हणाला-''मी जोपर्यंत जिवंत



आहे. तोपर्यंत आपणास दुःख करण्याचे कारण नाही. मी मारलेल्या बाणांपासून कोणी ही आपला बचाव करू शकणार नाही. मी जाऊन या राम-लक्ष्मणाचे प्राण घेतो. हा मी चाललो युद्ध-भूमीवर. आपण काळजी करू नका.

पित्याची परवानगी घेऊन उत्तमोत्तम गर्दभ जुंपलेल्या रथावर स्वार होऊन इंद्रजित रणांगणाकडे निघाला. तो जेव्हा युद्ध-भूमीकडे निघाला तेव्हा अनेक राक्षस-योद्धे निरनिराळी आयुधे धारण करून मोठ्या आनंदाने त्याच्या मागे निघाले.

इंद्रजित युद्ध-भूमीवर पोचला. एकादा दिव्य रथ प्राप्त व्हावा म्हणून यज्ञ करण्याचा त्याने विचार केला. त्याने चारी बाजूंना पहारेकरी नेमून मंत्रोच्चार करीत अग्नीत होम केला. त्याचा होम चालू असताना धूर दिसला नाही. फक्त वर येणाऱ्या मोठ-मोठ्या ज्वाला दिसल्या.

यानंतर इंद्रजितने ब्रह्मास्त्राचे स्मरण करून आपले धनुष्य, रथ व अन्य आयुधांना मंत्रित केले. अशा रीतीने होम संपला. मग इंद्रजित आपला रथ, आयुधे व सारथ्यासह आकाशात अंतर्धान झाला.

राक्षसांचं सैन्य घोडे व रथांसह युद्ध-भूमीकडे निघाले. निरनिराळ्या शस्त्रांचा उपयोग करून राक्षस वानरांशी युद्ध करू लागले. त्यांना प्रोत्साहन देण्यासाठी इंद्रजितने आवेशयुक्त स्वरात तेजस्वी उपदेश केला. राक्षस उत्साहाने लढू लागले. शेवटी इंद्रजित स्वतः युद्धभूमीवर दाखल झाला. एकेक तडाख्यात पाच-सहा वानरांना जो मारू लागला. केवळ सामान्य वानरांनाच नव्हे, तर अनेक वानर-वीरांना ही अत्यंत निर्दयपणे त्याने खाऊन टाकले. गंधमादन, नल, मैंद, गज, सुग्रीव, ऋषभ, अंगद, द्विविद इत्यादि त्याच्या बाणांनी घायाळ झाले. पण अदृश्य इंद्रजितला ते पाहू मात्र शकत नव्हते.





इंद्रजित जे बाण फेकत होता त्यातील काही राम व लक्ष्मण यांना ही लागले. तेव्हा राम लक्ष्मणाला म्हणाला-"हा इंद्रजित अदृश्य स्वरूपात युद्ध करीत आहे. म्हणून आपण त्याला मारू शकत नाही. त्याचे बाण लागून आपण बेशुद्ध झाल्यासारखं दाखवू या. म्हणजे तो खुश होऊन लंकेत परत जाईल."

लगेचच इंद्रजितच्या बाणांनी राम व लक्ष्मण दोघे ही मूर्च्छित होऊन जमिनीवर पडले. ते पाहून अत्यानंदाने इंद्रजित लंकेकडे परत फिरला.

हनुमान विभीषणाला म्हणाला-"इंद्रजितने ज्या अस्त्राचा उपयोग केला, ते ब्रह्मास्त्र आहे. त्यामुळे किती वानर मृत्यु-मुखी पडले याचा आपण छडा लावला पाहिजे."

हनुमान आणि विभीषण जळती लाकडे हाती घेऊन युद्ध-भूमीवर शोध घेऊ लागले. त्यांना जांबवान जिवंत असलेला दिसला. विभीषणाने त्या वृद्धाला विचारले-"जिवंत आहेस न?"

जांबवानच्या दृष्टीवर परिणाम झालेला होता. त्याने विभीषणाला विचारले- "सांग, हनुमान जिवंत आहे ना?"

"राम व लक्ष्मण यांच्याबद्दल न विचारता तू हनुमानासंबंधी का विचारीत आहेस?" विभीषणाने जांबवानला विचारले.

जांबवान म्हणाला-"बेटा विभीषणा, हनुमान जिवंत असेल तर सर्व वानर-सेना नष्ट झाली तरी काही बिघडणार नाही. पण जर तो मेला, तर सारी वानर-सेना जिवंत असली तरी मेल्यासारखीच आहे."

वृद्ध जांबवान जेव्हा असं म्हणाला तेव्हा स्वतः हनुमान पुढे आला आणि त्याने जांबवानाला पद-स्पर्श करून त्याची अभिवंदना केली. तेव्हा जांबवान हनुमानाला म्हणाला-"पुत्र हनुमान, आता वानरांचं संरक्षण तूच केलं पाहिजेस, तुझ्याशिवाय दुसरं कोणी ही

हे काम करू शकणार नाही."

राम व लक्ष्मण यांना शुद्धीवर आणण्यासाठी जांबवानने हनुमानाला एक उपाय सांगितला-

"तू समुद्रावरून उडून हिमालयावर जा. तेथे तुला कांचन व कैलास ही अत्युच्च शिखरे दिसतील. या दोन शिखरांच्या मध्य-भागी एक औषधि-पर्वत आहे. या पर्वताच्या शिखरावर चार दिव्य औषधि आहेत या औषधि-वनस्पतींतून एक प्रकारचा दिव्य प्रकाश बाहेर पडतो. या वनस्पतींची नावे आहेत- विशल्यकरणी, मृतसंजीवनी, सुवर्णकरणी नि संधानकरणी. या चारी वनस्पतींना घेऊन तू लवकर परत ये. त्यांचा उपयोग करून या वानरांना ही आपण जिवंत करू. जा झटपट जाऊन ये."

हनुमान लगेच तिथून निघाला व वायुवेगाने आकाशातून मार्ग आक्रमू लागला. नद्या, जंगल, पर्वत पार करीत करीत तो हिमालयाकडे जाऊ लागला. अशा रीतीने अत्यंत तीव्र गतीने हनुमान नगाधिराज हिमालयावर पोचला.

हिमालयावर पोचताच हनुमानाला उंच-उंच पर्वत-शिखरे दिसू लागली. अनेक आश्रम व मुनि-वाटिका ही त्याला दिसल्या. ब्रह्मकोश, कैलास पर्वत, इंद्राची तपोभूमि, रूद्रबाण, मोक्ष-स्थान, हयग्रीव-क्षेत्र आणि ब्रह्मकपाल इत्यादि प्रदेश त्याला तेथे दिसले. ब्रह्माने इंद्राला जिथे वज्र दिले ती जागा, कुबेराचे स्थान, ब्रह्मासन आणि शिवधनु क्षेत्र ही त्याने पाहिले. शेवटी कांचन-पर्वत व कैलास-पर्वत यांच्या मधे असलेला औषधि-पर्वत ही हनुमानाला दिसला. या पर्वतावरील औषधि-वनस्पतीतून एक अद्भुत प्रकाश बाहेर पडताना त्याने पाहिला.





# झोपेचे औषध

पूर्वीच्या काळी काश्मीरमधे वज्रगुप्त नावाचा एक सौदागर रहात असे. व्यापारात त्याला लाखो रुपये कमाई होई; तरीही तो नेहमी अतृप्तच दिसे. त्याची ही अतृप्ति दिवसेंदिवस वाढतच चालली अन् त्यामुळे त्याला झोपही लागेनाशी झाली.

एकदा शेजारच्या गावी राहणारा वज्रगुप्तचा मित्र जयानन्द त्याला भेटायला आला. जयानन्द हा एक सामान्य माणूस होता. तो जे काही मिळवी, त्यातच ओलं-कोरडं खाऊन आपल्या मुलांबाळांसह सुखाने दिवस घालवी. तो जीवनात नेहमी संतुष्ट असे. त्यामुळे उशीला डोके टेकले की त्याला गाढ झोप लागे.

आपल्याला झोप न येण्याची अडचण सांगून वज्रगुप्तने जयानन्दला ती दूर होण्याचा मार्ग माहीत असल्यास सांगायची विनंती केली.

जयानन्दने मित्राची समस्या लक्षपूर्वक ऐकून घेतली. नंतर हसत तो म्हणाला, "तुझ्या डोळ्यातली झोप का उडून गेलीय, हे ओळखलंय मी. तू असं कर-काही दिवस तू आपला व्यापार आणि त्यातल्या अडचणी वगैरेबद्दल विचारच करायचा सोडून दे. वेळ घालवण्यासाठी इतर काही असं काम करत रहा, की ज्याच्याबद्दल तुला काही विचार वगैरे करावा लागणार नाही. असं झालं, की झोप तुला शोधत झक्कत येईल. हाच तुझ्या अडचणीचा उपाय."

इतक्यात बाहेरून काही जनावरांच्या ओरडण्याचा आवाज ऐकू आला, अन्

**पुरुषोत्तम बापट**



पाठोपाठ त्यांच्या मागून येणाऱ्या गुराख्यांचा आवाजही जयानन्दला ऐकू आला. त्याने विचारले, "अरे, तुझ्या गल्लीत हा कसला आवाज?"

"अरे काय सांगू! मैदानात चरायला जाणाऱ्या बकऱ्यांचे कळप रोज याच रस्त्याने जातात. दुसरी वाटच नाही." वज्रगुप्त म्हणाला.

काहीसा विचार करून जयानन्द वज्रगुप्तला म्हणाला, "अरे मग अद्यापासून तू एक काम कर. दिवसभर कट्ट्यावर बसून मैदानात चरायला जाणाऱ्या या बकऱ्या तू मोजत जा, अन् रोज अशा किती बकऱ्या चरायला जातात ते पाहून ठेवत जा. बास, असलं काही निरुपयोगी काम केलंस, की तुला चांगली झोप येईल. मी पुन्हा तुला भेटायला येईन, तेंव्हा तुला माझ्या या अुपायाचा फायदा झाला की नाही, ते पाहीन." असे म्हणून जयानन्द निघून गेला.

दोन आठवड्यांनंतर जयानन्द आला. तेंव्हा त्याला असे दिसून आले की वज्रगुप्त खूपच थकलेला दिसत असून त्याचे डोळेही अगदी विस्तवासारखे लाल झालेले आहेत! जयानन्दने आश्चर्याने त्याला विचारले, "काय वज्रगुप्त! माझ्या उपायाचा तुला काही अुपयोग झालेला दिसत नाही! झोप नाहीच येत न तुला?"

"अरे, कसली आलीय झोप? इतकं भाग्य कुठलं माझं? तुझ्या सल्ल्याप्रमाणे इथे कट्ट्यावर बसून मी रोज विचार करतो की बकऱ्या मोजण्यात कुठे चूक तर होत नाही ना! म्हणून मी मैदानात जाअून, तलावाच्या किनारी अुभा राहून खूप एकाग्रतेने अन् सावधपणे मोजणी करू लागलो. आश्चर्याची गोष्ट अशी की या शहरात बरोब्बर एक हजार बकऱ्या आहेत!" वज्रगुप्त अुत्तरला.

"एक हजार बकऱ्या! इतकी बरोब्बर मोजणी केलीस तू? वेळ घालवण्यासाठी करायच्या कामात इतकी एकाग्रता अन् सावधगिरीची काय जरूर?" जयानन्दने विचारले.

यावर वज्रगुप्त म्हणाला, "अरे मोजणी म्हणजे शेवटी मोजणीच ना? त्यात चूक नाही होता कामा! एक हजार बकऱ्या एकाच वेळी पाहून माझ्या मनात तर असाही विचार आला की यांच्यापासून कमीत कमी चार हजार शेर तरी लोकर मिळत असावी!"

हसतच जयानन्द म्हणाला, "मी तर तुला केवळ बकऱ्या मोजायलाच सांगितल्या होत्या. त्यांच्यावर खर्च किती होईल, किंवा त्यांच्यापासून लाभ किती होईल याचा विचार करायला कुठे सांगितलं होतं?"

"अरे जयानन्द तुला तर माहीतच आहे की येथे लोकरी कपडा विणणारे चांगले कलावन्त विणकर आहेत. ती लोकर जर त्यांच्या हाती दिली, तर ते कमीत कमी दोन हजार वार लोकरीचं कापड तयार करून देतील आपल्याला. एक वार कापड आपण -कमीत कमी दोन मोहोरांच्या भावाने विकू शकू; आणि----" अशीच काही व्यापारासंबंधी माहिती वज्रगुप्त पुढे सांगणार, इतक्यात जयानन्दने त्याला मधेच थांबवले.

"हं, आता आणखी पुढे काही सांगायची जरूर नाही." जयानन्द म्हणाला, "विणून तयार होअून जे दोन हजार वार लोकरीचं कापड येईल, ते दुकानात विकायला ठेवून बसलास, तर



झोप कशी येणार तुला? तो सारा माल विकला गेला अन् तुझ्या हाती सारा पैसा आला, तरच झोप लागणार न तुला?''

जयानन्दच्या बोलण्यातले छुपे व्यंग आणि टोमणे यामुळे वज्रगुप्तचे मन दुखावले; तो काही बोलणार, इतक्यात त्याला थांबवत जयानन्द म्हणाला, ''वज्रगुप्त, तुझ्या घरापुढून जाणाऱ्या बकऱ्या, तुझ्या स्वतःच्या नाहीत, अन् तुझा व्यापारही लोकरी कापड विणण्याचा नाही, हे काय तुला माहीत नाही? आपल्या भोवतालचं सारंच वातावरण, प्रत्येक वस्तु यांच्याकडे फक्त व्यापारी दृष्टीने पहाणं, अन् जे काही काम करशील त्या सर्वांतून काही लाभ मिळवू पाहणं ही तुझी सवयच होऊन गेली आहे. त्यामुळेच निरर्थक मोजणी अन् हिशोब-ठिशोब, यात तुझी झोप अडून चाललेली आहे. ही गोष्ट मी अगदी पहिल्यानेच ओळखली, अन् तुझं मन व्यापारातून दूर जावं असा प्रयत्न केला मी! पण शेवटी माझाच पराजय झाला! तुझी अडचण दूर करणं हे माझ्या हातातलं नाही, ही गोष्ट कबूल करतो मी!''

''असं नव्हे जयानन्द! तू माझी अडचण दूर केलीस. तुझ्या कृपेमुळे अतृप्ति आणि सुखनिद्रा यांच्यातला संबंध अगदी आत्ताच लक्षात आला माझ्या! या रोगाचं औषध काय, ते ही ओळखलं मी तू काही न सांगताच!'' वज्रगुप्त अुत्साहाने म्हणाला.

''असं? सांग बरं काय ते!'' जयानन्दने हसत विचारले.

''मी आजच माझा सारा कारभार आपल्या मुलांवर सोपवून बाकीचं आयुष्य तुझ्यासारख्या चिन्तारहित मित्रांबरोबर व्यतीत करीन. हेच माझ्या आजाराचं औषध!'' असे म्हणून वज्रगुप्तने मोठ्या प्रेमाने जयानन्दला मिठी मारली.





# ब्रह्मराक्षस

एका गावात एक दुष्ट जमीनदार रहात असे. गावच्या जवळच जंगल होते. या जंगलातून जा-ये करणाऱ्या लोकांना आपल्या माणसांकडून ठार मारवून, त्यांची धन-दौलत, मूल्यवान वस्तु वगैरे हा जमीनदार लुटत असे.

एकदा एक पंडित तेथील राजाकडून सन्मानित होऊन, त्या दुष्ट जमीनदाराच्या गावाजवळील जंगलातून परत जात होता. पण जमीनदाराचे हस्तक अचानक त्या ब्राह्मणावर तुटून पडले. त्या दुष्ट लोकांनी ब्राह्मणाला ठार मारून त्याला सन्मानार्थ मिळालेले धन घेऊन तेथून पोबारा केला.

जमीनदाराच्या लोकांनी त्यापूर्वी ब्राम्हणाचे प्रेत जंगलात कुठेसे पुरूनही टाकले होते, त्यामुळे ब्राह्मणाचे काय झाले, हे कधीच कोणाला कळले नाही.

या मृत ब्राह्मणाला एक मुलगा होता. या मुलाचा मुलगा, म्हणजेच मृत ब्राह्मणाचा नातु आपल्या बापाच्या आज्ञेवरून एका गुरुकुलात शिकण्यासाठी निघाला होता.

रस्त्यात मुलाला एक वृध्द ब्राह्मण दिसला. तो मुलाला म्हणाला, ''बाळा, जरा माझ्याबरोबर चल. मी तुला चांगली मदत करणार आहे.'' मुलाला घेऊन ब्राह्मण एका दाट झाडाच्या मागे गेला अन् त्याला तिथेच खाली बसवून, स्वतः झाडाखाली खोदू लागला. त्या जागेतून नंतर त्याने एक पितळी गडवा बाहेर काढला. त्याचे तोंड कपड्याने बांधलेले होते.

ते पात्र मुलाच्या हाती देऊन वृध्द ब्राह्मण त्याला म्हणाला, ''बाळा, या गडव्यात सोन्याची नाणी आहेत. नीट संभाळून ने. रात्री तिथल्या जमीनदाराकडे मुक्काम करून, सकाळी आपली वाट

**(चान्दोबात २४ वर्षांपूर्वी प्रकाशित झालेली गोष्ट)**



सुधार." इतके सांगून वृध्द तिथून निघून गेला.

मुलाने भांड्यावर बांधलेले फडके सोडून पाहिले. तेंव्हा त्याला खरोखरच त्यात सोन्याची नाणी आढळली.

गावात तो पोचला तेंव्हा चहूकडे अंधार पसरला होता. वृध्द ब्राह्मणाच्या सूचनेप्रमाणे जमीनदाराकडे त्याने रात्री मुक्कामाची परवानगी विचारली. जमीनदाराने ती दिली.

मुलगा झोपल्यावर जमीनदाराने सहज म्हणून गडव्याचे फडके सोडून पाहिले. आतली सोन्याची नाणी पाहून तो थक्कच झाला! नाणी त्याच्याकडे कशी आली हे मुलाला अुठवून तो विचारू शकला असता. जमीनदाराला तेवढा हक्क असतोच. पण लोभ सुटून जमीनदारने ती नाणी हडप करण्यातच शहाणपणा मानला, मुलाला विचारायची काय गरज?

गडव्यातली नाणी चोरून जमीनदाराने वरचे फडके होते तसे बांधून टाकले आणि तो आपल्या खोलीत जाअून शान्तपणे झोपून गेला.

सकाळी झोपून अुठल्याबरोबर मुलाने प्रथम आपला गडवा पाहिला. पण तो त्याला हलका वाटला. त्याने वरचा कपडा सोडून पाहिले, तर नाणी गायब! भांडं एकदमच मोकळं! ताबडतोब जमीनदाराजवळ जाअून त्याने विचारले, "मालक, माझे हे भांडे सोन्याच्या नाण्यांनी संपूर्ण भरलेले होते, पण आता ते रिकामं दिसतंय. माझी नाणी कोणीतरी चोरली आहेत."

यावर एकदम रागावून जमीनदार ओरडला, "काय बडबडतोयस? माझ्यावरच चोरीचा आळ घेतोस? या गुन्ह्यासाठी मी आत्ताच तुला फाशी देववतो." नंतर आपल्या नोकरांना त्याने मुलाला तळघरात कैद करून ठेवायला सांगितले. नोकर मुलाला बकोटी धरून घेअून गेले.

नंतर आपल्या बोलण्याला नेहमी मान तुकवणाऱ्या गावातल्या चार वडीलधाऱ्या माणसांना त्याने बोलवून घेतले. त्यांना सर्व हकिकत सांगून तो म्हणाला, "या मुलाला फाशी देणंच योग्य, असं वाटतं मला. तुमचा काय विचार आहे?"

ते सारेजण मुक्त कंठाने म्हणाले, "यात काय संशय? या धूर्ताला नक्कीच फाशी द्यायला हवं. नाहीतर हा एवढासा पोरगा आपल्या बाबत काहीच्या काही बरळत राहील."

बास ! गावात मुलाच्या फाशीबद्दल दवंडी पिटवण्यात आली. संध्याकाळी वध-स्थानी लोकांची गर्दी जमली. नंतर मुलाला तेथे आणले गेले. फाशी अंमलात आणण्यासाठी स्वतः जमीनदारही तेथे हजर झाला.

तेंव्हा जमलेल्या लोकांच्यातून एका ब्राह्मणाने पुढे येअून जमीनदाराला विचारले, "या मुलाला फाशी का दिलं जात आहे? असा काय गुन्हा केलाय या एवढ्याशा मुलाने?"

"हे विचारणारा तू कोण?" जमीनदाराने अुलट ब्राह्मणालाच गरजून विचारले.

"मी?" हसतच ब्राह्मण अुत्तरला, "मी आजा या मुलाचा!"

"असं? मग ऐक तर! तुझ्या या नातवानं माझ्यावर चोरीचा आळ घेतलाय. रात्री मी याला झोपायला जागा दिली, अन् सकाळी हा मला म्हणतो-मी याची सोन्याची नाणी चोरलीत! माझ्यावर हा असा चिखल अुडवला त्यानं! म्हणूनच त्याला ही कठोर शिक्षा देत आहे मी!" जमीनदार अुत्तरला.

आता ब्राह्मण म्हणाला, "ठीक आहे. मग तुम्हीही दिव्य करून दाखवा. म्हणा, की मी खरोखरच याची नाणी चोरली असली, तर ब्रह्मराक्षस मला अुचलून नेवो!"

यावर जमीनदार ऐटीत म्हणाला, "हो, मला काय भीती? तुम्ही म्हणता तसंच करतो.—मी याचं सोनं हडपलं असेल तर ब्रह्मराक्षस मला अुचलून नेवो!"

दुसऱ्याच क्षणी ब्राह्मण वायुवेगाने जमीनदाराला पकडून आकाशात अुडून घेअून गेला! जमीनदाराचे पुढे काय झाले हे कोणाला कधीच कळले नाही.





# पक्षपात

**वि**शालपुरमधे जानकीबाई नावाची एक श्रीमन्त बाई रहात असे. तिला दोन मुलगे व एक मुलगी होती. जानकीबाईने आपल्या जमीन-जुमल्याचे नीटपणे रक्षण करून आपल्या मुलांना नीटपणे वाढवले व त्याच गावात चांगली स्थळे पाहून त्यांचे विवाहही करून दिले.

जानकीबाईच्या थोरल्या मुलाला दोन मुलगे अन् धाकट्याला एक मुलगा व एक मुलगी अशी मुले झाली. तिच्या मुलीलाही एक मुलगी झाली. म्हणतात नं, की "मुद्दलापेक्षा व्याजच जास्त प्यारं असतं." त्याचप्रमाणे जानकीबाईला आपल्या मुलांपेक्षा नातवंडेच अधिक प्यारी वाटत.

नातवंडे मोठी होऊ लागली. तिची मुले जेंव्हा आपल्या मुलांच्या शिक्षणाबद्दल काळजी करू लागली तेंव्हा जानकीबाई त्यांना म्हणाली, "इथल्या इस्टेटीची व्यवस्था तुम्ही पहा. मी मुलांना घेऊन शहरात राहीन. चांगल्या शाळेत त्यांना दाखल करीन. एकादे घर भाड्याने घेता येईल तिथे. दर सुट्टीला पुन्हा इथे एकत्र येऊ."

दोन्ही मुलांनी मुक्तपणे आपली संमती देत म्हटले, "आई, तू जसं आम्हाला शिस्तीत वाढवलंस तसंच यांनाही तुझ्याच हातून वाढवून, शिकवून मोठं कर. चांगल्या वर्तणुकीचे धडे दे."

नातवंडांना घेऊन जानकीबाई शहरात गेली अन त्यांना तिने एका उत्तमशा शाळेत दाखल केले. सर्व जण एका भाड्याच्या घरात राहू लागले. काही दिवसांनी जानकीबाईची मुलगी व जावईही आपल्या मुलीला घेऊन तिच्याकडे गेले.

मुलगी आईला म्हणाली, "आई, तू या चार नातवंडांना जसं इथं राहून शिकवत आहेस, तसंच माझ्याही लेकीला ठेवून घे. तिलाही शिकव. तुझे जावईबुवा अन् मी हीच मदत मागायला तुझ्याकडे आलो आहोत."

जानकीबाईने त्यांची विनंती मान्य करून त्या नातीलाही ठेवून घेतले. पण त्या दिवसापासून तिच्या इतर नातवंडांच्या लक्षात आले की आपली आजी या नातीच्या बाबतीत खूपच पक्षपात करते आहे. सर्व मुलांना एकाच पंक्तीला जेवायला वाढले, तरी आपल्या या नातीच्या पानात मात्र ती इतरांपेक्षा दही, तूप वगैरे जास्त वाढत असते! तिने जास्तीचे काहीही मागितले, तरी लगेच आजी तिला देते. ही गोष्ट त्या मुलांच्या मनात खटकू लागली. परंतु आजीबद्दल आदर असल्याने अन् थोड्याशा भीतीने कोणीच काही बोलले नाही. जानकीबाईच्या सर्वात मोठ्या नातवाला मात्र याबद्दल काहीच वाटत नव्हते. त्याला हा प्रकार मुळीच गैर वाटला नाही.

सुट्टीला सर्वजण परत विशालपुरला गेले. थोरला विवेक सोडून बाकीच्या नातवंडांनी आपापल्या आईजवळ आजीच्या पक्षपाताबद्दल तक्रार केली.

यावर दोघीही सुनांनी ठरवले की

सुजाता अग्रवाल



याबद्दल सासूला जाब विचारायचाच! पण विचारण्यापूर्वी दोघींनी विवेकला नीट हकिकत विचारली.

विवेक म्हणाला, "मला तर आजी काही पक्षपात करते, असं वाटत नाही. मामीच्या मुलीला ती काहीही जास्त वाढत असली, तरी आमच्या समोरच वाढते नं? लपवून लपवून तर काही देत नाही ना?"

"तेच तर विचारतेय मी. तिला जास्त काय म्हणून? तुम्हालाही तितकंच वाढू शकतात नं त्या? मग हा त्यांचा पक्षपात नव्हे तर काय?" विवेकच्या आईने त्याला विचारले.

तरीही नकारात्मक मान हलवत विवेक म्हणाला, "तसं नाही आई! काहीही असलं तरी आपण आपली आजी ही 'आपली' मानतो. पण मामीच्या मुलीचं तसं नाही. ती किती झालं, तरी परक्या घरची! त्यामुळे तिच्यावर जरा जास्त प्रेम दाखवलं अन् काही जास्त वाढलं तरी आपलं काय जातंय असं?"

यावर सुना काही बोलणार, इतक्यात शेजारच्याच खोलीत हा सर्व संवाद ऐकत असलेली जानकीबाई तेथे येऊन सुनांना म्हणाली. "पहा, विवेक तसा लहानच आहे अजून. पण माझ्या पक्षपाताबद्दल त्यानं काही तक्रार नाही केली. त्यानं खरं कारण शोधायचा प्रयत्न केला. ठीक आहे, हा प्रश्नही मिटवून टाकू या. आपण काही इतकी दरिद्री नव्हे, की जास्तीचं दूध-तूप खरेदी करू शकत नाही! मी यापुढे नीट लक्ष ठेवीन की माझ्या नातवंडांना तक्रार करायला काही जागा राहणार नाही."

जानकीबाईच्या या बोलण्याने सुनांचा राग पळून गेला अन् आपण उगीचय 'पराचा कावळा' केल्याबद्दल वाईटही वाटले!



# बहुरूपा वसुन्धरा :



## पोर्तुगीज योद्धा

'पोर्तुगीज योध्या' चा युद्धाशी काहीही संबंध नसून तो एक समुद्री प्राणी आहे. याची सर्वसाधारण लांबी ३० सें.मी. व जाडी १५ सें.मी. असते. याच्या डोक्यवरील तुऱ्यासारखा भाग एकाद्या नावेच्या शिडासारखा दिसतो. साधारणतः १८ व्या शतकात याचे अस्तित्व जेंव्हा नावाड्यांच्या लक्षात आले, तेंव्हा त्यांना याचा आकार पोर्तुगीज युद्धनौकेसारखा भासला; अन् त्याला नाव मिळाले 'पोर्तुगीज योद्धा'! पाण्याच्या पातळीवर त्याच्या शिडाचे फक्त टोकच दिसते. परंतु त्याखाली मात्र 'पोळिप्स' नावाच्या लहान लहान जंतूंची वसाहतच वसलेली आढळून येते. त्यातील लांब असणारे जंतु आहार पकडण्याचे काम करतात व छोटे जंतु तो पचवतात. हे छोटे किडे या प्राण्याच्या स्पर्श श्रृंगासारखे काम करतात. शिडासारख्या भागात हवा भरलेली असते व त्यामुळे हा प्राणी पाण्यावर तरंगू शकतो.

## कफ्फा पासून कॉफी

कॉफीला तिचे नाव इथिओपियातील एक प्रान्त 'कफ्फा' पासून मिळाले. तेथे मेंढपाळांना एकदा असे दिसून आले की एका विशिष्ट झुडुपाची फळे खाल्ली की त्यांच्या मेंढ्या मोठ्या उत्साहाने आपल्या मागील टांगांवर जोरजोरात उड्या मारतात! स्वतः मेंढपाळांनीच मग ती फळे चाखून पाहिल्यावर त्यांना आपल्या शरीरात नवा उत्साह संचरतो असे आढळून आले. त्यांनी थोडी फळे एका पाद्र्याला नेऊन दिली. त्याने फळांपासून दारु बनवली. जेंव्हा ती दारु पाहिली गेली तेंव्हा लोकांच्या लक्षात आले की या दारुमुळे झोप पळून जाते, म्हणजेच थकवा नाहीसा करता येतो. या फळाला ते लोक 'कफ्फी' म्हणू लागले. कारण त्या फळांचा कफ्फा या प्रांताशी संबंध होता.





## ऊदमांजराचा इशारा

ऊदमांजरे (बीव्हर) नदीनाल्यांच्या किनाऱ्यावरील उंच-उंच झाडे आपल्या तीक्ष्ण दातांनी अशा तऱ्हेने तोडतात की झाड पाण्यावर आडवे पडावे. अशा तऱ्हेने पाण्यावर एक बांध तयार होतो. झाड पाडले जाते तेव्हां इतर प्राणी त्या खाली चिरडून मरु नयेत म्हणून ऊदमांजरे त्यांना इशारा देण्यासाठी आपल्या शेपट्या पाण्यावर जोरजोराने आपटत फिरतात, त्यामुळे विशेषतः इतर ऊदमांजरांना सूचना मिळते व ती ताबडतोब पाण्यात उड्या मारून वेगाने पोहत सुरक्षित स्थानी पळून जातात. हे "बीव्हर" म्हणवले जाणारे प्राणी १५ मिनिटांपेक्षा अधिक काळ पाण्यात राहू शकत नाहीत.




# भारताचे नवे राष्ट्रपति





आजपर्यंत उप-राष्ट्रपति पदावर असलेले डॉक्टर शंकर दयाळ शर्मा मागील २५ जुलैला भारताचे नवे म्हणजे नववे राष्ट्रपति म्हणून निवडले गेले. देशाच्या या सर्वोच्च पदावर ते आता पांच वर्षे राहतील. केन्द्रीय संसदेचे सभासद व राज्यीय संसदांचे सभासद मिळून राष्ट्रपति निवडतात. या वेळी सत्ताधारी कांग्रेस व विरोधी दलांनी एकमताने राष्ट्रपतींची निवड करावी असा प्रयत्न विरोधी दलांनी केला. पण या प्रयत्नात त्यांना सफलता मिळाली नाही, म्हणून राष्ट्रपति पदासाठी निवडणुकीची व्यवस्था करण्यात आली. सत्तारूढ कांग्रेसच्या वतीने डॉ. शंकर दयाळ शर्मा आणि विरोधी दलांच्या वतीने दलित वर्गाचे प्रा. जी. जी. स्वेल निवडणुकीत उभे राहिले. प्रत्यक्ष निवडणूक होण्यापूर्वीच काय होणार याचा अंदाज सर्वांनी केला होता की विजय डॉ. शंकर दयाळांचाच होणार. आणि झाले ही तसेच!

डॉ. शंकर दयाळ शर्मा यांचा जन्म सन १९१८ मध्ये भोपाळ येथे झाला. सन १९३१ मध्ये केंब्रिज विश्व-विद्यालयातून इंग्रजी व